# ज्ञानगंगा

[ प्रकाण्डपंडित वेदशास्त्रसंपन्न श्रीपादशास्त्री जेरे यांची
श्रीमद्भगवद्गीतेवरील प्रवचने ]

किंमत ३५ रुपये

प्र व च न मं ड ळ , को ल्हा पू र .

**प्रकाशक :**

स. ब. कुलकर्णी, दुधगावकर वैद्य
प्रवचन मंडळ, कोल्हापूर.

**प्रथमावृत्ति :** शके १८९६

पुस्तके मिळण्याचे ठिकाण :

१) म[illegible]      श्री. ना. इ. कोटभागे, वॉचमेकर
[illegible] कोल्हापूर      [illegible] रोड, कोल्हापूर.

२) एस्. वाय् कुलकर्णी,
एस् यशवंत कंपनी,
शिवाजी उद्यमनगर, कोल्हापूर.



**मुद्रक :**

गोविंद वामन कुलकर्णी
सेवा मुद्रणालय, १६७ बी,
कोल्हापूर.

# प्रकाशकांचे–निवेदन

परमपवित्र भगवद्गीतेवरील पं. श्रीपादशास्त्री जेरे यांचा 'ज्ञानगंगा' हा ग्रंथ वाचकांच्या हाती देताना प्रवचन मंडळास अत्यंत आनंद होत आहे. या ग्रंथ निर्मितीच्या रूपाने आमच्याकडून जी कांही वेडीवाकडी सेवा घडली आहे ती गीतामाऊली मान्य करून घेईल याबद्दल शंका नाही. परम कृपाळू भगवान गोपाळकृष्णानेच आमचेकडून हे कार्य करवून घेतले आहे अशी आमची श्रद्धा आहे.

पं. श्रीपादशास्त्री जेरे यांची गीतेवरील प्रवचने इतकी रसाळ असतात की ती पुनः पुनः ऐकली तरी कंटाळा येत नाही. शास्त्रीजींना त्रास न देता ती वरचेवर ऐकता यावी यासाठी त्यांची प्रवचने ध्वनिमुद्रित करून ठेवावी अशी कल्पना प्रवचन मंडळाचे वयोवृद्ध अध्यक्ष श्री. स. ब. कुलकर्णी–दुधगांवकर वैद्य यानी सुचविली वयोमानामुळे त्यांना स्वतःला ती कल्पना प्रत्यक्षात आणणे अशक्य आहे असे दिसून आल्यावर श्री. स. य. कुलकर्णी–कळंबेकर यानी ते काम मनावर घेतले. पहिले काम या योजनेस पं. जेरे शास्त्री यांची अनुमती मिळविणे हे होते. प्रसिद्धीपराङ्गमुख असलेले शास्त्रीजी या गोष्टीस मान्यता देतील की नाही याबद्दल आम्हाला खात्री वाटत नव्हती. परंतु असंख्य श्रोत्यांची विनंती ते धुडकावून लावणार नाहीत अशी आशाही होती आमची आशा खरी ठरली व पंडितजींनी पुनः प्रथमपासून गीतेवर निरूपण करण्यास व ते ध्वनिमुद्रित करण्यास मान्यता दिली.

या कामासाठी ध्वनिमुद्रणाचे यंत्र खरीदणे किंवा भाड्याने घेणे मंडळाच्या आवाक्याबाहेरचे होते. कोणाचे खाजगी यंत्र मिळाले व ते त्याने वापरण्यास दिले तरच हे काम होणार होते. पं. जेरे यांची नेहमीची प्रवचने ज्या गुरुमहाराज वाड्यांत चालतात त्या वाड्याचे मालक श्री यशवंतराव महाराज यांचेकडे ध्वनिमुद्रणाचे यंत्र आहे असे कळले. त्यांना विनंती करताच त्यांनी आनंदाने प्रवचनें ध्वनिमुद्रण करून देण्याची जबाबदारी स्वीकारली. त्यासाठी लागणारे टेप फक्त मंडळास घ्यावे लागणार होते. पण त्यासही बराच खर्च येणार होता.

नेहमीच्या प्रवचनाच्या वेळी श्रोत्यांना त्यासाठी द्रव्यसहाय्य करण्याची विनंती करताच श्रोतृवर्गातील एका भगिनीने पहिली मदत दिली. त्या भगिनीचे नाव विचारता त्यानी फक्त पांडुरंग असे सांगितले. ही घटना म्हणजे पांडुरंगाचा

आशीर्वादच अशी खात्री होऊन मंडळ उत्साहाने कामास लागले. टेप घेण्यासाठी अनेक श्रोत्यांनी उदारहस्ते मदत केली. पहिले प्रवचन ज्येष्ठ व|| एकादशी शके १८९४ ( ७-७-७२ ) रोजी ध्वनिमुद्रित करण्यात आले. नऊ अध्यायावरील प्रवचने होईपर्यंत काम सुरळीत चालू होते. पण पुढे ते यंत्र नादुरुस्त झाले व यंत्र पूर्ववत् होण्यास बराच कालावधी लागणार असे दिसू लागल्यावर दुसऱ्या यंत्राचा शोध सुरू केला. अशा वेळी शाहूपुरीतील श्री. पद्माकर नरहर आरणके हे आमच्या मदतीस धावून आले व त्यानी हे कार्य तडीस नेले. श्री. यशवंतराव महाराज व श्री. आरणके यानी आत्मीयतेने व विनामूल्य हे काम केले म्हणूनच ते पूर्णतेस गेले.

ध्वनिमुद्रणाचे काम चालू असता या प्रवचनांचा एक ग्रंथही तयार करावा अशी कल्पना निघाली. कारण ध्वनिमुद्रिते ऐकायची झाली तर पुन: यंत्राची सोय पाहिजे व ते सर्वांना व पाहिजे तेव्हा जमेलच असे नाही. सर्वसामान्य व्यक्तीस त्याच्या सवडीनुसार गीतार्थ समजून घ्यायचा असेल तर त्यासाठी ग्रंथच उपयोगी पडेल. या कल्पनेस पंडितजीनीही मान्यता व आशीर्वाद दिले. सर्व प्रवचने संग्रहित करावयाची तर ग्रंथही मोठा होणार व त्यास खर्चही फार येणार तरी तुम्ही या फंदात पडू नये असाही सल्ला काही हितचिंतकानी दिला. पण भगवंताच्या मनात असेल तर तो आमचा संकल्प सिद्धीस नेल्याशिवाय राहणार नाही अशा विश्वासाने द्रव्याची जोडणी करण्यास सुरवात केली. पंडित जेरेशास्त्री यांच्यावरील श्रद्धेमुळे करवीर नगरीतील सर्वश्री पंत बालावलकर, नानासाहेब गद्रे, व मेहता आणि कंपनीचे मालक हरिश्चंद्रभाई मेहता व शिंदे कॉंट्रॅक्टर या दानशूर मंडळीनी प्रत्येकी हजार रुपये देऊन आम्हास प्रोत्साहन दिले. सर्वश्री अनिलराव कोरगांवकर, चंदूलाल गोडीदास, डॉ. भद्रे, डॉ. वझे, महादबा शेळके, भालजी पेंढारकर यांनीही उदारहस्ते मदत दिली. याशिवाय असंख्य मंडळीकडून आम्हास द्रव्यसहाय्य झाले आहे. त्या सर्वांचा जागेअभावी येथे नामनिर्देश करता येत नाही. या सर्वांच्या मदतीमुळे व सदिच्छेमुळेच हा ग्रंथ प्रसिद्ध होऊ शकला यात शंका नाही. द्रव्य गोळा करण्याच्या कामी श्री. कळंबेकर व श्री. कोटबागे यानी या वयांत तरुणही लाजतील असे कष्ट केले. त्यांना श्री. देशपांडे व श्री. शामराव दत्तात्रय पाटील यांनीही आत्मीयतेने सहाय्य केले. कै. डॉ. ल. ज. नागावकर यांनीही द्रव्य सहाय्यासाठी खटपट करण्याचे मान्य केले होते, पण अचानकपणे काळाने त्यांना ओढून नेल्यामुळे मंडळास त्यांची मदत होऊ शकली नाही.

ग्रंथाच्या छपाईस प्रारंभ करायच्या वेळीच कागद टंचाई निर्माण झाली. छपाईच्या कामात आणखीही अनेक अडचणी निर्माण झाल्या. त्यामुळे आमच्या

अंदाजापेक्षा ग्रंथ प्रसिद्ध होण्यास फारच वेळ झाला. ग्रंथ पुरा होईपर्यंत आम्हास असे अनेक अनुभव आले, ते सर्व सांगायचे झाले तर त्याचाही एक स्वतंत्र ग्रंथ होईल. घर पहावे बांधून या चालीवर 'ग्रंथ पहावा छापून' अशी पुस्ती जोडावयास हरकत नाही.

छपाईचे काम सेवा मुद्रणालयाचे मालक श्री. गो. वा. कुलकर्णी यांनी मनावर घेऊन पुरे केले. छपाईपूर्वी हस्तलिखिते स्वत: चिकित्सकपणे वाचून त्यात योग्य त्या सुधारणा त्यानी केल्या हे विशेष म्हटले पाहिजे. प्रवचने ध्वनिमुद्रित केली असली तरी छपाईसाठी ती लिहून काढणे आवश्यक होते. ती तपासून झाल्यावर पुन: त्याच्या प्रती तयार करण्याचे किचकट काम श्री. दि. ना. ताम्हनकर, श्री. व्यंकटेश परशराम खासबारदार व कु. आळतेकर भगिनी यांनी अतिशय कष्ट घेऊन प्रेमाने व भक्तिभावाने केले. हस्तलिखिते वाचून आवश्यक त्या सूचना प. पू. सत्यदेवानंद सरस्वती यांनी केल्या व विद्वत्तापूर्ण प्रस्तावना लिहून दिली, याबद्दल स्वामीजींचे आभार मानावे तेवढे थोडेच होतील. तसेच श्री. दत्तात्रय कवीश्वर पुणे व प्रा. गो. वि. कुलकर्णी कऱ्हाड यानी शास्त्रीजींची ओळख करून देणारे लेख दिल्याबद्दल व प्रा. गं. वि. कुलकर्णी यानी हस्तलिखिते वाचून केलेल्या सूचनाबद्दल प्रवचन मंडळ आभारी आहे.

या ग्रंथांत कांही उणीवा राहिल्या असण्याची व कांही चुका झाल्या असण्याची शक्यता नाकबूल करता येत नाही. तो दोष लेखन करणाऱ्यांचा आहे. त्याबद्दल पू. जेरेशास्त्री याना दोष देऊ नये अशी वाचकांना नम्र विनंती आहे

हा ग्रंथ पुरा होण्याच्या कामी असंख्य व्यक्तींचा हातभार लागला आहे. त्या सर्वांचा नामनिर्देश करणे शक्य नाही. याबद्दल कोणी राग मानू नये. प्रवचन मंडळ त्या सर्वांचे अत्यंत आभारी आहे.

पं. जेरेशास्त्री यानी मनावर घेतले म्हणूनच हा ग्रंथ तयार होऊ शकला म्हणून त्यांचे आभार मानले नाहीत तर तो कृतघ्नपणा ठरेल. त्यांचे आभार मानून ज्याचे कृपेमुळे हे कार्य पूर्ण झाले त्या भगवान श्रीकृष्णास अभिवादन करून हे निवेदन पुरे करीत आहोत.

कोल्हापूर, गोकुळाष्टमी
दिनांक ११।८। १९७४

**प्रवचन मंडळ**

श्री गणेशदत्तगुरुभ्यो नमः

# पू. गुळवणीमहाराजांनी केलेला पुरस्कार

**यन्नामस्मरणाद्दैन्यं पापं तापश्च नश्यति ।**
**भीतिग्रहार्तिदुःस्वप्नं दत्तात्रेयं नमामि तम् ॥**

श्री दत्तात्रेयकृपापात्र पंडितवर्य श्रीपादशास्त्री जेरे वाडीकर यांचे प्रवचन-सत्र कोल्हापूर येथे आज बरीच वर्षे चालू असलेले आम्हास विदित आहे. त्यांची सदाचारनिष्ठा आणि विद्वत्ता सर्वत्र प्रसिद्ध आहे. त्यामुळे त्यांची अधिकारवाणी सर्वांना आकर्षक अशी आहे. सांप्रत भगवद्गीतेवरील प्रवचने छापून प्रसिद्ध करण्याचा प्रवचन मंडळाचा उपक्रम चालू आहे तो स्तुत्य आहे. या प्रकाशनाने त्या गांवातील व इतर स्थळांतील रोज प्रवचनास उपस्थित राहू न शकणाऱ्या जिज्ञासू लोकांना स्वस्थ चित्ताने गीतार्थ चिंतनाचा मोठा लाभ घेता येईल.

भगवद्गीतेवर अनेक भाष्ये, टीका, उपटीका असे ग्रंथ अधिकारी पुरुषांनी लिहिलेले आहेत. त्यातून अनेक शास्त्रांतील प्रमेयांचे प्रतिपादन प्रधानसिद्धांतपोषक असे त्या त्या पुरुषानी केलेले आहे. ते शास्त्रमर्मज्ञ पुरुषांवाचून इतराना पूर्णपणे अवगत होणे अशक्य आहे. शास्त्रसिद्धांताचे यथार्थ ज्ञान जनतेपर्यंत पोचविण्याचे औत्सुक्य, सुहृत्संमित प्रसंगी कांतासंमित उपदेश, स्थैर्योपयुक्त अशी अंतरंग बहिरंग शब्दार्थयोजनाशक्ती, बुद्धिप्रचोदक सर्वांतर्यामी प्रभूवर अढळ श्रद्धानुराग, इत्यादी विविध गुणसंपन्न असणाऱ्या शास्त्रीबुवांचा प्रवचन संग्रह हा सिद्धान्ता-प्रमाणे जिज्ञासूंची जिज्ञासा पूर्ण करू शकेल. तसेच प्रवचन करू इच्छिणाऱ्या अभ्यासूंनाही या ग्रंथाचा मोठा उपयोग होईल. असा ज्ञानसंवर्धक ग्रंथ प्रकाशित करून शास्त्रीबुवांच्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करू इच्छिणारे प्रवचनमंडळ धन्यवादास पात्र आहे.

पं. श्रीपादशास्त्रींना दीर्घायुरारोग्य लाभून त्यांचेकडून असेच उत्तरोत्तर सात्त्विक ज्ञानप्रसाराचे कार्य होत राहो हीच त्या जगन्नियंत्याजवळ प्रार्थना आहे.

वासुदेवाश्रम पुणे ४
ज्ये. शु॥ १ रविवार शके १८९५

वा. द. गुळवणी

॥ श्री ॥

# पं. श्रीपादशास्त्री जेरे यांचा संक्षिप्त जीवन वृत्तांत

## लेखकः– दत्तात्रय कवीश्वर पुणे.

**स्मृतोऽप्यवति यो विघ्नं निघ्नन्नम्बासुतस्स्तुतः ।**
**गंधर्वस्थः स हि कलौ मलौघघ्नोऽस्तु मे हृदि ॥**

'नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते' ही भगवदुक्ती हृदयाशी बाळगून त्याप्रमाणे पवित्र ज्ञानाचाच नित्य संग्रह करण्यात आपले संपूर्ण जीवन व्यतीत करणारे प्रात:स्मरणीय ज्ञानधन महाभाग दृष्टीस पडणे आज अत्यंत दुर्लभ झाले आहे. अशा पुरुषांच्या नुसत्या दृष्टीक्षेपाने राष्ट्रविघातक आसुरी संपत्तीचे उन्मूलन होते. म्हणूनच 'चंद्रमे जे अलांछन । मार्तंड जे तापहीन । ते सर्वांही सदा सज्जन । सोयरे होतु ॥' अशी ज्ञानेश्वर माऊलीने प्रार्थना केली आहे. पं. श्रीपादशास्त्री जेरे हे अशा दुर्मिळ सज्जनापैकी एक आहेत.

आश्विन शुद्ध १३ शके १८३० या शुभदिनी श्रीदत्तक्षेत्र नृसिंहवाडी येथे शास्त्रीजींचा जन्म झाला. त्यांचे घराणे वंशपरंपरा श्री दत्तपूजकांचे असून त्यांचे पिताजी श्री. बंडोभटजी हे ज्योतिर्मन्त्रशास्त्रज्ञ व महान तपस्वी पुरुष होऊन गेले. त्यांच्या दिव्य ज्ञानमय मार्गदर्शनाने अनेक आर्तजनांचे जीवन मंगलमय झाले. श्री दत्तप्रभूंचे सान्निध्यात त्यांचा पवमान पाठ यावज्जीव कधीही चुकला नाही. अशा तपस्वी बंडोभटजींचे श्रीपादशास्त्री हे द्वितीय सुपुत्र होत.

यथोक्तकाळी व्रतबंध झाल्यावर पूज्य श्री. शंकरशास्त्री जेरे, श्रीमद् जगद्गुरु शंकराचार्य शिष्यस्वामी मठ संकेश्वर, करवीर यांनी वाडीत स्थापन केलेल्या संस्कृत पाठशाळेत वेदमूर्ती बाळशास्त्री पुजारी यांचे जवळ याज्ञिक विषयाचे संपूर्ण अध्ययन उत्तम प्रकारे केले. त्याच बरोबर त्यांचे शालेय शिक्षणही चालू होते. हे शिक्षण घेत असता घरच्या गोमातेची सेवा ते मनापासून करीत. त्यांच्या सेवाभावाने आकृष्ट झालेली ती गोमाता बाळ श्रीपादाची हाक ऐकताच धावत धावत त्यांचे जवळ येऊन उभी रहायची. जणू कांहीं गोपाल कृष्णाची वेणू ऐकून धाव घेणारी धेनूच. गोमाता जवळ येताच बाळ श्रीपादाचा प्रेमपूर्ण हस्त तिच्या पाठीवरून फिरायचा. हे अपूर्व दृश्य प्रत्यक्ष पाहण्याचे भाग्य त्यावेळी अनेकांना लाभले होते.

वेदाध्ययन व याज्ञिक कर्मात अल्पवयात प्रावीण्य मिळविल्यावर त्यानी पू. शंकरशास्त्री जेरे यांचेजवळ व्याकरण शास्त्रांतील कौमुदी, मनोरमा, शब्दरत्न इ. ग्रंथांचे अध्ययन केले, आपल्या शिष्याची विलक्षण प्रज्ञा व छात्रवृत्ती पाहून न्याय शास्त्राचा अभ्यास करण्यासाठी त्यांना धारवाडच्या श्री शंकराचार्य पाठशाळेतील पू गु. नागेशशास्त्री उप्पिनबेटगिरी यांचेकडे पाठविले. तेथे अविश्रान्त अभ्यास करून पुण्याच्या वेदशास्त्रोत्तेजक सभेची सर्वोच्च परीक्षा देऊन न्यायचूडामणी ही पदवी संपादन केली. त्यानंतर पुण्याच्या आचार्य मठात वास्तव्य करून पं सुब्बाशास्त्री तीर्थहळ्ळी यांचे जवळ मीमांसा शास्त्राचा अभ्यास करून त्यातही प्रावीण्य संपादन केले. तेथेच त्यानी वेदांताचाही सखोल अभ्यास केला. हे ज्ञानार्जन चालू असता त्यानी सुखाची अपेक्षा ठेवली नाही किंवा कष्टाची तमा बाळगिली नाही. 'सुखार्थिनः कुतो विद्या कुतो विद्यार्थिनः सुखं' या उक्तीप्रमाणे वागून व मनोभावे गुरुसेवा करून त्यानी करता येईल तितका विद्यासंग्रह केला. या कालांत त्यांचा विवाह झालेला होता. तरीही त्यानी ब्रह्मचर्याश्रमांतील कर्तव्यात थोडीसुद्धा कसूर केली नाही. हा त्यांच्या बुद्धीचा महान विशेष आहे.

शिक्षण पूर्ण होताच संकेश्वर मठांतील पाठशाळेवर त्यांची अध्यापक म्हणून नियुक्ती झाली. तेथे अध्यापनाबरोबरच श्री शिष्यस्वामींचे सान्निध्यात वेदान्त शास्त्रांतील उच्च ग्रंथ सांगण्याचे कार्य त्यानी सुरू केले. शिष्य स्वामी महाराजाना आपल्या विद्यार्थ्याबद्दल आपुलकी होतीच. पण सर्व शास्त्रांत अप्रतिहत विहार करणारी प्रज्ञाशक्ती पाहून त्यांच्या मनात आदरभावही निर्माण झाला. म्हणून चातुर्मास्य मुक्कामात त्याना आपल्याबरोबर घेऊन त्यांच्या ज्ञानाचा लाभ सर्वांना करून देण्याचा क्रम त्यानी बरीच वर्षे चालू ठेवला होता.

'जे जे आपणासी ठावे । ते ते लोकासि शिकवावे ।
शहाणे करून सोडावे । सर्वजन ।।'

या समर्थोक्तीप्रमाणे लोकांच्या मनांतील राजस व तामस वृत्ती दूर करून तेथे सात्त्विक वृत्ती उत्पन्न करणे ही एक मोठी जबाबदारी ज्ञानी माणसावर असते. त्यांच्या ज्ञानाचा लाभ अधिकाधिक लोकाना व्हावा असा योग लवकरच जमून आला. भगवती महालक्ष्मीच्या प्रेरणेने शास्त्रीजीनी कोल्हापुरांत येऊन मुक्काम केला. तेथील आचार्य मठात त्यांची अध्यापक म्हणून नियुक्ती करून व्यवस्थापकानी स्वतःची गुणग्राहकता व्यक्त केली असे म्हणणे युक्त ठरेल. केवळ नोकरी करून त्यांना स्वस्थ बसता आले असते, पण तसे न करता जगदंबेच्या परिसरांतील राम मंदिरात रोज संध्याकाळी त्यांनी आपली

प्रवचने सुरू करून ज्ञानदानास प्रारंभ केला. वेदान्तासारखा अवघड विषय अत्यंत सोपा करून सांगण्याच्या त्यांच्या पद्धतीमुळे श्रोत्यांची संख्या दिवसेदिवस वाढू लागली. राम मंदीर अपुरे पडू लागले. म्हणून प्रवचनासाठी गुरुमहाराजांचा प्रशस्त वाडा निवडण्यात आला. सकाळी स्वतःचे घरी विशिष्ट अधिकारी जिज्ञासू मंडळीसाठी वेदान्त ग्रंथाचे पाठ, आचार्य मठात अध्यापन व संध्याकाळी प्रवचन असे ज्ञानदानाचे कार्य अखंड चालू झाले. या त्यांच्या कार्याचा १९७० साली परमपूज्य गुळवणी महाराजांचे अध्यक्षतेखाली रजतमहोत्सव साजरा करण्यात आला. त्याच वेळी श्रोतृवर्गाने त्यांचा कृतज्ञताबुद्धीने सत्कार केला. हे त्यांचे प्रवचनकार्य अद्यापही अविच्छिन्न चालू आहे.

कोल्हापूर खेरीज सांगली, मिरज, कऱ्हाड, इचलकरंजी इत्यादी शहरातून त्यांची प्रवचने वर्षातून ठराविक काळी होत असतात. पुणे व मुंबई येथेही त्यांची प्रवचने गाजली आहेत.

शास्त्रींजीजवळ पांडित्याबरोबरच व्यवहारदक्षता हा गुणही मोठा आहे. या त्यांच्या व्यवहार ज्ञानाचा लाभही अनेक धार्मिक व सामाजिक संस्थांना झालेला आहे. शास्त्रीजी हे केवळ पुस्तकी पंडित नसून त्यानुसार स्वतःचे आचरण करणारे आहेत. म्हणूनच त्यांना आदर्श गृहस्थाश्रमी बनण्याचा मान मिळालेला आहे. त्यांचा गृहस्थाश्रम सर्वोपकारक्षम करण्यात त्यांच्या साध्वी पत्नीचाही मोठा वाटा आहे.

सध्याच्या अशांत व बिकट परिस्थितीत शास्त्रीजी सारख्या महापुरुषांची विशुद्ध ज्ञानगंगाच समाजांतील अशांतीचे शमन करण्यास समर्थ ठरणारी आहे. याकरिता भगवतीच्या कृपेने शास्त्रीजीना दीर्घायुरारोग्य लाभून समाजाच्या बुद्धीविकासाचे कार्य अखंड चालू रहावे येवढीच भगवतीजवळ प्रार्थना आहे. त्यांच्या गीताप्रवचनास ग्रंथबद्ध करून प्रसिद्धी दिल्याबद्दल प्रवचनमंडळास धन्यवाद. त्यांच्या पवित्र सहवासाचा लाभ घेतलेल्या माझ्यासारख्याकडे त्यांचा संक्षिप्त जीवनवृत्तांत लिहिण्याचे काम प्रवचनमंडळाने सोपविले, याबद्दल मी स्वतःस धन्य समजतो. पुण्यश्लोक शास्त्रीजीना अभिवादन करून हा लेख समाप्त करतो.

—०—

# पं. श्रीपादशास्त्री जेरे

## एक प्रसन्न व्यक्तिमत्त्व

### प्रा. गो. वि. कुलकर्णी, M. A.

पं. जेरे शास्त्री यांचे शेजारी मी राहतो. मला त्यांचा सहवास बालपणापासून लाभला ही मी अभिमानाची गोष्ट मानतो. त्यानी आपले 'थोरपण पऱ्हा सांडून' मजवर लोभ केला, ही माझ्या जीवनातील जमेची एक मोठी बाब आहे असे मी मानतो.

आज भारतांत जन्मानें ब्राह्मण असलेले असंख्य आहेत. ब्राह्मकर्मे करणारी मंडळीही असतील. तर कांही केवळ विचाराने ब्राह्मण असतील. या तीन्ही गोष्टींचा समन्वय झाला आहे अशी व्यक्ती सांपडणे महाकर्म कठीण. अशा अत्यंत दुर्मीळ व्यक्तीपैकी पं. जेरे शास्त्री आहेत. शास्त्रीबुवा म्हणजे 'जन्म, कर्म व ज्ञान यांचा 'प्रयागवटू जाहले' आहेत. या तीर्थावर ज्यांना स्नान करण्याची संधी मिळाली ते धन्य होत.

पं. जेरे शास्त्री यानी वाडी, धारवाड, पुणे इत्यादी ठिकाणच्या विद्वानांजवळ शास्त्राभ्यास पुरा केला व १९४५ साली ते करवीर नगरीत आले. तेव्हापासून आज मितीपावेतो त्यांचे ज्ञानदानाचे कार्य अखंडपणे चालू आहे. गुरुमहाराजांचे वाड्यात चालणारी शास्त्रीबुवांची प्रवचने हा करवीरातील एक नित्याचा कार्यक्रम ठरलेला आहे. शास्त्रीबुवांचे आज प्रवचन नाही' ही वार्ता 'आज इथे दूध मिळणार नाही' या बातमी इतकीच बेचैनी त्यांच्या श्रोतृवर्गात निर्माण करते हे मी प्रत्यक्ष पाहिलेले आहे.

पं. जेरे शास्त्री यांच्या वाणीत मोहिनी आहे. एकदा त्यांच्या प्रवचनाला जाण्याचा नाद लागला की तो सुटत नाही. वेदांतासारखा क्लिष्ट विषय अडाणी स्त्रियांनाही समजेल इतक्या सोप्या भाषेत समजावून सांगण्याची त्यांची शैली विलक्षण आहे. रोजच्या व्यवहारांतील साधीसुधी उदाहरण, एकादा विशेष प्रसंग व ताज्या बातम्या यांचा चपखलपणे उपयोग करून ते निरूपण करीत असल्याने त्यांचे प्रवचन कंटाळवाणें झाले आहे असे कधी होत नाही. त्यांची वाणी अत्यंत सौम्य आहे. प्रवचनात उगाच आरडाओरडा अगर

श्रोत्यांना खूष करण्यासाठी बाष्कळ टीका केलेली कधी आढळणार नाही. शृंगार प्रसंगाचे वर्णन करतानाही त्यांचेकडून मर्यादातिक्रमण होत नाही. त्यांच्या प्रवचनांत चुकूनही आत्मस्तुती ऐकायला येत नाही. प्रवचनाच्या ठरलेल्या वेळी ते उपस्थित राहतात. हा त्यांचा वक्तशीरपणा वाखाणण्यासारखा आहे. ठराविक वेळी येऊन ठराविक वेळात आपले विचार मुद्देसूदपणे मांडून ते भाषणाचा समारोपही मजेशीर पद्धतीने करतात. त्यानी बोलत रहावे असे वाटत असते तोवरच ते थांबतात. कोल्हापुरांत गुरुपौर्णिमा, दसरा, शिवजयंती अशा प्रसंगी एकाच विषयावर वेगवेगळ्या ठिकाणी त्याना बोलावे लागते. पण प्रत्येक ठिकाणी एकच तबकडी न वाजवता कांहीतरी निराळे सांगण्यात त्यांच्या बुद्धीचा विलास दिसून येतो.

त्यांच्यावर श्रोत्यांची श्रद्धा व भक्ती बसते, याचे कारण त्यांचे बोलणे हे लोका सांगे ब्रह्मज्ञान अशा जातीचे नाही. त्यांच्या बोलण्यामागे पवित्र आचरण, विशुद्ध चारित्र्य व सतत अभ्यासू वृत्तीची पार्श्वभूमी आहे. अशा वक्तव्याचा प्रभाव श्रोत्यांवर पडला नाही तरच नवल. जुन्या पद्धतीने त्यांचे शास्त्राचे शिक्षण झाले असले तरी ते आधुनिक विचारांचीही दखल घेतात. त्यासाठी त्यानी इंग्रजी भाषेचे ज्ञानही संपादन केले आहे. सतत अभ्यास व चिंतन हाच त्यांचा उद्योग, म्हणूनच त्यांच्या चेहऱ्यावर विद्येचे तेज विलसत असलेले स्पष्ट दिसून येते. त्यांचे प्रसन्न व पवित्र व्यक्तिमत्त्व पाहूनच श्रोते मंत्रमुग्ध होऊन जातात.

सध्याचा काळ हा अत्यंत चमत्कारिक आहे. रोज नवीन निर्माण होणारे यक्षप्रश्न व पोखरणाऱ्या समस्या क्षितीजासारख्या वाढतच आहेत. खवळलेल्या सागरांत किंवा दाट धुक्यात गुरफटलेल्या वातावरणात सांपडलेल्या नौकेसारखी आजच्या मानवाची अवस्था झाली आहे. यातून बाहेर पडण्यास एकच मार्ग आहे. तो म्हणजे आपल्या पूर्वजानी संपादन केलेले ज्ञान. हा ज्ञानदीप भगवद्गीते-सारख्या दीपस्तंभावर तेवत असल्याने गीता ही मार्गदर्शन करणारी आहे. अशा उदार गीतामाऊलीचा अर्थ सुलभ करून सांगणारे पं. जेरेशास्त्री ही खरी आजच्या काळाची गरज आहे. ज्यांनी ही गीता प्रवचने ऐकली ते भाग्यवानच होत. ह्या प्रसिद्ध होणाऱ्या ग्रंथाने त्या भाग्याचा वाटा सर्वांना मिळणार आहे,

या ग्रंथाप्रमाणेच त्यांनी समजावून दिलेल्या लघुयोगवासिष्ठ, पंचदशी, अमृतानुभव इत्यादी ग्रंथावरील त्यांची प्रवचनेही प्रसिद्ध व्हावीत व हे महान कार्य करण्यासाठी त्यांना दीर्घायुरारोग्य व सामर्थ्य लाभावे अशी त्या जगन्नियंत्या जवळ प्रार्थना आहे. पू. शास्त्रीजींना शतशः प्रणाम.

—०—

# ‘ ज्ञानगंगे ’ प्रत एक दृष्टिक्षेप

श्रीक्षेत्र कोल्हापूर येथील रहिवासी व तत्रस्थ सज्जन स्त्रीपुरुष मंडळीत आपल्या आचाराने, ज्ञानदानाने परम आदरणीय स्थान मिळविलेले असे पंडितवर्य श्री. श्रीपादशास्त्री जेरे यांची श्रीमद् भगवद्गीतेवरील प्रवचने प्रस्तुत ज्ञानगंगा ग्रंथात संग्रहित केली आहेत. गीता–तत्त्व–जिज्ञासु वाचकांना त्यांचा फार उपयोग होईल.

इ. स. १९४५ पासून पंडितजींच्या विद्याव्यासंगाचा लाभ कोल्हापूरच्या भावुकांना सातत्याने, नित्यशः होत आहे. ही अध्यात्मनिरूपणे ग्रंथरूपाने प्रसिद्ध केल्यास यच्चयावत् मराठी जाणणाऱ्या अभ्यासकानाही ‘ श्रीपाद–वाक्सुधे ’ची प्राप्ती होईल, या ‘ ज्ञानगंगे ’त मनसोक्त अवगाहन करता येईल अशा अत्यंत उदार हेतूने कोल्हापूर येथील पंडितजींच्या नित्याच्या श्रोत्यापैकी प्रामुख्याने सर्वश्री दुधगांवकर वैद्य, कळंबेकर कुलकर्णी, कोटबागे वांचमेकर इ. वयोवृद्ध भक्तांनीं छपाईची योजना आखली व प्रत्यक्ष मुद्रण कालात अर्थात् सद्यःस्थितीत छपाई खर्च बेसुमार वाढला असून देखील ग्रंथ पूर्ण केला व गीताभ्यासी वाचकांचे हाती दिला आहे याबद्दल आवर्जून त्यांचे कौतुक करावयास हवे.

आता प्रस्तुत ग्रंथांतील अंतरंगाचा अल्प परिचय करून घेऊ. निरुपणाच्या अगदी प्रारंभी ‘ गीता माहात्म्य’ अशा शीर्षकाखाली एक छोटेसे प्रवचन आहे. ते मुख्यतः ‘ सर्वोपनिषदो गावो दोग्धा गोपालनन्दनः । पार्थो वत्सः सुधीर्भोक्ता दुग्धं गीतामृतं महत् ॥ ’ ह्या सुप्रसिद्ध श्लोकाचेच सुंदर स्पष्टीकरण आहे. ह्या गीतामाहात्म्याच्या प्रवचनाचे सूक्ष्म वाचन केले म्हणजे पुढील गीता श्लोकांवरील निरुपणाचे स्वरूप कसे असेल याची उत्तम कल्पना येते. कारण ‘ गीता-माहात्म्याच्या ’ विवरणात पंडितजींच्या वाग्विलासाची, वाग्वैभवाची बहुतेक सर्व वैशिष्ठ्ये प्रकट झालेली दिसतात.

व्याकरण, न्याय, पूर्वमीमांसा, वेदान्त अशा गहन शास्त्रांचे संप्रदायपूर्वक सखोल अध्ययन आणि त्यांचे उत्कृष्ट अध्यापन, यांत पहिल्या प्रतीचे प्रावीण्य संपादन केलेल्या शास्त्रीबोवाना गीता श्लोकांचे स्पष्टीकरण करताना आपले शास्त्रपांडित्य प्रकट करणे अशक्य नव्हते. परंतु आपल्या समोर बसलेल्या श्रोत्यांच्या मन, बुद्धी, अंतःकरणाची पूर्ण जाण व पारख असलेल्या पंडितजीनी सर्वही सातशे श्लोक अत्यंत सुबोध भाषेत, दैनंदिन व्यवहारांतील दाखले देऊन स्पष्ट केले

आहेत. एवढ्या प्रदीर्घ ज्ञानसत्रांत सर्वसामान्य श्रोत्याला आकलन होऊ शकणार नाही अशी न्यायवेदान्त परिभाषा त्यानी कुठेही योजिली नाही, हे विशेष उल्लेखनीय वाटते. ही 'ज्ञानगंगा' संथ, शांत वहात आहे. तिच्या प्रवाहात अर्थशून्य शब्दांचे पोकळ बुडबडे नाहीत. गहन शब्दाचे भोवरे, आवर्त नाहीत. कुत्सित टीका, परमतदूषण यासारखा केरकचराही ह्या पात्रांत तरंगत नाही, आणि वादंगाच्या ईर्षेच्या लाटांच्या उसळ्या, उकळ्या तर नाहीतच!! संथ वाहते गंगामाई!

पंडित जेरेशास्त्री यांचा शास्त्रव्यासंग ह्या निरूपणांत इतका एकजीव होऊन प्रकट झाला आहे कीं श्रोत्याला किंवा वाचकाला तत्संबंधी विशेष चिंतन केले तरच ते उमगेल ! श्लोकांतील पार्थ, संजय, मधुसूदन, वार्ष्णेय इ. पदांची व्युत्पत्ती सांगून, त्या त्या ठिकाणी ते विशेषनाम किंवा संबोधन कां आले आहे याची ते मार्मिक फोड करतात. धर्मसूत्रें, योगसूत्रें, पुराणे, महाकाव्यें, श्रीमद्भागवत, योगवासिष्ठ, रामायण यांतील वेचक प्रमाणे वाचली म्हणजे त्यांच्या चौफेर व्यासंगाची कल्पना येते. व्यवहारांतील दृष्टांत सांगताना मानवी स्वभावाचे इतके अनंत पैलू शास्त्रीबोवानी दर्शविले आहेत की, ह्या प्रवचनांतून परमार्थाबरोबर वाचकानी चोख व्यवहाराचे मार्गदर्शनही संपादन करावे. कृष्णार्जुनांचे संवाद कल्पित असूनही अत्यंत उद्बोधक गोड आहेत.

आणखी कांहीं वैशिष्ठ्ये सांगण्याची इच्छा होती. पण संयोजकानी अतिसंक्षिप्त प्रस्तावना लिहावयास सांगितल्याने येथेच थांबतो. सर्वश्री स. य. कुलकर्णी, ना. ह. कोटबागे, दि. ना. ताम्हनकर हे आमच्या संप्रदायांतील म्हणजे स्वामी स्वरूपानंदजींचे कृपेतील आहेत. त्यानी व कु. शकुंतला व कु. लता आळतेकर या भगिनी द्वयाने ही प्रवचने लेखी व छापील स्वरूपात येण्यासाठी बहुमोल सेवा केली आहे. त्या सर्वांना आमचे नारायणस्मरणपूर्वक आशीर्वाद. इति लेखनसीमा !

आळंदी
१०-७-७४

स्वामी सत्यदेवानंद सरस्वती

॥ ॐ ॥

'ज्ञानगंगे'च्या शुद्ध प्रवाहात काहीसे स्वैर स्नान केले. माननीय पं. जेरे शास्त्री यांच्या व्यक्तिमत्त्वाचे सारे विशेष यात यथार्थपणे प्रकट झाले आहेत. श्रीमद्-भगवद्-गीते सारखा महान प्रासादिक सर्वसामान्य ग्रंथ आणि शास्त्रीबुवासारखा रसाळ, विद्वान, चारित्र्यसंपन्न, चतुर वक्ता हा मणिकांचनयोगच म्हटला पाहिजे. या 'ज्ञानगंगे'त गीतेतला विषय सर्वसामान्य जिज्ञासू माणसापर्यंत जाऊन भिडेल अशा शास्त्रपूत, निरनिराळया पौराणिक संदर्भांनी भरलेल्या, घरगुती मार्मिक दृष्टांतानी व छोटचा छोटचा कथांनी नटलेल्या, विनोदाने टवटवीत झालेल्या, प्रसन्न पद्धतीने मांडला आहे. कुठलेही पान उघडले तरी त्यातल्या मौलिक (original) व प्रतिभायुक्त, तात्त्विक व तार्किक, आटोपशीर व रसाळ विचारसरणीने वाचक सहज रंगून जातो व गीतेच्या गाभाऱ्यापर्यंत जातो. तितका अधिकारी असला तर गाभाऱ्यातही जातो. गीतेवर आजवर इतकी भाष्ये झाली आहेत की, नव्या भाष्यकाराने काही भाष्य करणे ही कसोटीच असते. पं. जेरे शास्त्रींचे भाष्य या कसोटीला उतरले असून आपले वैशिष्टच त्याने अबाधित ठेवले आहे, त्यात मोलाची भर घातली आहे, असे नम्रतेने म्हणावेसे वाटते. त्यांना मनःपूर्वक धन्यवाद. प्रवचन मंडळाने साक्षेपाने ते अक्षरबद्ध संग्रहित करून आकर्षक रीतीने प्रसिद्ध केले, याबद्दल त्याचे हार्दिक अभिनंदन...

महाराष्ट्रातल्या जनमानसाला ही 'ज्ञानगंगा' पवित्र करो! तेजस्वी करो!

**— गं. वि. कुलकर्णी**
कोल्हापूर,
दि. १२।७।७४

—०—

# अनुक्रम



करवीर निवासिनी श्रीमहालक्ष्मी

|| श्री ||

|| ॐ नमो भगवते वासुदेवाय ||

# गीता माहात्म्य

श्रीमद्भगवद्गीता हा ग्रंथ स्वदेशीयांना, परदेशियांना, विरक्तांना, संसारी व्यक्तींना, संन्याशांना, भक्तांना, सर्वांनाच मान्य आहे. या ग्रंथाला मानत नाही असा कोणीच सापडणार नाही. एका कवीने गंगा व गीता यांची तुलना केली आहे. तो म्हणतो, या दोघीही भगवंतापासूनच निर्माण झाल्या आहेत. एक त्याच्या पदारविंदापासून तर दुसरी त्याच्या मुखारविंदापासून. बलीकरिता भगवंतानी वामनावतार घेतला, त्रिपाद भूमी मागितली व एक पाऊल उचलले. त्या वेळी ब्रह्मकटाहाचा भेद झाला. त्याभोवती असलेले जल आत आले. ते भगवंताच्या पदस्पर्शाने पुनीत झाले. त्या पावन जलापासून गंगा निर्माण झाली. म्हणून गंगास्नानामुळे स्वर्गप्राप्ती होते. स्वर्गात जायचे, अमृत, अप्सरादि दिव्य भोग घ्यायचे व पुण्य संपले की पुन: खाली यावयाचे. 'क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशंति' असें भगवंतांचे वचन आहे. खेड्यातील माणसाने जवळ चार पैसे साठले की मुंबईस जावे, तेथे चैन करावी व पैसे संपले की घरी परतावे, तशी स्वर्गात जाणाऱ्यांची गत होते. गंगास्नानाने स्वर्ग मिळाला तरी मनुष्यास पुन: संसार सागरातच यावे लागते. संस्कृतमध्ये 'ड' 'ल' यो: अभेद: ' असे सूत्र आहे. त्याप्रमाणे 'जल' व 'जड' यातही अभेद आहे. गंगा जड असल्यामुळे जीवाचा खरा उद्धार होत नाही.

आता गीतेचे पहा. ती चेतन आहे. तिचे आलोचन केले तरी ती समुद्धरणच करते. मग तिला कसली उपमा द्यायची? उपमा फक्त मातेची देता येईल. माता आपल्या बालकाचे जतन, पोषण, संवर्धन व संरक्षण करते. ती नेहमी आपल्या बालकाचे अभीष्ट व कल्याणच

चिंतिते. असे असूनही मानवाला तिची महती कळत नाही ही गोष्ट निराळी. बालपणी अज्ञानामुळे व तारुण्यात ताठ्यामुळे मानव मातेची अवज्ञा करतो; तरीही माता बालकाचें कल्याणच इच्छिते.

गीतामाउलीहीं मानवाचे सर्व प्रकारे कल्याण करणारीच आहे. तिचे दूध असामान्य आहे; म्हणून ' दुग्धं गीतामृतं महत् ' असे म्हटले आहे. सर्व उपनिषदे या गायी आहेत. सामान्य गायी मात्र नव्हेत. सामान्य गायीचे दूध चुकून वासराने पिऊन टाकले तर मालकाला मिळत नाही. किंवा मालकाने सर्व काढून घेतले तर वासरू उपाशी राहते. पण उपनिषद् गायी सदाच दुभत्या आहेत. पण मानवाला त्या दिसत नाहीत, मग त्यांची धार काढायची कशी? मानवांना ते दूध काढणे शक्य झाले नाहीं म्हणून श्रीकृष्णानी दूध काढले. व्यवहारांत गवळी दूध काढून दुसऱ्यास देतो पण त्याबद्दल पैसे घेतो. पण भगवान म्हणतात, मला दूधही नको व त्याबद्दल पैसेही नकोत. सर्व दूध मानवांनी घ्यावे. मी नित्य तृप्तच आहे. मानवांनी ते दुग्धपान करावे व तृप्त व्हावे.

' पार्थो वत्सः सुधीर्भोक्ता '. कुठलीही गाय वासरू सोडल्याशिवाय पान्हा सोडत नाही. उपनिषदासारख्या गायी व भगवंतासारखा गवळी असल्यावर वत्सही तशाच योग्यतेचे हवे. म्हणून भगवंतानी वीर धनुर्धर अर्जुनाला वत्स बनविले. अर्जुन तृप्त झाला व त्याने जगालाही तृप्त केले. या दुग्धाचे भोक्ते कोण? भोक्ते ' सुधीः ' म्हणजे ज्यांची बुद्धी उत्कृष्ट आहे असे लोक. तुम्हीही हे दुग्धपान कराल तर तुमचीही बुद्धी श्रेष्ठ दर्जाची झाल्याशिवाय राहणार नाहीं.

प्रत्येक मानवाचे जीवन सुखदुःखांनी भरलेले आहे. विपुल धन, रूप, लावण्य आणि गुण यांनी संपन्न अशी स्त्री सर्व सुखाच्या राशीवर लोळत असताना आपणाला अपत्य नाही म्हणून दुःख करीत असते. आणि रूप नाही, गुण नाही, पैसा तर नाहीच नाही अशी घरदार नसलेली स्त्री उघड्यावर प्रसूत होऊन पुत्रमुखाचा आनंद उपभोगते. जीवनात नुसते

सुखनाही व नुसते दुःखही नाही. कुठे कमी असेल कुठे जास्त असेल, पण सुखाखेरीज जीवन होणारच नाही. तुम्ही अगदी करंटे असाल किंवा तुमची तशी कल्पना असेल, तरी सुद्धा गीतापठणाचे सुख तुम्हाला उपभोगता येईल. शुद्ध उच्चार करता येत नाही, अर्थ समजत नाहीं म्हणून थांबू नका. गीतेचा अर्थ भल्याभल्यांना समजलेला नाही, तिथे सामान्याची कथा काय ? अर्थ कळत नसला तरी वाचत रहा. ती वाचता वाचता तुमची बुद्धी सतेज होत जाईल. अर्थानुसंधान अधिकाधिक होईल याबद्दल मनात संशय आणू नका. तिच्या पठणामुळे तुमचे दुःखी जीवन सुखी झाल्याखेरीज राहणार नाहीं.

गीता हे 'दुग्धामृत' आहे. अमृत अतिमधुर व सुंदर हे खरे पण दुर्लभ; पण दूध मात्र सुलभ आहे. म्हणून गीतेला दोन्हींची उपमा दिलेली आहे. आता आपणाला दूध सरकारी केन्द्रावर मिळते, पण ठराविक वेळी जावे लागते. उशीर झाला तर रिकाम्या बाटल्या घेऊन परतावे लागते. कारण तेथे दुधाचा साठा मर्यादित असतो. पण गीतेचे तसे नाही. गीता-दुग्धामृत पूर्वी आपल्या पूर्वजांनी सेवन केले. सध्या आपण करीत आहो व पुढेही अनेक पिढ्या ते सेवन करीत राहतील, तरी ते कमी होणार नाहीं. ते दुग्धामृत पात्र सदैव भरलेलेच राहील.

हा ग्रंथ मोठा अद्भुत आहे. अती लहान नव्हे. अती महान नव्हे अती सुलभ नव्हे. किंवा अती दुर्लभही नाही. अती सोपा नव्हे आणि अती गूढही नव्हे. उदात्तता, रमणीयता, पावित्र्य आणि प्रसाद हे सौंदर्याचे चार प्रकार आहेत. हे चारही गुण गीतेत सामावलेले आहेत. म्हणून ती अत्यंत सुंदर झाली आहे. मनाला प्रसन्नता निर्माण करणारा आणि सर्व प्रकारच्या मानवांवर उपकार करणारा हा ग्रंथ आहे. मानवाचे चार प्रकार आहेत. १) व्यावहारिक, २) पारमार्थिक, ३) राजकीय व ४) विवेचक. या चौघांचेही समाधान करणारा हा एकमेव ग्रंथ आहे. व्यवहारी लोकांना व्यवहार कसा करावा हे तो शिकवितो. भक्ती,

ज्ञान व वैराग्य या परमार्थ साधनांचे या ग्रंथात सांगोपांग निरूपण असल्याने पारमार्थिक लोकांना तो अत्यंत प्रिय आहे. राजकारणी लोकांवर राजनीतीचा वर्षाव करणारा आणि विवेचकांना सुविचारप्रवण करणारा असा हा अद्वितीय ग्रंथ आहे.

गीता-सेवनाने मालिन्य, पापिष्ट वृत्ती, दुर्गुण व दुर्भाग्यता या चार गोष्टींचे निवारण होऊन मानव पुण्यवान, गुणवान व भाग्यवान बनतो. जगद्वंद्य भगवान श्रीकृष्णाने परम भागवत महाबुद्धिमान अर्जुनाला केलेला हा उपदेश भगवान व्यासानी ग्रथित केला आहे. तिघांच्या श्रेष्ठ बुद्धीचा हा त्रिवेणीसंगम आहे. या संगमात अवगाहन केल्यास मानवाला नेहमी ज्या उच्चतेची अपेक्षा असते, ती लाभल्यावाचून राहणार नाही. उच्चता, सुंदर व्यवहार, सुंदर संस्कार व ईशप्राप्ती करून देणारा हा अतिश्रेष्ठ ग्रंथ आहे.

अर्जुनाचे निमित्त करून मानवाने समग्र ऐश्वर्य, वीर्य, धर्म, यश, वैराग्य आणि ज्ञान कसे प्राप्त करून घ्यावे याचे मार्गदर्शन भगवंतानी येथे करून ठेवलेले आहे. म्हणून ब्रह्मचाऱ्यापासून संन्याशापर्यन्त चारी आश्रमांतील लोकांना व सर्व वर्णांना तारक असा हा ग्रंथ आहे. निष्काम कर्माशिवाय ज्ञान प्राप्त होत नाही. ज्ञान प्राप्त होण्यासाठी शोक व मोह नष्ट व्हावे लागतात. म्हणजे उपाय व उपेय ( साधन व साध्य ) या दोन्ही गोष्टींनी उपयुक्त असे हे शास्त्र आहे.

सर्व संस्कृत ग्रंथात गीतेइतका सुलभ ग्रंथ दुसरा नाही. तिचे अनेक अर्थ निघत असले तरी ती भगवद्वाक्ये आहेत हे लक्षात घेऊन तिचे अनुसंधान करा. ते जमत नसेल तर नित्य पठण करा. तेही शक्य नसेल तर श्रवण तरी कराच. श्रवणसुद्धा ज्ञानयज्ञाने केलेले भगवंताचे पूजनच आहे. पूर्वपुण्याई असल्याशिवाय गीतार्थश्रवण करण्याची इच्छा होत नाही. आपण निःसंशय भाग्यवान आहात. तुमच्यामुळेच मलाही ईश्वरी सेवा करण्याची संधी मिळाली आहे. चला, या ज्ञानगंगेत अवगाहन करून आपण सर्वजण धन्य होऊ या.

◇ ◇

# श्रीमद्भगवद्गीता

## अध्याय १ ला

धृतराष्ट्र उवाच—

**धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः ।**
**मामकाः पाण्डवाश्चैव किमकुर्वत सञ्जय ।। १ ।।**

गीतेतील हा पहिला श्लोक धृतराष्ट्राच्या मुखातून बाहेर पडलेला आहे. हा श्लोक अगदी साधा वाटतो. पण त्यातच गीता जन्माचे सारे सार साठलेले आहे. ' धृतं राष्टं येन सः धृतराष्ट्रः ' आणि सम्यक् जयति सः संजयः ' महर्षी व्यासानी दिव्य दृष्टी दिलेल्या संजयाला राजा धृतराष्ट्र विचारत आहे. सर्व राष्ट्राची धुरा ज्याचेवर असते त्याने दिव्य दृष्टीच्या व्यक्तीलाच विचारले पाहिजे. त्याचाच सल्ला घेतला पाहिजे, नाहीतर घात व्हावयाचा.

धृतराष्ट्र म्हणतो. ' संजया, कुरुक्षेत्राची हकीगत सांग. ' जेथे कौरव गेले आहेत ते कौरवांचे स्थान आहे. ' स्वस्थाने सर्वे बलीयान् ' असा सर्वसाधारण नियम असल्याने धृतराष्ट्राला आपल्या भूमीवर आपला विजय होणारच अशी खात्री वाटत होती. शिवाय कौरव ' समवेताः ' व ' युयुत्सवः ' म्हणजे सुसंघटित व युद्धास उत्सुक आहेत. पांडवांची सात तर कौरवांची अकरा अक्षौहिणी सेना असल्याने व सेनेत अनेक पराक्रमी पुरुष असल्याने कौरवांचे बाहु स्फुरण पावणे साहजिक आहे. कौरवांनी पांडवांचे राज्य घेतल्यावर पांडवांनी वनवास पत्करला व भिक्षाही मागितली; पण माझी मुले तसे मुळीच करणार नाहीत अशी धृतराष्ट्राला खात्री होती; म्हणूनच ' मामकाः ' हे पद मुद्दाम वापरले आहे. वास्तविक पांडव हे त्याच्या भावाचेच मुलगे म्हणून तेही माझेच

असे त्याला म्हणता आले असते. पण मग वादच निर्माण झाला नसता. ‘ दुर्योधनादय: ’ असे न म्हणता ‘ मामका: ’ असे म्हणून माझे पुत्र पांडवाहून वेगळे आहेत व ते पृथक् राहावे असे तो सूचित करतो.

‘ किमकुर्वत ’ म्हणजे काय केले ते सांग. आता युद्धासाठी गेलेले वीर युद्धच करणार. दुसरे काय करणार? मग काय केले असे विचारण्याचे प्रयोजन काय? माणसे लग्नाला म्हणून जातात पण ते लग्न होतेच असे नाही. मुलगी पळून जाते किंवा नवरा मुलगा रुसून बसतो. तसेच इथे झाले नसेल कशावरून? विपरीत घडण्याचीही शक्यता लक्षात घेऊन तो असे विचारीत आहे.

धृतराष्ट्र कुरुक्षेत्राला प्रथमच ‘ धर्मक्षेत्र ’ असे म्हणतो. कौरव ज्येष्ठ म्हणून राज्य कौरवांचे व पुढेही ते कौरवांनाच मिळाले पाहिजे. पाण्डवांचा त्याच्यावर हक्क नाही. आपले राज्य टिकविण्यासाठी केलेले युद्ध हे धर्मयुद्धच होय अशी राजा धृतराष्ट्राची पक्की समजूत असल्याचे ‘ धर्मक्षेत्रे ’ या पदावरून दिसून येते.

राजा धृतराष्ट्राचा प्रश्न व मनोगत जाणून संजय मनात म्हणतो, ‘ हे धर्मक्षेत्र खरे, पण राजा म्हणतो त्याप्रमाणे मात्र नाही. क्षेत्र म्हणजे शरीर. शरीरात धर्म राहतो पण कुणाच्या? प्रत्यक्ष भगवंताच्या. तिथे पांडव आहेत कसे तर ‘ समवेता: ’ म्हणजे धर्माच्या आज्ञेत वागणारे. म्हणून हे राज्य त्यांच्या हाती गेले तर कदापि अहित होणार नाही. उलट कौरवाकडे राज्य गेले तर भाऊबंदकी माजून राज्याचे शंभर तुकडे पडून सर्वनाश होईल. उलट शंभरात पाच सहज खपून जातील. एवढेच नव्हे तर पांच पांडव शंभर कौरवांचे रक्षण करू शकतील. धृतराष्ट्रालाही मान देतील. आणि हे पुढे सिद्धच झाले आहे. धर्मराज गादीवर आल्यावर त्याने धृतराष्ट्राला जितके सन्मानाने वागविले तितका मान दुर्योधनाकडूनही त्याला मिळाला नव्हता.

राजा, तू धृतराष्ट्र आहेस तर ते जितराष्ट्र आहेत. तुम्ही कपटाने घेतलेले राज्य परत घेण्यासाठी युद्ध करणारे पांडव नक्कीच विजयी होतील. आंधळा स्वतः खड्ड्यात पडतो व त्याच्या मागून जाणारेही अधोगतीला जातात तसेच तुझ्या मुलांचे होणार. राजा, तू ज्येष्ठ खरा व ज्येष्ठाचे राज्य हा नियमही मान्य आहे, पण ज्येष्ठ अव्यंग असला पाहिजे. तूं अंध म्हणून पंडूने सर्व कारभार आपले हाती घेतला. व तुला फक्त नामधारी ठेवले. पंडूचे राज्य त्याच्या पुत्रांकडेच जाणे योग्य. ते पांडव पंडूचे पुत्र आहेत. ते शुद्ध बुद्धीचे आहेत. परमात्म्याचे पंचप्राण आहेत. कोणीही आपले प्राण वाचविण्याची पराकाष्ठा करतो, तसे परमात्मा श्रीकृष्णही करणार व तुझ्या मुलांना नाइलाजाने त्याच्याशी युद्ध करावे लागणार. तो अचिंत्य शक्तिसंपन्न आहे, त्याच्या पुढे तुझ्या मुलांचा निभाव लागणे शक्यच नाही. हजारो टोळांनी अग्नीवर झडप घातली म्हणून काय अग्नीचा नाश होईल? उलट टोळच नष्ट होतील. भगवंताच्या शरीरात कौरव आधीच प्रविष्ट झाले आहेत. पांडव निमित्तमात्र आहेत, म्हणून जय पांडवांचाच होणार यात शंका नाही. कारण 'यतो धर्मस्ततो जयः' असा सिद्धांतच आहे.

'राज्य पांडवांचे असता तुझ्या मुलांनी भीमाला वीष चारले. त्यांना लाक्षाघरात जाळून टाकण्याची शिकस्त केली. कपट द्यूत खेळून द्रौपदीसारख्या साध्वी स्त्रीची विटंबना करण्याचा—भर सभेत तिला विवस्त्र करण्याचा-प्रयत्न केला. किती निंद्य कृत्ये केली याची गणतीच नाही. ठरल्याप्रमाणे वनवास व अज्ञातवास पुरा करून परतल्यावरसुद्धा त्यांचे राज्य त्यांना परत दिले नाही. कृष्णशिष्टाईत त्यांनी फक्त पांच गावांची मागणी केली तीही मान्य केली नाही. उलट सुईच्या अग्रावर राहील येवढीही भूमी मिळणार नाही असे उद्दाम उत्तर दिले. या सर्व अन्यायाविरुद्ध पांडव युद्ध करणार आहेत, म्हणून त्यांच्या दृष्टीने ते धर्मयुद्धच आहे.'

‘ पार्थ एव धनुर्धरः ’ हे जगाला पटावे म्हणून अर्जुनाने युद्ध आरंभिले. ती पदवी तर त्याला मिळालीच, शिवाय ब्रह्मानंद-वैभवसुद्धा मिळाले. कांचमणी म्हणून हुडकायला जावे व हाती चिंतामणी लागावा तसा प्रकार झाला.

सर्वसामान्य माणसाला वाटते, व्यवहारात गीतेचा कांही उपयोग नाही; पण ते म्हणणे बरोबर नाही. प्रत्येकाला गीता उपयोगी आहे. प्रत्येकाचे अंतःकरण हे एक कुरुक्षेत्रच आहे. ही एक युद्धभूमी आहे. तेथे दैवी व आसुरी वृत्तींचा लढा अहोरात्र चालू असतो. चोराच्या मनांतही चोरी करण्यापूर्वी चोरी केली तर काय होईल व न केली तर काय होईल असे द्वंद्व चालू असते. त्यात आसुरी वृत्तीचा विजय झाला की चोर चोरी करण्यास प्रवृत्त होतो. प्रत्येकाने वाईट वृत्तीत एखादी का होईना सद्वृत्ती मिसळावी म्हणजे त्याची सर्व कर्मे उजळून निघतील.

‘ माझे पुत्र पराक्रमी आहेत. त्यांचे सैन्य मोठे आहे, मी ज्येष्ठ आहे म्हणून राज्य माझ्या पुत्राकडेच राहिले पाहिजे ही त्यांची भूमिका न्याय्य आहे, त्यासाठी ते युद्ध करीत आहेत म्हणून ते धर्मयुद्धच आहे ’ हे धृतराष्ट्राचे मनोगत कळल्याने संजय विचारात पडला. तो मनात म्हणतो, ‘ आजवर मी याच्या अन्नावर वाढलो आहे. त्यातून मी त्याचा सेवक आहे. मग मला विरुद्ध मत कसे मांडता येईल? पण व्यासानी दिव्य दृष्टी दिली असल्याने राजाच्या भाषणातून निघणारे ध्वनितार्थही मला समजतात व ते सांगितले नाहीत तर तेही बरोबर होणार नाही. मला असे स्पष्ट दिसते की, पांडव कृष्ण शरीरात आहेत व कौरव बाहेर आहेत. भगवत्तेजाने ते युद्धाआधीच निस्तेज झालेले आहेत. मग त्यांचा विजय कसा होईल ? ’

पांडव किती ? पाच. व्यवहारात पाचांची एकवाक्यता कधीच होत नाही. त्यातुन पाचही विद्वान असले तर एकमत होणेच शक्य

नाही. आपल्या देशातील पांच पक्षांच्या प्रमुखांना एकत्र बसून एखाद्या प्रश्नाचा निर्णय करावयास सांगितले तर तो प्रश्न आणखी गुंतागुंतीचा होईल, पण एकमताने सुटणार नाही. एकाचे तोंड पूर्वेला तर दुसऱ्याचे पश्चिमेला. भिन्नाभिन्न पक्षाचे पुढारी कशाला? एकाच पक्षातील पांच जणांची मते परस्पर भिन्न असतात. कारण प्रत्येकजण स्वतःला विशेष बुद्धिमान समजत असतो.

पण पांडवांचे पाहा. त्यांचे प्रत्येकाचे एक एक वैशिष्ठ्य होते. प्रत्येकाचा स्वभाव भिन्न होता. भीम बलवान, अर्जुन शौर्यशाली, नकुल बुद्धिमान तर सहदेवाला सेवा म्हणजे भक्ती प्रिय होती. द्रौपदी कृष्णसखी व पतिव्रता होती. तरी तिला या पांचापैकी भीम अधिक प्रिय होता. तिचे म्हणणे असे की, आपला पक्ष न्याय्य असता, आपण समर्थ असता आपण अन्याय कां म्हणून सहन करावा? पण अशा भिन्न वृत्तीच्या बंधूंना व पत्नीला धर्म आवरून धरत असे. तो म्हणे, प्रत्येकाने आपल्या स्वभावाला थोडी मुरड घातली पाहिजे व कोणीही आततताई-पणा करू नये.

भीम, अर्जुन व द्रौपदी प्रसंगी धर्मराजास दूषणे देत, त्वेषाने बोलत, चीड आली की नकुल सहदेवही बोलायला कमी करीत नसत. द्यूत प्रसंगी तर भीम इतका चिडला होता की रागाने तो म्हणाला, 'सहदेवा, थोडा अग्नी आण, या जुगाऱ्याचे हातच जाळून टाकतो.' पण धर्मराजाने शांती ढळू दिली नाही. तो या सर्वांना फक्त एका धर्मबळावर आवरत असे. पाचांना राहू द्या, पण आपण आज आपल्या अर्धांगीलाही आवरू शकत नाही. ती लगेच म्हणते, 'हे स्वातंत्र्याचे युग आहे. मी मिळवती स्त्री आहे. मी कुणाची ताबेदारी पत्करणार नाही.' मग पाचांना आवरणारा राजा धर्म किती पराक्रमी असेल याची कल्पना करा. अशा पुरुषाचा पराजय कसा होईल?

व्यवहारात आपणाला असेच दिसून येते. प्रत्येकाला आपल्या कर्माचे फळ तात्काळ हवे असते. कर्माची दोन फळे असतात. त्यातले एक लगेच मिळते. तर दुसरे प्रारब्ध बनून कालांतराने मिळते. कौरवांची सेना पांडवांच्या मानाने प्रचण्ड होती. त्यांच्या सैन्यात भीष्म द्रोणासारखे पराक्रमी सेनानी होते; तरीही त्यांचा पराभव कां झाला? ते कांही पराक्रमात उणे होते किंवा चालू कर्मामुळेही नव्हे, तर तो त्यांच्या मागील दुष्कृत्यांचा परिपाक होता. आणि पांडवांचा जय कां झाला? तोही त्यांच्या पूर्व पुण्याईमुळे. मनुष्य सत्कर्म करतो तेव्हा त्याचेवर अनेक संकटे येत राहतात. त्यावेळी तो पेचात पडतो. आपण चांगले वागत असताही आपण अडचणीत का यावे? या प्रश्नाचे उत्तर त्याला बरोबर कळले नाही की त्याचा सत्कर्मावरील विश्वास उडतो. सत्कर्म करणेच श्रेयस्कर असते हे त्याला पटेनासे होते. सरळपणाने वागून दारिद्र्यात खितपत पडण्यापेक्षा चोरी, गुंडगिरी किंवा काळाबाजार करून धनवान झालेले बरे. लोक नावे ठेवू लागले तर त्यांची तोंडे पैशाने बंद करता येतील असा विचार करून तो वाममार्गास प्रवृत्त होतो व शेवटी अधोगतीस जातो.

आपली अधोगती कशी टाळावी, सत्कर्म कोणते व कुकर्म कोणते आणि सत्कर्मच का करावे हे ज्ञान आपणास गीता करून देते.

संजय उवाच—

**दृष्ट्वा तु पाण्डवानीकं व्यूढं दुर्योधनस्तदा ।**
**आचार्यमुपसङ्गम्य राजा वचनमब्रवीत् ॥ २ ॥**

इथे ‘राजा’ व ‘दुर्योधन’ अशी दोन पदे कां घातली आहेत? पांडव काही राजे नव्हते. तेव्हा राजा शब्दाने दुर्योधनाचाच बोध झाला असता. ‘दुःखं योधनं यस्य सः दुर्योधनः’ अशा दुर्योधनाने पांडव सैन्य पाहिले मात्र, त्याला वाटले आपण या युद्धापासून

तात्काळ परावृत्त व्हावे. जयाची त्याला आशाच वाटेना. उगीचच आपण या फंदात पडलो असे त्याला वाटू लागले. पण तो नुसता दुर्योधन नव्हता तर राजाही होता. राजा या नात्याने तो सैन्याची हालचाल करू लागला. मनाच्या कातर अवस्थेत तो द्रोणाचार्यांकडे गेला. भारतीय युद्ध १८ दिवस चालले होते. पैकी पाहिले १० दिवस भीष्म सेनापती होते. त्यावेळी भीष्म १७० वर्षांचे होते. नुसत्या ७० व्या वर्षी आमची किती दयनीय अवस्था असते. साधे उठणे बसणेही दुसऱ्याच्या मदतीशिवाय होत नाही. मग १७० व्या वर्षी अकरा अक्षौहणी सेनेचे आधिपत्य करणाऱ्या भीष्मांचे सामर्थ्य किती प्रचंड असेल याची कल्पना करा. पण अशा समर्थ पितामहांकडे प्रथम न जाता राजा द्रोणाचार्यांकडे गेला. कारण तो 'धिक् बलं क्षात्रबलं ब्रह्मतेजो बलं बलं' हे जाणत होता. याप्रसंगी केवळ क्षात्रबलाचा उपयोग होणार नाही तर ब्रह्मतेजही हवे, म्हणून तो गुरु द्रोणाचार्यांकडे गेला. गुरूकडे जायचे म्हणजे नम्रता हवी, तरच गुरु प्रसन्न होतात. म्हणून गुरु द्रोणाचार्यांना अत्यंत नम्रभावाने वंदन करून तो म्हणाला,

**पश्यैतां पाण्डुपुत्राणामाचार्य महतीं चमूम् ।**
**व्यूढां द्रुपदपुत्रेण तव शिष्येण धीमता ॥ ३ ॥**

मुख्य राजाच भयभीत झाल्यावर इतरांची काय अवस्था झाली असेल याची कल्पना करा. तो पांडवसेनेला 'महतीं चमूम्' असे म्हणतो, यावरून त्याच्या मनांतील भीती व्यक्त होते. सात व अकरा यातला फरक लहान मुलालाही कळतो. मग सम्राट म्हणवून घेणाऱ्या राजाला कळत नसेल असे कसे म्हणता येईल? तो म्हणतो माझी सेना ११ अक्षौहिणी आहे हे खरे, पण त्यात बाजारबुणग्यांची भरतीच अधिक आहे. केवळ संख्या-बळावर युद्ध जिंकता येत नाही हे तो जाणत होता. बहुमताने निवडणूक जिंकता येते, पण भारतीय युद्ध म्हणजे काही निवडणूक नव्हती.

'पांडवांचा सेनापती धृष्टद्युम्न आहे. साक्षात् अग्नीपासून त्याची उत्पत्ती झालेली आहे व तीही खास द्रोणवधासाठी. तो बुद्धिमान आहे. त्याच्यासारखा दुसरा सेनापती पांडवाकडे नाही. शिवाय तो तुमचा शिष्य आहे. त्याच्यातील उणीवा तुम्हाला माहीत असणार. त्याला माहीत नसलेले एखादे अस्त्र वापरून त्याचा नाश करा, की मग आपणाला कशाचेच भय नाही. आपला जय व्हावा असे वाटत असेल तर हा काटा दूर केलाच पाहिजे.' इतके राजा बोलला तरी द्रोणाचार्य गप्पच. दुर्योधन मनात म्हणतो 'हे का बरे बोलत नाहीत? प्रतिस्पर्धी तुल्यबल नाही म्हणून तर हे नाराज झाले नाहीत ना? एखाद्या पहिलवानाला ढेकणाबरोबर कुस्ती खेळ म्हणून सांगितले तर तो रागावतो. तसे याना वाटते की काय?' म्हणून तो पुढे म्हणतो,

अत्र शूरा महेष्वासा भीमार्जुनसमा युधि ।
युयुधानो विराटश्च द्रुपदश्च महारथः ॥४॥

धृष्टकेतुश्चेकितानः काशिराजश्च वीर्यवान् ।
पुरुजित् कुंतिभोजश्च शैब्यश्च नरपुंगवः ॥५॥

युधामन्युश्च विक्रान्त उत्तमौजाश्च वीर्यवान् ।
सौभद्रो द्रौपदेयाश्च सर्व एव महारथाः ॥६॥

'हे गुरुवर्य, पांडवांचा फक्त सेनापतीच श्रेष्ठ आहे असे नव्हे तर त्यांच्या सेनेत भीमार्जुनासारखे प्रबल योद्धे आहेत. युयुधान म्हणजे सात्यकी, विराट, द्रुपद, धृष्टकेतु, चेकितान, काशिराजा, पुरुजित्, कुंतिभोज, शैब्य, युधामन्यु, उत्तमौजा, अभिमन्यु, द्रौपदीचे पांचपुत्र इत्यादी महारथी आहेत. ते विक्रान्त आहेत म्हणजे त्यांनी यापूर्वी अनेक युद्धात जय मिळविलेला आहे. नरपुंगव म्हणजे ते पुरुषश्रेष्ठ आहेत. दहा हजार योद्धयांबरोबर एकदम लढतो तो महारथी. असे महारथी व

शौर्यशाली पुरुष समोर उभे असता त्यांच्याबरोबर युद्ध करण्यात कमीपणा मुळीच नाही.

एवढे राजा बोलतो आहे तरी आचार्य स्तब्धच ! राजा मनात म्हणतो, ' मी येवढे बोलतो तरी हे त्याकडे काहीच लक्ष देत नाहीत. माझ्या बोलण्याला हे प्रतिसाद देत नाहीत याचा अर्थ काय ? हा तर माझा उघड उघड अपमान आहे ' असा विचार करून तो चिडून म्हणाला,

**अस्माकं तु विशिष्टा ये तान्निबोध द्विजोत्तम ।**
**नायका मम सैन्यस्य संज्ञार्थं तान्ब्रवीमि ते ॥ ७॥**

गुरुवर्यांना चिडून तो ' द्विजोत्तम ' असे संबोधित आहे. खऱ्या क्षत्रियाला आपल्या भाषणाने चेव आला असता, त्याचे बाहू स्फुरण पावले असते. अंगात वीरश्री संचारली असती. ब्राह्मणांचा थंडपणा इथे काय कामाचा ? तुम्ही द्विजोत्तम असाल पण येथे तुमचा काही उपयोग नाही. म्हणून तो म्हणतो, ' आमचे योद्धे विशिष्ट आहेत. ( शिष्ट बरे पण विशिष्ट नकोत. कारण त्यांच्यात मतैक्य नसते ) आमच्या विशिष्ट योद्धयांबद्दल मी थोडक्यात सांगतो '

तरीही आचार्य काही बोलले नाहीत. त्यानी विचार केला याला काहीही सांगितले तरी हा अशा मनःस्थितीत आहे की, त्यातून हा विपरीतच अर्थ काढणार. त्यापेक्षा मौन बरे. दुर्योधनाने त्यांच्या मौनाचाही विपरीत अर्थ काढला. ज्याअर्थी हे काही बोलत नाहीत त्या अर्थी हे पांडवांचे पक्षपाती असले पाहिजेत. आतापर्यंत जेव्हा जेव्हा आम्ही पांडवाबरोबर युद्ध करण्याचा प्रस्ताव मांडला, तेव्हा तेव्हा यांनी पांडवांचीच बाजू उचलून धरली आहे. पण आता मला यांचेकडून काम करून घ्यायचे आहे म्हणून याना खूष करणे आवश्यक आहे, म्हणून तो म्हणतो:—

**भवान्भीष्मश्च कर्णश्च कृपश्च समितिंजयः ।**
**अश्वत्थामा विकर्णश्च सौमदत्तिस्तथैव च ॥ ८ ॥**

भीष्म सेनापती असता त्यांचा उल्लेख प्रथम न करता ' भवान् ' म्हणजे आमच्या सेनेतील प्रथम योद्धे आपण आहात असे म्हणतो. हा बुद्धिमान पुरुष आपल्या बोलण्यातील गर्भितार्थ जाणून रागावला तर सारेच बिघडायचे. त्यापेक्षा त्यांचा प्रथम उल्लेख केलेला बरा. द्रोणाचार्यानंतर भीष्म, कर्ण व कृपाचार्यांचे नाव घेतो, पण लगेच कर्णानंतर आपला उल्लेख केला म्हणून कृपाचार्यांना राग येईल अशा शंकेने त्यांना 'समितिंजय' असे विशेषण जोडले. समितिंजय म्हणजे युद्धात खात्रीने विजय मिळविणारे. कृपाचार्यांचा असा गौरव करतो कारण कृपाचार्यही त्याचे गुरु आहेत. पुनः द्रोणाचार्यांना संतुष्ट करण्यासाठी त्यांच्या पुत्राचा अश्वत्थाम्याचा उल्लेख करतो. अश्वत्थाम्याप्रमाणेच विकर्ण व सोमदत्त राजाचा मुलगा ' भूरिश्रवा ' हे वीरही आपल्या सेनेत आहेत, असे दुर्योधन द्रोणाचार्यांना सांगत आहे.

दुर्योधनाच्या या बोलण्यावरून त्याचे शहाणपण उठून दिसते. चुका सर्वांच्याच हातून होत असतात. त्या समजताच जो सुधारून घेतो तो खरा शहाणा. नभोवाणीवरील निवेदक बोलण्यात चूक झाली की पुनः बोलू लागण्यापूर्वी ' माफ करा ' असे म्हणतो. त्याप्रमाणे ' द्विजोत्तम ' म्हटल्याने निंदा झाली असे वाटताच ' भवान् ' म्हणून तो आपली चूक सुधारून घेतो.

धृतराष्ट्राच्या मते विजय आपल्या पक्षाचा व्हायला पाहिजे. तो अंध आहे. अंधाला विचार अधिक असतो. कारण त्याच्या डोळ्यांची सर्व शक्ती त्याच्या बुद्धीत केन्द्रित झालेली असते. ' सत्यं ब्रूयात् प्रियं ब्रूयात् प्रियं च नानृतं ब्रूयात् ' असे मनूने सांगून ठेवले आहे. सत्य असून प्रिय असेल तेच सांगावे. असत्य असून प्रिय असले तरी न सांगणे बरे. संजयाने हेच धोरण ठेवले आहे. म्हणून त्याच्या सांगण्यात

ध्वन्यर्थ भरलेला आहे. वरवरच्या अर्थापेक्षा ध्वन्यर्थालाच अधिक महत्त्व असते. म्हणून संजय खोटे बोलत नाही किंवा अप्रिय वाटेल असेही बोलत नाही.

दुर्योधन आपल्या सेनेचे आणखी वर्णन करीत आहे.

**अन्ये च बहवः शूरा मदर्थे त्यक्तजीविताः ।**
**नानाशस्त्रप्रहरणाः सर्वे युद्धविशारदाः ॥ ९ ॥**

आमचीही सेना महान आहे. वर सांगितलेल्या योद्ध्यांखेरीज आणखी कितीतरी योद्धे आहेत. पांडवाकडील योद्ध्यांची संख्या सतरा झाली पण, आपल्या बाजूच्या वीरांची गणती करताना साताच्यावर जाईना, म्हणून आणखी कितीतरी असा मोघम उल्लेख करून दुर्योधन वेळ मारून नेत आहे.

योद्धा स्वतःसाठी लढताना प्राणपणाने लढतो, पण तो दुसऱ्यासाठी इतका निकराने लढणार नाही. अशी शंका आपल्या वीराबद्दल नको म्हणून आपल्या वीरांचे 'मदर्थे त्यक्तजीविताः' असे वर्णन केले आहे. हे वीर माझ्यासाठी आपले प्राण अर्पण करण्यासही तयार आहेत असे तो म्हणतो. पण वीरांच्या यादीत स्वतःचे नाव घालण्याचे टाळतो. म्हणजे त्याला स्वतःचा जीव प्रिय आहे. पांडवसैन्य शस्त्रनिपुण आहे तर आमचे सैन्य युद्धनिपुण आहे असे तो म्हणतो.

**अपर्याप्तं तदस्माकं बलं भीष्माभिरक्षितम् ।**
**पर्याप्तं त्विदमेतेषां बलं भीमाभिरक्षितम् ॥ १० ॥**

माझे सैन्य अपरिमित म्हणजेच अफाट आहे व भीष्मामुळे ते सुरक्षित आहे. त्यांचे सैन्य मोजके आहे व त्याचे रक्षण बळशाली भीम करीत आहे. त्यांचे सैन्य मोजके असल्यामुळे जिंकायला सुलभ असा अर्थ

सूचित करतो. ' अपर्याप्तं ' चा दुसरा अर्थ असमर्थ असाही आहे. भीष्म कौरव पक्षाचे खरे पण त्यांचे प्रेम पांडवावर आहे. ' पांडवांचा विजय होवो ' अशी ते रोज प्रार्थना करतात. मग भीष्म कौरवांना विजय मिळवून देतील हे कसे शक्य आहे? भीष्म आणि भीम या दोन्ही शब्दांचा अर्थ भयंकर असाच आहे. भीष्मामध्ये फक्त एक षकार जास्त आहे. भीष्मांच्या पोटात भीम शिरलेला आहे. तो त्याना जिवंत ठेवील हे कसे शक्य आहे? कौरव सेनापती भीष्माबरोबर पांडव सेनापती धृष्टद्युम्नाचा उल्लेख दुर्योधन करीत नाही. कारण त्याचा काटा काढून टाकण्याचे काम त्याने आधीच आचार्य द्रोणांना प्रथमच सांगितले आहे. दुर्योधनाच्या दृष्टीने खरे भय पांडवसेनापतीपासून नाही, तर भीमापासूनच आहे. भीष्म वृद्ध तर भीम तरणाबांड. मोडेन पण वाकणार नाही हा भीमाचा बाणा. तर भीष्म आधीच विरुद्ध बाजूस झुकलेले, म्हणून आपला जय होणे अशक्य आहे असेच दुर्योधनाला वाटत होते.

दुर्योधनाने इतकी बडबड केली तरीही आचार्य द्रोण काही बोलले नाहीत. ते मनात म्हणाले, भीष्म सेनापती असता हा माझ्याकडे कां आला आहे? हा एकीकडे गुरूला मान देण्याचे नाटक करतो आणि दुसरीकडे माझी निंदागर्भ स्तुती करतो, तेव्हा याच्याशी बोलण्यात काही अर्थ नाही.

द्रोणाचार्यांच्या मौनामुळे दुर्योधनास अर्थातच राग आला. तो आपल्या सेनेकडे मुख करून म्हणाला,

**अयनेषु च सर्वेषु यथाभागमवस्थिताः ।**
**भीष्ममेवाभिरक्षन्तु भवन्तः सर्व एव हि ॥ ११ ॥**

हे सैनिक हो, तुम्ही व्यूहद्वारात राहून भीष्मांचे रक्षण करा. द्रोणांचे रक्षण करा असे सांगत नाही. त्यांच्या रक्षणाची पर्वा करीत नाही. पुढे पुत्रवधाने व्याकुळ होऊन शस्त्रसंन्यास केल्यावर धृष्टद्युम्नाने त्यांचा अधर्माने वध केला. सर्व कौरवपक्षीय वीरांच्या समक्ष हे घडले

पण कोणीही प्रतिकार केला नाही. नुसते भीष्माचे रक्षण करा असे न म्हणता 'भीष्म एव' म्हणजे भीष्मांचेच रक्षण करा. पर्यायाने द्रोणांचे रक्षण करू नका असेच तो सुचवितो. भीष्म सेनापति होते व सेनापतीचे संरक्षण करणे हे तर सेनेचे कर्तव्यच आहे. मग तेच त्यांना सांगण्याची राजाला कां आवश्यकता भासली ? राजाच्या शरीररक्षकांना राजाचे रक्षण करा असे सांगण्याची काय आवश्यकता ? त्यासाठीच त्यांची नेमणूक असते. थोडक्यात द्रोणाचार्यांच्या मौनामुळे रागावून दुर्योधनाने त्यांचा अपमान केला.

ही हकीगत ऐकून धृतराष्ट्र मात्र व्याकुळ झाला. तो म्हणाला, 'ऐन युद्ध प्रसंगी आपल्या मुलाने आपल्या गुरूचा असा अपमान करणे योग्य नाही. शिवाय स्वमुखाने भीष्मपक्षाचे म्हणजेच पर्यायाने पांडवांचे रक्षण करा असा आदेश देतो, म्हणजे याला स्वतःच्या जयाची अपेक्षा नाही वाटते ? भीष्म व द्रोण हेच तर दोन प्रमुख योद्धे, तेच नाराज झाले तर इतर कसे लढतील ? आणि विजय तरी कसा मिळेल ?

भीष्म म्हणाले, याने गुरुजनांचा अपमान केला हे काही याने बरोबर केले नाही. तेव्हा हा राजा असला तरी याची स्तुती करण्यात अर्थ नाही. पण मी वयोवृद्ध, ज्ञानवृद्ध असल्याने मला तसा मर्यादाभंग करता येणार नाही. तो तरुण आहे. गुरूचे प्रोत्साहन न मिळाल्याने त्याचेकडून वावगे बोलणे झाले असेल, पण आपण त्याला सांभाळून घेतले पाहिजे. हा माझा नातू आहे. राजाही आहे. तेव्हा अशा आणीबाणीच्या प्रसंगी याला धीर देणेच आपले कर्तव्य आहे. हा आनंदित होईल असे काही केले पाहिजे. असे मनाशी ठरवून त्यानी आपला शंख फुंकला.

**तस्य संजनयन् हर्षं कुरुवृद्धः पितामहः ।**
**सिंहनादं विनद्योच्चैः शंखं दध्मौ प्रतापवान् ॥१२॥**

दुर्योधनाला आनंदित करण्यासाठी वृद्धपितामहानी अत्यंत प्रतापी असा शंख फुंकून सिंहाप्रमाणे मोठी गर्जना करून कुरुक्षेत्र दणाणून टाकले. मनुष्य आसन्नमरण झाल्यावर अगदी शेवटच्या क्षणी हेमगर्भमात्रा देतात तसा हा शंखनाद होता. त्या मात्रेने प्राण लगेच जात नाहीत हे खरे, पण किती काळ तग धरतील याचीही शाश्वती नसते.

**ततः शंखाश्च भेर्यश्च पणवानकगोमुखाः ।**
**सहसैवाभ्यहन्यन्त स शब्दस्तुमुलोऽभवेत् ॥१३॥**

भीष्मांचे अनुकरण इतरांनी केले. सर्वांनी एकदम आपआपले शंख, (भेरी, पणव, आनक, गोमुख) कर्णे, नगारे, ढोल बडवायला सुरवात केली. त्या वाद्यांचा अतिशय कर्णकर्कश असा आवाज झाला. कौरव सेनेच्या युद्धपुकाराचे वर्णन संजय असे थोडक्यात करतो. कोणी काय वाजविले ते स्वतंत्रपणे सांगत नाही. कारण कोणी उल्लेख करण्यासारखा असा त्याला त्या सेनेत आढळलाच नाही. पांडव सेनेचे मात्र सविस्तर वर्णन करतो.

**तत श्वेतैर्हयैर्युक्ते महति स्यंदने स्थितौ ।**
**माधवः पांडवश्चैव दिव्यौ शंखौ प्रदध्मतुः ॥१४॥**

प्रथम माधवाने शंख फुंकला. भीष्मानी शंखनाद केल्याचे सांगितल्यावर पांडव सेनापती धृष्टद्युम्नाने प्रत्युत्तर म्हणून शंख वाजविला असे संजय सांगत नाही. कारण धृष्टद्युम्न हा तसा नामधारी सेनापती होता. खरी सूत्रे श्रीकृष्णाच्याच हातात होती. तोच सारे करीत होता. पण आपण केले असे सांगणे त्याला आवडत नाही. म्हणून 'माधव' असा त्याचा उल्लेख केला आहे. माधव म्हणजे लक्ष्मीपती. रणलक्ष्मी,

विजयलक्ष्मी, नीतिलक्ष्मी, धनलक्ष्मी या सगळ्या त्याच्या पायाशी लोळण घेतात.

अर्जुनाने खांडवन अग्नीला भक्षणासाठी दिल्यावर अग्नीने संतुष्ट होऊन जो रथ दिला होता, त्यात कृष्णार्जुन बसलेले होते. असा सुंदर रथ दोन्ही सैन्यात दुसरा नव्हता. म्हणून ' महति ' असे विशेषण लावलेले आहे. या रथाला जोडलेले घोडे शुभ्र होते. यश नेहमी शुभ्र धवल असते व ते प्रदान करून देणारे अश्वही शुभ्रच हवेत. श्रीकृष्ण सारथी व अर्जुन रथी होता. पण त्या दोघात मोटार मालक व ड्रायव्हर असा उच्चनीच भाव नव्हता. भगवान स्वेच्छेने सारथी झालेले होते. युद्ध सुरु होईपर्यन्त ते दोघे एकमेकांच्या अर्ध्या आसनावर बसणारे मित्रच होते. त्या रथाचे नावही ' विजय ' असे होते. त्याच्या नुसत्या दर्शनाने आणि नादाने शत्रुसैन्याची शुद्धीच हरपत असे. त्याच्या ध्वजावर मारुती होता. रथांतील शस्त्रसामुग्रीही तशीच दिव्य होती. अशा रथात बसलेल्या श्रीकृष्णार्जुनांनी नुसते शंख फुंकले नाहीत तर ' प्रदध्मतुः ' म्हणजे प्रकर्षाने वाजविले. त्या नादाने पांडव सैन्यास प्रोत्साहन मिळाले, तर कौरव सैन्याचे धाबे दणाणले.

**पांचजन्यं हृषीकेशो देवदत्तं धनंजयः ।**
**पौंड्रं दध्मौ महाशंखं भीमकर्मा वृकोदरः ॥१५॥**

श्रीकृष्णाने पांचजन्य, अर्जुनाने देवदत्त, महापराक्रमी भीमाने पौंड्र नावाचा महाशंख वाजविला.

**अनन्तविजयं राजा कुन्तीपुत्रो युधिष्ठिरः ।**
**नकुलः सहदेवश्च सुघोषमणिपुष्पकौ ॥१६॥**

धर्मराजाने अनंतविजय, नकुलसहदेवाने सुघोष व मणिपुष्पक नांवाचे शंख फुंकले.

**काश्यश्च परमेष्वासः शिखंडी च महारथः ।**
**धृष्टद्युम्नो विराटश्च सात्यकिश्चापराजितः ॥१७॥**
**द्रुपदो द्रौपदेयाश्च सर्वशः पृथिवीपते ।**
**सौभद्रश्च महाबाहुः शंखान्दध्मुः पृथक् पृथक् ॥१८॥**

हे पृथ्वीनाथ धृतराष्ट्रा, महाधनुर्धर काशिराजा, महारथी शिखंडी, धृष्टद्युम्न, विराट, शत्रूकडून कधीही पराजय न पावलेला सात्यकी, द्रुपद, द्रौपदीचे पुत्र, सुभद्रापुत्र महाबाहू अभिमन्यु, यांनी आपआपले शंख पुकारून रणभूमी दणाणून टाकली.

**स घोषो धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत् ।**
**नभश्च पृथिवीं चैव तुमुलो व्यनुनादयन् ॥१९॥**

श्रीकृष्णाच्या पांचजन्याने युद्धाआधीच कौरवांची हृदये विदीर्ण झाली. ' हृदयं चित्तवक्षसो: ' म्हणजे चित्त आणि वक्षस्थळ या दोहोला हृदय शब्द लागू पडतो. ज्ञान, चेतना, धैर्य, कृती, उत्साह हे पांच मनाचे धर्म आहेत. पांडवांच्या शंखनादाने कौरव इतके भयभीत झाले की, त्यांच्या मनाचे हे पाचही धर्म लयाला गेले. गर्भगळीत होऊन ते चेतनाशून्य झाले. आकाश व पृथ्वीमधील प्रचंड अंतरही या रणघोषाने विलग झाले. महाभूते ज्या नादाने विदीर्ण झाली तेथे कौरवांची काय कथा?

भगवान म्हणतात, माझ्याबरोबर युद्ध करण्याची या कौरवांची योग्यताच नाही. या सामान्य जनाशी मी कशाला लढू?

' न धरी शस्त्र करी मी गोष्टी सांगेन युक्तीच्या चार '

अशी माझी प्रतिज्ञा आहे. मी ती कशाला मोडू? पण यांना मारणे तर आवश्यक आहे. म्हणून केवळ गर्जना करूनच त्यांना मी मारून टाकले आहे. म्हणूनच पुढे अकराव्या अध्यायात भगवान म्हणतात,

' मयैवैते निहताः पूर्वमेव ' यांना मी पूर्वीच मारलेले आहे. मग एकदा मारलेले कौरव पुनः युद्धाला कसे उभे राहिले? भगवंताने तसा संकल्प केला म्हणून. कारण अर्जुन अधर्मयुद्ध करणार नाही. मृत, मूर्च्छित, स्त्रिया व प्रेक्षक यांचेवर शस्त्र चालवायचे नाहीं, असा धर्मयुद्धांतील नियम आहे. त्याचे तो उल्लंघन करणार नाहीं. म्हणून कौरवांना जिवंत भासविणे आवश्यक होते. शिवाय अर्जुनाची कीर्ती होणेही जरूरीचे होते. देवाच्या मनात तारायचे असल्यावर त्याला कोणीही मारू शकत नाही. कौरव उभे रहावेत असा त्याचा संकल्प होता म्हणूनच ते युद्ध करू शकले. भगवंताला काही अशक्य नाही.

अथ व्यवस्थितान्दृष्ट्वा धार्तराष्ट्रान् कपिध्वजः ।
प्रवृत्ते शस्त्रसंपाते धनुरुद्यम्य पांडवः ॥२०॥
हृषीकेशं तदा वाक्यमिदमाह महीपते ।

अर्जुन उवाच—

सेनयोरुभयोर्मध्ये रथं स्थापय मेऽच्युत ॥२१॥

अर्जुन हा कपिध्वज होता. कपि म्हणजे रामायणांतील प्रख्यात वानर आंजनेय—मारुति. तो त्याच्या रथावर होता. मारुती हा प्रत्यक्ष रुद्राचा अवतार. श्रीकृष्णाच्या पांचजन्यानेही जे मेले नसतील ते मारुतीच्या बुभुःकाराने खलास होत. अर्जुनाने कौरवसैन्य युद्धोत्सुक असल्याचे पाहिले आणि आपले गांडीव धनुष्य उचलले.

संजय म्हणतो, " राजा, अजून युद्ध प्रत्यक्ष सुरू झाले नाही. तोवरच संधी करून मोकळा हो. अजून विचार कर. एकदा का अर्जुनाने युद्धाला सुरवात केली की तो ऐकणार नाही. "

धृतराष्ट्र म्हणतो, ' संजया, ही माझी मुले माझे ऐकत नाहीत, त्याला काय करू? "

संजय– " तू राजा आहेस ना, मग त्यांचा निग्रह करून त्यांना संधी करायला भाग पाड. "

यातील पहिल्या श्लोकात कपिध्वज आणि पांडव अशी दोन विशेषणे आली आहेत. मग पुनः 'अर्जुन उवाच' हे शब्द कशाला ? अर्जुनाचे भाग्य मोठे हे या पुनरुक्तीने दाखवून देतो. इन्द्र, चंद्र, वरुण व यम या चारी दिक्पालांचे जो नियमन करतो, त्या ईश्वराला अर्जुनाने सारथी बनविले आहे. दोन्ही सैन्यामध्ये माझा रथ उभा कर. असे सांगताना अर्जुन कृष्ण न म्हणता त्याला अच्युत असे संबोधितो. मला जर शोक मोह झाला व मी कर्तव्यच्युत झालो, तर तू अच्युत असल्याने तसे होऊच देणार नाहीस. पुनः कर्तव्यतत्पर करशील असे तो यातून सुचवितो.

**यावदेतान्निरीक्षेऽहं योद्धुकामानवस्थितान् ।**
**कैर्मया सह योद्धव्यमस्मिन्रणसमुद्यमे ॥२२॥**
**योत्स्यमानानवेक्षेऽहं य एतेऽत्र समागताः ।**
**धार्तराष्ट्रस्य दुर्बुद्धेर्युद्धे प्रियचिकीर्षवः ॥२३॥**

खरे म्हणजे हे सारे वीर अर्जुनाने पूर्वी अनेकदा पाहिलेले होते. पण आता प्रत्यक्ष युद्ध कोणाबरोबर करायचे या दृष्टीने तो शत्रुपक्षाचे अवलोकन करतो. दुष्टबुद्धी दुर्योधनाचे प्रिय इच्छिणारे व युद्धोत्सुक वीर कोणकोण जमले आहेत ते एकदा पाहून घेऊ या, असे अर्जुन म्हणतो.

युद्धापूर्वी दुर्योधन श्रीकृष्णाप्रमाणेच बळरामाकडेही मदतीसाठी गेला होता. तेव्हा बळराम त्याला म्हणाला, ' मी तुमच्या पक्षाचाच आहे. मी तुझ्या बाजूने लढू लागलो तर मला समोरच्या श्रीकृष्णावरही आघात करावे लागतील. पण ते माझ्याकडून होणार नाहीं. म्हणून मी आता तीर्थयात्रेलाच निघून जातो. ' अशा प्रकारे बळरामाने तटस्थपणाचे धोरण स्वीकारले. हीच भूमिका भीष्म, द्रोण, कृप, अश्वत्थामा यांनीही

स्वीकारणे आवश्यक होते. कौरव व पांडव हे दोघेही भीष्मांचे नातू आणि द्रोणांचे शिष्य, असे असता हे या दुर्बुद्धीच्या पक्षाला कां बरे चिकटून राहिले आहेत ? हे अर्जुनाला पहायचे होते.

संजय उवाच—

**एवमुक्तो हृषीकेशो गुडाकेशेन भारत ।**
**सेनयोरुभयोर्मध्ये स्थापयित्वा रथोत्तमम् ॥२४॥**
**भीष्मद्रोणप्रमुखतः सर्वेषां च महीक्षिताम् ।**
**उवाच पार्थ पश्यैतान्समवेतान्कुरूनिति ॥२५॥**

संजय म्हणाला, " हे राजा, अर्जुनाची विनंति ऐकताच श्रीकृष्णाने आपला उत्कृष्ट रथ राजे, महाराजे व भीष्मद्रोणादि ज्यात आहेत, अशा दोन्ही सैन्यांच्या मध्यभागी उभा केला व म्हणाला. ' अर्जुना, येथे जमलेल्या कौरवांना एकदा पाहून घे ' स्वजनांना पाहून हा मोहित होणार हे भगवान जाणतच होता. मग त्यानी आधीच अर्जुनाला त्यापासून परावृत्त का केले नाही ? अजुनाचा प्रत्येक हुकूम मानायला ते काय त्याचे पगारदार नोकर थोडेच होते ! पण भगवंत हे प्रत्यक्ष ज्ञानमार्तंडच असल्याने अर्जुनाला शोक मोह झाले तरी ते धुक्याप्रमाणे नाहींसे करून टाकण्याचे त्यांच्यात सामर्थ्य होते. शत्रू सुसज्ज असता त्याच्यापुढे एकट्या अर्जुनाला उभे करणे अत्यंत धोक्याचे होते, हे काय ते जाणत नव्हते ? तरीही त्यानी अर्जुनाच्या सांगण्याप्रमाणे त्यास दोन्ही सैन्याच्या मध्ये उभे केले. कारण, अर्जुनावर अनुग्रह करून त्यास कर्तव्यनिष्ठ करण्यास ते समर्थ होते.

सबंध गीतेत धृतराष्ट्र हा एकच श्रोता व संजय हा एकच वक्ता असता ' संजय उवाच ' ह शब्द पुनः कां घातले आहेत ? याचे कारण संजय येथे राजाचा पूर्वीसारखा केवळ सारथी नाही. व्यासकृपेमुळे त्याला

दूरश्रवण व दूरदर्शनाची शक्ती प्राप्त झालेली होती. म्हणून तो भगवंताचे हृद्गतही जाणू शकत होता. अर्जुनावर भगवंत अनुग्रह करणार हेही त्याला दिसत होते. भगवान हृषीकेश होते. 'हृषीकाणां ईशः' म्हणजे इंद्रियांचा स्वामी. आम्ही आज्ञा केली तरी इंद्रिये आमचे ऐकत नाहीत. मनसुद्धा टांग्याच्या घोड्याप्रमाणे अडून बसते. ते धड पुढेही जात नाही की धड मागेही येत नाही. वाणीचे सुद्धा तसेच होते. एखादा मनुष्य बरेच दिवसांनी भेटला की त्याला कोठेतरी पाहिल्याचे स्मरते. त्याचे नावही ओठावर असते, पण आठवत नाही. असे कां होते? कारण आपल्यावर हृषीकेश प्रसन्न नसतो. जेथून वीज निर्माण होते ते विद्युत्गृहच जर बंद असेल तर घरातील बटणे खालीवर करून प्रकाश थोडाच पडणार आहे? उजेड तर पडणार नाही, पण बटणे मात्र मोडून जातील. तसेच इंद्रियांच्या बाबतीत आहे. त्यांची प्रेरक शक्ती असलेला भगवान हृदयात जागृत असला पाहिजे. भगवान म्हणतात, 'अर्जुना, तू खुशाल शत्रूपुढे उभा रहा. मी प्रेरणा केली नाही, तर त्यांची शस्त्र उचलण्याची काय प्राज्ञा आहे?'

अर्जुनाला गुडाकेश म्हणतात. गुडाका म्हणजे निद्रा. आपण म्हणू तेव्हा झोप लागली पाहिजे व म्हणू तेव्हा जाग आली पाहिजे; ही एक प्रकारची सिद्धी आहे. सकाळी सहाची गाडी आहे. रात्री सर्व तयारी करून टेवली आहे. रिझर्वेशनही करून ठेवलेले आहे. स्थानकापर्यन्त जाण्यासाठी स्वतःचे वाहन आहे. अशा परिस्थितीत साडेपाचपर्यंत झोपायला काय हरकत आहे? पण गांवाला जाण्याच्या कल्पनेने चार पासूनच जाग येते. अंथरूणावर पडणे आपल्या हातात असते, पण झोप लागणे कांही आपल्या हातचे नाही. पूर्ण झोप झाली असेल तर उत्साह दिसतो, म्हणून झोप आपल्या स्वाधीन हवी. अर्जुनाला ही सिद्धी प्राप्त झालेली असल्यामुळे युद्धकाळातही अवसर मिळाला की तो झोप घेई.

म्हणून त्याचा उत्साह कमी होत नसे. म्हणूनच तो ज्ञानाचा अधिकारी झाला.

कौरवसैन्याकडे पाहिल्यावर त्याला कर्ण दिसला. कर्णाला तो आपला शत्रू समजत होता. त्याच्याशी लढताना अर्जुनाचे तेज व वीर्य वृद्धिंगत होत असे. पण भीष्मद्रोणाबद्दल त्याची वृत्ती वेगळी होती. भीष्म तर पितामह. बालपणी त्यानीच पांडवांचा सांभाळ केला. द्रोणाचार्यांनी अर्जुनाला धर्नुवेद दिला. त्यामुळे त्या दोघांना पाहून अर्जुनाच्या मनात पूज्यबुद्धीच जागृत झाली. द्रोणानी बाण सोडले तरच त्याना प्रत्युत्तर द्यायचे असे त्याने ठरविले होते. प्रत्यक्ष युद्ध सुरू झाले तेव्हां अर्जुनाने पहिले दोन बाण असे सोडले की, ते फुलाप्रमाणे आचार्यांच्या पायावर जाऊन पडले. अशा रीतीने वंदन करूनच मग युद्धारंभ त्याने केला.

जगच्चालकाला आपला सारथी बनवून त्याला आज्ञा करण्याचे भाग्य अर्जुनाला लाभले होते. हे भाग्य कसे लाभले? कारण अर्जुनाने भगवंताला पूर्ण शरणागती दिलेली होती. संजय म्हणतो, ‘ राजा तूही भरतकुलातच उत्पन्न झालेला आहेस. त्या श्रेष्ठ कुळाला साजेल असेच वाग. पांडवांना शरण जाऊ नकोस, पण भगवंताला शरणागती द्यायला काय हरकत आहे? भगवान श्रीकृष्णाला शरण गेलास, तर तुझे पुत्र, पांडव आणि त्यांना मदत करायला आलेल्या सर्वांचे कल्याण होईल. या गोष्टीचा कर. ’

पण पुत्रमोहामुळे धृतराष्ट्राला हे संजयाचे बोलणे ऐकूच गेले नाही. पण त्याचा मोह कोण घालविणार? अर्जुनाचा शोक मोह घालविण्यास भगवान त्याच्या सन्निध होते. तसे धृतराष्ट्राच्या सन्निध कोणी नसल्याने त्याचे दुःख कायम राहिले.

तत्रापश्यत् स्थितान्पार्थः पितॄनथ पितामहान् ।
आचार्यान् मातुलान् भ्रातॄन्पुत्रान्पौत्रान्सखींस्तथा ॥२६॥
श्वशुरान् सुहृदश्चैव सेनयोरुभयोरपि ।
तान्समीक्ष्य स कौन्तेयः सर्वान्बन्धूनवस्थितान् ॥२७॥
कृपया परयाविष्टो विषीदन्निदमब्रवीत् ।

तेथे अर्जुनाचे साक्षात पिते नव्हते पण चुलते होते. म्हणून त्यांना उद्देशून 'पितॄन्' असा शब्द योजला आहे. पितामह म्हणजे भीष्म, सोमदत्त, बाल्हिक, द्रोण व कृप हे आचार्य, शकुनि हा मामा, दुर्योधनादिक बंधु, लक्ष्मण, अभिमन्यू हे पुत्र, त्यांची मुले म्हणजे नातवंडे, अश्वत्थामा हा मित्र, श्वशुर म्हणजे विराट, द्रुपद इ. सुहृद म्हणजे शल्यासारखे मित्र असूनही शत्रू पक्षास गेलेले या सर्वांना अर्जुनाने पाहिले. यापैकी पिते, पितामह, आचार्य व मातुल हे सारे पूज्य असून पुत्रपौत्र कृपा कोटीतील होते. मित्रावर प्रेम असल्याने त्यांचेशी युद्ध करणे अवघड जाते. दोन्ही सैन्यात प्रेमाची मंडळी होती. त्यांना पाहून त्याचे मन माघार घेऊ लागले. सर्व आपलेच स्वजन पाहून त्याच्या मनात कृपा निर्माण झाली. नुसती कृपा केव्हाही चांगली, पण येथे तिला परा असे विशेषण जोडले आहे. म्हणजे येथे आगंतुक म्हणून अयोग्य आहे. या कृपेलाच शास्त्रकार मोह किंवा अज्ञान असे म्हणतात. 'आविष्टः' म्हणजे पछाडला गेला. भूत माणसाला पछाडते तसे. कृपेमुळे तो पछाडला गेला. तो विषाद करू लागला. शोक व मोह ही संसाराची बीजे आहेत. ही नसतील तर संसारच होणार नाही.

अर्जुनाला विषाद झालेला ऐकून धृतराष्ट्र मनात आनंदित झाला. कारण त्याला सर्वात अधिक भीती अर्जुनाचीच वाटत होती. तोच शोकाकुल झाल्यामुळे आता माझे पुत्र याचे हातून सुखरूप राहतील, अशी आशा त्याच्या मनात निर्माण झाली.

अर्जुन उवाच —

**दृष्ट्वेमं स्वजनं कृष्ण युयुत्सुं समुपस्थितम् ॥२८॥**

संजयाने धृतराष्ट्राचे मनोगत जाणले व तो म्हणाला, 'राजा ही तुझी दुराशा निराधार आहे. 'वलक्षो धवलोऽर्जुनः' म्हणजे अर्जुन हा मुळचा शुद्ध स्वभावाचाच आहे. शिवाय तो भगवत्कृपापात्र आहे. त्यामुळे त्याचा शोकमोह फार काळ न टिकता तो पूर्व स्वभावाला येईल.' हे सूचित करण्यासाठी मागे कौन्तेय हा शब्द आला असता पुनः अर्जुन उवाच असे म्हटले आहे.

अर्जुन म्हणतो, 'मी शोक—मोहाने व्याप्त झालो तरी तू कृष्ण आहेस. कृष्ण म्हणजे 'भक्तदुःखकर्षिन्'—भक्तांचे दुःख दूर करणारा आहेस, म्हणून मी भीत नाही.'

**सीदन्ति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति ।**
**वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते ॥२९॥**

हे युद्धोत्सुक स्वजन पाहून माझी गात्रे विकल झाली आहेत. शरीर असमर्थ झाले म्हणून वाणीकडून कार्य करावे, तर तोंडाला कोरड पडली. आहे. शरीराला कापरे भरून सर्वांगावर काटा उभा राहिला आहे

**गाण्डीवं स्रंसते हस्तात्त्वक्चैव परिदह्यते ।**
**न च शक्नोम्यवस्थातुं भ्रमतीव च मे मनः ॥३०॥**

धैर्य गेल्यामुळे गांडीव धनुष्य हातून गळून पडले आहे. मनस्ताप इतका झाला आहे की, तो त्वचेपर्यन्त येऊन ती तापली आहे. भगवान म्हणाले, 'लढता येत नसेल तर नुसता उभा तरी राहा'— अलीकडे पक्षप्रमुख आपल्या उमेदवाराला नाही का सांगत की पडलास तरी चालेल पण उभा राहा. अर्जुन म्हणाला तेही मला अशक्य आहे.

कारण मला ‘भ्रमण’ म्हणजे चक्कर येत आहे. भ्रमण ही मूर्च्छनेची प्रथमावस्था आहे.

**निमित्तानि च पश्यामि विपरीतानि केशव ।**
**न च श्रेयोऽनुपश्यामि हत्वा स्वजनमाहवे ॥३१॥**

हे केशवा, मला शकुन पण चांगले होत नाहीत. युद्धप्रसंगी स्वर्गीय, अंतरिक्ष व भौम उत्पात होत असतात. रामरावण युद्धाआधी सुद्धा असेच उत्पात झाले होते. पण ते सर्व रावणाला सावध करण्यासाठी आहेत हे राम जाणत होता. तसेच आता होणारे उत्पात हे कौरवासाठी होते, पण अर्जुन ते आपणासाठी आहेत असे समजू लागला. कारण मोहामुळे त्याला विपरीत ज्ञान होऊ लागले होते. मोहामुळे कर्मेन्द्रिये तर दुबळी होतात, पण ज्ञानेन्द्रियेही कार्य करीनाशी होतात. ज्ञान झालेच तर ते विपरीत म्हणजे उलटे होते. अर्जुनाची अवस्था अशीच झाली होती.

भगवान म्हणाले, ‘अर्जुना, ही विपरीत अवस्था घालविण्यासाठी तू काय करणार आहेस ?’

अर्जुन म्हणाला, ‘दुसरे कांही नाही. केशव म्हणून तुझा धांवा करणार. केशकार्षिन्–दुःखांचा नाश करणारा आहेस अशी तुझी सनातन कीर्ती असल्याने तुझाच धावा करणार.’ भगवंताची सर्वच नांवे मंगल आहे[illegible] योग्य वेळी उच्चारले तर त्याचा प्रभाव अधिक पडतो.

‘स्वजनं आहवे’ म्हणजे युद्धात स्वजनांना मारून कल्याण होईल असे मला वाटत नाही असे अर्जुन म्हणाला. युद्ध करून लगेच फलप्राप्ती होणार नाही असे त्याला वाटले. प्रत्येक कर्माची दृष्ट व अदृष्ट अशी दोन फळे असतात. शिक्षण होताच चांगली नोकरी मिळाली तर ते दृष्ट

फल व तेथील वातावरण त्रासदायक असेल तर ते अदृष्ट फळ होय. नोकरी लागल्यावर सुंदर पत्नी मिळणे हे दृष्ट फळ व ती भांडखोर निघाली तर आपले अदृष्ट म्हणायचे! मुंबईला मोठ्या पगाराची नोकरी मिळते हे दृष्ट फळ, पण फूटपाथावर राहावे लागले तर अदृष्ट. कडकडून भूक लागली असता समोर अन्न आले तर ते दृष्ट फळ व नेमके त्यात न आवडणारे पदार्थ असले तर ते अदृष्ट. पूजा संध्या आदि नित्यकर्मांची दृष्ट फळे नसली तरी अदृष्ट फळासाठी ती करणे आवश्यक आहे.

**न कांक्षे विजयं कृष्ण न च राज्यं सुखानि च।**
**किं नो राज्येन गोविन्द किं भोगैर्जीवितेन वा ॥३२॥**

राज्यभोग व सुखासाठी युद्ध करायचे पण मला ते नको आहेत. हे गोविन्दा, राज्य, सुखोपभोग किंवा जीवन यांचा तरी काय उपयोग आहे? काही कर्मे स्वजनाकरिता—परिवाराकरिता करावयाची असतात. प्रभू रामचंद्र वनवास संपवून आयोध्येला परत आल्यावर भरत त्याना म्हणाला, ‘तुम्ही माझ्या मातेच्या वचनाप्रमाणे वनवास पत्करला. आता हे तुमचे राज्य तुमच्या ताब्यात घ्या.’ त्यावर रामचंद्र म्हणाले, ‘तूच राज्य कर म्हणजे तुझ्या मातेला अधिक सुख होईल. तुझ्या ताब्यात असलेले राज्य मला का देतोस? तुला सर्वजण मदत करीत आहेत ना?’

‘सर्वजण मदत करतात हे खरे, पण मोठा बैल वहात असलेले जू वासराच्या मानेवर ठेवले तर त्याला कसे पेलेल! घोड्याची बरोबरी गाढवाला किंवा राजहंसाची बरोबरी कावळ्यास कशी करता येईल? ही राज्याची धुरा आता मला सांभाळता येणार नाही, म्हणून ही जबाबदारी तुमची तुम्ही स्वीकारा. दशरथ राजाने पुत्रकामेष्टी यज्ञ करून पुत्र प्राप्त करून घेतला. त्याने रानावनात भटकावे हे योग्य दिसते काय? त्याने काय भिक्षा मागावी? एक सुंदर आम्रवृक्ष लावला, त्याला मोहोर आला, पण फळे येण्याआधीच तो नष्ट व्हावा, तसे तुम्ही

राज्य केले नाहीत तर होणार आहे.' भरताने इतके विनविल्यावर रामाने राज्य घेण्याचे मान्य केले.

'रामोऽस्मि सर्वं सहे' राम राज्य करीत होता, पण त्याला पत्नीसुख नव्हते. बाकी तिन्ही भावांना पत्नीसुख होते, पण त्यांना राज्याचा अधिकार नव्हता. पत्नीशिवाय खरे राज्यसुख आहे असे म्हणता येत नाही. पत्नीशिवाय घराला शोभा नाही. पत्नी-शिवाय घर म्हणजे 'यथारण्यं तथा गृहं' असे म्हटले आहे. तरीसुद्धा रामाने आपल्या परिवाराकरिता दीर्घकाळ राज्य केले.

**येषामर्थे कांक्षितं नो राज्यं भोगाः सुखानि च ।**
**त इमेऽवस्थिता युद्धे प्राणांस्त्यक्त्वा धनानि च ॥३३॥**
**आचार्याः पितरः पुत्रास्तथैव च पितामहाः ।**
**मातुलाः श्वशुराः पौत्राः श्यालाः संबंधिनस्तथा ॥३४॥**
**एतान्न हन्तुमिच्छामि घ्नतोऽपि मधुसूदन ।**
**अपि त्रैलोक्यराज्यस्य हेतोः किं नु महीकृते ॥३५॥**

अर्जुन म्हणतो, मला राज्यसुख नको. भीष्मद्रोणादिक परि-वाराकरता राज्य करायचे, पण तेच प्राण व धन यावर उदार होऊन लढायला उद्युक्त झाले आहेत. त्यांनी मला ठार मारले तरी सुद्धा मी प्रतिकार करणार नाही; नव्हे मनातही तशी इच्छा आणणार नाही. मला स्वर्गसुखाचीही इच्छा नाही, तिथे पृथ्वीच्या राज्या-साठी कोण धडपडेल ?

**निहत्य धार्तराष्ट्रान्नः का प्रीतिः स्याज्जनार्दन ।**
**पापमेवाश्रयेदस्मान्हत्वैतानाततायिनः ॥३६॥**

हे जनार्दना, कौरवपक्षीयांना मारून आमचे काय प्रिय होणार आहे ? उलट, या आततायी लोकांना मारून पाप मात्र पदरात पडेल.

भगवान म्हणाले, ' ते स्वजन असले तरी आततायी आहेत, हे तुला मान्य आहे. आग लावणारा, धन चोरणारा, बायका पळविणारा, दुसऱ्याची जमीन घेणारा आततायी समजला जातो. मग ज्यांनी ही सर्वच कृत्ये केली असतील, ते किती पातकी असतील ? अशा लोकांना मारणे हे पाप नसून त्यांना जिवंत ठेवणे हेच पाप आहे.'

**तस्मान्नार्हा वयं हंतुं धार्तराष्ट्रान्स्वबांधवान् ।**
**स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव ॥३७॥**

काही गोष्टी विजयाकरिता, काही राज्यप्राप्तीकरता तर काही सुखासाठी करावयाच्या असतात. पण यापैकी मला कशाचीही इच्छा नाही. आमचेच बांधव असलेल्या कौरवांना मारणे योग्य होणार नाही. शिवाय स्वजनांना मारून आम्हाला स्वप्नात तरी सुख मिळेल काय ?

भगवान, म्हणाले, ' अरे, हे तुम्हाला राज्य तर राहोच, पण सुईच्या अग्रावर राहील येवढीही भूमी द्यावयास तयार नाहीत. तुला भिक्षाही मागता येणार नाही. कारण तो क्षत्रियांचा धर्म नव्हे. मग निर्वाहासाठी तू करणार तरी काय ? '

अर्जुन,– ' भगवंता तू माधव म्हणजे लक्ष्मीपती आहेस. तुझा आश्रय केल्यावर आम्हाला काही एक कमी पडणार नाही. ' आत्मानं सततं रक्षेत् दारैरपि धनैरपि ' असा नियम आहे हे मान्य. पण तुझ्या कृपेमुळे निर्वाहासाठी यातायात करण्याचे मला मुळीच कारण नाही.

**यद्यप्येते न पश्यन्ति लोभोपहतचेतसः ।**
**कुलक्षयकृतं दोषं मित्रद्रोहे च पातकम् ॥३८॥**
**कथं न ज्ञेयमस्माभिः पापादस्मान्निवर्तितुम् ।**
**कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिर्जनार्दन ॥३९॥**

लोभाने अंतःकरण आक्रान्त झाल्यामुळे कौरवांना कुलक्षयापासून होणारे अनर्थ व मित्रद्रोहाचे पातक दिसत नाही. पण आम्हाला हे समजत असता आम्ही जाणूनबुजून त्यात का प्रवृत्त व्हावे? असा अर्जुनाने प्रश्न केल्यावर भगवान म्हणाले, 'या युद्धामुळे कुलक्षय व मित्रद्रोह होईल हे काय कौरवांना कळत नाही? येथे जमलेल्या लोकात तूच तेवढा शहाणा आहेस की काय? कौरवाकडेही किती तरी बुद्धिमान पुरुष आहेत. तरी ते लढण्यास सिद्ध झाले आहेत. मग तूच तेवढा माघार कां घेत आहेस?'

अर्जुन– भगवन्, कुलक्षय व मित्रद्रोहाचे काय काय परिणाम होतात ते ऐका—

**कुलक्षये प्रणश्यन्ति कुलधर्माः सनातनाः ।**
**धर्मे नष्टे कुलं कृत्स्नमधर्मोऽभिभवत्युत ॥४०॥**

कुलक्षय झाला की सनातन कुलधर्म नष्ट होतात व धर्म भ्रष्ट झाला की अधर्म सर्व कुल व्यापून टाकतो. 'जगत्स्थितिर्हेतुः धर्मः'—जगाची सर्व व्यवस्था धर्मावर अवलंबून आहे असे वचन आहे. प्रत्येक कुलाचे विशिष्ट कुलधर्म-कुलाचार असतात. ते मोजकेच असतात. पण त्यांच्या पालनाने समाजात एक प्रकारची शिस्त राहते. युद्धामुळे जर कुळेच नष्ट झाली, तर कुलधर्मांचे कोण रक्षण करणार?

**अधर्माभिभवात्कृष्ण प्रदुष्यन्ति कुलस्त्रियाः ।**
**स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंकरः ॥४१॥**

अधर्माने कुल व्यापले की कुलस्त्रिया बिघडतात. हे वार्ष्णेया, स्त्रिया बिघडल्या की वर्णसंकर होतो. कर्माचे फळ हवे असेल तर धर्म राखला पाहिजे. तोच नष्ट झाला तर 'मात्स्यन्याय'– मोठा मासा लहान माशास खातो– या न्यायाने सर्वत्र अनवस्था होऊन दुर्बळांना कोणी वाली राहणार नाही. व अशा रीतीने सारे जग लयाला जाईल.'

अर्जुनाने आपले विचार शास्त्रीय भूमिकेवरून मांडलेले आहेत. आततायींचा वध करावा असे अर्थशास्त्र म्हणते, तर ते स्वजन असतील तर त्यांना मारू नये असे धर्मशास्त्र सांगते. जेव्हा या दोन्ही शास्त्रात विरोध येतो, तेव्हा 'अर्थशास्त्रात धर्मशास्त्रं बलवत्' असा नियम असल्याने धर्मशास्त्रच मानणे भाग आहे. अधर्म वाढला की धर्माचा पराभव होतो. सध्या बरोबर अशीच परिस्थिती निर्माण झालेली आहे. धर्मामुळे स्त्रिया बिघडतात. त्याचा परिणाम संततीवर होतो. म्हणूनच वर्णसंकर होतो. धर्म पाळायला कोणालाच सवड नाही. कारण स्त्रियांनाही पुरुषाप्रमाणे आता बाहेरचे व्याप सांभाळावे लागतात. तरुण उपभोगात मग्न तर वृद्ध व्याधिग्रस्त असल्याने संत्रस्त झालेले. यामुळे अनर्थ माजलेला आहे.

**संकरो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च ।**
**पतन्ति पितरो ह्येषां लुप्तपिण्डोदकक्रियाः ॥४२॥**

असा संकर करणारे पुरुष व त्यांची मुले ही सर्व नरकाला जातात. इतकेच नव्हे तर हे लोण त्यांच्या पितरापर्यन्त पोचून च्युत होतात. कारण, या लोकांतून पितरांना पिंडदान व तर्पण केले जात नाही. पिंड म्हणजे श्राद्ध व तर्पण म्हणजे मृतात्म्यांना पाणी देणे. हे अर्थ सध्याच्या थोड्या तरी लोकांना माहीत आहेत. आणखी कांही काळाने त्यांचा अर्थ कोशात पाहूनही समजणे कठीण होणार आहे. संकर करणाऱ्या अधःपतित लोकांनी श्राद्ध व तर्पण केले तरी पितर त्यांचा स्वीकार करीत नाहीत. वृद्धाचा प्रथम अपमान करून मग त्यास चहा दिला तर तो घेईल का? तसेच धर्मभ्रष्टांनी दिलेले पदार्थ पितर स्वीकारीत नाहीत. विवाहप्रसंगी वधुपिता 'प्रतिगृहाण' म्हणजे माझ्या कन्येचा स्वीकार करा, अशी वरास विनंती करतो. त्या वेळी 'प्रतिगृह्णामि' असे वराने म्हणून

वधूपित्याच्या विनंतीस मान दिला, तरच विवाहविधी पूर्ण होतो. तसेच पिंडदान व तर्पण तुम्ही केले तरी ते स्वीकारावयाचे किंवा नाही हे त्यांच्या मर्जीवर असते.

**दोषैरेतैः कुलघ्नानां वर्णसंकरकारकैः ।**
**उत्साद्यन्ते जातिधर्माः कुलधर्माश्च शाश्वताः ॥ ४३ ॥**

कुलक्षय करण्याच्या या दोषामुळे वर्णसंकर होतो व त्यामुळे शाश्वत जातिधर्मांचा नाश होतो. वर्गात पन्नास मुले असली तर ती सर्वच हुषार नसतात. त्यांतील पहिल्या चार पांच विद्यार्थ्यांना विशेष शिक्षण दिले जाते. तीच मुले उत्तम गुण मिळवून शाळेची कीर्ती वाढवितात. शैक्षणिक संस्थांच्या उन्नतीसाठी अशी वर्गवारी करावी लागते. तसेच जन्मान्तरासाठी सुद्धा करणे आवश्यक आहे, असे शास्त्रकारांचे म्हणणे आहे. एखादा विद्यार्थी इतका तयारीचा असतो की, तो म्हणतो माझी कशीही परीक्षा घ्या. कारण तो हुषार असतो. अभ्यासही मन लावून करतो व त्याला मार्गदर्शन करणारे शिक्षकही त्याच योग्यतेचे लाभलेले असतात. म्हणून तो असे आत्मविश्वासाने बोलू शकतो. त्या हुषार विद्यार्थ्याप्रमाणे एखाद्या मानवाला सुंदर बुद्धी लाभलेली असते. तो उत्कृष्ट धर्माचरण करतो व त्याला सद्गुरुचाही लाभ झालेला असतो. असा पुरुष छातीठोकपणे सांगू शकतो की, मला कोणत्याही जन्मात घाला, मी दरिद्री होणारच नाही. मनुष्यामनुष्यामध्ये असा भेद निसर्गतःच असतो.

**उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां जनार्दन ।**
**नरके नियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम ॥४४॥**

‘ कुलधर्म लोपले की कायम नरकवास प्राप्त होतो. असे आम्ही श्रुतिस्मृति–पुराणे यातून ऐकलेले आहे. ’

भगवान म्हणाले– 'होईना कुलक्षय. मी तुमच्या पाठीशी असल्यावर कांही बिघडणार नाही'

अर्जुन– 'तू जनार्दन म्हणजे 'जनान् अर्दयति नाम पीडयति सः जनार्दनः' तुझे नियम मोडले की पीडा होणारच, याचा अनुभव आम्ही घेतला आहे. 'मामनुस्मर' या तुझ्या आज्ञेप्रमाणे आम्ही प्रत्येक वेळी वागत होतो. पण द्यूताचे वेळी आमची चूक झाली व त्याचे प्रायश्चित्त आम्हाला चांगलेच मिळाले. तसे पुनः होऊ नये अशी इच्छा आहे.

**अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम् ।**
**यद्राज्यसुखलोभेन हन्तुं स्वजनमुद्यताः ॥४५॥**

खरोखर आम्ही किती मूर्ख! या क्षुल्लक राज्यसुखाच्या लोभामुळे आम्ही स्वजनांना ठार मारण्यास प्रवृत्त झालो आहोत!

**यदि मामप्रतीकारमशस्त्रं शस्त्रपाणयः ।**
**धार्तराष्ट्रा रणे हन्युस्तन्मे क्षेमतरं भवेत् ॥ ४६ ॥**

क्षत्रियाला दोन प्रकारचे मृत्यु क्षेमकर म्हणून सांगितले आहेत. एक शत्रूशी लढता लढता मरणे व दुसरा युद्धात शस्त्रसंन्यास करून स्वस्थ राहिल्यावर शत्रूच्या शस्त्रास्त्राच्या आघातामुळे मरण पत्करणे. यापैकी दुसऱ्या प्रकारचे मरण मी पत्करतो. त्यात माझे कल्याण आहे असे मला वाटते.

प्रभु रामचंद्र व काळपुरुष एकांतात बोलत असता लक्ष्मण पहारा करत उभा होता. कुणालाही आत सोडायचे नाही अशी त्याला रामाची आज्ञा होती. नेमके त्याच वेळी दुर्वास ऋषी आले. आत्ताच्या-आत्ता रामाची भेट पाहिजे, नाहीतर सर्व राष्ट्र भस्म करून टाकतो असे ते म्हणाले. लक्ष्मणापुढे पेच पडला. पण लक्ष्मणाने विचार केला की,

मी आत गेलो तर आज्ञाभंग होऊन मला मृत्यु पत्करावा लागेल. पण त्यामुळे सर्व राष्ट्राचा नाश तरी टाळता येईल. अर्जुनही असाच विचार करतो. आपल्या मृत्यूने सर्व कुळाचा नाश टळत असेल, तर आपण मरण्यातच अधिक कल्याण आहे असे म्हणून तो मृत्यूची तयारी करतो.

संजय उवाच—

**एवमुक्त्वार्जुनः संख्ये रथोपस्थ उपाविशत् ।**
**विसृज्य सशरं चापं शोकसंविग्नमानसः ॥४७॥**

संजय म्हणतो—असे म्हणून शोकाने व्याकुळ झालेला अर्जुन धनुष्य बाण टाकून रथात स्वस्थ बसला. त्यानेच युद्धाला सज्ज झालेले योद्धे पाहण्यासाठी म्हणून दोन्ही सैन्यामध्ये रथ नेण्याची भगवंताला विनंति केली होती. योद्धे पाहण्यासाठी तो उभा होता. पण वरील उद्गार काढून तो खाली बसला. कांहींचे म्हणणे अर्जुन रथात बसूनच सेनेचे अवलोकन करीत होता. पण युद्धाचा निश्चय बदलल्यामुळे तो कायमचाच बसला.

या अध्यायाला ' अर्जुनविषादयोग ' असे नाव आहे. योग म्हणजे अघटित घटना. अर्जुन हा मर्यादा, शौर्य, नीती यांचा मूर्तिमंत पुतळा. त्याने वृद्धसेवा केलेली होती. रणांगणांत शत्रूला पाहून त्याला वीरश्रीचाच संचार होत असे. यावेळी मात्र नेहमीप्रमाणे वीरश्रीचा संचार न होता शस्त्रसंन्यासाचे विचार अर्जुनाच्या मनात येतात हे अघटितच. म्हणून ' अर्जुनविषादयोग ' असे नाव दिले आहे.

युद्धाच्या प्रारंभी युधिष्ठिराने अर्जुनास श्रीकृष्णाच्या स्वाधीन करून त्याचे रक्षण करण्याची विनंति केली होती. कारण, अर्जुनाचे रक्षण झाले की सर्व पांडवसेनेचे रक्षण आपोआपच होणार होते. एक पांडव गेला की बाकीच्यांनी अग्निकाष्ठे भक्षण करण्याची प्रतिज्ञाच केली होती.

भगवान म्हणाले, ' युधिष्ठिरा, हा तुझा फक्त बंधूच आहे पण माझा बंधू, मेव्हणा व शिष्यही आहे. स्वमांसाचे लचके तोडूनही मी त्याचे रक्षण करीन. पण युद्धात रक्षण केले तर ते कायमचे नव्हे. पुनः मृत्यु येणार ही भीति आहेच. खरे रक्षण ज्ञानानेच होते.

**' न देवा दंडमादाय रक्षन्ति पशुपालवत् ।**
**यं रक्षितुमिच्छन्ति बुद्‌ध्या संयोजयन्ति तम् ॥ '**

ज्याचे खरेखुरे रक्षण करायचे असेल त्याला भगवान बुद्धि म्हणजे ज्ञान देतात. पण ज्ञानाचा ' नापृष्टः कस्यचित् ब्रूयात् ' असा नियम आहे. विचारल्याशिवाय सांगायचे नाही. अर्जुन रथी व कृष्ण सारथी. रथी सारथीपेक्षा श्रेष्ठ, मग रथी सारथीला शरण कसा जाईल? पण अर्जुनाला ज्ञानप्राप्ती व्हावी म्हणून भगवंतानीच त्याला बुद्धिपुरःसर विषाद निर्माण केला.

॥ ॐ तत्सत् श्रीमद् भगवद् गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे
श्रीकृष्णार्जुनसंवादे अर्जुनविषादयोगो नाम प्रथमोऽध्यायः ॥

हरये नमः हरये नमः हरये नमः ।

◊ ◊ ◊

# अध्याय २ रा.

धृतराष्ट्र उवाच—

तं तथा कृपयाविष्टमश्रुपूर्णाकुलेक्षणम्
विषीदन्तमिदं वाक्यमुवाच मधुसूदनः ॥१॥

संजय म्हणाला, ' भगवान् मधुसूदन करुणेने व्याप्त झालेल्या, अश्रुपूर्ण नेत्रांनी युक्त झालेल्या व विषादाला प्राप्त झालेल्या अर्जुनाला पुढील वाक्य बोलले.

अर्जुनाला स्वजनांबद्दल कृपा निर्माण झालेली पाहून राजा धृतराष्ट्र आनंदित झाला; अर्थात् मनातून, व आता जय आपलाच असे त्याला वाटले. तो म्हणतो, ' आता आपली मुले सुखरूप राहतील व त्यांना राज्याला मुकावे लागणार नाही. अर्जुनाला स्वजनाबद्दल कृपा निर्माण झालेली पाहून त्यावर श्रीकृष्ण काही बोलले नाहीत. श्रीकृष्णाचे मत म्हणजे सुप्रीम कोर्टाचा निकाल. हे ऐकून राजा धृतराष्ट्राला आनंद होणे साहाजिकच आहे. रुपयातील १८ आणे काम झाले असे त्याला वाटले. संजय म्हणतो, 'याची ही दुराशा नष्ट केली पाहिजे. हा बाहेरून आंधळा आहे तसाच आतूनही आंधळा आहे की काय ? अर्जुनाला निर्माण झालेली परदुःख–प्रहाणेच्छा दया म्हणजेच, परम कृपा ही लोकविलक्षण होती. एखादा चोर सभ्य माणसाचा पोशाख करून सर्वत्र किल्ल्या चालवितो. लोकांना वाटते की यांचा हा कोणी मित्र, पाहुणा किंवा जामात असेल. म्हणजे चोर असून तो पोशाखावरून साव

भासतो. तद्वत् ही कृपा नसून हा महामोह आहे, कृपेचे पांघरूण घेऊन आला होता, एवढेच काय ते. म्हणूनच भगवंतांनी पुढे त्याला कश्मल म्हटले आहे. अशा अर्जुनाला मधुसूदन, म्हणजे मधु या उन्मत्त दैत्याचा ज्याने विनाश केला होता, तो म्हणाला. हे सांगून संजय सुचवितो, तुझी मुले राजा धृतराष्ट्रा, अशीच उन्मत्त झाली आहेत, त्यांचाही मधुसूदन निःपात करणारच. मधुसूदन म्हणजे कृष्ण, त्यानंतर पुनः 'श्री भगवानुवाच' का तर

> ऐश्वर्यस्य समग्रस्य धर्मस्य यशसः श्रियः ।
> ज्ञानवैराग्ययोश्चैव षण्णां भग इति स्मृतम् ॥

मधुसूदन हे विशेषण देऊन त्याची क्रियाशक्ती प्रचंड आहे हे सांगितले. पण मोह घालविण्यास तिचा उपयोग नाही, त्याकरता ज्ञानच हवे. ज्ञानाची परिपूर्णताही श्रीकृष्णाकडे आहे. त्यामुळे मोह जाणारच. हे सुचविण्याकरिता 'श्रीभगवान् उवाच' असे म्हटले आहे. माजघरातील गडद अंधकार कशाने जाईल? पाटया व खोरी वापरून, गाडी लावून जाईल काय? छे. उलट दुप्पट होईल. त्याकरता एखादी छोटीशी मेणबत्ती किंवा दिवा लावावा लागेल. दुसऱ्या कशानेही भागायचे नाही. त्याचप्रमाणे मोह घालविण्यासाठी ज्ञानच हवे.

संजय म्हणतो, अर्जुनाला मोह झाला खरा, पण तो कायम राहणार नाही. कारण तो शुद्ध आहे. भर दुपारी बारा वाजताना आकाश निरभ्र असताना ज्याला अंधार दिसत असेल तो माणूस नव्हे, ते घुबड आहे. तसेच अर्जुनाला मोह होणे अशक्य आहे. झाला तरी तात्काळ जाईल.

श्री भगवानुवाच ।

> **कुतस्त्वा कश्मलमिदं विषमे समुपस्थितम् ।**
> **अनार्यजुष्टमस्वर्ग्यमकीर्तिकरमर्जुन ॥ २ ॥**

भगवान म्हणाले, ' अर्जुना, आर्यांना सेवन करण्यास अयोग्य, स्वर्गप्राप्तीला प्रतिबंध करणारा हा मोह ऐन युद्धाच्या वेळी म्हणजे अयोग्य काळात तुझ्या मनात कुठून आला ?

हा क्षुद्र पदार्थ तुला निर्माण कसा झाला ? प्रत्येक पदार्थाला योग्य काळ व योग्य देश लागतात. आंब्याच्या झाडाला आंबे भाद्रपदात लागले तर ? किंवा बुडख्यालाच लागले तर ? ते जसे अयोग्य. त्याच-प्रमाणे इथेही तुला निर्माण झालेली कृपा अयोग्य आहे. कृपा कोणाबद्दल निर्माण व्हावी, माहीत आहे ? दीन, अनाथ, अपंग, शरणागत याबद्दल. हे कौरव तसे मुळीच नाहीत. हे स्वजन आहेत म्हणतोस, पण युद्ध ठरविण्यापूर्वीच हे तुला माहीत होते. मागे तू अनेकदा त्यांच्याशी लढलाही आहेस. मग आताच का माघार घेतोस ? यांनी काय काय केले ते तुला आठवत नाही का ? पाहा. भीमाला विष दिले. लाक्षागृहात तुम्हाला मारण्याचा घाट घातला. त्यात एक निष्पाप स्त्री पाच मुलांसह जळून मेली. कपटद्यूत केले. भर सभेत द्रौपदीची विटंबना केली. असे करणाऱ्यांनी स्वजनत्व केव्हांच पायदळी तुडविले आहे. तू एकट्याने ते पाळून काय उपयोग ?

भीष्म, द्रोण गुरु म्हणतोस. अरे गुरूंनी शिष्याचे रक्षण करायचे असते, की त्याला मारायचे असते ? शिक्षक मुलांना मारू लागला तर त्याला शाळेतून काढतात. नोकरीच जाते. आई, वडील, भाऊ, मामा किंवा अन्य कोणीही असो, जर ते कर्तव्यपराङ्मुख झाले तर राजाने त्यांना अवश्य शासन करावे. मागे पुढे पाहू नये. असे याज्ञवल्क्य स्मृती-कार सांगतात. तू राजा आहेस ? मग हे स्वजन शासनीय आहेत, म्हणून त्यांना दंड करणे तुझे कर्तव्य आहे. तूच माझ्याकडे आलास, व मला मदत करण्याची विनंती केलीस. त्यानंतर आपण इथे आलो. युद्धच करायचे नव्हते तर सिंहनाद, शंखनाद कशाला केलास ? शत्रूला प्रत्युत्तर

का दिलेस ? आता तुला पांडित्य सुचले काय ? गात्रे विकल होतात. तोंडाला कोरड पडली म्हणतोस. ही शोकाची चिन्हे नव्हेत. लोक तुला भ्याड म्हणतील. आपल्याबरोबर मलाही चल म्हणतोस म्हणजे लोक दोघांना मूर्खात काढतील. हे तुझे कश्मल ( मोह ) नरककारक आहे. अपकीर्ती करणारे आहे.

नवरात्रात नंदादीप लावतात. ते पात्र स्वच्छ असेल, कापूस चांगला असेल, तेलही निर्दोष असेल तर काजळी येतच नाही. व तसे होणेच चांगले. पण आलीच तर झटकून टाकायची. त्याचप्रमाणे तूं अस्सल योद्धा, तुला मोह होणे अयोग्य. रणांगणात शत्रू समोर पाहून खऱ्या योद्ध्याचे बाहू स्फुरण पावतात. पण त्याऐवजी तुला मोह निर्माण कसा झाला? जरी झाला तरी मी तो झटकून टाकतो. अस्सल कोरे दूध असेल व जर स्वच्छ भांड्यात गवळ्याने त्याची धार काढली असेल, तर त्यात पाला कसा येईल? ( धागरीतले, रतीबाचे असेल तर त्यात पाला येणे एक वेळ शक्य आहे. ) तसा मोह इतरांना होईल. पण अर्जुनाला होणे शक्य नाही. हा मोह ईश्वरप्रेरणेनेच निर्माण झाला असल्याने फार काळ टिकणार नाही.

**क्लैब्यं मा स्म गमः पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते ।**
**क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप ॥३॥**

हे पार्था, तू असा निर्वीर्य होऊ नकोस. हे तुला शोभत नाही. हे परंतपा, मनाची क्षुद्र दुर्बलता झटकून उभा राहा.

‘ अर्जुना ’ तुला मोह होणे योग्य नाही. क्लीबता जसा वीर्याचा नाश करते, तसा मोह शौर्याचा नाश करतो. अर्जुन म्हणाला, ‘ अहो, पण मलाच काय एकट्याला मोह झालेला आहे ? जगात प्रत्येकालाच मोह होत नाही काय ? मग तुम्ही माझा उपहास काय म्हणून करता ?’

भगवान म्हणाले, तुझी व बाकीच्यांची योग्यता सारखी नाही. अरे, मी तुझ्याच रथावर का बसतो ? व शिखंडीच्या रथावर का बसत नाही ? पांडव सर्वच मला प्रिय आहेत. तरी देखील पांडवानां धनंजयः । म्हणून मुद्दाम तुझाच उल्लेख करतो. बाकीच्यांचा नाही. कारण तू माझी, विभूती आहेस. प्रत्यक्ष शंकराशी तू युद्ध केले आहेस. त्याने सुप्रसन्न होऊन तुला पाशुपत अस्त्र दिले आहे. बाकी कुणाला दिले नाही. अष्ट दिक्पालांनी तुला शस्त्रास्त्रे दिली आहेत.

तुवा संग्रामे हरु जिंकिला । निवात कवचांचा ठावो फोडिला । पवाडा तुवा केला । गंधर्वांसी ।।

अशी ज्याची योग्यता आहे. व गांडीव नावाचे अद्वितीय धनुष्य जो धारण करतो. जो जगदेकवीर आहे. अशाला मोह का व्हावा ? हे ऐकून अर्जुन गडबडला. भगवंताचे बोलणे त्याला पटले. पण जो अस्सल असतो तो आपला पक्ष एकदम सोडत नाही. कारण तसे केले की मूर्खात गणना होते. म्हणून अर्जुन म्हणाला, ' होऊ नये तो झाला आहे खरा, त्याला काय करू ? ' भगवान म्हणाले, ' तू परंतप परान् तापयतीति परंतपः । असा आहेस ना ? असा पुरुष सर्वत्र हिंडून शत्रूंना हुडकून काढून त्यांना ताप देतो, मग मोह हा सुद्धा शत्रूच नाही का ? कारण तो षड्रिपूंपैकी आहे. मग त्याचा नाश करायला नको का ? प्राण्याच्या शरीरात सर्वात महत्त्वाचे हृदय. हृदयाचे बल म्हणजे विवेक. म्हणून विवेक कर म्हणजे मोह जाईल.

अर्जुन उवाच—

**कथं भीष्ममहं संख्ये द्रोणं च मधुसूदन ।**
**इषुभिः प्रतियोत्स्यामि पूजार्हावरिसूदन ॥४॥**

अर्जुन म्हणाला, हे मधुसूदना, भीष्म द्रोणावर उलट बाण टाकून मी युद्ध कसे बरे करू? कारण ते पूजनीय आहेत.

भीष्म व द्रोण हे दोघे माझे गुरु आहेत. शास्त्रकार म्हणतात. मातापिता मुलाला जन्म देतात, पण फक्त शरीराचा. पण गुरु त्याला ज्ञान देऊन दुसरा जन्म देतो.

पिताऽसि यो अस्माकं अविद्यायाः परं पारं तारयसि ।

असे म्हटले आहे. म्हणून गुरूशी खरे युद्ध तर राहोच,पण वाचिक युद्ध देखील करू नये. सासू सुनेला फार बोलली तरी तिने गप्प बसावे. ती पूज्य असते म्हणून. ती चुकली हे कबूल, पण तुम्ही शहाण्या ना? मग तीच चूक पुनः का करता? स्तब्ध राहण्याने संयम वाढतो. उलट उत्तर दिल्याने तीही देते व हा वाद कधीच मिटत नाही. संयम केला तर ईश्वर त्यांना शासन करतोच.

भीष्मद्रोणांनी बाण जरी माझ्यावर टाकले, तरी मी याच हेतूने टाकणार नाही. हे दोघे माझेच नव्हे, तर सर्व क्षत्रकुलाचे गुरु आहेत. जगातील सर्व वीर त्यांच्याकडूनच शिकून गेले आहेत. माझा पिता पांडू बाळपणीच गेला. तेव्हापासून भीष्मांनी माझे पालन केले आहे. शंतनूच्या वराने ते स्वच्छंदमृत्यू आहेत. व आजन्म ब्रह्मचारी आहेत. साक्षात् परशुरामापासून ते अस्त्रविद्या शिकले आहेत. त्रिकालज्ञानी आहेत. त्रैलोक्याला पावन करणारी गंगा त्यांची माता आहे. इतके असून भक्त आहेत, योगी आहेत, रात्री दोनला उठून ईशचिंतन करतात. द्रोणांनी मला सर्व धनुर्वेद दिला आहे. आपला पुत्र अश्वत्थामा त्याच्यापेक्षाही माझ्यावर त्यांचे अधिक प्रेम आहे. म्हणूनच त्यांनी रहस्यविद्या त्याला न देता मला दिली आहे. पार्थ एव धनुर्धरः । ही पदवी मला त्यांच्यामुळेच लाभली. ती खरी व्हावी म्हणून त्यांनी एकलव्याकडे त्याच्या उजव्या हाताच्या आंगठ्याची गुरुदक्षिणा मुद्दाम मागितली. इतके असून ते ब्राह्मण आहेत. हे दोघे कौरवांच्या बाजूने लढत असले,तरी रोज 'पांडुपुत्रस्य विजयो भवतु' म्हणून ईश्वराची प्रार्थना करतात. प्रत्येक

वेळी आमचाच पक्ष घेऊन त्यांनी कौरवांना परावृत्त केले आहे. अशांना कसे मारू?

भगवान म्हणाले, 'माझा आदर्श तुला मान्य आहे ना? माझा कित्ता तू गिरवणार ना? मी प्रत्यक्ष मामाला मारले. मग तुला स्वजनाबरोबर लढायला काय हरकत आहे?' अर्जुन म्हणाला, 'तुझी गोष्ट निराळी आहे. कंस फक्त नात्याने तुझा मामा होता. पण जन्मजात वैरी होता. त्याने तुझ्या मातापित्यांना तुरुंगात ठेवले होते. तुझे सर्व भाऊ ठार केले होते. तू जन्मल्यापासून तुझ्या वधासाठी निरनिराळे असुर पाठवून सतत प्रयत्न केला होता. म्हणून त्यांना मारलेस ते योग्य झाले. पण भीष्मद्रोणांनी तसे केले आहे काय? नाही. त्यांचे व माझे जन्मतः वैर कुठे आहे? म्हणून त्यांचा वध करणे योग्य नाही.

**गुरूनहत्वा हि महानुभावान् श्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीह लोके।**
**हत्वार्थकामांस्तु गुरूनिहैव भुञ्जीय भोगान् रुधिरप्रदिग्धान्॥५॥**

या महानुभाव पूज्य गुरूंना मारण्यापेक्षा या लोकी भिक्षा मागणे परवडेल. ते श्रेयस्कर ठरेल. पण त्यांना ठार करून त्यांच्या रक्ताने माखलेले विषयोपभोग कसे भोगता येतील?

भगवंता, या पूज्य गुरूंना मारण्यापेक्षा भिक्षा मागीन. एका घरात भिक्षा न मिळाल्यास प्रत्येक घरात मागीन. लोकांनी याबद्दल निंदा केली तरी हरकत नाही. राज्याने काय मिळणार, फक्त अर्थ व काम. म्हणजे पैसा व त्यापासून मिळणाऱ्या चैनीच्या वस्तू. पण मी पार्थ आहे. देवतेच्या वरापासून जन्माला आलो आहे. अशाने फक्त अर्थकामातच कृतकृत्यता मानावी काय? भीष्मद्रोणांना खाली पाडले तर हे दोन पुरुषार्थ मिळणार. पण ते फक्त या लोकातच. गुरूंच्या रक्ताने माखलेले भोग मी भोगावेत काय? मी श्रेष्ठ असल्याने धर्म व मोक्ष मिळवीन. तसे करताना अर्थकाम मिळाले नाहीत तरी हरकत नाही.

**न चैतद्विद्मः कतरन्नो गरीयो यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः ।**
**यानेव हत्वा न जिजीविषामस्तेऽवस्थिताः प्रमुखे धार्तराष्ट्राः ॥६॥**

जय आमचा होईल की त्यांचा होईल हे सांगता येत नाही. या दोन्हीपैकी आम्हाला श्रेयस्कर काय तेही समजत नाही. समोर कौरव उभे आहेत. पण त्यांना मारून आपण जगावे अशी माझी इच्छा नाही.

भगवंता, युद्ध श्रेष्ठ की भिक्षा मागणे श्रेष्ठ हे मला कळत नाही. जय आमचा होईल की त्यांचा हेही गूढच आहे. कारण मी जसे शंकराशी युद्ध केले आहे, तसेच भीष्मांनी सुद्धा प्रत्यक्ष विष्णूचा अवतार असलेल्या परशुरामाबरोबर युद्ध केले आहे. इतकेच नव्हे तर त्यात विजयही मिळविला आहे. ते काय सामान्य आहेत? द्रोणही तसेच पराक्रमी आहेत.

गोग्रहणाचे वेळी मी सर्वांवर संमोहनास्त्र सोडले. व उत्तराला सर्वांची वस्त्रे आणण्यास सांगितले. तेव्हा सर्वजण पेंगत होते. पण हे दोघे मात्र जागे होते. फक्त त्यांनी माझ्या अस्त्राला मान दिला व मनाने पराभव पत्करला एवढेच. यांना मारून राज्य घेतले तर लोक म्हणतील हा गुरुघातकी आहे व पराभव झाला तर कुणाशी लढावे हे सुद्धा याला कळत नाही म्हणून पराभव झाला. दिव्यावर झडप घातल्यावर पतंग कधीतरी जिवंत राहील काय? अशा प्रकारे हे युद्ध करणे, अनार्य, अस्वर्ग्य व अपकीर्तिकारक होईल. म्हणून युद्ध न करणेच चांगले.

भगवान म्हणाले, या दोघांना सोड व बाकीच्यांशी युद्ध कर. त्यांच्याबरोबर लढताना विजयाची शंका नाही ना? तर मग त्यांच्याशी युद्ध कर. ममता आहे म्हणतोस पण ती काल्पित आहे. तशी नसती तर युद्धाआधी माझ्याकडे मदत मागायला कशाला आला असतास? हे शत्रू आहेत असे समज की मोह पळतो.

अर्जुन म्हणाला, ‘ गुरु आहेत, पूज्य आहेत व महानुभाव आहेत. त्यांना कसे मारू? त्यांच्याशिवाय बाकीच्यांना मार म्हणता, पण ते शक्य नाही. कारण शत्रूने सेनेच्या अग्रभागी त्यांना मुद्दाम ठेविले आहे.’ भगवान म्हणाले, ‘ तू त्यांना गुरु म्हणतोस मग त्यांनी तुझ्या पक्षाला यायला नको होते का? बरे न आले तरी कौरवांची समजूत करून युद्ध करू नका असे त्यांना सांगून यानी हे प्रकरण इथपर्यंत यायच्या आधीच मिटवायला नको होते काय? समजा, कौरवांनी हे न ऐकले तर बलरामाप्रमाणे तटस्थ रहायला हवे होते. बलरामाकडे दुर्योधन मदत मागायला गेल्यावर तो म्हणाला, ‘ मला तुझा पक्ष आवडतो पण तिकडे कृष्ण आहे ना? म्हणून मला तुझ्याकडे येता येत नाही. म्हणून मी तीर्थयात्रेलाच जातो. अर्जुना, भीष्मद्रोणांनी यापैकी काहीच केले नाही म्हणून ते दोषी आहेत.

शिवाय कौरवांनी उलूक नावाच्या दूताला जेव्हा तुमच्याकडे पाठविले, तेव्हां उद्योगपर्वात तू सर्व योद्धे पहात असताना प्रतिज्ञा केली आहेस की,

यस्य वीर्यं समाश्रित्य धार्तराष्ट्र विकत्थसे ।
हन्तास्मि प्रथमं भीष्मामिषतां सर्व धन्विनाम् ॥

मी भीष्मांनाच सर्वात प्रथम मारीन. कारण तुमच्या सर्व गमजा त्यांच्या बळावर आहेत. ती प्रतिज्ञा विसरलास काय? प्रतिज्ञा करताना विचार करावा व केल्यावरती पाळावी, नाहीतर ते आश्वासन होईल. त्यात काहीच अर्थ राहणार नाही. भिक्षा मागीन म्हणतोस. तू एखाद्या ब्राह्मणाच्या घरी भिक्षा मागायला गेलास व तिथे आसपास धनुष्य पडलेले दिसले तर ते उचलल्याशिवाय राहशील काय? शक्यच नाही. कारण तो तुझा जन्मजात स्वभाव आहे. तो झुंजवील तूते । प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति । म्हणून लढ. शिवाय युद्ध हा क्षत्रियांचा स्वधर्म

आहे. त्यांना ते न्याय्य आहे. इथे जय मिळाला तर पृथ्वीचे निष्कंटक राज्य मिळेल व रणात धराशायी झालास तर महेंद्रपद मिळेल. भीष्म-द्रोण गुरु असले तरी लोभी आहेत. सभापर्वात प्रत्यक्ष भीष्मांनीच राजा धर्माला हे सांगितले आहे की,

**' अर्थस्य पुरुषो दासः दासस्त्वर्थो न कस्यचित् । '**

म्हणून तू यांना अवश्य मार. पिता, माता, गुरु कोणीही असो, जर त्याने धर्माचे उल्लंघन केले असेल तर त्याला तत्काळ शासन करा असे शास्त्र सांगते. मी इथे तुला उपदेश करत बसत नाही. कारण ही ती वेळ नव्हे. लोक तरुणांना म्हणतात तारुण्यात चैन करायची. विषयोपभोग घ्यायचे. दंगामस्ती करायची. यावेळी कसला परमार्थ करता ? श्रवण मनन करता ? वृद्धपणी मुलांनी घरातून बाहेर काढल्यावर, सर्व उपाय थकल्यावर मग परमार्थ करा. तसेच भगवान म्हणतात, अर्जुना, तुला उपदेश करत बसण्याची ही ती वेळ नव्हे. इथे सिंहनाद, शंखनाद झालेले आहेत. युद्धाकरता सर्व योद्धे सिद्ध होऊन उभे आहेत. यावेळी तुला फक्त मी ' स्मारितम् ' । आठवण करून दिली. कारण सर्व स्मृती तू पाहिल्या आहेस. धर्मशास्त्राचेही अध्ययन केले आहेस.

अर्जुन म्हणाला, युद्धात जय मिळाल्यावर इथे निष्कंटक राज्य मिळेल म्हणता. पण गुरूंना व स्वजनांना मारल्यामुळे मला ते विषवत् वाटेल व त्यापासून आनंद न होता उलट उद्वेगच निर्माण होईल. गुरु-घातकी असेल त्याला स्वर्गात तरी कोण घेईल ? उलट तेथून देव हाकलूनच देतील. इतके करूनही तेथे श्रेष्ठपद मिळाले तरी क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति । या न्यायाने ते अशाश्वतच असणार. त्याने फायदा होणार नाही.

**कार्पण्यदोषोपहतस्वभावः पृच्छामि त्वां धर्मसंमूढचेताः ।**
**यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम् ॥७**

कार्पण्य म्हणजे दैन्य. त्यामुळे माझा स्वभाव आच्छादित झालेला आहे. धर्माबद्दल माझे चित्त मूढ झालेले आहे. म्हणून माझे निश्चित कल्याण कशात आहे ते मला सांगा. मला तुमचा शिष्य समजा. मी तुम्हाला शरण आलो आहे. मला बोध करा.

भगवान म्हणाले, " मी तुला, ' उत्तिष्ठ परंतप ' असे सांगितले ना? आता पुनःपुनः काय सांगायचे ? " तो म्हणतो, ' पुनः निश्चित सांगा.' भगवान म्हणाले, ' भीष्मद्रोणादि तुझे गुरु आहेत, मीसुद्धा तसलाच गुरु ना ? मुलाला शाळेत घालतात. पहिलीपासून ११ वी पर्यंत त्याचे अकरा गुरु होतात. पण त्यात खरा गुरु कोणीच नसतो. तसलाच गुरु की काय ?' अर्जुन म्हणाला, ' तसला गुरु नव्हे. मी भीष्मद्रोणांना गुरु मानतो.' हे कबूल, पण ' शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम् ' असे म्हणून तुम्हाला जशी अनन्यशरणागती मी दिलेली आहे, तशी त्यांना दिलेली नाही. खरा गुरु जो असेल त्याने एकदा सांगितल्यावर शिष्याचे समाधान होत नसेल तर त्याला हजार वेळ सांगितले पाहिजे. व शिष्याचे संशय दूर करून त्याचे पूर्ण समाधान केले पाहिजे.

**नहि प्रपश्यामि ममापनुद्याद् यच्छोकमुच्छोषणमिंद्रियाणाम् ।**
**अवाप्य भूमावसपत्नमृद्धं राज्यं सुराणामपि चाधिपत्यम् ॥८॥**

तुझ्या उपदेशाशिवाय इंद्रियांचे शोषण करून टाकणारा मोह नाहीसा होणार नाही. पृथ्वीचे निष्कंटक राज्य किंवा देवांचे आधिपत्य मिळाले तरी माझा मोह जाणार नाही. यातून बाहेर पडण्यासाठी तुझ्या उपदेशाशिवाय दुसरे साधन मला दिसत नाही.

संजय म्हणाला, ‘ अर्जुनाला स्वजन युद्धाकरता उभे असलेले पाहून शोकमोह झाले. भगवंतांनी ते अयोग्य आहेत असे सांगितल्यावरही कसे गेले नाहीत? हे आश्चर्य नव्हे काय? पण असा विचार क्षणभरच त्याच्या मनात आला. नंतर तो लगेच म्हणाला, मला यातले रहस्य समजले. ‘ क्लैब्यं मास्म गमः पार्थ । ’ म्हटल्यावर त्याचा मोह हाललेला होताच. नारळ फोडायला हातात घेतल्यावर पहिल्या घावासरशी तो फुटत नाही; पण चीर भेलेली असतेच. आणखी दोन घाव घातल्यावर तो हमखास फुटणार. मडक्याला तडा गेल्यावर ते किती दिवस राहते? अगदी घाईलाच आलेले असते. याच अवस्थेला अर्जुनाचा मोह गेलेला होता व पुढेही पूर्ण जाणार म्हणून धृतराष्ट्राला जयाबद्दल वाढणारी आशा व्यर्थ आहे.

संजय उवाच ।

**एवमुक्त्वा हृषीकेशं गुडाकेशः परंतप**
**न योत्स्य इति गोविन्दमुक्त्वा तूर्ष्णीं बभूव ह ॥९॥**

संजय म्हणाला, ‘ राजा, अर्जुन वरीलप्रमाणे भाषण करून हृषीकेशाला म्हणजेच भगवंताला ‘ मी लढणार नाही ’ असे स्पष्ट सांगून स्तब्ध राहिला. ’

अर्जुन म्हणाला, ‘ भगवंता, तू गोविंद आहेस. गाम् विंदाति इति गोविंदः । माझा मोह पूर्ण घालविण्यासाठी तू पुनःपुनः बोलणार आहेस. तसेच हृषीकेश म्हणजे इंद्रियांचा स्वामी आहेस. गायत्री मंत्रात सर्वांच्या बुद्धीला प्रेरणा देणाऱ्या भगवंता, माझ्याही बुद्धीला प्रेरणा दे. तेजस्वी कर. अशी प्रार्थना त्याचकरता केलेली असते. या सर्व योद्ध्यांच्या हातात शस्त्रास्त्रे असताना तू त्यांना स्तब्ध बसविले आहेस. हे ज्याला करता येते त्याला माझा मोह घालविता येणार नाही काय? ’ तो

म्हणाला, मी गुडाकेश आहे. गुडाका म्हणजे निद्रा—आत्मविषयक अज्ञान. ते मी जिंकले आहे. कारण तू परमेश्वर आहेस हे मी ओळखले आहे. व म्हणूनच तुला मी अनन्य शरण आलो आहे. मी परंतप आहे. माझा तू फक्त मोह घालव की शत्रू नष्ट करतो पहा.

**तमुवाच हृषीकेशः प्रहसन्निव भारत ।**
**सेनयोरुभयोर्मध्ये विषीदंतमिदं वचः ॥१०॥**

हे भरतकुलोत्पन्न धृतराष्ट्रा, दोन्ही सैन्यामध्ये खिन्न होऊन बसलेल्या अर्जुनाला भगवान श्रीकृष्ण स्मित वदनाने पुढीलप्रमाणे बोलू लागले.

तम् म्हणजे ज्याचा मोह गेलेला नाही व विषीदंतम् म्हणजे त्या मोहाचे कार्य शोकही कायम आहे, अशा अर्जुनाला भगवान म्हणाले. ते नेहमी स्मितपूर्वकच बोलतात. सामान्य लोकांचा परिहास हा विनोदात परिणत होतो. पण भगवंताचा आत्मबोधात परिणत होतो हा विशेष आहे. इतकेच नव्हे, तर उपदेश न करता केवळ आपल्या हास्याने अर्जुनाला आत्मज्ञान देण्याचे त्यांचे सामर्थ्य आहे. संजय म्हणतो, 'धृतराष्ट्रा, तू चाणाक्ष राजा आहेस. पृथ्वीवरील सर्व राजांना चांगल्या प्रकारे ओळखतोस. अर्जुनाप्रमाणे भगवत्कृपेला पात्र झालेला एकतरी राजा तुझ्या पहाण्यात आहे काय?

धृतराष्ट्र म्हणतो, 'कृष्णाने जरी अर्जुनाला आत्मबोध केला तरी त्याला त्यापासून आत्मज्ञान होणार नाही. सुंदर कार्याची निर्मिती होण्याकरता देशकालही तसेच लागतात. आत्मज्ञान गूढ आहे. दुर्विज्ञेय आहे. सुसूक्ष्म आहे. त्याकरता कमालीची शांतता व चित्ताची स्वस्थता अपेक्षित असते. इथे अर्जुन परसैन्यात सापडला आहे. एकाकी आहे. सिंहनाद, शंखनाद होऊन योद्धे सुसज्ज आहेत. अशा वेळी त्याला आत्मबोध होणे शक्यच नाही. पालथ्या घागरीवर पाणी पडल्यासारखे होईल व माझ्या मुलांचा विजय होईल. हा त्याचा सर्व अभिप्राय ओळखून संजय

'श्रीभगवानुवाच' हे पद मुद्दाम घालतो. खरे पाहता हृषीकेश उवाच असे तो मागच्या श्लोकात म्हणाला होता. मग पुन, 'श्रीभगवानुवाच' का? त्याच्या जवळ शब्द जास्त होते की काय? तसे नव्हे. राजाचा भाव जाणूनच त्याने हा शब्दप्रयोग केलेला आहे. तो म्हणतो, सामान्य माणसाला कार्य करायचे झाल्यास देशकालाची अपेक्षा असते तशी भगवंताला नसते. केवळ एका संकल्पाने, हास्यानेही तो हे लीलया कार्य करू शकतो. म्हणून तुझी दुराशा व्यर्थ आहे.

श्रीभगवानुवाच—

**अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे ।**
**गतासूनगतासूंश्च नानुशोचन्ति पण्डिताः ॥११॥**

शोक करण्याला अयोग्य अशा गोष्टीबद्दल तू शोक करत आहेस. आणि वर पांडित्याच्या गोष्टी सांगत आहेस. पण विवेकी पुरुष मृताबद्दल आणि आसन्नमरणाबद्दल शोक करत नाहीत.

'अशोच्यानन्वशोचस्त्वम्' पासून वीस श्लोकांनी भगवंतांनी अर्जुनाचा शोक-निरास केलेला आहे. व 'स्वधर्ममपि चावेक्ष्य' पासून पुढील आठ श्लोकांनी त्याच्या प्रज्ञावादाचे निराकरण केले आहे. 'अशोच्यानन्वशोचस्त्वम्' हे गीतेचे बीज आहे. बीजात जसा संपूर्ण वृक्ष असतो, तशी यात सर्व गीता अंतर्भूत आहे. बीजाला योग्य देश काल मिळाले, पाणी जमीन मिळाली; की त्यापासून मूळ धरते. व मग खोड बनून स्कंद येतात. पुढे पल्लव येऊन पुष्पे व फळे येतात. इथे तसेच आहे. म्हणून बाकीचे श्लोक हा फक्त तिचा विस्तार आहे. 'सर्व धर्मान् परित्यज्य........मा शुचः ॥' ही तिची शक्ती आहे. या साऱ्यांचा न्यासात उच्चार केलेला असतो. 'अशोच्यानन्वशोचस्त्वम्' असे सांगून भगवंतांनी अर्जुनाला शालजोडीतले दिले आहेत. ते म्हणतात, 'तू मूढता प्रकट करतोस व दुसरीकडून प्रज्ञावाद सांगतोस.' तसेच

शिष्यपणा स्वीकारून ' न योत्स्ये ' म्हणून स्वतंत्रता व्यक्त करतोस. हे परस्पर विरोधी आहे. कारण शिष्याने नेहमी गुरुच्या आज्ञेतच राहिले पाहिजे. त्याला स्वातंत्र्य नसतेच, या मुद्यावरून रामाने भरताच्या गळयात राज्य बांधले.

चित्रकूट पर्वतावर राम असताना भरत तिथे गेला. चतुरंग सैन्य व वसिष्ठादी मुनी सर्वजण त्याच्याबरोबर होते. कैकेयी सुद्धा होती. तिने आपली चूक कबूल केली. भरत म्हणला, ' मनुवंशाचा असा नियम आहे की राज्य ज्येष्ठाचे. झाले गेले होऊन गेले. तू राज्य परत घे. नाहीतर मी प्रायोपवेशन करतो.' म्हणून त्याने दर्भ आंथरले सुद्धा. रामाच्या सांगण्यावरून वसिष्ठांनी त्याला बोध केल्यावर तो म्हणाला, ' गुरु म्हणून त्यांना सात वेळा नमस्कार करीन, पण आता कुणाचे ऐकणार नाही. तो इतक्या हट्टाला पेटल्यावर राम म्हणाला, ' राज्य माझे हे तुला मान्य आहे. म्हणजे तू माझा प्रजाजन आहेस. प्रजेने राजाच्या आज्ञेत रहायला पाहिजे. माझी आज्ञा मान्य करून हे राज्य कर.' यावर भरताला बोलता येईना.

भगवान म्हणतात, ' भीष्म द्रोण अशोच्य असताना तू शोक करतोस. त्यांच्या आत्म्याबद्दल शोक करतोस काय ? पण तो व्यर्थ आहे. कारण ' देही नित्यमवध्यो ऽयम् ' म्हणून त्यांच्या देहाबद्दल शोक करतोस काय ? तोही व्यर्थ आहे. कारण तसे केल्यास जीर्ण वस्त्राबद्दल शोक केल्याप्रमाणे होईल. तुम्ही एक धोतरजोडी तीन वर्षेपर्यंत वापरली. नंतर ती फाटली. मग रडायचे की काय ? वस्त्र हे आज ना उद्या फाटणारच. तसा देह हा आज ना उद्या जाणारच.

**अद्य वाब्दशतान्ते वा मृत्युर्वै प्राणिनां ध्रुवः ।**

अर्जुन म्हणाला, आपले स्वजन मृत झाले असतील किंवा आसन्न-मरण झाले असतील तर शोक होणे स्वाभाविकच नाही का ? पंडित

असला तरी तो व्यवहार करतोच ना? मग त्याने शोक का करू नये? भगवान् म्हणाले, ' पंडा म्हणजे आत्मविषयक बुद्धी. ती ज्याने संपादन केली तो पंडित. ' तरति शोकम् आत्मवित् । ' असा उपनिषदांचा सिद्धांतच आहे. त्यामुळे त्याला शोक होत नाही. तू मात्र शोक करतोस म्हणून पंडित नाहीस. मग प्रज्ञावाद कशाला सांगतोस? त्यामध्ये फक्त चर्चा असते. शिष्य झाल्यावर मात्र सारी जबाबदारी गुरुवर असते. अर्जुनाचा केवळ शोक घालविला असता, तर तो लगेच कर्तव्यतत्पर झाला असता. मग आत्मबोध त्याला का केला? कारण ममता ही एक लता आहे व शोक हे तिचे पल्लव आहेत. अज्ञान तिचे मूळ आहे. वेलीच्या फांद्या, पालवी लगेच काढता येतात. पण ४–८ दिवसांनी त्या पुनः फुटतात. म्हणून भगवान म्हणाले, ह्याचा शोक एका क्षणात घालवता येईल. पण जोपर्यंत ह्याचे अज्ञान कायम आहे, तोपर्यंत तो पुनः पुनः निर्माण होणारच. शोक समूळ घालविण्याकरता, अज्ञानच घालवले पाहिजे. म्हणून त्याला आत्मबोध करणे आवश्यक आहे.

**न त्वेवाहं जातु नासं न त्वं नेमे जनाधिपाः ।**
**न चैव न भविष्यामः सर्वे वयमतः परम् ॥ १२ ॥**

खरोखर तू, मी व हे राजे पूर्वी नव्हते असे नाही. तसेच यानंतर आपण सर्वजण असणार नाही असेही नाही.

मृत व आसन्नमरण याबद्दल पंडित शोक करत नाहीत. हे ऐकल्यावर अर्जुन म्हणाला, ' सर्व लोकांप्रमाणेच पंडितही खातात पितात ना? मग सर्वांप्रमाणेच ते शोक का करत नाहीत? ' भगवान म्हणाले, ' बाकी सर्वांप्रमाणेच ते सर्व व्यवहार सामान्याप्रमाणे करतात हे खरे. पण ते शोक करत नाहीत. शिवाय त्यांनी शोक केला तर त्यांना पंडित कोण म्हणेल? एखाद्या मूर्खाला, ' तू पंडित आहेस.' असे म्हटले तर किती आनंद होतो? मग खरा पंडित आनंदात असता त्याला शोक

म्हणजेच मनस्ताप कसा असू शकेल? आत्मा नित्य आहे म्हणून तो शोक करत नाही. भीष्मद्रोणांचे आत्मे असेच असल्यामुळे तुला शोक करण्याचे कारण नाही. एवढे सांगितले असते तरी भागले असते. तसे न सांगता तुझा, माझा व त्यांचा आत्मा असे वेगवेगळे का सांगितले? वक्त्याने नेहमी शब्द हे तोलूनच वापरले पाहिजेत. अधिक वापरल्यास तो अग्राह्य वक्ता ठरतो. त्याला कोणीही मान देत नाही, पण गीतेत फालतू शब्द नाहीतच; तिच्यावरील कितीतरी टीका सध्या उपलब्ध आहेत. म्हणून गीतेची योग्यता त्यांना आली काय? गीता ती गीता व टीका ती टीकाच. कारण गीता म्हणजे साक्षात् भगवद् वाक्ये आहेत.

आत्मा नित्य आहे म्हणजे काय? भूत, वर्तमान व भविष्य या तिन्ही कालात राहतो तो पदार्थ नित्य होय. तसा आत्मा आहे. 'न त्वेवाहं' माझा आत्मा आहे. पूर्वपक्ष म्हणतो, श्रीकृष्ण हा परमात्मा आहे हे अर्जुनाला माहीत होते म्हणूनच तो श्रीकृष्णाकडे युद्धासाठी मदत मागायला गेला असताना ५६ कोटी यादवसेना युद्धाला न मागता त्याने नि:शस्त्र असलेल्या श्रीकृष्णालाच स्वेच्छेने आपल्या पक्षाला घेतले. श्रीकृष्ण म्हणजे साक्षात् परब्रह्म. 'कर्तुमकर्तुमन्यथा कर्तुम्' समर्थ असणारे, केवल संकल्पाने ब्रह्मांडाच्या घडामोडी करणारे ते आपल्या रथावर सारथीरूपाने राहिल्यावर आपला पराभव कदापि होणार नाही, हे त्याला पक्के ठाऊक होते. भीष्मांनी राजसूय यज्ञात त्याला अग्रपूजेचा मान दिला हेही माहीत होते, पण श्रीकृष्णाच्या स्वरूपाचे यथार्थज्ञान त्याला प्रत्यक्ष विश्वरूप दाखविल्यावरच झाले. तेव्हाच अर्जुन म्हणाला,

**सखेति मत्वा प्रसभं यदुक्तं........ प्रणयेन वापि ।**
**यच्चावहासार्थमसत्कृतोऽसि.... तत्क्षामये त्वामहमप्रमेयम् ॥**

विश्वरूप दिसण्यापूर्वी फक्त श्रीकृष्ण म्हणजे अत्यंत पराक्रमी युक्तिमान नेता व मुत्सद्दी. फक्त त्याच्याकडे योगशक्ती आहे, एवढेच तो

मानीत होता. व परमात्मा आहे एवढे ऐकून माहीत होते. त्याचा साक्षात् अनुभव विश्वरूपदर्शन झाल्यावरच झाला. अर्जुन कृष्णाला वयाने आपल्या एवढाच मानत होता. म्हणूनच चौथ्या अध्यायात सूर्याला हा योग मी सांगितला म्हटल्यावर अर्जुन भगवंताला विचारतो 'अपरं भवतो जन्म' आपण सूर्यापेक्षा वयाने लहान. सूर्य आमच्या आजोबा, पणजोबां-पासून आहे. मग त्याला आपण हा योग कसा सांगितला? पण विश्वरूप दर्शनानंतर 'पिताऽसि लोकस्य चराचरस्य' हे अर्जुनाने एकदम मान्य केले.

प्रथम तो परमात्मा माहीत नसल्यानेच कौरवांचा जय झाला तर अर्थातच आमचा पराजय होणार व आम्ही मरणार. व श्रीकृष्ण आमच्या पक्षाला असल्याने त्याचीही तीच गत होणार, असे त्याला वाटत होते. तो म्हणतो, 'कृष्णच मेला तर आम्हाला कोण मदत कर-णार? शिवाय स्वत:पेक्षा श्रीकृष्णावर अधिक प्रेम असल्याने तो रहावा अशी तीव्र इच्छा होती. हे जाणूनच भगवंतांनी सांगून टाकले, 'अर्जुना, मी पूर्वी नव्हतो असे नाही व पुढे नाही असेही नाही व सध्या तर आहेच. अर्जुनाची दुसरी शंका स्वत:बद्दल होती. ही सूक्ष्म होती. ती त्याने 'यद्वा जयेम यदि वा नो जयेयु:' यातून सूचित केलेली आहे. माझा पराभव होऊन मी मृत झालो तर? त्याकरता तुझा आत्माही नित्य आहे हे सांगितले. कृष्ण हा परब्रह्म आहे म्हणजेच शिव आहे. व जीवशिवाचे ऐक्य आहे. हे अर्जुनाला माहीत नव्हते हे सिद्ध होते. काही लोक म्हणतात, "आत्मे अनेक आहेत हे यातून भगवंतांनी सांगितले आहे. पण ते चूक आहे. कारण व्यवहारात नानात्मत्व सिद्धच होते. ते सांगण्याकरता गीताच कशाला पाहिजे? लौकिकातील अर्थच जर तिने सांगितला तर तिचे अपूर्वत्व ते काय? शिवाय प्रस्तुतचा विषय नित्यत्वाचा आहे. आत्मा एक की अनेक

सांगण्याचा नाही. नैय्यायिक म्हणजेच गौतम म्हणतात, ‘ आत्मे नाना आहेत.’ तुमच्या मुलाला दोन हजार रु. पगार झाला, तुम्हाला व त्याला दोघांनाही आनंद आहे. पण दोघांचा आनंद सारखा नाहीं. कारण प्रत्यक्ष पैसे त्याच्या हातात पडतात म्हणून मुलाचा आनंद अधिक. तुमच्या मुलाचे लग्न झाल्यास तुम्हाला व त्याला दोघांनाही आनंद होतो. पण प्रत्यक्ष मुलाचे लग्न होते, म्हणून त्याचा आनंद अधिक.

ते म्हणतात आत्मा एकच ना? मग गुरूला आनंद झाल्यावर ब्रह्मानंद होऊन ज्ञान मिळाल्यावर शिष्याला लगेच ज्ञान का होत नाही? वेदान्ती म्हणतो एक घट आहे त्यात आकाश सापडलेले आहे ते घटाकाश. तो घट फोडल्यास ते घटाकाश महाकाशात विलीन होते. तसेच आत्मा एकच. पण तो शरीर, मन व बुद्धी या उपाधीमुळे भिन्न भिन्न भासतो एवढेच.

प्रभु रामचंद्र व परशुराम यांची सीता स्वयंवरानंतर गाठ पडली. परशुराम म्हणाला, ‘ माझे तू धनुष्य मोडलेस असे ऐकले. पण ते फार जुनाट होते. हे मी दाखवतो हे मात्र नवीन आहे. हे फक्त उचलून दाखव. धनुर्भंग राहू दे. असे केले नाहीस तर काय होईल? मी पृथ्वी एकवीस वेळा निःक्षत्रिय केली आहे हे लक्षात ठेव. तुला सुद्धा मी जिवंत ठेवणार नाही. त्या परशुरामाच्या बोलण्यावर प्रभु रामचंद्र फक्त हसले व त्यांनी त्याच्या हातातील धनुष्य हिसकावून घेतले. आकर्ण प्रत्यंचा ओढली व विचारले, ‘ परशुरामा, माझा बाण अमोघ आहे. कोणावर सोडू सांग. तो कदापि व्यर्थ जाणार नाही. मी एकबाणी आहे. तू संपादन केलेल्या पुण्यलोकावर हा बाण सोडू, का तुझ्या पाथावर सोडून गती कुंठित करू? कारण तू ब्राह्मण असल्याने मला अवध्य आहेस. विश्वामित्र तसेच आहेत. त्यांनी मला विद्या शिकविली आहे. म्हणून मी तुझा वध करणार नाही. तेव्हा परशुरामाने तो बाण आपण संपादन केलेल्या

स्वर्गासारख्या पुण्य लोकावर सोडायला सांगितला. श्रीराम व परशुराम एका विष्णूचेच अवतार. ते वेगळे होते काय ? नाही. मग नाना आत्मे मानल्यास एकाच विष्णूना दोन आत्मे मानावे लागतील. म्हणून तसे न मानता श्रुती सांगते. आत्मा हा एकच आहे. पण अंतःकरण या उपाधीने तो भिन्न आहे असे फक्त भासते; कारण प्रत्येकाची अंतःकरणे भिन्न आहेत.

**देहिनोऽस्मिन्यथा देहे कौमारं यौवनं जरा ।**
**तथा देहांतरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति ।। १३ ॥**

ज्याप्रमाणे जीवाला देहामध्ये असताना बाल्य, बाल्यातून तारुण्य, तारुण्यातून वार्धक्य या अवस्था ( एक संपून दुसरी अवस्था येते ) येतात, त्याप्रमाणे त्याला एक देह जाऊन दुसऱ्या देहाची अवस्था म्हणजेच प्राप्ती होत असते. म्हणून जे विवेकी लोक आत्मा नित्य आहे हे जाणतात. ते जन्ममरणाच्या भ्रांतीने युक्त होत नाहीत.

आत्मा नित्य आहे. भीष्मद्रोणांचे देह जातात म्हणून तू शोक करू नकोस. तो म्हणाला, व्यवहारात ' चैत्रः जातः मैत्र मृतः ।' असे म्हणतात याची काय वाट ? सर्वांचाच असा अनुभव आहे तर ते खोटे कसे असेल? भगवान म्हणाले, याचा अनुभव जर तुला प्रमाण मानायचा आहे तर ' शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम् ॥ ' असे म्हणून मला शरणागती का दिलीस ? आत्मा हा अत्यंत सूक्ष्म आहे. सूक्ष्म वस्तूचे ज्ञान व्हायला यंत्र लागते. ' म्हणून तर डॉक्टर सांगतात, ' एक्स रे काढून घ्या म्हणजे स्पष्ट कळेल.' जास्त ताप असल्यास तो हाताने कळतो, पण थोडीशी कसर ' असल्यास हाताने कळत नाही. त्याला थर्मामीटरच पाहिजे. फुफ्फुसाचे ठोके ऐकू येण्यास स्टेथॉस्कोपच पाहिजे. तसेच इथे आहे. आत्मज्ञान होण्यास वेदरूपी यंत्र लागते. त्यातील साधने करावी लागतात. ती करणाऱ्यांना ऋषिमुनी किंवा शास्त्रकार म्हणतात. आमच्या

शरीरात अनेक जंतू आहेत. पण ते आम्हाला दिसत नाहीत. पण शास्त्रकार म्हणतात. ते जंतू शरीरात आहेतच. ते असल्याशिवाय आपण जिवंतच राहू शकत नाही. या बाबतीत आपले मत बाजूला ठेवून शास्त्रकारांचे मतच प्रमाण मानावे लागते. कारण त्यांनी जन्मच्या जन्म त्यात घालविला असतो. तसेच आत्म्याच्या बाबतीत आहे.

एकाच देहाच्या बाल्य, तारुण्य, वार्धक्य या अवस्था आहेत. यात वाद नाही. अवस्था बदलल्या तरी आतील जीव बदलत नाही. तारुण्यातील पती वेगळा व वार्धक्यातील पती वेगळा मानल्यास अनवस्था प्रसंग निर्माण होईल. पण तो बदलत नाही. तसेच कर्मानुसार पशुपक्षी, मानवदेह, कोणताही देह येवो. आतील आत्मा बदलत नाही. म्हणूनच तो नित्य आहे. हे ऐकल्यावर अर्जुन म्हणाला, आत्मा जर नित्य आहे तर मागच्या जन्मी मी अमुक होतो हे का आठवत नाही! भगवान म्हणाले, 'असे स्मरण नसायला काय झाले? असे स्मरण असणाऱ्यांना जातिस्मर म्हणतात.' तुकाराम म्हणतात,

'धर्मस्थापनेसाठी आम्हा करणे आटाआटी ।
आम्ही वैकुंठवासी आलो याच कारणासाठी ॥'

नारद म्हणतात, "पूर्वजन्मी मी दासीपुत्र होतो. तिथे चातुर्मासात ऋषी आले, त्यांची मनःपूर्वक मी सेवा केली. माझा इंद्रियनिग्रह व सेवा पाहून ते संतुष्ट झाले. त्यांनी माझ्यावर अनुग्रह केला. त्यांच्या सांगण्याप्रमाणे मी ईश्वराचे ध्यान केल्यावर मला सगुण दर्शन झाले. त्यानंतर या जन्मी मी नारद झालो." अर्जुना, असे जातिस्मर तुला किती तरी दाखवता येतील. अर्जुन म्हणाला, पण व्यवहारात हा जन्मला व तो मेला असे म्हणतात याची वाट काय ?

भगवान म्हणाले, देह व आत्मा जवळ जवळ आहेत. त्यामुळे देहाचे धर्म आत्म्यावर व आत्म्याचे धर्म देहावर लादले जातात. व्यवहारात

चहाडखोर माणसे ह्याचे त्याला व त्याचे ह्याला सांगत नाहीत काय ? तसलाच हा एक प्रकार आहे. आत्मा चेतन व देह जड असे असताना आत्म्याचे चेतनत्व देहाकडे घेऊन देह चेतन म्हणतात व आत्मा अजर, अमर, अज असताना देहाचे अस्ति, जायते वगैरे विकार त्याच्यावर लादतात. तुम्ही गरम पाण्याने स्नान करता की नाही ? प्रायः शहरातील सर्व लोक गरम पाण्यानेच स्नान करतात. पाणी चुलीवर ठेवून खाली जाळ लावलेला असतो. भांड्याला सूक्ष्म छिद्रे असतात. त्यातून उष्णता आत जाते. ती पुनः बाहेर जाऊ नये म्हणून वरूनही पुनः घट्ट झाकण घालायचे असते. पाणी ऊन कसे होते? तेजाचे कण त्यात काही काळ शिरतात म्हणूनच. पण ते आपणाला समजत नाही. तसेच देह व आत्मा पृथक् असताना एक भासतात. काही ठिकाणी लक्षणेने अर्थ घ्यावा लागतो. उदा. ' पाने मांडलेली आहेत. पानावर बसा. ' असे म्हटल्यावर खरोखर वाढलेल्या ताटावर बसायचे काय ? व तसे त्याने केल्यावर त्याला रत्नागिरीला पाठवायला नको काय ? इथे जसा लक्षणेने पान म्हणजे त्याच्या शेजारी मांडलेला पाट असा अर्थ करायचा, तसेच चैत्र जन्मला म्हणजे त्याचा आत्मा नव्हे तर देह जन्मला असा अर्थ करायचा.

**मात्रास्पर्शास्तु कौन्तेय शीतोष्णसुखदुःखदाः ।**
**आगमापायिनोऽनित्यास्तांस्तितिक्षस्व भारत ।। १४ ।।**

इंद्रिये व विषय यांच्या संनिकर्षाने सुख-दुःखे निर्माण होतात. ती येणारी जाणारी असल्याने तू सहन कर.

अर्जुन म्हणाला, 'आत्म्याचे नित्यत्व सांगत असताना तुम्ही सुख-दुःखे अनित्य आहेत हे मध्येच कशाला सांगितले ? हे विषयांतरच नाही का झाले ? अप्रस्तुत नव्हे काय ? '

भगवान म्हणाले, ‘ तू म्हणतोस तसे ते विषयांतर मुळीच होत नाही. तुला याचा अर्थ कळला नाही एवढेच. हा श्लोक सूत्रमय आहे. मुलगी पाहताना तिचे सर्व शरीर पाहता काय? ते तर आच्छादित असते. म्हणून फक्त मुखच पाहतात व त्यावरून बाकीची अटकळ बांधली जाते. तसेच सूत्रमय श्लोकातील फक्त रहस्यमय अर्थांचा विचार करून त्याचे मर्म जाणावे लागते. तू अत्यंत बुद्धिमान असल्यामुळे तो अर्थ जाण. न समजल्यास मला विचार. शांतपणे विचार केला तर तो अर्थ कळेल. घरात गडबड असते, पण परमार्थातही तसेच करून कसे चालेल? निदान तिथे तरी शांतता हवी. मंद लोक फक्त वरवरचा अर्थ घेतात. तू मात्र तसे करू नकोस.

कडकडीत हिंवाळयात रबरी पिशवीत थंड पाणी घालून ती अंगाला लावली तर काय वाटते ? या उलट तिच्यात ऊन पाणी घालून अंगाला लावली तर ! परागाच्या शय्येवर पहुडल्यावर सुख होते. या उलट युद्धात विषारी बाण लागले तर दुःख होते. तुझे असे म्हणणे आहे की, भीष्मद्रोणांच्या शरीरावर बाण मारल्यावर ते दुःख त्यांच्या आत्म्या-पर्यंत पोहोचणारच. पण तू असा विचार कर की दुःख खरोखर कुणाला होते. पाषाणावर घाव घातले तर त्याला दुःख होते काय? छे, जडाला दुःख होत नाही. म्हणूनच तर दवाखान्यात मेल्यावर डोळा काढून घेतात. ( अर्थात तो बेवारशी असेल तर ). कारण मेल्यावर पंधरा मिनिटाच्या आत डोळा काढला तर दुसऱ्याला त्याचा उपयोग होऊ शकतो. प्रेताला कितीही टोचले तरी ते हू की चू सुद्धां करत नाही. देह जड आहे. त्याला दुःखे होत नाहीत. पण झालेली कशी दिसतात? अंतःकरणामुळे. ते द्वार आहे. तुम्हाला पाणी ऊन करायचे आहे. त्याकरता साक्षात त्यात अग्नी घातला तर तो विझतो. पण पातेल्यात पाणी ठेवून त्याला खालून जाळ लावला की ते तापते.

इथे पातेले हे द्वार आहे. त्याने कार्य होते. तसेच इथे अंत:करण हे द्वार आहे. त्याने कार्य होते. ते पंचमहाभूतांच्या सत्त्वांशाने बनलेले असते. त्यावर ममत्व धरले की सारे बिघडते. सुखदु:खे भोगावी लागतात. तुम्ही काळ्या बाजाराने साखर पुष्कळ घेतली व पाचशे ५०० तोळे सोनेही घेतले. ते नेत असताना पोलिसांनी वाटेत पकडले, तर ते जिन्नस माझे नव्हेत असे म्हटले की सुटका होते. नुकसान होते, पण पुढील संकट टळते. सोने सुद्धा आमचे नाही म्हणायचे. तो म्हणतो, आता ५०० तोळे जाते ते जाऊ दे. मागे मला कितीतरी नफा झालेला आहे. इथे जसा व्यापारी ममत्व सोडल्यामुळे सुटतो. तसेच अंत:करण माझे नव्हे म्हटले की सुखदु:खातून सुटका होते.

अंत:करण जेव्हा परदेशात जाते, म्हणजे पुरीतती नावाच्या नाडीत जाते, त्या वेळी काजळ किंवा डांबर लावले तरी कळत नाही. दु:ख होत नाही. पण जागृतीत जरासे लागले तरी दु:ख होते. म्हणजे सर्व दु:खे मानीव आहेत. म्हणजेच मिथ्या आहेत. जागृतीत पाय ठणकत असतो. झोप लागल्यावर ते दु:ख जाते व जागे झाल्यावर पुन: सुरू होते. खरे म्हणजे मध्ये सुद्धा देहाला दु:ख असतेच. पण अंत:करणच नसल्यामुळे तेव्हा दु:ख भासत नाही एवढेच. सुखदु:खे येतात व जातात हे कबूल करणे भागच आहे. नाहीतर काल आकंठ श्रीखंडपुरीने तृप्त झाल्यावर आज पुन: भूक का लागते?

आत्मा नित्य आहे व सुखदु:खे अनित्य आहेत. मग या दोघांमध्ये धर्मधर्मिभाव कसा असू शकेल? नित्य पदार्थाचे धर्मही नित्यच असायला नकोत काय? अग्नी म्हटला की केव्हांही तो उष्णच असतो. सूर्य जर एखाद्याच्या प्रार्थनेवरून मध्यरात्री उदयाला आला तरी प्रकाशमानच असणार. कारण प्रकाश हाच त्याचा धर्म आहे. धर्म गेल्यावर धर्मीही नष्ट होतो असा नियम आहे. उदा० उष्णता काढायची

झाल्यास ती नुसती काढता येणार नाही. जेव्हा निखारे विझतील तेव्हा ती जाईल. प्रत्येकाला दुःख नको आहे. यच्चयावत् जीवांची धडपड त्याकरताच आहे. सुख–दुःखे जर आत्म्याचा धर्म मानली तर ती नष्ट करताना त्यांच्याबरोबर धर्माधर्मी सिद्धांताप्रमाणे आत्मासुद्धा नष्ट होईल. तोच नष्ट झाला तर मोक्षशास्त्र व्यर्थ होईल. गोंधळ माजेल. याकरता अर्जुना, सुख–दुःखे अनित्य आहेत. म्हणून ती आत्म्याचा धर्म होऊ शकत नाहीत. शिवाय आत्मा मुळातच निर्धर्मक आहे. तू भीष्मद्रोणावर बाण मारलेस तरी ते दुःख फक्त त्यांच्या देहाला होणार. आत्म्याला नाही. म्हणून लढ. ते दोघे पूज्य आहेत ना, महानुभाव आहेत ना? मग दुःख फक्त वर देहालाच होते, हे ते जाणतात. अर्थात विवेकाने हे सिद्ध होते. तूही तसाच विवेक का करत नाहीस? का तूच एकटा शहाणा ते सांग.

तू हिमालय पर्वतावर आराधना केल्यावर भगवान पशुपती तुझ्यावर प्रसन्न झाले. अष्टदिक्पाल व इंद्रसुद्धा. इंद्राने बोलावल्यावरून तू स्वर्गात गेलास. व तेथे देवांना अजिंक्य असलेले निवातकवच ठार केलेस. तुझ्या बाणांनी त्यांची मस्तके पटापट पडत असताना तुझ्या नेत्रातून अश्रुबिंदु आले आहेत काय? का आले नाहीत? हे शत्रू ही बुद्धी होती म्हणूनच. मग आतासुद्धा भीष्म द्रोणांना शत्रू मान की दुःख जाते. अर्जुन म्हणाला, "भीष्मद्रोणांना बाण मारून ते त्यांना लागून दुःख होतच नाही, असा विवेक करायचा. दुःख सोडायचे हे चांगले, की युद्धच न करणे चांगले? भगवान म्हणाले, विद्या शिकून सोडलेली चांगली, की न शिकताच सोडलेली चांगली? ते तूच सांग." एक मनुष्य एम्. ए. झालेला आहे. व दुसरा झालेला नाही. यात फरक काय? जो शिकला आहे त्याच्या नावापुढे एम्. ए. ही पदवी लागते व जो शिकला नाही त्याच्या नावाआधी एम्. ए. लागले तर ती त्याची आद्याक्षरे ठरतात. पदवी ठरत

नाही. म्हणून निरुपयोगी होते. साठ वर्षे झाली म्हणजे स्मरणशक्ती मंदावते व शिकलेले विसरले जाते. २७ X ७ किती विचारले तर सांगता येत नाही. विसरलो म्हणता. पूर्वीचे लोक शिकून विसरलेले असतात. सध्या मुलांना पाढे शिकवतच नाहीत. शिकून जरी विसरला तरी कर्तव्यतत्पर ठरतो. फळ आले नाही तरी हरकत नाही. कर्तव्य बजावलेच पाहिजे. 'यत्ने कृते यदि न सिध्यति कोऽत्र दोषः' भीष्मद्रोणाबरोबर लढुन विवेक केलास तर कर्तव्य होते. न केल्यास भीरूपणा सिद्ध होतो.

नोकरी करणाऱ्यांना वाटते, ११ ते ५ काम असते. त्यात उसंत मिळत नाही. त्रास होतो. पण घरात दुःख नाही असे कोणी सांगितले? कुठेही जा, पळसाला पाने तीनच! सुख-दुःखे भोगावी लागणारच. ती सहन केलीच पाहिजेत. तू प्रज्ञावाद सांगतोस, मग दुःख का करतोस? कारण पंडित कधीच दुःख करीत नाहीत. सुख-दुःखे रोज येतात व जातात. शहाण्याने त्यांची दखल घ्यावी काय? सूर्य रोज उदयाला येतो म्हणून तू कधी पेढे वाटतोस काय? किंवा तो अस्ताला गेला म्हणून रडतोस काय? जावई वर्षातून एकदा आला तर दिवाळसण साजरा कराल. पण सकाळ, दुपार, संध्याकाळ सारखाच येऊ लागला तर? कांद्याची भजी कितीदा कराल? उलट त्यालाच म्हणाल तूच बाजारात जा आणि तुझ्याच पैशाने भजी आण. सुखदुःखाबद्दल असेच करायचे. अर्जुना, तू भारत आहेस. भा म्हणजे ज्ञान त्यातच रत राहिले पाहिजे. दुःख करू नको.

**यं हि न व्यथयन्त्येते पुरुषं पुरुषर्षभ।**
**समदुःखसुखं धीरं सोऽमृतत्त्वाय कल्पते ॥१५॥**

हे पुरुषश्रेष्ठा, हे विषयसंबंध ज्याला व्यथा निर्माण करत नाहीत व जो सुखदुःखे समान मानतो, असा पुरुष मोक्षाला योग्य होतो.

अर्जुन म्हणाला, ‘भीष्मद्रोणांना मारायचे व विवेकाने शोक सोडायचा हे तुमचे सांगणे म्हणजे चिखलात पाय टाकायचा व घाण करायचा व नंतर पाण्याने स्वच्छ धुवायचा, तसे मला वाटते.

त्यापेक्षा प्रथमच चिखलात पाय न टाकणे बरे नव्हे काय? तसे, आधी विचार करून युद्ध टाळणेच श्रेयस्कर होय. भगवान म्हणाले, ‘जगात तुला फक्त शोकच घालवायचा आहे की अन्यही कर्तव्य आहे? कर्तव्यात यश येण्याकरता का होईना, प्रत्येकाने योग्यता मिळविलीच पाहिजे. एक सम्राट चक्रवर्ती राजा आहे. सध्यासारखा नामधारी किंवा फक्त तनखाच खाणारा नव्हे. पूर्वीचा खरा राजा आहे. त्याला उभ्या आयुष्यात नोकरी करण्याची गरज नाही. पण अत्यंत बुद्धिमान आहे. मग त्याने पदवीधर व्हायचे की नाही? जरूर व्हावे. कारण त्यामुळे राज्य अधिक चांगल्या पद्धतीने करण्याला मदत होईल. अडाणी असल्यास लोक सहज फसवतात. शिकून योग्यता आली असेल तर तसे होणार नाही.

एखाद्या प्रिय व्यक्तीचा वियोग झाला म्हणजे तो मेल्याने तुम्ही दोन दिवस रडता. पण तिसऱ्या दिवशी का होईना उठताच ना? मग कामाला लागता. कारण हातपाय हलवल्याशिवाय गत्यंतरच नसते. सुखदु:खे भंडावून सोडतात, सकाळी उठल्यावर चहा करताना हात भाजतो म्हणून तो करायचा कोण सोडतो काय? किंवा तो पिताना जीभच भाजते म्हणून तो प्यायचा सोडता काय? साधे पडसे येते, खोकला येतो, अशा वेळी नोकरदार लोक रजा घेऊन मोकळे होतात. कारण त्यांना पगारी रजा मिळते. पण दुकानदार मात्र घरी बसत नाही. कारण रोजची मिळकत बुडते. शिवाय घरी राहण्याने खोकला थांबतो असे थोडेच आहे. त्यापेक्षा दुकानात बसून खडीसाखर खाल्लेली बरी नव्हे काय? डॉक्टर ऐटीत रोग्याला सांगतात ताप आलेला आहे तरी

कॉटवरून हलू नका हे सांगणारे डॉक्टर मात्र स्वतःला ताप आल्यावर दवाखान्यात जातात. कामे करतात. न जाऊन काय करतात? रोजचे हजार रुपयांचे प्रॅक्टीस बुडते ना? म्हणून गेलेच पाहिजे. तशी सुखदुःखे सहन केली पाहिजेत.

एखाद्याला यदाकदाचित मोक्ष नको असेल. तरी विशिष्ट योग्यता अंगी आणण्याकरता सुखदुःखे सहन केलीच पाहिजेत. कारण योग्यता हेसुद्धा एक फळच आहे. मुंबईला तुमच्याकडे एखादा पाहुणा १०।१२ वर्षांनी आला, तर तुम्ही त्याचे मनापासून स्वागत करता. मत्स्यालय, विमानतळ, म्यूझियम वगैरे प्रेक्षणीय स्थळे त्याला दाखवता. पण तो दर वर्षी येऊ लागला तर? मग स्वस्थ बसता. सुखदुःखांचे तसेच आहे. ती सकाळपासून रात्रीपर्यंत येतात व जातात. मग शहाण्याने त्यांची दखल घ्यावी काय? ' एतानि सुखदुःखानि यं न व्यथयन्ति स एव पुरुषः । ' ही दुखदुःखे ज्याला व्यथा निर्माण करत नाहीत तोच पुरुष '. सामान्याने सुद्धा हे करायला हवे. मग तू तर पुरुषश्रेष्ठ आहेस. म्हणून तू सुखदुःखे सहन केलीच पाहिजेस.

लक्षात ठेव तू क्षत्रिय आहेस. छाती फुटली तरीसुद्धा खऱ्या क्षत्रियाने रणांगणात धैर्याने उभे रहायचे असते. एक वेळ ब्राह्मणांनी रडावे, पण क्षात्रियांनी रडायचे नाही. कर्णाची परीक्षा त्यातच झाली. परशुराम हे उत्कृष्ट धनुर्विद्या शिकवितात हे ऐकून कर्णालाही शिकण्याची अनावर इच्छा निर्माण झाली. पण फक्त ब्राह्मणांनाच शिकवीन अशी त्यांची प्रतिज्ञा होती. म्हणून कर्णाने आपण ब्राह्मण असल्याचे खोटेच सांगितले. व त्यांची सेवा करत शिकत राहिला. तो बुद्धिमान होता. अभ्यासू होता. थोड्याच दिवसात तयार झाला. ब्रह्मास्त्रासारखी अस्त्रे-ही गुरूनी त्याला शिकविली. एके दिवशी कर्णाच्या मांडीवर डोके ठेवून परशुराम झोपले असताना एका किड्याने येऊन कर्णाची मांडी पोखरून

रक्तबंबाळ केली. पण गुरूची झोप मोडू नये म्हणून त्याने हूं की चूसुद्धा केले नाही. काही वेळाने रक्ताच्या उष्ण स्पर्शाने गुरु जागे झाले व म्हणाले, "खरे सांग, तू कोण आहेस? ब्राह्मण असणे शक्यच नाही. कारण इतकी तितिक्षा त्यांना नसते. म्हणून तू क्षत्रियच असला पाहिजेस."

भगवान म्हणाले, 'तुझ्या बाणांनी व्यथित झाल्यावर भीष्म रडतील काय? अरे, तो तर शौर्याचा पुतळा आहे. ते रडणे शक्यच नाही. कुठलेही उत्कृष्ट फळ मिळविण्याकरता सुखदुःखे सहन केलीच पाहिजेत. तरच उत्कर्ष होतो. अभ्यास करताना ढेकूण, डास हमखास चावतात. उलट नेहमीपेक्षा जास्तच. ते म्हणतात, याचे लक्ष दुसरीकडे आहे तेव्हा आपण आपले कार्य जोरात करू या. किंवा अभ्यास करताना झोप येते. मग अभ्यास करायचा की नाही? अर्जुना, द्रौपदी मिळवण्याकरता तुम्हाला किती कष्ट पडले? स्वयंवराला आलेल्या सर्व राजांबरोबर लढावे लागले.

आत्मा नित्य आहे, व सुखदुःखे अनित्य आहेत. म्हणून यामध्ये धर्मधर्मी भाव नाही. सुखदुःखेच जिथे अनित्य आहेत, तिथे ती मिळवण्याची साधने नित्य कशी असतील? म्हणजेच सारे जग मिथ्या ठरते. सुखदुःखे हा फक्त मनाचा धर्म आहे. म्हणून ती आल्यावर तू उसळी मारू नकोस. चित्रकाराने एखादे उत्कृष्ट चित्र पाहिले तर तो सामान्याप्रमाणेच पाहतो काय? छे, अगदी वेगळ्या प्रकारे पाहतो. पुनःपुनः निरखून बघतो. तसतसा त्याला अधिकाधिक आनंद होतो. त्याचप्रमाणे आत्मानुसंधान पुनः पुनः करण्याने साधकाला नवानवा आनंद होतो. विषयांचे चिंतन करण्यामुळे मात्र

'ध्यायतो विषयान् पुंसः .... बुद्धिनाशात् प्रणश्यति !'

ही अनर्थपरंपरा निर्माण होते. म्हणून ते न करता आत्मचिंतनच करावे. एक मोठा आरसा घेऊन त्यात आपले प्रतिबिंब पहा.

नुसते नव्हे, नवे कपडे घालून, नवे अलंकार घालून आपले आपणच सजून. दुसरे सजवायला कोण आणायचे ? कारण ऐश्वर्य तेवढेच असते. अशा पहाण्याने विलक्षण आनंद होतो. तसेच तुमचाच आत्मा पुन: पुन: पाहण्याने होतो.

**नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः ।**
**उभयोरपि दृष्टोऽन्तस्त्वनयोस्तत्त्वदर्शिभिः ॥१६॥**

अविद्यमान वस्तूला कधीही अस्तित्व नसते. व विद्यमान वस्तूचा कधीही अभाव नसतो. विद्यमान व अविद्यमान (वस्तूंचा) या दोहींचाही निर्णय तत्त्ववेत्त्यांनी जाणला आहे.

सुखदु:खे मिथ्या आहेत म्हणून सर्व जग मिथ्या आहे. म्हणून तू अवश्य युद्ध कर. असे भगवंतांनी अर्जुनाला सांगितल्यावर तो म्हणाला, मला फक्त दोन पदार्थ माहीत आहेत. एक आत्मा व दुसरा अनात्मा. आत्मा मागे होता, सध्या आहे व पुढेही असणार. हा सत् पदार्थ आहे म्हणून त्रिकालात याचा नाश होत नाही. दुसरा पदार्थ म्हणजे असत्. उदा. खपुष्प, वंध्यापुत्र, कासवीचे दूध, शशशृंग वगैरे कधीच नसलेले पदार्थ. हे दोन पदार्थ मी जाणतो. मग तुम्ही यापेक्षा वेगळा मिथ्या पदार्थ कोठला आणला ? भगवान म्हणाले, असत् पदार्थांची उत्पत्ती कधीच होत नाही. वंध्यापुत्र निर्माण झालेला तुम्ही कधी पाहिला आहे का ? सत् पदार्थांचा नाश कधीच होत नाही. पण नैय्यायिक मात्र सत् पदार्थांचा नाश होतो असे म्हणतात. त्यांचे म्हणणे असे की, आत्म्याला जसे सत् लागते तसेच जगातील प्रत्येक पदार्थाला सन् घटः । सन् पटः । असे लागते. तुम्ही काचेच्या ग्लासमधून सरबत पिता. तो फुटतो ना ? मडके सुद्धा फुटते. मग सत्पदार्थांचा नाश होत नाही, असा सिद्धांत कसा मांडता ? यावर वेदांती उत्तर देतो, वंध्यापुत्रासारखे असत् पदार्थ उत्पन्न होत नाहीत व तुमच्या मते सत्पदार्थही नष्ट होतात. मग जगात

शिल्लक राहते तरी काय? सर्वच नष्ट झाल्यावर शून्यवाद मानावा लागेल. पण तसे मानणे चुकीचे आहे.

प्रत्येक खात्यात विशिष्ट निर्बंध असतात ते पाळावेच लागतात. तुम्ही बँकेत गेला तर तिथे तुमचेच पैसे असले तरी सुद्धा ते सुटी-दिवशी मिळत नाहीत. यावर तक्रार चालत नाही. तसेच ऑफीसची वेळ ११ ते ५ ही जाहीर झालेली असते. एखादा मनुष्य तिथे रात्री अकरा वाजता गेला, तर चालेल का? ती दिवसाचीच वेळ मानून जायला पाहिजे. तरच काम होते. मग परमार्थात सूद्धा व्यवस्थेकारिता विशिष्ट नियम नकोत काय? त्याकरता आत्मा नित्य मानलाच पाहिजे. म्हणजेच तो सत् आहे व सताचा कधीही नाश होत नाही. हे ओघाने आलेच. त्याचाही नाश मानल्यास मोक्षशास्त्र व्यर्थ होईल. इतकेच नव्हे, तर त्यावर आधारलेली धर्मशास्त्रापासून कामशास्त्रापर्यंतची सारीच शास्त्रे व्यर्थ होतील. अनवस्था-प्रसंग निर्माण होईल. सताचा नाश होत नाही व असत् पदार्थ उत्पन्न होत नाहीत, असा सिद्धांत सामान्यांनी नव्हे तर तत्ववेत्त्यांनी मांडला आहे.

आता मिथ्या पदार्थ म्हणजे काय ते पाहू. निवडणुकीत काही उमेदवार निवडून येतात. त्यापैकी कांही सदस्य होतात व काही मंत्री होतात. पण या दोघाशिवाय तुमच्या आमच्यासारखे मध्येच राहतात. त्यांची गणना कशात करायची? काही मोती खरे असतात. स्वाती नक्षत्रातील पाण्याने ते बनलेले असतात. पाचपाचशे वर्षे झाली तरी मुळीच खराब होत नाहीत. याउलट कांही मोत्यांना पाणी लागले की ते तत्काळ खराब होतात. इतकेच नव्हे तर नुसत्या मण्यासारखे दिसतात ते खोटे. या दोन्हीपेक्षा वेगळे असतात ते दहा पंधरा वर्षे टिकतात. यावरून हे सिद्ध होते की खरेही नव्हेत व खोटेही नव्हेत, असा एक वर्ग आहे; जात आहे, पदार्थ आहे. त्यालाच मिथ्या म्हणायचे.

स्वप्नात लॉटरीचे पहिल्या नंबरचे बक्षिस मिळते. त्याचे लाख रुपये आलेले दिसतात. ते खरे काय ? नाहीत. कारण बँकेत ते स्वतःच्या खात्यावर कुठे ठेवता येतात ? मग खोटे म्हणावे तर त्यांची रास मी माझ्या डोळ्यांनी प्रत्यक्ष पाहिली. रुपये खणखण वाजवून पुनः मी मोजून घेतले. स्वप्नात चोरी झाली असे वाटल्यावरून मनुष्य ओरडत उठतो. पण पाहतो तर कड्या कुलपे व सर्व पदार्थ जागच्या जागीच असतात. म्हणून चोरी खरी नव्हे. आरडाओरडा करत उठला म्हणून ती खोटी-ही म्हणता येत नाही. अर्जुना, यालाच मिथ्या म्हणावयाचे. मिथ्या जरी पदार्थ असले तरी व्यवहारात जरूर त्यांचा उपयोग करून घ्यावा. सध्याचा रुपया तुम्हाला माहित आहे. त्यात खरे रुपे असते काय ! छे ! ती तर कागदाची नोट असते. चलन म्हणून तिचा अवश्य उपयोग करायचा. पण पूर्वीच्या काळी लोक आपले धन जसे जमिनीत पुरून ठेवत होते, तशा नोटा मात्र पुरून ठेवायच्या नाहीत.

ऋग्वेदामध्ये नासदीय सूक्तात म्हटले आहे. एक असा पदार्थ आहे की, जो सत् नाही व असत्‌ही नाही. यथा तमः । अंधार प्रत्येकाला माहीत आहे. वीज गेल्यावर लगेच येतो व ती आल्यावर ताबडतोब जातो. हा कुठून येतो ? व कुठे जातो ? याचे वडील कोण ? अज्ञानसुद्धा असेच आहे. अंधारात भीती वाटते. ती घालवण्यासाठी कितीही चिमण्या, मेणबत्त्या आणल्या तरी समाधान होत नाही. अज्ञानाचे आईबाप कोण ? त्याचा पत्ता नाही. ज्ञान कशाने निर्माण होते ते सांगता येते. सद्‌गुरुकृपा झाल्यावर, महावाक्याचा विचार केल्यावर ज्ञान होते. पण अज्ञान कशाने निर्माण झाले ते सांगता येत नाही. अंधार दोन प्रकारचा असतो, एक आतला व दुसरा बाहेरचा. बाहेरचा अंधार दिव्याने जातो व आतला अंधार ज्ञानाने जातो. जोपर्यंत अंधार आहे तोपर्यंत भय आहे. तसे अज्ञान जोपर्यंत आहे तोपर्यंत भय कायमचे

असते. ते सत् नाही, असत् नाही. सदसद्विलक्षण आहे असे वेदांती म्हणतात.

जगातले पदार्थ सतात घालावेत काय? पण ते तसे घालता येत नाहीत. कारण ते त्रिकालाबाधित कुठे आहेत. असतात घालता येत नाहीत. कारण ते शशशृंगाप्रमाणे उत्पन्नच झाले नाहीत असे नाही. अशालाच मिथ्या म्हणायचे. श्रीखंड आवडते म्हणून भरपूर खाल्ले असले तरी संध्याकाळी पुनः आणाच म्हणतो. हापापलेलाच असतो. चहासाठी म्हणा किंवा भोजनासाठी म्हणा. मग जेवतानाच पाच सहा शेर खायचे होते. पण तसे करता येत नाही, कारण उलटी होते. सारी सुखदुःखे याच लायकीची आहेत. अनिर्वचनीय आहेत. पण आत्मा मात्र नित्य असून त्याचा नाश होत नाही. हे मानणे भागच आहे. मोक्ष तुम्हालाही मिळालेला नाही व मलाही नाही. पण 'बहूनां जन्मनामन्ते ज्ञानवान् मां प्रपद्यते' याकरता तरी तो नित्य मानलाच पाहिजे.

**अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम् ।**
**विनाशमव्ययस्यास्य न कश्चित्कर्तुमर्हति ।। १७ ।।**

ज्याने हे सर्व जग व्यापले आहे ते सत् अविनाशी आहे असे समज. या अविनाशी वस्तूचा नाश करण्यास कोणीही समर्थ नाही.

जगातील प्रत्येक पदार्थापासून सुख व दुःख दोन्ही निर्माण होते. उदा. २५ हजार रुपये खर्च करून सुखाकरता मोटार घेतली. पण अपघात कशामुळे होतात? मोटारीमुळेच. घर सुखाकरता बांधले. पण त्यात बिऱ्हाडकरू शिरतो व घर माझेच म्हणून पीडा देतो. आपल्या हाताला चंदन लावले की आनंद होतो, पण त्याचेच बोट डोळ्यात गेले की दुःख होते. दुसऱ्याचे बोट गेले असते तर दंड थोपटून उभा राहिला असता, आपलेच गेल्यावर काय करतो? बोट कापून टाकायचे काय? छे! तसे केल्यास एक नवे दुःख पुनः निर्माण होईल.

सुखाकरता अन्न खायचे. पण रोग कशाने निर्माण होतात? अन्नामुळेच; जगातला एक पदार्थ असा दाखवा की, त्याने शेवटपर्यंत सुखच द्यावे किंवा दुःखच द्यावे. पण असा एकही पदार्थ नाही. म्हणूनच, त्यांना मिथ्या म्हणायचे.

पण आत्म्याकडे पहा, तो सर्वदा सुखच देतो. दुःख कदापि देत नाही. म्हणूनच त्याला सत् म्हणायचे. जगात दोनच पदार्थ आहेत. जड व चेतन. याशिवाय तिसरा पदार्थ नाही. होय ना? मग केस, नखे व दात यांना कशात घालायचे? चेतन म्हणावे तर कापले तरी दुःख होत नाही. उलट आम्ही पदरचे पैसे देऊन सलूनमध्ये जातो व एक रुपया घे व हे काप म्हणतो. मग त्यांना अचेतन म्हणावे तर दोन चार दिवस जाताच पुनः वाढतात. जड व चेतन यापेक्षा भिन्न असलेला हा पदार्थ, यालाच मिथ्या म्हणतात. फक्त सदभिन्नत्व हेच लक्षण तुम्ही का करत नाही? भगवान म्हणतात, अरे शशशृंगासारखे अत्यंत असत् पदार्थसुद्धा आहेत असे म्हणणारे कांही शहाणे लोक आहेत. तू तसा नसलास म्हणून काय झाले? त्यांच्याकरता 'सदसद्भिन्नत्व' असे लक्षण करावे लागते.

आत्मा नित्य आहे म्हणून तो सत् आहे. यावर पूर्वपक्ष म्हणतो, आकाश व काल सुद्धा नित्य आहेत त्यांची वाट काय? वेदान्ती म्हणतो, याला प्रमाण दाखवा. आकाश अनित्य आहे असे मी म्हणतो, याला श्रुती प्रमाण आहेत. आत्म्यापासून आकाश निर्माण झाले. त्यापासून वायु मग तेज नंतर जल व त्यापासून पृथ्वी. अशी श्रुती आहे. जातस्य हि ध्रुवो मृत्युः । या नियमाप्रमाणे आकाश उत्पन्न झाले असल्याने कधीतरी नष्ट होणारच. आमच्यानंतर कित्येक वर्षांनी नष्ट होईल एवढेच. म्हणून ते नित्य नव्हे. काल नित्य आहे, कारण 'उद्या' कधी संपला आहे काय? पण सिद्धांती म्हणतो, भूतकाळ वर्तमानकालात

आहे काय? भविष्यकाळ भूतकालात आहे काय? वर्तमानकाळ भविष्यकाळात आहे काय? नाही. मग तो नित्य कसा असेल? अज्ञाना-बद्दल तसेच. सर्वांना अज्ञान असते हे खरे पण, ज्ञान संपादन केल्यावर ते जाते. म्हणून तेही अनित्यच. अशा रीतीने बाकी साऱ्यांचे नित्यत्व बाधित होते, पण आत्म्याचे मात्र बाधित होत नाही.

अंधुक प्रकाशात एक दोरी पडलेली आहे. पूर्वेकडून पाहाणाऱ्याला ती पुष्पमाला वाटली, पश्चिमेकडचा मनुष्य म्हणाला, ते बलीवर्दमूत्र आहे. दक्षिणेकडच्याने तो साप ठरविला. उत्तरेच्याला तो संन्याशाचा दंड वाटला. ईशान्येकडला म्हणाला, ती भू-भेग आहे. गंमत अशी की यापैकी एकही दुसऱ्याचे मत मान्य करत नाही. पण त्यांच्यातल्या मतमतांतरामुळे दोरीत काहीएक फरक पडत नाही. कारण ती सर्वांचे अधिष्ठान आहे. अधिष्ठान पदार्थ केव्हाही सत्य असतो. हा सिद्धांत सर्व वाद्यांना मान्य आहे. आत्मा अधिष्ठान असल्याने नित्य आहे. त्याच्यावर जगातले अनंत पदार्थ भासले तरी त्यात एवढासा सुद्धा बदल होत नाही. कृष्णावर सत्राजिताने स्यमंतक मणी चोरल्याचा आळ घातला. तो आळ गेल्यावर कृष्णात काही फरक पडला काय? म्हणजे आरोप खोटा असून अधिष्ठानभूत पुरुष खरा असतो. पण काही वेळा आरोप खराही असतो, तेव्हा काय करायचे? तो जरी खरा असला तरी मनुष्याचे अस्तित्व अनेक पटींनी खरे असते. आत्मा नित्य अव्यय आहे. म्हणजे त्यात विगम नाही, बदल नाही.

तुम्हाला ६० वर्षे झाली. तुम्ही म्हणता पूर्वी माझे शरीर किती सुंदर होते? पण आता तसे आहे काय? शक्ती तशी आहे काय? ती पण कमी झालेली असते. पण तुम्ही हे मात्र कबूल करत नाही. पुनः विवाहाला उभा राहतो, मग कसा कबूल करील? पूर्वी स्मरणशक्ती अत्यंत तल्लख असली तरी वार्धक्यात आपणच ठेवलेले पैसे आपणच

विसरतो. पूर्वी सकाळी ३ व रात्री २ भाकरी खात होता. पण आता खाल काय? यदाकदाचित खाल्ल्या तरी पचतील काय? पचविण्यासाठी डॉक्टरकडे मात्र जायचे नाही. पूर्वी झोप तुमच्या स्वाधीन होती. पण आता? पलंगावर मऊ मऊ गादीवर मच्छरदाणी लावून पडले तरी येत नाही. म्हणजे शरीर, वाणी, मन, इंद्रिये, बुद्धी या साऱ्यात बदल झालेला आहे. हे तुम्हाला मान्य आहे. पण हे सर्व बदल ज्याला समजतात त्यात बदल झाला आहे काय? तो आत्मा बदललेला आहे काय? मुळीच नाही. तो फक्त तटस्थपणे बदल दाखवत मात्र असतो. मग ६० वर्षेपर्यंत ज्यात बदल झाला नाही त्यात आणखी दहा वीस वर्षे गेली म्हणून बदल होईल काय? नाही. म्हणूनच तो नित्य आहे. येन सर्वमिदं ततम् । त्याने सर्व चराचर व्यापले आहे. भगवान पुढे सांगतात ९ व्या अध्यायात

मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना ।

आत्माच सर्वत्र आहे. मग इतर पदार्थ दिसतात त्याची वाट काय? ते म्हणतात 'पश्य मे योगमैश्वरम्' योग म्हणजे तरी काय? माया हा अर्थ त्यांनीच सांगितला आहे. माया धरली की सारे बरोबर जुळते. भगवान म्हणतात, मत्स्थानि सर्वभूतानि । व पुढे लगेच नच मत्स्थानि भूतानि । म्हणतात. यापैकी खरे कोणते? कृष्ण खोटे बोलतो की काय? संन्याशानेसुद्धा गीता रोज म्हणावी असे सांगितले आहे. असे जिचे माहात्म्य तिने असे दुटप्पी सांगावे काय? पण भगवान म्हणतात माया असा अर्थ केला की काम होते.

रत्नागिरीचे आंब्याचे कलम इथे लावले तर लागत नाही. म्हणजे त्याचा देशतः नाश होतो. जगले तर शंभर वर्षांनी वठते, हा त्याचा कालतः नाश झाला. त्याच्यावर वीज पडली तर ते जळून जाते. हा त्याचा वस्तुतः नाश झाला. मोटारीचा अपघात ज्या ठिकाणी

झाला तो देश. ज्यावेळी झाला तो काळ. व मोटार हे साधन किंवा पदार्थ. तो काळ आल्याशिवाय नाश होत नाही. काळाने प्रेरणा केल्यामुळेच तो मनुष्य त्या ठिकाणी खेचून आणला जातो. आत्म्याचा देशतः कालतः वस्तुतः नाश होत नाही. कारण त्याच्यापर्यन्त देश, काल, वस्तू पोहोचूच शकत नाहीत.

**अंतवन्त इमे देहा नित्यस्योक्ताः शरीरिणः ।**
**अनाशिनोऽप्रमेयस्य तस्माद्युध्यस्व भारत ॥१८॥**

नित्य, अविनाशी व अगम्य अशा आत्म्याचे हे देह स्वभावतः विनाशी म्हटलेले आहेत. म्हणून अर्जुना, तू युद्ध कर.

भीष्मद्रोणांचा आत्मा नित्य आहे. अविनाशी आहे. त्याबद्दल शोक करूं नकोस. कारण खरा पंडित मृत व आसन्नमरणाबद्दल शोक करीत नाही. हे त्याला पटविण्याकरिता 'अशोच्यानन्वशोचस्त्वम्' पासूनचे श्लोक सांगितले. यानंतर अर्जुन म्हणतो, 'मी त्यांच्या आत्म्या-बद्दल शोक करत नाही.' पण त्यांचे देह जाणार ना? म्हणून मला दुःख होते. यावर भगवान म्हणाले, त्यांच्या देहांबद्दलही तू शोक करू नको. कारण देह अंतवंत आहेत. आत्मा मात्र एकच आहे. हे सांगण्या-करता 'नित्यस्य' हे एकवचन घातले आहे. व तो हे अनेक देह धारण करतो हे सांगण्यासाठी देहाः हे बहुवचन मुद्दाम घातले आहे.

शीर्यते प्रतिक्षणं तत् शरीरम् । या शरीराची झीज एकसारखी होत असते. ती भरून काढण्याकरता मनुष्य अहर्निश प्रयत्न करत असतो. रात्री झोपतो. इतकेच काय पण दिवसासुद्धा झोपतो. खुराक सकाळी खाल्ला व रात्रीही खाल्ला तरी काय होणार? समजा, वृद्धाने सकाळ, दुपार, संध्याकाळ, त्रिकाळ पावशेर, पावशेर दूध प्राशन केले, तरी काय होणार? इतके करूनही शक्ती वाढत नाहीच. या साऱ्यावर शरीर मात करते. ते पडतेच. हे ऐकल्यावर अर्जुन म्हणाला, 'शरीर जरी

मर्त्य असले तरी ते माझ्या निमित्तामुळे पडू नये असे मला वाटते.' हे ऐकल्यावर भगवान म्हणाले, 'भीष्मांनी तुझे लालनपालन केले आहे. द्रोणांना अश्वत्थामा पुत्र आहे. पण भीष्मांना नाही. कारण ते नैष्ठिक ब्रह्मचारी आहेत. मग तुझ्याशिवाय त्याना कोण आहे ? हे दोघे अत्यंत वृद्ध झालेले आहेत. त्यांची इच्छा तुझ्याच हातून मृत्यू यावा अशी आहे. मग ती त्यांची अखेरची इच्छा तू पूर्ण करायला नको काय ? लक्षात ठेव, युद्धाआधी धर्मराज तुम्हा साऱ्यांना घेऊन त्यांच्या पाया पडायला गेला होता. त्यावेळी त्यांनी आपला मृत्यू स्वमुखाने कथन केला आहे. शिखंडीला पुढे करून त्याच्या मागून अर्जुनाने बाण मारावे, म्हणजे मी मरेन असे त्यांनी सांगितले आहे.

कौरव आततायी आहेत, दुष्ट आहेत, हे त्यांना मान्य असतानाही, ते तो पक्ष मुळीच न सोडता तुझ्यापुढे का उभे आहेत, हे माहीत आहे ? ते म्हणतात आठरा अक्षौहिणी सैन्यात एका पार्थाशिवाय कोणीही आम्हाला मारू शकणार नाही. त्याच्या हातून आम्ही धारातीर्थी पतन पावलो तर आम्हाला स्वर्ग मिळेल. तुझ्या गुणांवर ते इतके लुब्ध आहेत की आपण होऊन पुढे येऊन मरायला तयार झाले आहेत. मग ही त्यांची इच्छा पूर्ण करायला नको का ? ते अस्सल क्षत्रिय आहेत.

'शिष्यादिच्छेत् पराजयम्' अशी गुरूची इच्छा असते. पिता म्हणतो माझ्याजवळ दहा गुण आहेत. मुलाने आकरा गुण मिळवावेत. माझे धन दहा कोटी आहे. ते त्याने पंधरा कोटी करावे. आहे ते राखावेत; त्यात बहुमोल भर घालावी. कीर्ती वाढवावी. या त्यांच्या इच्छा पूर्ण केल्या पाहिजेस. द्रोणांनी साऱ्यांना चोरून तुला अधिक अस्त्रविद्या दिली. सामान्य विद्यार्थ्याला शिकवतात, त्याप्रमाणे ते इतराबरोबर तुला शिकवत होतेच. पण तुझ्यासाठी स्वतंत्रपणेही शिकवत होते. ते कशाकरता ? 'शिष्यादिच्छेत् पराजयम्' याकरताच. ते [illegible]

करता तू युद्धच करायचे नाही म्हणतोस. यामुळे शत्रू म्हणतील, "अहो अर्जुन पळाला. केव्हां ? शंखनाद झाल्यावर, सिंहनाद झाल्यावर. तुला जर युद्धच करायचे नव्हते, तर मी शंख-वाजवल्यावर तू काय म्हणून शंख वाजवलास? तेव्हाच गप्प बसायचे होतेस. शंखनाद करणे हे युद्धाचे आव्हान स्वीकारणे होय. खऱ्या क्षत्रियाने ते केव्हाच नाकारायचे नसते. यावेळी निघून गेलास तर हा कुणाचा शिष्य? 'द्रोणाचा' असे लोक म्हणतील व तुझ्याबरोबर त्यांच्याही नावाला काळिमा लागेल. 'हा भीष्माचा नातू' असे म्हणून भीष्मांचीही नाचक्की होईल. म्हणून असे करू नकोस.

एका मुलाने पगारातले पैसे शिल्लक टाकून हजार दोन हजार रुपये साठविले. आपल्या संसारासाठी असेच राखावे असे त्याचे मत होते. पण आईची इच्छा रामेश्वराच्या यात्रेला जायची होती. तेव्हा त्याने काय करावे ? आईची इच्छाच पूर्ण करावी. कारण ती इतकी थकली आहे की फार दिवस जगणार नाही. पैसे काय ? तो तरुण असल्यामुळे पुनः साठवता येतील. अर्जुना, तू तसेच केले पाहिजेस. तू भीष्मद्रोणांना मारलेस तर १) इथे धारातीर्थी पतन पावल्यामुळे त्यांना स्वर्ग मिळेल. २) घरात मृत्यु येऊन त्यापासून येणारा नरक टळेल. ३) त्यांची अखेरची इच्छा पूर्ण केल्यासारखे होईल. तू जर आता मारणार नाहीस, तर आतापर्यंतचे त्यांचे आयुष्य जसे दुर्योधनाच्या दुष्ट संगतीत गेले, तसेच पुढेही जावे काय? त्यांनी त्याच परिस्थितीत पिचत रहावे की काय? त्यातून सोडविणे तुझे कर्तव्य ठरते.

**य एनं वेत्ति हन्तारं यश्चैनं मन्यते हतम् ।**
**उभौ तौ न विजानीतो नायं हन्ति न हन्यते ॥१९॥**

आत्मा मारणारा आहे असे जो समजतो, व तो स्वतः मरणारा आहे असे जो समजतो, त्या दोघांनाही खरे कळत नाही, कारण हा कोणाला मारत नाही व कोणाकडून मारला जात नाही.

आत्मा नित्य आहे. म्हणून विवेकी म्हणजेच पंडित मृताबद्दल व आसन्नमरणाबद्दल शोक करत नाहीत. देहाबद्दल म्हणशील तर ते विनाशी आहेत. तस्माद् युद्धयस्व भारत । हे ऐकल्यावर अर्जुनाला पटले देखील. पण त्याने मुद्दामच अज्ञानाचे सोंग घेतले. तो म्हणाला, ‘ मी असे केल्यानेच यांचे ज्ञानभांडार अनायासे बाहेर येईल, व माझ्याइतकाच जगाचाही फायदा होईल. पण याकरता विरोधी भूमिका मात्र चांगलचि रंगवली पाहिजे. म्हणून तो भगवंताला म्हणाला, ‘ आत्मा व देह जर भिन्न असतील तर तुमचे म्हणणे मला मान्य होईल. पण ते भिन्न नाहीत, एकच आहेत, याला मी श्रुतीचे प्रमाण देतो ‘ ब्राह्मणः न हन्तव्यः ’ । ब्राह्मणाला ठार मारू नये असे वेदात म्हटले आहे. आत्मा नित्य आहे. तो कसा मरेल ? व देह तरी अनित्यच आहे, तो गेला तर कुठे बिघडले ? असे असताना त्याचा वध करू नये असे सांगितले आहे. त्या अर्थी आत्मा व देह दोन्ही एकच असले पाहिजेत. हेच सिद्ध होते. त्याच वाक्यात जर ब्राह्मणाचा वध केला तर अश्वमेधेन यजेत् । अश्वमेध करावा हे प्रायश्चित्त सांगितले आहे.

ब्रह्मापासून ही भूते निर्माण होतात व जगतात. म्हणून त्यांची हिंसा करू नये असे सांगितले आहे. इथे भूते म्हणजे पंचमहाभूते असा अर्थ घ्यायचा नाही. कारण त्यांना मारण्याचे सामर्थ्य तुमच्यात कुठे आहे? म्हणून भूते म्हणजे जीव हाच अर्थ केला पाहिजे. ती मारू नयेत. मारली तर आत्मा नष्ट होतो. म्हणून देह व आत्मा भिन्न मानून चालायचे नाही. व्यवहारात मम गृहम् । म्हटल्यावर घर निराळे व मी निराळा असा बोध होतो. तसेच मम आत्मा म्हटल्यावर देह व आत्मा पृथक् हे सिद्ध होत नाही काय? असे आपण म्हणाल, पण मी सांगतो ते खरे नसून औपचारिक असते. घरात आलेल्या पाहुण्याला, ‘ हे घर आपले आहे.’ असे आपण सांगतो ते खरे काय? ते खरे धरून उद्या त्याने तुमच्यावर दावा लावला तर चालेल काय? घर तुमचे याचा अर्थ

यातील सुखसोयींचा उपयोग तुम्ही करून घ्या. एवढाच घ्यायचा. म्हणून देह व आत्मा एकच मानला पाहिजे.

भगवान म्हणाले, याने पूर्वपक्ष ज्या पद्धतीने ज्या तोडीचा मांडला आहे, तसेच उत्तर मला द्यायला पाहिजे. हा सारा भाग कठोपनिषदात आला आहे. नचिकेतस् या नावाचा एक मुलगा होता. वाजश्रवस् हा त्याचा पिता. त्याने यज्ञ केला. व त्या यज्ञात म्हाताऱ्या आणि वांझ गायी ब्राह्मणाला तो दान करू लागला. तो म्हणाला, 'या इतक्या म्हाताऱ्या आहेत की त्या शेणसुद्धा देऊ शकत नाहीत. मग काय करायच्या? मेल्यावर त्यांचा पुढचा खर्च आपणाला करायला लागू नये म्हणून तो देऊन टाकत होता. पण हे पाहून नचिकेताला वाईट वाटले. त्याने असे करू नका म्हटले तरी तो ऐकेना. तेव्हा 'बाबा, तुम्ही मला कोणाला दिले?' म्हणून त्याला विचारले. तीनतीनदा तेच विचारल्यावर पिता चिडला, व 'यमाला दिले' म्हणाला. ते ऐकल्यावर मुलगा खरोखरच यमाकडे गेला. पण त्यावेळी यम घरी नव्हता. यमाच्या बायकोने या मुलाचे आतिथ्य करायला हवे होते. पण तिने ते केले नाही. यमाने आल्यावर त्याला पाहिले. तो असंतुष्ट होऊ नये म्हणून 'तीन वर माग.' म्हटले. 'तू माझा अतिथी आहेस. आता मी तुझे स्वागत करतो.'

नचिकेत म्हणाला, "माझा पिता माझ्यावर रागावला आहे तो प्रसन्न होऊ दे. व त्याने माझा पुन: स्वीकार करावा. २) स्वर्गप्राप्ती करून देणारी अग्निविद्या मला दे. ३) मेल्यावर जीव असतो असे काही-जण म्हणतात व नसतो असे काहीजण म्हणतात. यापैकी खरे काय ते सांग." यमाने पहिले दोन वर दिले पण तिसऱ्याबद्दल म्हणाला, 'अरे, देवसुद्धा याबद्दल संशयात पडतात. या भानगडीत तू कशाला पडतोस? त्यापेक्षा अप्सरा घे. नंदनवन घे, कामधेनू घे. मार्कंडेयाचे आयुष्य देतो.

इंद्रपद देतो. पण हे मागू नको. नचिकेत म्हणाला, "हे सारे तुझे तुलाच असू दे. मला नको. मला ज्ञानच सांग." कुठलाही लोभ त्यावेळी त्याला भुलवू शकला नाही. तेव्हा हा अधिकारी आहे, म्हणून यमाने आत्मज्ञान सांगितले.

चार्वाक म्हणतो, आत्मा स्वतः मरतो. याउलट नैय्यायिक म्हणतात, 'तो स्वतः मरत नाही. पण तो कर्ता असल्यामुळे दुसऱ्यांना मात्र मारतो.' या दोघांचे निराकारण करण्याकरता भगवान म्हणतात, 'या दोघांनाही आत्म्याचे खरे ज्ञान नाही. कारण आत्मा स्वतः मरत नाही व दुसऱ्यालाही मारत नाही.' अर्जुन म्हणाला, 'ब्राह्मणः न हंतव्यः' या श्रुतीची वाट काय? भगवान म्हणाले, 'देहाचा व आत्म्याचा कल्पित संबंध आहे. त्यामुळे ब्राह्मणाचा देह मारला तर त्याचा आत्माच मेला असे मानले जाते. निवडणुकीला दहा लोक उभे होते त्यापैकी सात निवडून आले. तीन पडले. पण ते जर तुमचे मित्र असतील तर तुम्ही स्वतःचाच पराभव झाला असे कल्पित संबंधामुळे समजता. तुम्हाला दाम्पत्य-भोजन घालायचे आहे. त्याकरता रस्त्यावरील कोणताही पुरुष व कोणतीही स्त्री आणली तर चालत नाही. त्याकरता एक ब्राह्मण व एक सुवासिनी बोलवा, चालेल; तरीपण ते दाम्पत्य होणार नाही. त्याकरता त्यांचा देव, अग्नी व ब्राह्मण यांच्या साक्षीने वैदिक पद्धतीने विवाह झालेला असला पाहिजे. करार पद्धतीने नावे नोंदवून रजिस्टर पद्धतीने चालणार नाही. हा संबंध शास्त्रीय असला तरी कल्पितच मुलगा आजारी पडल्यावर किंवा सुखी असेल तर कल्पित संबंधामुळेच ते स्वतःही सुखीदुःखी होतात. अर्जुना, हे संबंध जसे कल्पित आहेत, तसे देह व आत्मा यांचा संबंधसुद्धा कल्पितच आहे, खरा नाही, म्हणूनच तर देह व आत्मा वेगवेगळे आहेत. एक नाहित. तू सांगितलेल्या श्रुती फक्त अनुवाद

करणाऱ्या आहेत, व मी सांगितलेल्या तत्त्वार्थदर्शक आहेत, म्हणून त्यांच्यापेक्षा प्रबल आहेत.

आत्मा म्हणजे तरी काय? सारभूत पदार्थ. आंब्याचा आत्मा कोणता? त्यातील रस. म्हणूनच तुम्ही त्याच्या रसाचा आमरस करता व साली कोयी फेकून देता. आत्मा नष्ट होतो काय? छे! तो कधीच नष्ट होत नाही. कारण तो आनंदरूप आहे. जगातील आनंदच नष्ट झाला तर जगणार कशावर? ओढ्याच्या काठी झोपडीत भिकारीण बाळंतीण होते. चारआठ दिवसातच मूल झोळीत बांधून भीक मागू लागते. तरी देखील तिच्या जीवनात आनंदाचे लेश असले पाहिजेत. नाहीतर ती जगणारच नाही. ह्या महागाईच्या दिवसात सुंदर सुवासिक भाताचा एकच घास खायला घातला तर खाणारा म्हणतो, ' कशाला घातला? त्यामुळे आपली आग जास्तच पेटली आहे. म्हणजे हे पदार्थ थोडे दिले तर तक्रार आहे. पण आनंद थोडा दिला म्हणून तक्रार आहे काय? मुळीच नाही. अर्जुन म्हणाला, ' पण तो आनंद आम्हाला का मिळत नाही? ' भगवान म्हणाले, ' योग्यता नाही, म्हणून मिळत नाही.' तुम्हाला सध्या भरपूर उत्कृष्ट धान्य मिळत नाही. म्हणून जगातले सगळे धान्य संपले म्हणायचे की काय? सुंदर सुवासिक जिरग्या तांदळाचा भात तुम्हाला घातला, पण अंगात ज्वर असल्यामुळे तुमची खाण्याची वासनाच नसली तर तो आनंद घेता येईल काय? आनंद सर्वत्र आहे, सर्वव्यापक आहे. त्यालाच परब्रह्म म्हणतात. पण योग्यता आल्याशिवाय तो घेता येत नाही. योग्यता येण्याकरता साधने करावी लागतात.

सध्या मंत्र्यावर कडक निर्बंध घातले आहेत. त्यांनी मोठ्या मोटारी वापरायच्या नाहीत. लहानच घ्यायच्या. त्यांचा खाजगी बंगला असेल तर सरकारी बंगला त्यांना मिळणार नाही. पगार निम्माच घ्यायचा. तरीसुद्धा पंतप्रधानपद मिळवण्यासाठी लोक धडपडत आहेत. तेसुद्धा

कायमचे नव्हे, फक्त पाच वर्षांपुरतेच. मग नाचिकेताला यम इंद्रपद देत होता ते कायमचे व मार्कंडेयाचे दीर्घायुष्य, तरी ते त्याने नाकारले. तो वेडा होता काय? तो म्हणाला, मूर्तिमंत आनंदच माझ्या हाती आल्यावर ही त्याची साधने कशाला हवीत? धनाने सुख होते काय? धन वाढले की लोक रात्रंदिवस घिरट्या घालू लागतात. इन्कमटॅक्ससाठी भंडावून सोडतात. त्यासाठी हिशोबाच्या दोन दोन वह्या ठेवाव्या लागतात. गिरणी काढून स्वतःच्या कर्तबगारीवर धन वाढविले, तर नोकर म्हणतात, 'आम्हांलाही त्यातला वाटा मिळाला पाहिजे. यालाच एकट्याला काय म्हणून?' ते संप करतात. बायकामुलांपासून सुख होते असे नाही. ते रोगी निघाले तर? किंवा ते प्रतिकूल निघाले तर? अल्पायू निघाले तर? पण ते घेतल्याशिवाय गत्यंतरच नाही म्हणून घ्यायचे एवढेच. म्हणून खरे सुख देणारा एक आत्मा आहे. तो सुखरूपच आहे.

**न जायते म्रियते वा कदाचिन्नायं भूत्वा भविता वा न भूयः ।**
**अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे ॥२०**

आत्मा कधी जन्मत नाही, किंवा त्याला कधी मृत्यूही येत नाही. हा एकदा होऊन पुनः नष्ट होणारा आहे असेही नाही. तो जन्मरहित, नित्य, शाश्वत व अनादी आहे. शरीराचा नाश झाला तरी तो नष्ट होत नाही.

अर्जुन म्हणाला, 'ब्राह्मणः न हन्तव्यः ।' अशी श्रुती आहे. तिच्यावरून देह म्हणजेच आत्मा ठरतो. चार्वाकाचे हेच मत आहे. तो म्हणतो, 'खा, प्या, चैन करा.'

ऋणं कृत्वा घृतं पिबेत् । भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुतः ।

खुशाल दुसऱ्याचे कर्ज काढा, मजा मारा. मेल्यावर कोण विचारतो? हे त्याचे म्हणणे सुंदर आहे. म्हणूनच चारु म्हणजे सुंदर,

वाक् म्हणजे वाणी, ती बोलणारा हे त्याला नाव पडले. याच्या मतावरून आत्मा स्वत: मरतो हे सिद्ध होते. पण 'न हंतव्य:' । हे वाक्य राहते. मग औपचारिक म्हणून सोडून द्या. भगवान म्हणाले, 'तू फक्त प्रत्यक्षावरून देहाला आत्मा म्हणतोस. होय ना? व त्याचा नाश झाला म्हणजे आत्माच नष्ट झाला म्हणतोस. पण हे बरोबर नाही. एखाद्या पुरुषाने संन्यास घेतल्यावर 'गृहस्थ: नष्ट: '। असे म्हणतात. म्हणजे तो खरोखरच मेलेला असतो काय? छे! त्याची शिखा व यज्ञोपवीत नष्ट झालेले असते. म्हणून तसा शब्दप्रयोग केला जातो. तो औपचारिक. तसेच 'ब्राह्मण: न हन्तव्य: ' । या वाक्याचाही अर्थ लावायचा आहे. त्याचा देह फक्त जातो, आत्मा नाही.

आत्मा केव्हाही मरत नाही. केव्हाही जन्मत नाही. देह जन्मतो, हे आपण प्रत्यक्षच पाहतो. देह म्हणजे जन्ममरणशाली व आत्मा त्या बरोबर विरुद्ध धर्मवान. या दोघांचे ऐक्य स्वप्नात तरी असू शकेल काय? समजा, तुझ्या मताप्रमाणे आत्म्याला जन्म आहे असे मानले तर त्याला कोणी जन्माला घालायचे? अनात्म्याने? पण ते शक्य नाही. आत्माच जन्माला घालतो म्हटले तर? जगात नाना आत्मे कुठे आहेत? एकच तर आहे. म्हणून तो जन्मत नाही. नित्य आहे असे म्हणणे भाग आहे. ज्याला जन्मच नाही त्याला मरण तरी कसे असेल? म्हणून तो अजरामर आहे. पण मग त्यापासून सृष्टी कशी झाली? संकल्पाने.

मद्भावा मानसा जाता येषां लोक इमा: प्रजा: ।

सर्व उपनिषदांमध्ये असेच वर्णन केले आहे. एक जोडपे घेतल्यावर त्यापासून पुढे सृष्टी वाढेल हे कबूल; पण पहिले जोडपे तरी कुठले आले? हा प्रश्नच आहे. चौऱ्यांशीलक्ष योनी आहेत. त्या प्रत्येकाचा प्रतिनिधी म्हणून तितकी जोडपी कुठली आणावयाची? वेदांती म्हणतो हे सर्व पदार्थ निर्माण करणारा पदार्थ स्वयंभू सर्वज्ञ व सर्वशक्तिसंपन्न

आहे. आपल्या सामर्थ्याने त्याने हे सारे विश्व साधनांशिवायच निर्माण केले आहे. सर्गकाली सर्व सृष्टी निर्माण होते व प्रलयकाळी सर्व लयाला जाते. सगळे पदार्थ नष्ट झाल्यावर ते तो पुन: निर्माण करतो. त्याअर्थी त्याच्याजवळ वरची दोन लक्षणे असलीच पाहिजेत.

मदालसेचा पुत्र सुबाहू याने अलर्काविरुद्ध लढताना संकल्पाने सैन्य निर्माण केले, ते त्याने आधी जुळवून ठेवले होते व नंतर तेथून आणले असे म्हणायचे की काय? नाही. वाडीला कृष्णानंदस्वामी नावाचे संन्यासी राहात होते. आपल्याबरोबर ४–५ शिष्य घेऊन ते मिरजेच्या मिरासाहेब नावाच्या मुसलमान साधूच्या भेटीला गेले होते. त्या साधूंनी आपल्या जातीप्रमाणे त्यांचे आगत–स्वागत करून भेट म्हणून मांसाचे ताट त्यांना दिले. ते पाहून शिष्य घाबरले. पण स्वामींनी ते ताट तसेच झाकून ठेवायला सांगितले. स्नानानंतर त्यावर उदक प्रोक्षण केले व झाकण काढा म्हटले. शिष्य म्हणाले, ' कलियुगात मांसाशन वर्ज्य. त्यात ते ब्राह्मणांनी तर मुळीच खाऊ नये. तशात आम्ही पडलो संन्यासी. काय करावे ? पण त्यांनी ताटावरचे झाकण उघडताच सुंदर रसरशीत ताजी फळे दिसली. स्वामींच्या मंत्रशक्तीमुळे असे रूपांतर झाले होते. मग अचिंत्य शक्तिसंपन्न परमात्म्याच्या संकल्पामुळे सृष्टी व्हायला काय हरकत आहे ?

जगात धर्म व ब्रह्म या दोन गोष्टी सूक्ष्म आहेत. ' धर्मब्रह्मणी वेदैकसमधिगम्ये ।' त्या वेदाशिवाय कुठल्याही प्रमाणाला कळतच नाहीत. कारण त्यांची शक्तीच अपुरी पडते. नमस्कार करणे चागले. त्यामुळे पुण्य निर्माण होते. पण म्हणून कुणीही कुणालाही नमस्कार करून चालत नाही. पत्नीने पतीला केला तर पुण्य निर्माण होते. पण पतीने पत्नीला केला तर पुण्य निर्माण होत नाही. असेच का? ते सूक्ष्म आहे. तुम्हांला कळणार नाही. म्हणून शास्त्रकार म्हणतात, ' आम्ही

सांगतो तसे वागा. चिकित्सा करत बसू नका. तरच कल्याण होईल.

प्रत्यक्षेण अनुमत्या वा यस्तुपायो न विद्यते ।
एनं विदन्ति वेदेन तस्मात् वेदस्य वेदता ॥

ही त्यांची प्रतिज्ञाच आहे. हे तुमचे मातापिता असे तुम्ही म्हणता. याला प्रमाण काय? तुम्ही त्यावेळी त्यांना पाहिले आहे? मग कशावरून? आप्त सांगतात म्हणून. मातापिता जसे आप्तवाक्यावरून मानावे लागतात. तसेच वेदावरून धर्मब्रह्म मानावेच लागतात. प्रत्यक्ष दिसले नाही तरी. शिवाजी महाराजांना काय कमी होते? बायका मुले धन राज्य सारे होते. तरी ते तुकारामाला शरण गेले. यावरून असे दिसते की धर्माने जो वागतो त्याचा उत्कर्ष होतो. अधर्माने वागणाऱ्यांचा अपकर्ष होतो. म्हणून धर्म मानणे भाग आहे. ब्रह्मज्ञान्याकडे सारे जग धाव घेते. लोहचुंबकाकडे सुया धावतात त्याप्रमाणे तो रानावनात रहात असला तरी लोक हुडकत जातात. सर्वांना त्याची अपेक्षा असते. पण तो मात्र कुणाकडे जात नाही. त्याला कुणाचीच अपेक्षा नसते.

आत्मा शाश्वत आहे म्हणजे सतत राहणारा आहे. हे ऐकल्यावर अर्जुन म्हणाला, 'सूर्य आमच्या आधी कितीतरी वर्षे झाला आहे. व आमच्यानंतर किती तरी वर्षे राहणार आहे. आकाश तसेच आहे. आत्मा सुद्धा असाच आहे काय?' भगवान म्हणाले, त्यांच्याप्रमाणे दीर्घ कालानंतर तो नष्ट होतो असे नाही. तो नित्य आहे. पुराण आहे. 'पुराणि अणति नाम गच्छति सः पुराणः ।' एका शरीरातून दुसऱ्या शरीरात जातो म्हणून त्याला पुराण म्हणतात. शरीर गेल्यावर तो गेला असे म्हणतात पण ते औपचारिक आहे. खरे नव्हे. 'पुराणि नवः इव'। असा त्याचा दुसराही एक अर्थ आहे. मनुष्य जसजसा वृद्ध होत जातो तसतशी त्याची शक्ती, कमी कमी होत जाते. माणसाचेच काय? पण अचेतन पदार्थांचेसुद्धा. मातीच्या

ढेकळाला हात लावल्यावर ती भुळुभुळू खाली पडते. मग तुम्ही म्हणता, जुनी झाली. आता तिच्यात अर्थ राहिला नाही. पण आत्म्याचे तसे नाही. इतका काळ झाला तरी त्याच्या सामर्थ्यात वैगुण्य आलेले नाही. युगे अठ्ठावीस विटेवरी उभा । असे तुम्ही म्हणता. म्हणजे इतकी वर्षे झाली हे तरी कबूल आहे ना? मनुष्य शंभर वर्षांचा झाला, एकशे दोन वर्षांचा झाला तर त्यात काही राम राहात नाही. पण आत्म्याचे तसे नाही. सतत काम केले की, सौंदर्य व शक्ती कमी कमी होत जाते. पण 'अविरतकृतविश्वसर्गलीलम् ।' पण आत्मा विश्वाच्या घडामोडी सतत करत आहे. 'युगशतजरठाभिजातदेहम् ।' शेकडो युगे झाली तरी म्हातारा होत नाही, म्हणून पुराण आहे, असे प्रल्हाद म्हणतो. ब्रह्म व धर्म सूक्ष्म आहेत. ते समजण्याकरता विशिष्ट योग्यता संपादन करावी लागते.

धर्मोत्कर्षवशात् व्यासादिभिः सह प्रत्यक्षं व्यवहरन्ति देवताः । नामदेवाबरोबरच देव का बोलत असे? व त्याचेच दूध तो का प्याला? अनेक जन्मींचा त्याचा धर्म साठत येऊन त्याचा परिपाक झाला होता म्हणूनच. महामंत्र्याबरोबर बोलण्याची पात्रता यायला अगणित द्रव्य खर्च करून, निवडून यावे लागते. सारांश, मंत्र्याशी बोलण्याकरता जशी योग्यता लागते, तशीच देवाबरोबर बोलण्याकरता सुद्धा योग्यता लागते.

**वेदाविनाशिनं नित्यं य एनमजमव्ययम् ।**
**कथं स पुरुषः पार्थ कं घातयति हन्ति कम् ॥२१॥**

हे पार्था, या आत्म्याला जो नाशरहित, नित्य, जन्मरहित व क्षयरहित असा जाणतो, तो पुरुष मारणार तरी कसा? व कुणाला मारण्याला प्रवृत्त तरी करणार कसा?

अर्जुन म्हणाला, आत्मा नित्य आहे. देह अनित्य आहे. तो अपरिच्छिन्न तर हा परिच्छिन्न. हा शुद्ध तर तो अशुद्ध. म्हणून दोन्ही एक

असणे शक्य नाही. तरी दोघांचा तादात्म्य संबंध मानला पाहिजे. नुसता लोखंडाचा गोळा घेतला तरी कार्य होत नाही. नुसत्या अग्नीनेही होत नाही. पण तोच तापवला तर गवताची काडी जाळू शकतो. तसेच देह जड आहे, तो एकटा काही करू शकत नाही. आत्मा करील म्हटले तर चेतन आहे व अकर्ता आहे, म्हणून काही करत नाही. म्हणून दोघांच्या तादात्म्याने कार्ये होतात, असे मानणे भाग आहे. मित्रत्व हा संबंधही असाच कल्पित आहे. तो खरा मानता येत नाही. कारण फायदा असेपर्यंत मित्र गळ्यात गळा घालतात, पण मागील दाराने हा माल पळवितो असे समजल्यावर एकाचे तोंड पूर्वेला तर दुसऱ्याचे पश्चिमेला होते. मैत्री असली तर दिल्लीहूनही येथे मुद्दाम भेटायला येतो. अर्जुन म्हणतो, 'देह व आत्मा यांचा असा संबंध असल्यामुळे भीष्म-द्रोणांना मी मारल्यावर मला दुःख होणारच व तुम्ही माझ्या बाजूला आहात. मला प्रेरणा करत आहात म्हणून तुम्हालाही दोष लागणारच.'

भगवान म्हणाले, "आत्मा कसा आहे? तुला माहीत आहे काय? 'अहं' या रूपाने सर्वांना तो भासतो. पण तसा भासून उपयोग नाही. अज, नित्य, अविनाशी, अव्यय ही विशेषणे उपनिषदांनी त्याला दिलेली आहेत. तो तसा भासला पाहिजे. जगातील प्रत्येक वस्तूला पुढील सहा विकार लागतात. १) जायते–उदा. देह गर्भातून बाहेर आल्यावर जन्म झाला, हा पहिला विकार. २) अस्ति– नंतर तो दहा दिवसाचा झाला, महिन्याचा, दोन महिन्याचा झाला, अशी मोजणी होते. म्हणजे त्याला कालाचा संबंध येतो. हा दुसरा विकार. ३) वर्धते– २०–२५ वर्षांपर्यंत वाढतो. मग वाढ थांबते. ४) विपरिणमते–विवाह होतो. पत्नी येते. ती म्हणते हा माझा आहे. तुमचा नव्हे. तिच्या सल्ल्यामुळे त्याच्यात बदल होतो. बदल होणे हा चौथा विकार झाला. ५) अपक्षीयते-वार्धक्यात इंद्रिये शिथिल होत जातात. कान जातात,

डोळे जातात, दात पडतात, काही इंद्रिये पूर्ण जातात. तर कांही क्षीण होतात. गुणसुद्धा कमी कमी होत जातात. पूर्वीसारखे आठवत नाही. म्हाताऱ्याला काही करू नका म्हणून सांगितले तर ऐकत नाही. ऐकले तर तो म्हाताराच नव्हे. तरुणांचे व त्यांचे खटके उडतात ते यामुळेच. ते म्हणतात आमची शक्ती जास्त आहे. आम्ही यांचे काय म्हणून ऐकावे? पण ज्ञान जर झाले असेल तर वृद्ध चटकन माघार घेतो. समजुतदारपणे वागतो. ६) नश्यति– शेवटी नाश होतो. आत्मा अज आहे. तो जन्मतच नाही. म्हणून जायते हा पहिला विकार त्याला नाही. जन्मच नसल्यामुळे हा किती वर्षांचा झाला हा प्रश्नच उपस्थित होत नाही. म्हणून अस्ति हा दुसरा विकार त्याला नाही. देह सावयव आहे. म्हणून कान, डोळे जातात. पण आत्मा निरवयव आहे. त्यातले काही जाण्याचा प्रश्नच नाही. म्हणून त्याचा ऱ्हास होत नाही. म्हणून अपक्षीयते हा विकार त्याला नाही. जन्मच नाही तर नाश कसा होणार? म्हणून नश्यति हा शेवटचा विकारही त्याला नाही. तो नित्य आहे. म्हणून त्यात वाढ नाही. बदल नाही. म्हणून वर्धते विपरिणमते हे विकार नाहीत. एकंदरीत कुठलाच विकार त्याला नाही. अशारीतीने आत्मा जो जाणतो तोच पुरुष होय. पूर्णात् पुरुषः। त्याचे ज्ञान त्याने मिळवले म्हणून ' कं घातयति हन्ति कम् ' हा कुणाला मारील? सर्वव्यापक आत्माच आहे. याशिवाय दुसरा पदार्थच नाही. म्हणून वरील दोन्ही गोष्टी संभवतच नाहीत.

हे सर्व विकार देहाचे आहेत. म्हणून देहाचा संबंध सोडला पाहिजे. हा संबंध रोजच्या रोज सोडता येतो, हे झोपेवरून सिद्ध होते. एखादा माणूस मेला. पण त्याचा तुमचा बिलकुल संबंध नसेल तर तुम्हांला दुःख होते काय? असे लोक रोज मरतात की नाही? लक्षावधी जन्मतात. लक्षावधी मरतात. पण जर ओळख असली, आपलेपणा असला तरच वाईट वाटते.

आदित्यस्य गतागतैरहरहः संक्षीयते जीवितम् ।

सूर्य रोज उदयाला येतो व अस्ताला जातो. त्याच्याबरोबर आमच्या आयुष्याचा एक एक दिवस घेऊन जातो. पण आमच्या ते लक्षातच येत नाही. संबंध सोडला की दुःख जाते. याकरता शास्त्रकारांनी वानप्रस्थाश्रम सांगितला आहे. सगळे सोडून फक्त पत्नीला घेऊन वनात जा. घरी राहिला तरी हरकत नाही. बायकामुले, धन, घर वगैरे सोडायची काही आवश्यकता नाही. फक्त त्यावरचे ममत्व सोडा

सध्या रेडिओवर वाद्ये वाजतात ना? स्त्रीपुरुष गाणी म्हणत आहेत ना? मग आम्हांला ते ऐकू का येत नाहीत? त्याचे बटण दाबून बरोबर स्टेशन लावले की ऐकू येते. नाहीतर नाही. संबंध जोडल्याशिवाय ऐकू येत नाही. शरीरात अहंकार असाच आहे. शरीररूपी रेडिओचा अहंकार हा व्हॉल्व आहे. म्हणून तो घालविला पाहिजे. कारण शरीर व आत्मा यांचा संबंध हाच जोडतो. त्यामुळे देहाचे सर्व विकार आत्म्यावर भासतात व दुःख होते. मात्र ज्यांनी हा संबंध मनाने तोडला, त्यांना दुःख नाही.

सर्व शोक घालवायचे झाल्यास उत्कृष्ट अधिकाऱ्याला प्रथम ज्ञानच सांगायचे. ते जमले नाही तर भक्ती. तीही न साधल्यास कर्म. तुम्हीच सांगा, कुठली नोकरी पाहिजे? जो तो म्हणतो क्लास वनची हवी. ती देत असला तर थर्ड क्लासची कोण घेईल? कारण त्याला १२०० रु. पगार तर ह्याला १२ रु. असतो. ती मिळत नसेल तर पुढच्या पुढच्या पायऱ्या घ्यायच्या. तसेच हे आहे. कर्म चांगले यात वाद नाही. पण त्यात वैगुण्य आले तर? शासन आहे. भक्तीचे तसेच. पण ज्ञानात ही भानगडच नाही. ज्ञानी देह आपला म्हणत नाही. मग देहाने केलेल्या पापपुण्याला तो कसा जबाबदार ठरेल? व त्यांची फळे त्याला कशी भोगावी लागतील? म्हणूनच 'सर्व ज्ञानप्लवेनैव वृजिनं

संतरिष्यसि । ' असे म्हटले आहे. ज्ञान झाल्यावर देहाकडून पापे झाली तरी भीती नाही. अर्जुना, तू हे ज्ञान संपादन केलेस तर देह व आत्मा यांचा संबंध कल्पित आहे हे कळेल व त्यामुळे प्रत्यक्ष तुझ्या देहावरची दुःखे तुला भासणार नाहीत. मग भीष्मद्रोणांना बाण मारल्यावर ती दुःखे तुझ्याकडे कशी येतील ? म्हणून ऊठ. युद्ध कर.

**वासांसि जीर्णानि यथा विहाय नवानि गृह्णाति नरोऽपराणि ।**
**तथा शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानि संयाति नवानि देही ॥२२॥**

ज्याप्रमाणे मनुष्य वस्त्रे जुनी झाली की ती टाकून देऊन नवीन धारण करतो, त्याप्रमाणे आत्मा जीर्ण शरीरे टाकून देऊन नवी प्राप्त करून घेतो.

सर्व रमणीय भोग जीवाला मिळतात ते कशाच्या द्वारा? शरीराच्या द्वारा. म्हणून अर्जुन म्हणतो, शरीर असे उपयुक्त असताना मी भीष्म-द्रोणांवर बाण टाकावेत काय? भगवान म्हणाले, ' शरीराने जीवाला सर्व सुंदर भोग मिळतात हे खरे; पण ते किती काल ? नवीन कपडे घातले, किंवा नवीनच दागिने घातले तर ते काय २४ तास घालूनच बसता ? अर्जुना, शरीर हे वस्त्राप्रमाणे आहे. फाटल्यावर जसे आपण कपडे टाकून देतो, तसे हे जीर्ण झाल्यावर सोडायला लागते. म्हातार-पणामुळे ते इतके जर्जर होते की भोग घेण्याचे सामर्थ्यच त्यात रहात नाही. समजा, एखाद्या म्हाताऱ्याचे शरीर अगदी कणखर असेल, इंद्रिये ही अगदी अविकल असतील, त्याला दातांनी चणे खाता येतात, ऊसही विळीच्या सहाय्याशिवाय खाता येत असेल. तुझ्या मते भीष्मद्रोण तसे आहेत. त्यांना चारचारशें वर्षे झालेली आहेत. तरी शरीरे चांगली आहेत म्हणशील तर मी सांगतो, ' तुझ्या बाणांनी रणांगणात जर ते मेले तर त्यांना स्वर्ग मिळेल.

पृथ्वीवरचे शरीर पार्थिव असते त्याला दुर्गंध येतो. जरासे अधिक श्रम झाले की ते दमते. पण स्वर्गात मिळणारे शरीर तैजस असते.

त्याला सुवास येतो. ते दमतच नाही. कितीही भोग घेतले तरी त्याला बाधत नाहीत. ते अधांतरी राहते. ते प्राप्त व्हावे म्हणून अनेक यज्ञ-याग करावे लागतात. अपरंपार पैसा ओतावा लागतो. कमालीची दक्षता घ्यावी लागते. पण रणांगणात मेले की ते अनायासे मिळते. याला साऱ्या स्मृती प्रमाण आहेत. असे स्वर्गीय शरीर जर तुझ्यामुळे भीष्म द्रोणांना मिळत असेल तर त्यांना तू उपकारकच होत नाहीस काय? मग त्यांचे इथले शरीर जाते म्हणून शोक करत असशील तर तुझ्या-सारखा शहाणा तूच !

भीष्म, द्रोण वृद्ध आहेत. पण दुर्योधनादिक बंधू तरुण आहेत. त्यांना कसे मारावे, हे म्हणू नकोस. कारण इथल्यापेक्षा सुंदर शरीर त्यांना मिळते. एक शरीर सोडून दुसरे शरीर येताना मागे गर्भवासाचे नऊ महिन्याचे दु:ख असते हे विसरून उपयोगी नाही. तुमचा मुलगा एकुलता एक व गुणी असताना त्याला शिक्षणासाठी परदेशात पाठविता. त्यावेळी वियोगाचे दु:ख होते. पण तिथे तो स्थायिक न होता, बरोबर 'बाई' न आणता जर सुदैवाने परत आला तर व महिन्याला हजारो रुपये पगार घेऊ लागला की श्रमांचे सार्थक होते. भगवान म्हणतात, 'भीष्म द्रोणांना जरी इथले देह सोडतांना दु:ख झाले तरी वरील उदाहरणाप्रमाणे पुढे सुख आहे म्हणून ते सहन केले पाहिजे. खरे म्हणजे इथे रणांगणात धारातीर्थी पतन पावले तर त्यांना गर्भवासा-शिवाय एकदम स्वर्गीय शरीरच मिळते.'

अर्जुन म्हणाला, 'देह हा वस्त्राप्रमाणे आहे ना? मग वस्त्र फाडू लागल्यावर कदाचित आतल्या देहाला नाही का लागणार? मी भीष्म-द्रोणावर तीक्ष्ण बाण मारले तर ते दु:ख त्यांच्या आत्म्यापर्यंत पोहोचणार नाही काय?'

भगवान म्हणाले, 'अर्जुना, एक शेतकरी आपली गाडी धान्याने भरून परगावी निघाला. वाटेत त्याला टोलनाका लागला. त्यांनी सांगितले इथे कर भरल्याशिवाय जाता येणार नाही. हे ऐकून तो परत फिरला. रात्र झाली. दुसऱ्या रस्त्याने परगावी जाऊन कर चुकवावा म्हणून तो रात्रभर गाडी घेऊन हिंडला. नंतर उजाडले. पण गाव न येता पुनः टोल नाक्यावरच आला. अर्जुना, तू असेच करत आहेस. याला 'घट्टकुट्टप्रभातन्याय' किंवा 'पाच पाढे पंचावन' म्हणतात. इतक्या श्लोकातून तुला शोक करू नको म्हणून मी सांगत आहे. तरी तू आपला मूळ पदावरच आहेस. तेव्हा मी उपदेश केलेला व्यर्थच गेला.' अर्जुन म्हणाला, 'तसे नव्हे हो. एका मोठ्या मडक्यात जर लहान मडके ठेवले व त्यावर काठीने जोराचा प्रहार केला तर बाहेरच्या मडक्याबरोबर आतले मडकेही फुटणार नाही काय? व त्यातील पाणी सांडणार नाही काय? भगवान म्हणाले, जगातील पदार्थांचा चार प्रकारांनी नाश होतो तसा आत्म्याचा होत नाही.

**नैनं छिन्दन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः ।**
**न चैनं क्लेदयन्त्यापो न शोषयति मारुतः ॥ २३ ॥**

आत्म्याला शस्त्रे तोडीत नाहीत. अग्नी जाळू शकत नाही. पाणी भिजवू शकत नाही. किंवा वायू शुष्क करू शकत नाही.

काही पदार्थांचा खड्गाने नाश होतो. हा झाला पृथ्वीच्या योगाने होणारा नाश. जमिनीवर किंवा दगडावर पाणी सतत पडत राहिले तर काही काळाने त्याचे अवयव शिथिल होतात. शेवटी पूर्ण नाश होतो. अशाप्रकारे जलाने नाश होतो. उष्माघाताने लोक मरतात हा झाला तेजामुळे नाश. प्रचंड वावटळे होऊन दऱ्यांचे पर्वत व पर्वतांच्या दऱ्या होतात. त्याच्या तडाख्यात लक्षावधी प्राणी सापडतात. पण वरील चारी प्रकारांनी आत्म्याचा नाश होत नाही, कारण आत्मा नित्य आहे.

पाणी थंडच असायचे व अग्नी उष्णच असायचा हा त्यांचा स्वभाव. चिंच आंबट असते. आंब्याच्या झाडाला एखादाच आंबा आंबट लागतो; बाकी सारे गोड असतात. अशी अपवाद म्हणून एक तरी चिंच गोड असू शकते काय? नाही. तिला जरी पाटातून गोडे पाणी पाजविले तरी फळ आबटच देते. 'स्वभावो दुरतिक्रमः' त्याला औषध नाही. त्याचप्रमाणे नित्यत्व, अविनाशित्व हा आत्म्याचा स्वभाव आहे. म्हणून त्याचा नाश होत नाही. अर्जुन म्हणाला, 'मी हे कबूल करतो. पण मनापासून मुळीच नव्हे. तटलो म्हणून. स्वभाव हे शेवटचे उत्तर आहे. त्याच्या आधी युक्ती द्या म्हणजे मान्य करीन.

भगवान म्हणाले, 'बाकी सर्व पदार्थांचा नाश होतो, पण आकाशाचा होत नाही. का? अमूर्त आहे. म्हणून इतक्या लोकांनी युद्धे केली आकाशात शस्त्रास्त्रे टाकली. तोफा उडविल्या. पण त्यामुळे त्याचा एक टाका तरी उडाला काय? जमिनीला भूकंप होतात, भेगा पडतात. वायूलासुद्धा इकडचा तिकडे ढकलता येतो. पण तसे आकाश ढकलणे शक्य नाही. कारण ते अमूर्त आहे. तसेच आत्मा नित्य, सर्वगत, स्थिर क्रियाशून्य आहे हे चार हेतू मी तुला देतो व दृष्टांत आकाशाचा देतो. तसा तू दाखव. यावर विचार कर. हे तुला न पटल्यास आणखी चार हेतू देईन. आत्म्याचा स्वभावतः नाश नाही व दुसऱ्याकडूनही त्याचा नाश होत नाही.

**अच्छेद्यो ऽ यमदाह्यो ऽ यमक्लेद्यो ऽ शोष्य एवच ।**
**नित्यः सर्वगतः स्थाणुरचलो ऽ यं सनातनः ॥ २४ ॥**

आत्म्याचा छेद होणे, दाह होणे, तो आर्द्र होणे किंवा शुष्क होणे अशक्य आहे, तो नित्य, सर्वगत, स्थिर, अचल व सनातन आहे.

आत्मा नित्य आहे. लाकूड, दगड वगैरे पदार्थांचे अवयव शिथिल होतात. तसे त्याचे होत नाहीत. कारण तो एकरूप आहे. सर्वगत

आहे म्हणजे सर्वव्यापी आहे. देहादिकांचा नाश होतो, कारण ते मध्यम परिमाणाचे असतात म्हणून. पण आकाश व्यापक म्हणून त्याचा नाश होत नाही. आकाशाचा सुद्धा प्रलयकाळात नाश होतो. पण आत्मा त्याहीपेक्षा व्यापक म्हणून त्याचा नाश होत नाही. यावरून तो सर्वगत आहे हे सिद्ध होते. स्थाणू म्हणजे स्थिर आहे. विक्रियंते इति विकाराः। न विद्यन्ते विकारा यस्मिन् स अविकारी । त्यात विकार होत नाहीत. लोखंडात विकार होतो. काही कालानंतर ते गंजते. दुधाचा विकार होऊन दही बनते. विकारामुळे पदार्थाची अवस्था बदलते. पण आत्मा अविकारी असल्यामुळे आहे तसाच राहतो. तो अचल आहे. गहू इकडून तिकडे हलवल्यास त्यात विकार होत नाहीत. पण त्यात क्रिया घडते. आत्मा अक्रिय असल्यामुळे दुसऱ्यालाही तो हलवता येत नाही. सनातन आहे म्हणजे अनादिकालापासून आहे. म्हणून तो अच्छेद्य, अदाह्य, अक्लेद्य, अशोष्य आहे.

**अव्यक्तोऽयमचिन्त्योऽयमविकार्योऽयमुच्यते ।**
**तस्मादेवं विदित्वैनं नानुशोचितुमर्हसि ॥२५॥**

हा आत्मा अव्यक्त, अचिन्त्य, अविकारी आहे; असे म्हटले आहे. त्याचे अशा प्रकारे ज्ञान झाल्यावर शोक करणे योग्य नाही,

अव्यक्त म्हणचे हाताला लागत नाही. डोळ्याला दिसत नाही, कानांनी ऐकू येत नाही, म्हणजे इंद्रियगम्य नाही. अचिंत्य आहे– मनालासुद्धा समजत नाही. अर्जुना, हे आठ हेतू असल्यामुळे तो अच्छेद्य, अदाह्य, अक्लेद्य, अशोष्य आहे, हे सद्हेतू आहेत. तुला समजले ना? न समजल्यास तू ह्याचा नीट अभ्यास केला नाहीस हेच सिद्ध होते. तो म्हणाला, ‘हे हेतू बरोबर आहेत. पण ते आत्म्यावर आहेत, हे कशावरून?’ यत्र यत्र धूमः तत्र तत्र वह्निः। हे अनुमान ठीक आहे.

पण धूर तरी असतो कशावरून ? तसेच हे हेतू तुमच्या पक्षावर आहेत याला प्रमाण काय ?

भगवान म्हणाले, ' प्रत्यक्ष प्रमाण आत्म्यावर चालत नाही. कारण तो अतींद्रिय आहे. अनुमान पण लंगडे पडते. तिसरे प्रमाण म्हणजे शब्द म्हणजेच वेद. त्यावरून सिद्ध होते कारण ते निर्दोष आहेत. त्यांचे प्रामाण्य विद्वज्जनांच्या अनुभवावरून सिद्ध आहे. इतकेच नव्हे तर कुमारिल भट्टांनी त्याकरता दिव्यसुद्धा केलेले आहे. हे तुमचे मातापिता ह्याला प्रमाण काय ? तुम्ही जन्माच्यावेळी त्यांना पाहिले आहे काय ? आप्त वाक्यावरून ते प्रमाण ठरतात. त्याला दुसरे उत्तरच नाही. त्यामुळेच आम्ही बिनदिक्कत त्यांचे नाव लावतो. न लावले तर इस्टेट मिळत नाही. कोर्टात गेल्यावर ते आरोपाबद्दल चौकशी करतात. पण त्यांचा मुलगा कशावरून हे विचारत नाही. कारण ते बरोबरच आहे. हे धरले तरच पुढले व्यवहार होतात. तसेच इथे वेदप्रामाण्य मानले पाहिजे. अर्जुन म्हणाला, ' तुमचे हेतू सत् आहेत. वेदप्रामाण्यही मला मान्य आहे. पण युक्ती द्या. कारण त्याशिवाय मानल्यास ' बाबा वाक्यं प्रमाणम् ' प्रमाणे होईल.

भगवान म्हणाले, ' रूप हे देवदत्तच असते ना ? कितीही स्नो पावडर लावली तरी त्याचा उपयोग होत नाही. पण शहरातला मनुष्य चार महिने खेड्यात राहिला. उन्हातान्हात राबला की काळवंडतो. म्हणजे त्याच्या रूपात बदल होतो. मनातही बदल होतो. शिक्षणामुळे तसा बदल झालाच पाहिजे. कारण ते शिक्षणाचे प्रधान कार्य आहे. न झाल्यास खरा शिकलाच नाही. पेपरमध्ये नोटा घालून पास झाला असेल असे म्हणणे भाग पडते. तरुण असताना विलास करा म्हणणारा म्हातारा झाल्यावर बेताने वागा म्हणतो. स्वभावाला मुरड घालायला सांगतो. कारण तेव्हा बुद्धी बदललेली असते. पण हे बदल ज्याला कळतात तो

आत्मा मात्र बदलत नाही. मग तो एकरूप मानायला नको काय? बालपण उलटून तारुण्य आल्यावर 'मी तरुण आहे' म्हणतो. म्हणजे 'मी काल नाही' हे मान्य असते. वृद्ध झाल्यावर 'मी तरुण नाही' हेही कबूल असते. पण मी नाही म्हणत नाही. म्हणजे 'तो' सर्वदा आहेच. कालचे व आजचे जेवणसुद्धा एक नसते. काल शिवरात्र म्हणून भगर होती, आज पारणे म्हणून पुरणपोळी. पण आत्मा मात्र काल आज सारखाच आहे. हे झोपेवरून सिद्ध होते. काल तुम्हांला गाढ झोप लागली होती व आजसुद्धा लागली होती. त्या दोन्हींत बिल्कुल फरक नाही. म्हणूनच तो एकरूप आहे.

अर्जुन म्हणाला, इतक्या युक्त्या असताना 'उच्यते' 'श्रूयते' असे का म्हणता? भगवान म्हणाले, 'एखादा अधिक प्रतिभावान असला तर तो आपल्या बुद्धिमत्तेने युक्त्या बाधित करू शकतो. तसे होऊ नये म्हणून प्रबळ प्रमाण मानावे लागते. बौद्ध म्हणतात वेदप्रामाण्य आम्हांला मान्य नाही. ते भंड निशाचर आहेत. अशांच्या गळ्यात युक्त्या बांधाव्या लागतात, म्हणून दोन्ही लागतात. बाहेर जाताना तुम्ही नवे कपडे घालता, नवे दागिने घालता, दोनच काय? पण तीन किलोचे सोने अंगावर असले तरी त्याचे ओझे त्यावेळी वाटत नाही. पण घरी आल्यावर ते लगेच काढून टाकावे वाटतात. त्याचे प्रयोजन समारंभापुरते असते. म्हणजे ती खोटी रूपे असतात. व्यवहारासाठी घेतलेली असतात. जीवात्मा म्हणतो, 'व्यवहारासाठी मी देहेंद्रियमनःप्राणबुद्धी ही रूपे घेतो. ती उसनी असतात. म्हणून ती सारी झोपेत सोडून देतो. त्यावेळी तो सताशी संपन्न झालेला असतो, असे श्रुती सांगते.

**अथ चैनं नित्यजातं नित्यं वा मन्यसे मृतम् ।**
**तथापि त्वं महाबाहो नैनं शोचितुमर्हसि ॥ २६ ॥**

अर्जुना, हा आत्मा नेहमी जन्मतो व नेहमी मरतो असे जरी मानले तरीसुद्धा तू त्याबद्दल शोक करणे योग्य नाही.

भगवान म्हणाले, ' अशोच्यानन्वशोचस्त्वम् ' पासून आतापर्यंत मी तुला आत्मा नित्य आहे, अविनाशी आहे असे सांगितले. पण खऱ्या वक्त्याने सारखे आपलेच मत प्रतिपादन करणे योग्य नाही. दुसऱ्याचे मतसुद्धा विचारात घेतले पाहिजे. म्हणून अर्जुना, तुझ्या म्हणण्याप्रमाणे आत्मा नेहमी मरतो व नेहमी जन्मतो असे मानले तरीसुद्धा तू शोक करू नकोस. तू महाबाहू आहेस ना ? म्हणजे अत्यंत शौर्यसंपन्न. त्याच्या अंगात जन्मतःच वीरश्री असते व त्याचे आजानु बाहू असतात.अशाने जर युद्धात लोक मरतात म्हणून रडायला सुरवात केली, तर जगात युद्धे होतील काय ? तू कधी शिकार केली आहेस की नाही ? तेव्हा मृगावर बाण मारल्यावर ते मेले म्हणून शोक केलास काय ? मग आता भीष्म द्रोण मरतात म्हणून शोक का करतोस ? घरातील एखादे काचपात्र फुटले म्हणून रडायचे काय ? दहा वर्षेपर्यंत टिकले हेच भाग्य ! घेतानाच फुटणार म्हणून घेतलेले असते. तसा देह जन्माला येतानाच हा पुढे मरणार म्हणूनच घेतलेला असतो. इतकी वर्षे तो टिकला हे भाग्य समजायचे. दुःख काय करतोस ? नव्या नव्या आकाराची कांचपात्रे मिळत असताना एक फुटले म्हणून दुःख कां ? तसेच अर्जुना, भीष्मद्रोणांना नवे सुंदर देह मिळतात व ते देणारा तू होतोस. मग शोक काय करतोस ? मातीचा हत्ती आणला व त्याचा पाय मोडला तर लहान मुलगा रडू लागतो. म्हणून मोठ्या माणसानेही रडायचे काय ? अर्जुना, देह गेला तर आत्माच गेला म्हणून अज्ञ रडतात. पण विवेकी रडत बसत नाही.

**जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च ।**
**तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि ॥ २७ ॥**

उत्पन्न झालेल्याला नि:संशय मृत्यू आहे. आणि मृत्यू झालेल्याला नि:संशय जन्म आहे. म्हणून अटळ अशा गोष्टीबद्दल तू शोक करणे योग्य नाही.

उपजे तें नाशे । नाशले पुनरपि दिसे ।
हे घटिकायंत्र तैसें । परिभ्रमे गा ।। ज्ञानेश्वरी

देह हा नेहमी जन्मतो व मरतो म्हटले तरी तू शोक करू नकोस. आत्म्याचा देहाशी संयोग म्हणजे त्याचा जन्म; व त्याचा देहाशी वियोग म्हणजेच मरण असे चार्वाक म्हणतो. जन्म व मरण या गोष्टी अटळ आहेत. अर्जुन म्हणाला, 'मी उत्कृष्ट अधिकारी असताना मला हे सामान्य मत का सांगता ?' भगवान म्हणतात, 'अरे लौकिकात हेच रूढ आहे म्हणून सांगतो. मरणात दु:ख असते हे सर्वांना मान्य असते. पण जन्मातही दु:ख असते हे लोक मान्य करीत नाहीत. कारण मुलगा झाला की पेढे वाटतात, हत्तीवरून साखर वाटतात. मुलगी झाली की बर्फी वाटतात. थाटामाटाने बारसे करतात. पाळणे फुलांनी शृंगारतात. आनंद मानतात.' पण अर्जुन विचारी होता. तो म्हणतो, 'जन्माआधी नऊ महिने गर्भवासाचे दु:ख जीवाला आहेच.' 'अधोमुख रे दु:ख त्या बालकासी.' गर्भात जीव हा उलटा खाली डोके वर पाय अशा स्थितीत असतो. त्याला हात पाय लांब करता येत नाहीत. मातेने तिखट, आंबट खाल्ले की त्याला वेदना होतात. म्हणून जन्मही मरणाइतकाच दु:खद आहे. भगवान म्हणाले, 'जीव हा स्वतंत्र आहे असे मानतात. पण ते चूक आहे. जीव हा आपल्या स्वभावाने म्हणजेच प्रकृतीने तो परतंत्र असतो, बांधलेला असतो. तू युद्ध न करताच इथून परतायचे म्हणतोस पण आपण रथ फिरवून जाऊ लागलो व प्रतिपक्षांनी सोडलेला एखादा तिखट बाण जर तुला लागला तर तत्काल रथ फिरवून तू त्याचा प्रतिकार केल्याशिवाय राहणार नाहीस. कारण क्षत्रियांचा हा स्वभावच आहे.

अरे शत्रू समोर असताना त्याबरोबर लढून धारातीर्थी पतन पावलो तर स्वर्ग. पण शत्रूला पाठ दाखवून पळून जाऊ लागलो व त्यांनी मागून गोळी घातली तर मृत्यू आल्यास स्वर्ग मिळणार नाही, हे लक्षात ठेव. जीवाला दुसरे पारतंत्र्य असते ते ईश्वराचे. भीष्मद्रोणांना मारायचे तुझ्या मनात नाही. पण त्यांचे मरण तुझ्याच हातून ईश्वराने ठरविले असेल तर ते कसे टळेल ?

अर्जुना, एखाद्याला उन्हाळा, एखाद्याला पावसाळा हे ऋतू सोसत नाहीत. म्हणून हे ऋतूच येऊ नयेत असे होईल काय ? ऋतू अटळ आहेत तसे जन्ममृत्यूही अपरिहार्य आहेत. म्हणून शोक करू नको. अर्जुन म्हणाला, ' मग माझे दैवच खडतर म्हणायचे. कारण तुमच्या-सारखा प्रभावी नेता मला लाभूनसुद्धा मला युद्ध टाळता येत नाही.' भगवान म्हणाले, ' अर्जुना, तू उलट विचार का करत नाहीस ? भीष्मद्रोणाचे बाण लागून तूच पडणार नाहीस कशावरून ? तसे झाल्यास तुला स्वर्ग मिळेल. व भीष्मद्रोण जिवंत राहतील तर त्यातही तुझे कल्याणच आहे.

**अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत ।**
**अव्यक्तनिधनान्येव तत्र का परिदेवना ॥२८॥**

अर्जुना, हे प्राणिमात्र जन्मापूर्वी अव्यक्त असतात, मध्ये तेवढे व्यक्त होतात व (पुन्हा) मृत्यूनंतर अव्यक्तच बनतात. मग शोक कसला ? शिवाय अर्जुना, तू ज्या देहाबद्दल एवढा शोक करीत आहेस, तो देह तरी काय किंमतीचा आहे याचा विचार केलास काय ? भूते म्हणजे देह उत्पन्न होण्यापूर्वी नसतात. प्रथम फक्त मुलगीच असते. नंतर तिचा विवाह होऊन तिला मुलगा होतो. यावरून मुलगा प्रथम नसतो हे सिद्ध झाले, मरणानंतर ही भूते म्हणजे देह नसतात. म्हणजे फक्त मध्येच काही काळ असतात. तुमच्याजवळ प्रथम एक कवडीही नव्हती. स्वप्न पडले त्यात लाख रुपये मिळाले, लॉटरीचे पाहिले बक्षिस मिळाले, आता आपण

आचारी पाणके ठेवायचे, काहीही काम करायचे नाही. मोटारीतून हिंडायचे व फक्त राजासारखे जाऊन पाटावर बसायचे. असे तुम्ही ठरवले पण जाग आल्यावर भाजीलाही चार पैसे जवळ नव्हते. याची वाट काय? मग ते मध्ये भासलेले रुपये खरे मानायचे काय? नाही. तसाच देह हा फक्त मध्येच भासणारा आहे. तू भीष्मद्रोणाबद्दल शोक करतोस. पण ते तुझ्याबद्दल शोक करतात काय? ते म्हणतात, देह मिथ्याच आहे. गेला तर गेला. मग तू त्यांचा शिष्यच आहेस ना? गुरूचे गुण शिष्यात आले तर शिष्य म्हणवून घ्यावे. नाही-तर काय उपयोग? रस्त्यात एक शिंप पडला होता' तो तुम्हांला रुपया वाटला. तो घेण्यासाठी तुम्ही वाकला. हात लावताच शिंप हे कळले. लोकांनी विचारले, 'काय हो, काय झाले?' 'तुम्ही म्हणाला, काही नाही.' आणि चालायला लागला. मग, मध्ये भासले ते खरे आहे काय? मिथ्याच. मग अशा कवडी किंमतीच्या देहाबद्दल द्रोणाचार्यांच्या शिष्याने भीष्मांच्या नातवाने गांडीवधारी जगदेकवीराने शोक करावा हे उचित आहे काय?

स्त्रियांसारखे नेत्रातून अश्रू गाळावेत काय? शिवाय अर्जुना, युद्ध करणे हे क्षत्रियांचे कर्तव्य आहे. म्हणून तुला ते केलेच पाहिजे. कर्तव्य केल्यावर खरे पाहाता यश येतेच. पण यदाकदाचित आले नाही, तरी हरकत नाही. कारण कर्तव्य हेच स्वतः फलरूप आहे. नारद म्हणतात, 'भक्ती ही स्वतः फलरूप आहे.' त्याप्रमाणेच. म्हणून जरी जय मिळाला नाही तरी हरकत नाही. युद्ध करच. 'यत्ने कृते यदि न सिध्यति कोऽत्र दोषः' अर्जुना, काही दुःखे सत्संगतीने जातात. काही साधनांनी तर काही ईश्वरकृपेने जातात. पण सर्व शोक घालवायचे झाल्यास आत्मज्ञानच व्हावे लागते. आत्म्याशिवाय देहाला काय किंमत आहे? पाषाण फोडला तर त्याला काहीही होत नाही. तसेच ज्या देहात

आत्मा नाही, त्याला फोडले, कर्तन केले, तरी काहीही होत नाही. देह हा विनाशी आहे. पण आत्मा मात्र नित्य व अविनाशी आहे. म्हणून शोक करू नकोस.

**आश्चर्यवत् पश्यति कश्चिदेनमाश्चर्यवद्वदति तथैव चान्यः ।**
**आश्चर्यवच्चैनमन्यः शृणोति श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित् ॥२९॥**

कोणी आत्म्याकडे आश्चर्याने पाहतो, कोणी आत्म्याबद्दल आश्चर्याने बोलतो, कोणी त्याबद्दल आश्चर्याने ऐकतो. पण याप्रमाणे आश्चर्याने पाहून, बोलून वा ऐकून ही एखादा सुद्धा आत्म्याला जाणू शकत नाही.

आत्मज्ञानाशिवाय शोक जाणार नाही हे खरे, पण त्यासाठी योग्यताही तशीच असावी लागते. पशुपक्षी आत्मज्ञान आत्मसात करू शकणार नाहीत, त्याचा अधिकारी फक्त मानवच आहे. आत्मज्ञान दुर्बोध तरी का असावे ? तर योग्यता आल्यावर सुबोध आहे. त्याची दुर्बोधता जाते. ज्ञान मनुष्यालाच व्हायचे, त्याचसाठी तर मानवाचा जन्म आहे; इतकेच नव्हे तर मानवाची इंद्रिये, देह, बुद्धी व मन या सर्वांचीच रचना ज्ञानाला अनुकूल अशीच परमेश्वराने केली आहे. असे असताना तीव्र प्रयत्न केल्यावर ज्ञान व्हायला काय हरकत आहे ? भगवान म्हणाले, 'ज्ञान इंद्रियद्वारा होते. पण ही इंद्रिये ज्ञानाची साधने असताना त्यांची प्रवृत्ती सतत बाह्य विषयांकडेच असते. ब्रह्मदेवाने निर्माण करतानाच ही बाह्य विषयाकडे धावणारी असे म्हटले आहे व आत्मा मात्र आत आहे. एकाचे तोंड पूर्वेकडे व एकाचे पश्चिमेकडे असेल तर त्यांची गाठ कशी पडणार. ज्ञानसाधने इंद्रिये, मन व बुद्धी ही बाह्य व प्राप्तव्य ज्ञान आत म्हणून हे दुर्बोध झाले आहे. त्याकरता इंद्रियांना विषयसुखापासून परावृत्त करावे लागते. त्यांना अंतःप्रवण करावे लागते. ज्याच्याजवळ अनंत सुकृत असेल व विलक्षण धैर्य असेल असा अद्वितीय साधकच हे प्राप्त करून घेऊ शकतो.

दुसरे असे की, आत्म्याचे स्वरूप आहे तसे न भासता ते विपरीत भासते. आत्मा हा अकर्ता अभोक्ता असताना व्यवहारात कर्ता, भोक्ता भ्रमाने भासतो. तो सच्चिदानंद घन, नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त स्वभाव असताना दुःखरूपच भासतो. तो वरून दुःखी भासतो, हे खोटे. आतमात्र सुखकंद, आनंदकंद आहे. पण लोकांना हे कळत नाही. म्हणून त्याच्या प्राप्तीसाठी प्रयत्न करीत नाहीत. आत्मज्ञानाकरिता साधुसंतांनी सुंदर ग्रंथ लिहिले आहेत. त्यातले शब्दही सुलभ वाटतात. पण नुसते वाचून मुळीच कळत नाहीत. कळले तर विपरीत कळतात. त्यांने शास्त्रग्रंथी सुटत नाहीत. त्याकरता सांगणारा सुंदर वक्ता, प्रवचनकार लागतो. आत्मा सांगण्याकरता वेद प्रवृत्त झाले, पण तेही सूक्ष्मार्थाचेच प्रतिपादन करतात. म्हणून वेदार्थ साकल्याने जाणणारा पुरुष गुरुरूपाने पुढे येऊन त्यानेच प्रतिपादन करावे लागते तरच कळते. आत्मज्ञानही एखाद्यालाच होते.

मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद् यतति सिद्धये ।
यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः ।
(गीता अ. ७ श्लो. ३)

ज्यांना ज्ञान होते ते समाधिमग्न राहतात, रानावनात फिरतात. ते म्हणतात, आम्ही कर्मण्यातून सुटलो म्हणून सांगण्याची जबाबदारी आमच्यावर नाही. एखादाच ज्ञानी कारुण्याने युक्त होतो व त्याला सामान्य मानवाला हे सांगावेसे वाटते. पण ज्ञानी झाला तरी त्याला येईलच असे नाही. कारण समजणे निराळे आणि इतरांना सांगणे निराळे असते. एखाद्याला सांगताही येईल, पण ते दुसऱ्याच्या मनावर बिंबवणे त्याहून कठीण. त्याकरता वक्तृत्व, अनुभव त्याचबरोबर कौशल्य व चातुर्य लागते. शिष्याने शंका विचारताच त्याचे निरसन करता आले पाहिजे. हे सर्व फार कठीण आहे. अर्जुना, तुझा व माझा ३६ वर्षांचा संबंध आहे. मग आतापर्यंत कुठे ज्ञान विचारलेस काय? नाही. फक्त

गप्पा मारल्या एवढेच. मीसुद्धा तू ‘ शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम् । ’ म्हणून शरण आलास, तेव्हाच तत्वज्ञान सांगू लागलो.

व्यासांची योग्यता काय कमी होती ? वेदांचे प्रणेते म्हणून ते गाजले. त्यांनी ब्रह्मसूत्रे लिहिली, वेदांचे विभाग केले. सर्व वेद हा एकच प्रचंड होता. त्याचे ऋग्वेद, सामवेद, यजुर्वेद, अथर्ववेद असे चार भाग केले म्हणून त्यांना व्यास म्हणतात. वेदान् विव्यास इति व्यासः । एवढ्या योग्यतेचे शुक्राचार्य, त्यांना व्यासांनी ज्ञान सांगितले. व्यासांनी स्वतःच्या मुलाला, शुकाचार्यांना सांगताना काही चोरून ठेवले असेल का ? नाही. पण शुकाचे समाधान पितृवचनांनी झाले नाही. शुक जनकाकडे गेला. सात दिवस शुक जनकाच्या दारात उभा होता, सात दिवसात जनकाकडील कोणीच त्याची विचारपूस केली नाही. आठव्या दिवशी शुकाला अंगणात आणले, तरी शुकचित्ताला विकार नाही, तो तसाच उभा होता. १५ व्या दिवशी अंतःपुरात नेले. सुंदर स्त्रियांनी त्याची सेवा केली. तरी निर्विकारच राहिला. बाविसाव्या दिवशी जनक राजा त्याला भेटला, शुकाला भूक तहानेचीही शुद्ध नव्हती. झोपही नव्हती. राजा जनकाने विचारले, ‘ झोपेशिवाय, भुकेशिवाय एकवीस दिवस कसा राहिलास?’ ‘निर्विकार अशा आत्मतत्त्वाचा विचार करीत राहिलो होतो’ असे म्हणाला. जनक म्हणाला, ‘ ज्या निर्विकार तत्त्वाचा तू विचार करीत राहिलास, तेच ब्रह्म तू आहेस. ’ तेव्हाच शुकाचार्यांचे समाधान झाले. शब्द हे साधनसुद्धा विलक्षण आहे. रात्री गाढ झोपेत हाक ऐकून जाग येते. लौकिक शब्द जर इतके कार्य करतो तर वेदासारखा साक्षात ईश्वर मुखातून आलेला शब्द, त्याचे सामर्थ्य केवढे प्रचंड असेल, विचार कर.

एखाद्या साध्वीला आपला पती मैत्रिणीला सांगायचा आहे. कोणता ते माणसांच्या मेळाव्यात दाखवायचे आहे. तर ती कसा बोध करील?

हल्लीच्या स्त्रियांना हे सांगणे सोपे आहे, त्या म्हणतील, 'माझ्या पतीचे नाव 'प्रकाश' आहे. 'तो मंडईत गेला आहे.' पण पूर्वी नाव उच्चारीत नसत. पण पूर्वींची पतिव्रता नाव न उच्चारता कसा अचूक बोध करते पहा. हा काय ? नव्हे. तो काय ? नव्हे. प्रत्येक प्रश्नाला ती नाही म्हणते व शेवटी स्वतःच्या पतीकडे बोट करताच मौन स्वीकारते. होय म्हणत नाही व नाही म्हणत नाही. यावरून हाच तिचा पती असा बोध होतो. आत्मा सांगताना वेद असेच करतात. पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेन्द्रिये म्हणजे आत्मा नव्हे, मन म्हणजे नव्हे, बुद्धी आत्मा नव्हे. अहंकार, अन्नमयादि पंच कोश, जागृती, स्वप्न, सुषुप्ती या अवस्था म्हणजे आत्मा नव्हे. स्थूल, सूक्ष्म व कारणदेह म्हणजे आत्मा नव्हे, असे सांगतात. त्या साध्वीने मौनाने आपला पती सांगितला. तसेच ब्रह्माचे आहे. ते मौनानेच सांगतात.

'मौने व्याख्याप्रकटितपरब्रह्मतत्त्वं युवानं।'

तसेच साक्षात् ब्रह्माचे दर्शन वेद करू शकत नाहीत. कारण ते इंद्रियातीत आहे. अचक्षु, अश्रोत्र, अजिव्ह, अनणू, अदीर्घ, अऱ्हस्व आहे. त्याचे ज्ञान इंद्रियांना कसे होईल? कारण वाण्यादि इंद्रियांना ते ब्रह्म प्रेरणा देते. त्या ब्रह्मामुळे वाणी, इंद्रिये चालतात.

'यद् वागादेः पदं न व्यवहरति मुहुर्येन वागादिवर्गः प्रचलति।'

म्हणूनच वेद "नेतिनेति" हे सांगून ब्रह्माचे ज्ञान करून देतात याला अतद्व्यावृत्ति म्हणतात.

ब्रह्मतत्त्वाचा वक्ता, श्रोता हे दुर्मिळ आहेत, जगात अस्तिक लोक फार कमी. नास्तिकच फार आहेत. आस्तिकातही फायदा असेल तरच भक्ती करणारे अधिक, भोगैश्वर्यप्रसक्त हे नाव गीतेने त्यांना दिले आहे. ते म्हणतात, 'भक्तीने विवाह होतो का ? मुलगा होईल का ? मी निवडून

येईन का? हे होत नसल्यास भक्ती कशाला करायची? वेदातील एक हजार अधिकरणे भोगैश्वर्याबद्दल आहेत. त्यांना सकाम कर्मे, उदाहरणार्थ, पुत्रप्राप्तीसाठी पुत्रकामेष्टि याग, पशूसाठी चित्रायाग असे याग आहेत. वेद म्हणतो, 'या निमित्ताने का होईना लोक माझ्याकडे येऊ देत. मग ते क्रमाने निष्काम कर्मात व ज्ञानमार्गात येतील. फक्त तीनशेहे अधिकरणे ज्ञानाबद्दल वेदात आहेत. वेदांत ऐकू लागताच मुळात इंद्रादिदेवताच ऐकणाऱ्यावर संकटे आणतात. " देवा दारादिरूपेण " देवता बायका मुलात प्रवेश करतात, व बायका म्हणतात, 'ऐकायला गेलात तर जेवण बंद.' मुलगा म्हणतो, 'बाबा, वेदांत कशाला ऐकता?' मी तुम्हाला बाग करून देतो, त्यात खुरपे फिरवीत बसा कसे. प्रवचनाला कशाला जाता?' देवता म्हणतात, 'वेदांत ऐकून हा आमच्यापेक्षा ज्ञानाने श्रेष्ठ होईल!' 'हे बरे नाही.' इतके होऊनही ऐकू लागला तर वेदांत समजतच नाही. ब्रह्म व माया यांचा गोंधळ. दुसरे काय? त्यामुळे श्रवण सोडतो. ऐकलेले पूर्वजन्मीच्या संस्कारांनी, ईश्वर कृपेनेच समजते व मनात बरोबर ठसते. ऐकलेल्याचे मनन केले पाहिजे. प्रतिबंध तीन प्रकारचे असतात. १) भूत २) वर्तमान ३) भविष्य. हे गेल्याशिवाय ज्ञान होत नाही. वामदेवाचे हे प्रतिबंध ती गर्भात असताना गेले व गर्भावस्थेत 'मी ब्रह्म आहे.' असे त्याला ज्ञान झाले. जडभरताला त्याकरता तीन जन्म घ्यावे लागले. प्रतिबंध असल्यास मॅट्रिकसुद्धा पास होत नाही.

अर्जुना, आत्म्याचे स्वरूप, त्याच्या प्राप्तीची साधने, वक्ता, श्रोता, हे सर्व दुर्मिळ आहे. आत्मज्ञानार्थ प्रवृत्त होणारा एखादाच. 'मनुष्याणां सहस्रेषु कश्चित् यतति सिद्धये।' व त्या प्रवृत्त होणाऱ्यातील एखादाच आत्मा जाणणारा असतो. 'कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः' परंतु म्हणून अर्जुना त्यासाठी प्रयत्न करू नयेत, असे मुळीच नाही. व्यास म्हणतात,

'ऐहिकमपि अप्रस्तुतप्रतिबंधे तद्दर्शनात्' प्रतिबंध नसल्यास श्रवणमननांनी याच जन्मी इथेच आत्मज्ञान होते. प्रतिबंध असल्यास पुढील जन्मी होईल. पण श्रवणमननादि साधने कदापि व्यर्थ जाणार नाहीत. अर्जुना इथेच ज्ञान होणाऱ्यात तुझा नंबर लागणार नाही कशावरून? म्हणून अवश्य प्रयत्न कर.

**देही नित्यमवध्योऽयं देहे सर्वस्य भारत ।**
**तस्मात् सर्वाणि भूतानि न त्वं शोचितुमर्हसि ॥३०॥**

अर्जुना, सर्वांच्या देहामध्ये असणारा आत्मा सर्वदा अवध्य, अमर आहे. म्हणून कोणत्याही प्राण्याबद्दल त्यांचे देह गेले तरी आत्मा आहेच, म्हणून तू शोक करण्याला योग्य नाहीस.

अर्जुना आत्मा अवध्य, अविनाशी, तर देह वध्य, विनाशी आहेत. भा म्हणजे ज्ञान त्यात तू रत आहेस. शिवाय भरतकुलामध्ये जन्मलेला आहेस. उत्कृष्ट कुलातील गुण त्या संततीमध्येही येतातच. म्हणूनही शोक करू नकोस. आतापर्यंत एकोणीस श्लोकांनी भगवंतांनी अर्जुनाचा शोक-निरास केला. आता पुढील श्लोकापासून अर्जुनाच्या प्रज्ञावादाचे निराकरण करतात.

**स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकम्पितुमर्हसि ।**
**धर्म्याद्धि युद्धाच्छ्रेयोन्यत्क्षत्रियस्य न विद्यते ॥३१॥**

आणि स्वधर्माचा विचार करताही तू व्याकुळ होणे योग्य नाही. कारण कर्तव्यप्राप्त युद्धापेक्षा क्षत्रियाला दुसरे हितकर काही नाही.

'स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव ।' स्वजनांना मारून सुख कसे होईल? हा प्रज्ञावाद अर्जुनाने पहिल्या अध्यायात मांडला होता. म्हणून स्वधर्माचा विचार करताही तू कंपित होणे, व्याकुळ होणे योग्य नाही. कारण धर्म्य युद्धापेक्षा अधिक श्रेयस्कर, हितकर, कर्तव्य क्षत्रियाला दुसरे कोणतेच नाही. भगवान म्हणतात,

'युद्धापूर्वी मला 'तुम्ही युद्धात मदत करा' म्हणून माझ्याकडे आला होतास, त्यावेळी कौरव शत्रू ही तुझी बुद्धी होती. आता पुन: युद्ध न करता जायचे म्हणतोस म्हणजे ते स्वजन ही बुद्धी झाली. तुझ्या सारख्याने क्षणोक्षणी असा चंचलपणा करणे योग्य आहे काय ? इथून परत फिरताच पुन: युद्धाला चल म्हणणार नाहीस कशावरून ? तुझ्यावर शहाणा म्हणून विश्वास तरी कसा मानावा? अरे सुईच्या अग्रावर राहील एवढीसुद्धा भूमी देण्यास दुर्योधन तयार नाही. मी केलेली शिष्टाईसुद्धा व्यर्थ गेली. हे तू पाहिलेसच. मग युद्ध करून राज्य नको, तर माधुकरीच मागणार ? त्यापेक्षा यांना मारून राज्य घेतलेस तर लक्षावधी ब्राह्मणांना रोजच्या रोज भोजन घालशील. हे चांगले नव्हे काय ? स्वत:ला बुद्धिमान म्हणवतोस. मग हा साधा व्यवहार कसा तुझ्या लक्षात येत नाही ? इंद्रप्रस्थात राजा धर्म राज्य करीत असताना, रोज ऐंशी हजार ऋषी सुवर्णाच्या ताटात जेवत असत. बरे हे वैभव तुम्ही पाहिले एवढेच नाही, तर प्रत्यक्ष भोगले आहे. ते परत यावे असे तुला वाटत नाही काय? युद्धापूर्वी राजा धर्माने तुला विचारले असता तू सर्व जबाबदारी मी शिरावर घेतो असे म्हणाला होतास व आता वचनभंग करतोस हे तुला शोभते काय? आपण इथून निघून गेल्यास प्रतिपक्ष मुळीच स्वस्थ बसणार नाही. धर्मादी तुझ्या बंधूंना व तुझ्या पक्षीयांना कौरव ठार मारतील. या पातकाचा तू धनी कशाला होतोस? मी इथेच स्वस्थ बसतो, ते खुशाल मला मारू देत म्हणतोस. तुला असे जर मरण पत्करायचे होते तर कर्णापुढे अगर अन्य कौरवांपुढे तसे उभे रहायचे होतेस. लगेच शरसंधान करून हे काम त्यांनी केले असते. त्याकरता एवढा युद्धाचा आटापिटा करण्याची काय गरज होती ?

कथं भीष्ममहं संख्ये........पूजार्हावरिसूदन । हा त्याचा दुसरा प्रज्ञावाद आहे. भीष्मद्रोण हे दोघे पूज्य आहेत. गुरु आहेत. द्रोण तर ब्राह्मण आहेत. त्यांना कसे मारू ? यावर भगवान म्हणतात,

गुरुं वा बालवृद्धौ वा ब्राह्मणं वा बहुश्रुतम् ।
आततायिनमायान्तं हन्यादेवाविचारयन् ॥ ' असे मनू म्हणतो.

गुरु, बाल, वृद्ध किंवा बहुश्रुत म्हणजेच विद्वान ब्राह्मण यांना मारू नये खरे, पण ते जर आततायी असतील व स्वत:वर चालून आले असतील तर मुळीच सोडू नका, अवश्य मारा. असा त्याचा अर्थ आहे.

उद्यतेषुं रणे दृष्ट्वा ब्राह्मणं क्षत्रबंधुवत् ।
यो हन्यात् समरे क्रुद्धः ब्रह्महत्या न तस्य स्यात् ॥

ब्राह्मण जरी असला व तो जर शत्रू म्हणून बाण उगारून पुढे आला तर त्याला जरूर मारावे. त्यामुळे ब्रह्महत्या लागणार नाही. अर्जुना, तू राज्य घेत असताना यांनी काय म्हणून मध्ये यावे ? म्हणून तू यांना अवश्य मार. राज्यपालन करणे तेही पुत्रवत् वात्सल्याने, हा क्षत्रियांचा धर्म आहे. पण त्याहीपेक्षा युद्ध करणे अधिक महत्त्वाचे आहे. अर्जुना, युद्धात दुर्योधनादिकांना खाली पाडल्याशिवाय राज्यपालन कसे करता येईल ? म्हणून राज्यपालनापेक्षासुद्धा युद्धच महत्वाचे. म्हणून युद्ध करणे हा क्षत्रियांचा स्वधर्म असे न म्हणता त्यापेक्षा श्रेयस्कर असे दुसरे काहीच नाही असे मुद्दाम म्हटले आहे.

**यदृच्छया चोपपन्नं स्वर्गद्वारमपावृतम् ।**
**सुखिनः क्षत्रियाः पार्थ लभन्ते युद्धमीदृशम् ॥३२॥**

अशा प्रकारचे युद्ध म्हणजे स्वर्गाचे उघडलेले द्वारच आहे. भाग्यशाली क्षत्रियांनाच हे प्राप्त होते.

अर्जुना, युद्ध हे विवाहाप्रमाणे आहे. लग्नाला वरपक्ष तयार झाला की वधूपक्ष तयार नसतो. तो तयार असला की पहिला कबूल नसतो. तसेच युद्ध करण्याची नुसती इच्छा असून काय उपयोग ? प्रतिपक्षच उभा नसेल तर? पण हे दैवाने इथे उपस्थित आहेत.

विचार कर. भीष्म-द्रोणासारखे अप्रतिद्वंद्व योद्धे तुला या म्हणशील तर मिळतील काय? पण ते आपण होऊन चालून आलेले आहेत. ही सुवर्णसंधी दवडू नकोस. हे युद्ध सुकृताने प्राप्त झाले आहे. युद्धाची सुरुवात होण्यापूर्वी तू नव्हे, पण धर्मराज स्वतः भीष्मद्रोणांकडे गेला होता. 'तुमचा नातू, शिष्य तुम्हांला नमस्कार करतो. युद्धाची परवानगी द्या.' म्हणून म्हणाला. नमस्कार केल्यावर जर आशीर्वाद दिला नाही तर तो वृद्धच नव्हे. भीष्मद्रोणांनी आनंदाने परवानगी दिली. ते म्हणाले, 'तू आलास हे ठीक केलेस. आला नसतास तर तुमची राखरांगोळी केली असती.' म्हणजे भीष्मांनीसुद्धा युद्धाला परवानगी दिली आहे. म्हणून युद्ध करून मोकळा हो.

अर्जुन म्हणाला, 'शास्त्राने अभिचार याग सांगितला आहे. त्यामुळे तुमचा शत्रू परस्पर नष्ट होतो. पण तो करू नये. कारण त्याचे फल दुष्ट आहे. तुम्ही युद्ध कर म्हणता. हा क्षत्रियांचा विधी आहे, हे मान्य. पण हे केल्यामुळे भीष्मद्रोणासारखे खाली पडतात. हे दुष्ट फल आहे. म्हणून मी माघार घेत आहे.' यावर भगवान म्हणाले, 'शास्त्राने कुणाचीही हिंसा करू नका. पशुपक्ष्यांचीच नव्हे तर वनस्पतींचीसुद्धा, असे सांगितले आहे. मग पिके तोडायची की नाहीत? कारण वनस्पतींनाही जीव आहे.' अर्वाचीन काळी जगदीशचंद्र बोस यांनी शोध लावला आहे. पिके जर तयार झाली असतील तर जरूर तोडावी. असे शास्त्र सांगते. त्यामुळे पाप लागत नाही, असे मानणेच भाग आहे. कारण एका शेतातील ऊस तोडला तर दोनतीन हजार झाडे कापावी लागतात. इतक्या जीवांची हत्या केल्यावर तो जिवंत राहील कसा? म्हणून शास्त्राने जिथे विधी सांगितला असेल तिथे दोष जरी दिसले तरी त्याकडे दुर्लक्ष करून तो करावा. त्यापासून दोष लागणार नाही. मृताचे और्ध्वदेहिक केल्यावर पुण्य लागते. विवाह हा विधी आहे. तो

झाल्यावरच स्त्रीशी संबंध करायचा. विवाहविधी झाला असेल तर मेल्या-वरसुद्धा संबंध तुटत नाही. श्राद्ध करावे लागते. न केल्यास प्रत्यवाय नावाचा दोष लागतो. त्यातून भोगल्याशिवाय सुटका नाही. म्हणून अर्जुना, युद्धात मेले तर तुला दोष लागणार नाही. कारण युध्द हा एक विधीच आहे.

काही कुळाचार असतात व ते पाळावेच लागतात. हे तुला मान्य आहे की नाही? स्त्रियांनी पुरुषांची पूजा करावी असे असताना गर्भाधान, सीमंतोन्नयन वगैरे संस्कारांत पुरुषांनी त्यांची पूजा करावी असे सांगतात. बायकांची ओटी बायकांनीच भरावी असे असताना पुरुषांनी भरावी म्हणतात. म्हणून ज्या घरात हा कुलाचार असेल त्यांनी तो अवश्य करावा. विपरीत दिसला तरी. तसेच गुरूशी युद्ध तुला विपरीत वाटले तरी करच. कारण भीष्मांनी आपले गुरू परशुराम यांच्याबरोबर पूर्वी युद्ध केलेले आहे. मग तुला करायला काय हरकत आहे? काही शिष्टाचार असतात. वेद प्रामाण्य ज्यांना मान्य आहे व त्याप्रमाणे वागतात तेच शिष्ट. तसे भीष्मद्रोण आहेत. हे तुला मान्य आहे ना? मग तुलाही तसेच वागायला नको काय? तरच गुरूची विद्या आली, असे होईल.

काशिराजाच्या अंबा, अंबिका व अंबालिका नावाच्या तीन मुली होत्या. भीष्मांनी सर्व राजांचा पराभव करून त्यांना रथात घातले. कारण त्या वीर्यशुल्का होत्या. हस्तिनापुरास आणल्यावर अंबा म्हणाली, ‘ मी मनाने शाल्वाला वरले आहे, त्यानेही मला वरले आहे.’ म्हणून तिला त्याच्याकडे पाठवून दिले. बाकी दोघींचे विचित्रवीर्याबरोबर लग्न लावले. पण शाल्वाने अंबेला नाकारले. म्हणून ती पुन: भीष्माकडे आली. ते विवाहास नाकबूल होते. म्हणून ती परशुरामाकडे आली. ते भीष्मांचे गुरू. त्यांनी सांगितले, ‘ हिच्याशी लग्न कर. माझी आज्ञा

आहे. न केल्यास अमात्यासह तुला ठार करतो. भीष्म म्हणाले, 'तुम्ही ब्राह्मण, त्यात गुरू, त्यात वृद्ध म्हणून मला मान्य आहात.' पण मरुत्त म्हणतो, 'गुरू जर मर्यादेचे उल्लंघन करू लागले तर त्यांना जरूर शासन करावे. ही शाल्वावर प्रेम आहे म्हणाली, म्हणून त्याच्याकडे पाठवून दिले. हिचा आमचा संबंध संपला. मी हिच्याशी लग्न करणार नाहीच. पण भावाचेसुद्धा हिच्याशी लग्न करणार नाही. माझे करणेच योग्य आहे. याच्या आड आपण आला तर युद्ध करून आपणाला रणात पवित्र करतो; आपला गर्व नाहीसा करतो. शेवटी २७ दिवस युद्ध झाले. त्यात भीष्मांचा जय झाला. अर्जुना, ही तुमची परंपरा आहे, म्हणून मी सांगतो, 'युद्धात तुझाच जय निश्चित होणार. युद्ध कर. तसे केल्याने, 'शिष्यादिच्छेत्पराजयम्' ही त्यांची अपेक्षाही पूर्ण होईल. भीष्म शरपंजरी पडले, तेव्हा कृष्णाच्या विनंतीवरून धर्माला. राजधर्म, नीतिधर्म, आपद्धर्म, मोक्षधर्म, स्त्रीधर्म, सर्व सांगू लागले, तेव्हा द्रौपदी म्हणाली, 'आपण आता इतके बोलताच, पण मला जेव्हा दुष्ट दु:शासनाने सभेत ओढून आणले तेव्हा, 'मी दासी आहे काय ? मी दासी आहे काय ?' असे आपणाला पुन: पुन: विचारले. तेव्हा आपण माझ्या प्रश्नाचे उत्तर का दिले नाही ? भीष्म म्हणाले, 'दुष्ट कौरवांचे अन्न खाल्ले होते; म्हणून माझी बुध्दी पालटली होती. पण आता अर्जुनाच्या तिखट बाणांनी व तीक्ष्ण बाणांनी ते रक्त निघून गेले. आता माझा आत्मा पवित्र झाला. आता वाटेल ते विचारा. त्याचे उत्तर देतो.

अर्जुना, कौरवांना पवित्र करून त्यांना ताळ्यावर आणण्यासाठी तरी युध्द कर. कार्तवीर्यासारखे राजे दत्तात्रेयांची उपासना करून युध्द मागून घेतात. व तू युद्ध नाकारतोस हे बरे नाही. जो क्षत्रिय लुगडे नेसून राहील तोच जिवंत राहील. बाकी सर्वांना ठार करून पृथ्वी

एकवीस वेळा निःक्षत्रिय करणारा परशुराम त्याचा पराभव त्याचा शिष्य भीष्म यांनी केला. त्याचप्रमाणे तूही कौरवांचा पराभव करशील.

**अथ चेत्त्वमिमं धर्म्यं संग्रामं न करिष्यसि ।**
**ततः स्वधर्मं कीर्तिं च हित्वा पापमवाप्स्यसि ॥३३॥**

असे असून हा कर्तव्यप्राप्त संग्राम तू केला नाहीस तर स्वधर्म व कीर्ती यांना मुकून पाप मात्र मिळवशील.

अर्जुना, युद्ध केले तर काय फायदा होतो? शिष्टाचार, कुलाचार पाळले जातात. स्वधर्मपालन होते व कीर्ती मिळते. इथले राज्य किंवा परत्र स्वर्ग मिळतो. हे तुला सांगितले. आता युद्ध न केल्यास काय होते ते ऐक. अपकर्ष होतो व दोष लागतो. यावर अर्जुन म्हणाला, ' शास्त्र तीन प्रकारची कर्मे सांगते. त्यापैकी नित्यकर्मे स्नानसंध्यादी केलीच पाहिजेत, न केल्यास प्रत्यवाय निर्माण होतो. नैमित्तिक कर्मे म्हणजे ग्रहण, पाडव्याचे गुढीपूजन, संक्रांत हीसुद्धा आवश्यक आहेत. श्राद्धपक्षादी ही सुद्धा नैमित्तिक केलीच पाहिजेत.

तसे काम्य कर्माबद्दल नाही. 'हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम् ॥ ' ही दोन्ही फले मला नकोत.

यावर भगवान म्हणाले, ' काम्य कर्मे करू नयेत; ती आवश्यक नाहीत हे खरे, पण एखादे काम्यकर्म सुरू करून ते मध्येच सोडले तर नित्य नैमित्तिक कर्मे न केल्यास जे दोष निर्माण होतात तेच दोष निर्माण होतात. उदा. गणपतीची पूजा करण्याकरता त्याला आवाहन केले व नंतर पूजाच केली नाही तर चालेल काय? ते कर्म न केल्यास तुमच्या उरावर बसल्याशिवाय राहणार नाही. अर्जुना, तू युद्ध करायचे ठरविलेस व तयारी केलीस म्हणजे काम्य कर्माची सुरवात झाली. आता मध्येच ते कसे सोडता येईल? युद्धच करायचे नव्हते, तर

सिंहनाद, शंखनाद करून सुरवात का केलीस ? आता युद्ध तडीला न नेल्यास दोष लागणारच."

घरातून चार दिवस बाहेर गेल्यास, परगावी गेल्यास किती तडजोड करावी लागते? दूधवाला, पोस्टमन, भांडीवाली सर्वांची व्यवस्था करावी लागते. मागे राहिलेल्यांची व्यवस्था करावी लागते. पिठे दळून आणून ठेवावी लागतात. स्वतःबरोबर तहानलाडू, भूकलाडू घ्यावे लामतात. मग अठरा अक्षौहिणी सैन्य इथे आले आहे, मरू किंवा मारू या तयारीने. मग त्यांनी किती व केव्हापासून तयारी केली असेल? तुझ्यामुळे ती फुकट जाईल याची वाट काय? तू माधुकरी मागितलीस तर उभ्या आयुष्यात तुला पुढे कुठलेही क्षात्रकर्म करता येणार नाही. स्वधर्म न केल्याने एक दोष लागेल. कारण युद्ध करणे हा क्षत्रियांचा धर्म आहे. ते तू करणार नाहीस म्हणून एक दोष व दुसऱ्याचा धर्म भैक्ष्य हा आचरल्याने दुसरा दोष लागेल.

आपली कीर्ती लोकांनी गावी म्हणून प्रयत्न करावा लागतो. पाच पन्नास रुपये खर्च करावे लागतात. अपकीर्ती मात्र प्रयत्नाशिवाय एक कवडीही न खर्च करता आपोआप होते. कीर्ती जाईलच, शिवाय पापाचा धनी व्हावे लागेल. अर्जुन म्हणाला; 'पाप काय ते एकदा सांगा.' भगवान म्हणाले, 'दुःख निर्माण करणारे दुष्ट साधन म्हणजे पाप, आपलेच अनुचित कर्म. चुका झाल्यानंतर त्याचे फळ देहपातानंतर दुसऱ्या देहात गेला तरी भोगावेच लागते. ते चुकत नाही. 'नाभुक्तं क्षीयते कर्म कल्पकोटिशतैरपि।' शास्त्र न मानणारे लोक हे मानत नाहीत. पण त्यांना ते फळ भोगावेच लागते. जिवंत असताना लोक निंदा करतात; हे दुसरे फळ. प्रारब्ध मानल्याशिवाय गत्यंतर नाही. नाहीतर एखादा अत्यंत सुंदर व दुसरा अत्यंत कुरूप का? एखादा अत्यंत श्रीमान तर एखादा अत्यंत दरिद्री का? एकाच मातापितरापासून

झालेली दोन मुले यात एक अत्यंत बुद्धिमान तर दुसरा अतिनिर्बुद्ध का? राजप्रासादात जन्माला आलेल्या बालकाला जन्मल्यापासून सर्व भोग, हातापायाशी नोकर. जन्मोत्सवाची साखर हत्तीवरून वाटली जाते. तर ओढ्याच्या काठी जन्माला आलेल्या गरिबाच्या मुलाला पहिले स्नान गार पाण्याचे ! ही परिस्थिती त्या बालकाला व त्याच्या मातापितरांना ही बाजूला करता येत नाही. त्या बालकाला घ्यायला कोणीच नसते. झाडाला झोका बांधून त्यात त्याला ठेवतात व आईबाप भीक मागायला जातात. असे व्हायला त्याचे गतजन्मीचे दुष्कर्म हेच कारण. दुसरे काय? युद्धत्याग केल्याने तुझ्या हातून दुष्कर्म होईल, म्हणून युद्धकार्य सुरू कर.

**अकीर्तिं चापि भूतानि कथयिष्यन्ति तेऽव्ययाम् ।**
**संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते ॥३४॥**

जर तू युद्ध केले नाहीस, तसाच परत फिरलास तर सर्व लोक तुझी अपकीर्ती सांगत राहतील. संभावित, सज्जन पुरुषाला अशा अपकीर्ती पेक्षा मरण बरे असे वाटते. दुष्कीर्ती त्याला मरणाहून अधिक दुःखद आहे असे वाटते.

अर्जुन म्हणाला, ' मी युद्ध न केल्यास माझी अपकीर्ती होईल, म्हणता ना? खुशाल होऊ दे. मरणापेक्षा अपकीर्तीच बरी. कारण युद्धात समजा मी जिंकले तरी केव्हा तरी मी मरणारच. त्यांना मारल्यावर मला दुःख होणारच. यदाकदाचित मीच धारातीर्थी पतन पावलो तरी मी मरणारच, म्हणजे मृत्यू अटळ आहे. तो उभय बाजूंनी अटळ आहे. मरणाचे दुःख फार तीव्र असते. शास्त्रकार म्हणतात, एकदम शंभर विंचू चावल्यास जशा वेदना व्हाव्यात तशा वेदना मृत्युसमयी होतात. सतरा मर्मस्थाने म्हणजे पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेंद्रिये, पंचप्राण, मन व

बुद्धी ही एकदम तुटतात. यापेक्षा जिवंत राहून अपकीर्ती झाली तर काय बिघडले? दुर्योधनाचेच पहा ना. त्याची काय जगात कमी नाचक्की झाली? पण तरी खुशाल तो चैनीत जीवन कंठत आहे ना?' भगवान म्हणाले, 'अर्जुना, जे झाड सफळ आहे, उदा० चिंच, आवळा, आंबा, अशाच झाडाला लोक दगड मारतात. पण बाभळीसारख्या निष्फळ झाडाला दगड मारत नाहीत. याचा विचार केलास काय? तसेच अपकीर्ती दुःखकारक कोणाला? संभविताालाच. कीर्तिरूपी फळे तुला लगडलेली आहेत. म्हणून अपकीर्तीचे धोंडे तुलाच खावे लागणार. दुर्योधन हा मूर्तिमंत कलीचा अवतार म्हणूनच जन्माचा आला आहे. उभ्या आयुष्यात एकही सुंदर कार्य त्याने केले नाही. जन्मल्याबरोबरच तो गर्दभाप्रमाणे ओरडला. म्हणून प्रज्ञावान विदुराने, त्याचवेळी त्याचा त्याग करायला राजा धृतराष्ट्राला सुचवले. पण राजाला ते पटले नाही. असा ज्याचा इतिहास आहे तो दुर्योधन म्हणतो, 'भीमाला विष चारले, द्रौपदीची विटंबना केली, पांडवांना लाक्षागृहात दग्ध करण्याचा घाट घातला; या कृत्यांची भर पडली, त्यात काय बिघडले? मलिन वस्त्र नेसल्यावर मनुष्य पटकन कुठेही बसतो. पण इस्त्रीची पँट अंगावर असताना मात्र रुमालाने खुर्ची पुसून नंतरच खुर्चीवर बसतो. गाईच्या गोठ्यात शेण काढताना जो पोषाख अंगावर असतो तोच लग्नमुंजीला जाताना असतो काय? नाही. झकपक पोषाक असल्याशिवाय लग्नमुंजीच्या ठिकाणी येऊ देत नाहीत. काळ्या घोंगड्यावर शाईचा डाग पडल्यास उठून दिसत नाही, पण तोच परीटघडीच्या पांढऱ्या शुभ्र वस्त्रावर एकदम उठून दिसतो. अर्जुना, दुर्योधनाचे बरोबर असेच आहे. त्याला अपकीर्तीचे काहीच वाटत नाही. कारण तो काळ्या कांबळ्याप्रमाणे आहे. त्यावर डाग पडल्यास काय होणार? तू मात्र शुभ्र वस्त्रासारखा आहेस, अपकीर्तीचा डाग तुझ्यावर पडून चालणार नाही. ज्याने युद्धात प्रत्यक्ष महेशाला जिंकले, अग्नीला खांडव वन खायला देऊन देवेंद्राचा पराभव केला, स्वर्गात जाऊन निवातकवच या असुरांना

मारले, उत्तरगोग्रहणात बृहन्नडावेषात संमोहनास्त्राने भीष्मद्रोण इ. सर्वांचा पराभव करून त्यांची वस्त्रे काढून घेतली, तो जगदेकवीर अर्जुन पळाला तर केवढी अपकीर्ती होईल? विचार कर. उत्तर हा सुद्धा कौरवांचे प्रचंड सैन्य पाहून, प्रथम जरी त्याने गमजा मारल्या होत्या, तरी पळत सुटला, पण तो तुझ्यासारखा कीर्तिमान नव्हता म्हणून खपले. तुझे मात्र खपायचे नाही. अपकीर्ती पाण्यावर टाकलेल्या तैलबिंदूप्रमाणे तत्काळ पसरते. पण कीर्ती मात्र पाण्यात टाकलेल्या तुपाच्या थेंबाप्रमाणे गोठून बसते. अपकीर्ती मेल्यावरसुद्धा सुटत नाही. हा अमक्याचा मुलगा. अशी अपकीर्ती त्याच्या संततीलाही सहन करावी लागते.

अपकीर्ती अव्यय असते. ती नष्ट न होता वाढतच जाते. त्यामुळे लोक पुनः पुनः टोचून बोलतात. हे दुःख सातत्याने असते व मरणाचे दुःख एकदाच असते. म्हणून तू अपकीर्तीच्या बळी पडू नकोस.

**भयाद्रणादुपरतं मंस्यन्ते त्वां महारथाः ।**
**येषां च त्वं बहुमतो भूत्वा यास्यसि लाघवम् ॥३५॥**

भयामुळे तू रणातून पळ काढलास असे महारथी मानू लागतील. जे तुझ्याबद्दल अभिमान बाळगून होते, ज्यांच्याकडून तू बहुमानाला प्राप्त झाला होतास त्यांच्याकडून तू लघुत्वाला प्राप्त होशील. ते तुला तुच्छ लेखतील.

भगवान म्हणाले, ‘ अर्जुना, तू युद्ध कर. आत्मा अमर व अविनाशी आहे. म्हणून परमार्थ दृष्टीने युद्ध करायला हरकत नाही. शिष्टाचार, कुलाचार तसाच आहे. भीष्मांनी परशुरामाबरोबर युद्ध केले आहे हे तुला माहीतच आहे. व्यवहार दृष्टीनेही युद्ध करणेच चांगले. व्यवहार सुरळीत होण्यासाठीच तर धर्मशास्त्र असते हे युद्ध न्याय्य आहे. त्यात उत्कर्ष आहे, म्हणून कर. तू संभावित आहेस. म्हणून कीर्तिरक्षणासाठी कर.

भगवंतांनी परोपरीने समजावून सांगितले तरी अर्जुनाच्या मनात सूक्ष्म शंका राहिलीच. तो म्हणतो, 'भगवंता, मरणाचे दुःखच अधिक व अपकीर्तीचे दुःख कमी. यदाकदाचित मी दयाबुद्धीने येथून पळून गेलो व त्यांनी 'पळून गेला' म्हटले तरी माझ्या कीर्तीला मुळीच बट्टा लागणार नाही. समजा, एका सुप्रसिद्ध गवयाने बिंदु चौकात गायन केले व ज्या सामान्य लोकांना ते आकलन झाले नाही ते निघून गेले. पण खऱ्या दर्दी लोकांनी माना डोलावल्या. सामान्य लोक निघून गेले म्हणून तो गवई वाईट ठरत नाही. माझ्या अंतःकरणातील दयाबुद्धी न कळल्याने जरी कौरवांनी दोष दिला तरी हरकत नाही. हत्ती जाताना कुत्री भुंकत असतात. त्यातलाच हा कौरवांचा प्रकार होईल.' भगवान म्हणतात, 'सामान्य लोकांबद्दल तुझे हे मत कबूल. पण तू पळून गेल्यावर महारथी काय म्हणतील? शत्रूपक्षातील महारथी कांही सामान्य नाहीत.

कुसुमाग्रकाष्ठन्यायात् । म्हणजे एका मनुष्याचे अत्तराचे दुकान होते ते काढून त्याने कोळशाची वखार घातली. अत्तराचे दुकान असताना हा आरामात लोडाला टेकून व्यापार करी. सुगंधही मिळे. आता वखारीत काम करताना कोळशाची पूड मात्र नाकातोंडात जाई. दोन्हीत पैसा विपुल मिळतो पण अत्तर विकणेच चांगले नाही का? अर्जुना, ज्याने नेहमीच उच्चपदावर दिवस घालविले त्याने नीचपदात केव्हाही पदार्पण करू नये.

**अवाच्यवादांश्च बहून् वदिष्यन्ति तवाहिताः ।**
**निन्दन्तस्तव सामर्थ्यं ततो दुःखतरं नु किम् ॥ ३६ ॥**

तुझे शत्रू तुझ्याविषयी भलभलते बोलतील, तुझ्या सामर्थ्याची निंदा करतील, याहून अधिक दुःख ते काय?

अर्जुन म्हणाला, 'यांनी माझी निंदा तरी काय म्हणून करावी? पूर्वी बृहन्नडा वेषात एका रथानिशी मी सर्व महारथ्यांना लोळवले होते.

इतकेच नव्हे तर संमोहनास्त्र घालून साऱ्यांची वस्त्रे काढून घेऊन त्यांना नग्नही केले होते. दुसरा प्रसंग घोषयात्रेचा. त्याकरता कौरव निघाले. पांडवांना वनात नष्ट करण्याचा त्यांचा बेत होता. तो चित्ररथ गंधर्वाला कळला. त्याने इंद्राच्या आज्ञेवरून सर्व कौरवांचा पराभव करून दुर्योधनाच्या मुसक्या बांधल्या. ही बातमी कळल्यावर भीमाने आनंदाने टाळ्या वाजविल्या. पण धर्म म्हणाला,

ते शतं च वयं पंच परस्परविवादने ।
परैस्तु विग्रहे प्राप्ते वयं पंचाधिकं शतम् ॥

मग आम्ही जाऊन गंधर्वांशी युद्ध करून दुर्योधनाची सुटका केली. या सारखी ढळढळीत उदाहरणे समोर असताना ते निंदा कशी करतील ?' भगवान् म्हणाले, 'करू नये हे कबूल; पण करतात त्याला काय करायचे? शिवाय ते शत्रू आहेत. कितीही गुणवान असला तरी त्याचे दोष काढायचेच ! त्यांचा हा स्वभावच असतो. ते म्हणतील, त्यावेळी त्याचा चुकून जय झाला. खरा हा पळपुटाच आहे. इतकेच नव्हे तर अवाच्यवाद बोलतील, म्हणजे शिव्यादेखील देतील. भित्र्याने येथे यावेच कशाला? दिव्यावर पतंग जातो व नष्ट होतो. भीष्मद्रोणादी पाहून याला तसेच वाटले म्हणून पळाला असे म्हणतील.

**हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम् ।**
**तस्मादुत्तिष्ठ कौन्तेय युद्धाय कृतनिश्चयः ॥३७॥**

युद्ध करताना तुला मरण आले तर स्वर्गप्राप्ती होईल. याउलट झाले तर म्हणजे तुझा विजय झाला तर पृथ्वीचे राज्य भोगशील. म्हणून युद्धाचा पक्का निश्चय करून युद्धाला उभा रहा.

'नहि प्रपश्यामि ममापनुद्यात् ....राज्यं सुराणामपि चाधिपत्यम् ।' 'मला स्वर्ग नको व इथले राज्यसुद्धा नको.' असे अर्जुन म्हणाला असताना त्याला हे नको असलेले फळ का सांगितले? एखाद्याने

तुम्हाला फीस्टला बोलाविले व सर्व नावडते पदार्थ वाढले तर चालेल का ? तसेच नको असलेल्या राज्य, स्वर्ग ह्या फळाने अर्जुनाला संतोष कसा होईल ? अर्जुनाला राज्य व स्वर्ग हवे होतेच. म्हणून तर युद्धाची जय्यत तयारी करून तो आला होता. पण भीष्मद्रोणांना पाहून त्याने माघार घेतली एवढेच. तेव्हा भगवान म्हणाले, ' हे आततायी आहेत; म्हणून यांना खुशाल मार. त्यात दोष नाही. शिवाय थोड्याशा अधर्माने जर पुढचा प्रचंड अधर्म टळत असेल तर तसे करायला काय हरकत आहे ? हे युद्ध करणार नाहीस तर मग पुढच्या आयुष्यात काय करणार ? भिक्षा मागणार म्हणतोस. पण तो क्षत्रियाचा स्वधर्म नव्हे. जन्मभर अधर्म करण्यापेक्षा इथे यांना मारण्याचा अधर्म केलेला काय वाईट ?

अर्जुनाची दुसरी शंका 'यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः ।' ही होती. परिक्षेला सारेच पास होतात काय ? एखाद्या मुलाला शाळा अजिबात नको असते. मारून मुटकून जात असतो, पण तो पास होतो. आणि हुशार विद्यार्थी नेमका नापास होतो. दहा रुपये देऊन पुनः पेपर तपासणी करून देखील उपयोग होत नाही. याप्रमाणे युद्धात कुणाचा जय होईल हे सांगता येत नाही. भगवान म्हणाले, ' तू संशयात कशाला पडतोस ? ' युध्यस्व जेताऽसि रणे सपत्नान् । ' तू कौन्तेय म्हणजे माझा आतेभाऊ आहेस. तेव्हा माझ्या संबंधामुळे तुझा जय होणारच. ' यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे । ' असे तू मला विचारले होतेस. म्हणून ' तस्मादुत्तिष्ठ कौन्तेय युद्धाय कृतनिश्चयः । ' हे उत्तर मी तुला दिले. तुला युद्धच करायचे नव्हते तर वनातून परत कशाला आलास ? तुला पळून जाण्यासाठी द्रोणांनी रहस्यविद्या दिली काय ? अरे, दुसऱ्यांच्या कल्याणासाठी काही गोष्टी कराव्या लागतात.

मनूचा मुलगा प्रियव्रत याला नारदाने आत्मस्वरूप सांगितले. त्यामुळे तो परमार्थाकडे वळला व ज्ञानी झाला. राज्य, भोग काही नको,

म्हणू लागला. तेव्हा ब्रह्मदेव त्याला म्हणाला, 'या जगाचा ईश्वर म्हणून मी तुला मान्य आहे ना? तर मग माझी आज्ञा म्हणून राज्य कर.' मग त्याने राज्य केले. तसेच अर्जुना, तूसुद्धा लोकांकरता युद्ध कर. हे कौरव कसे आहेत हे तुला माहीत नाही काय? यांच्या हातात राज्य आले तर ज्यांनी तुम्हाला जाळायला कमी केले नाही, ते लोकांनाही जाळायला कमी करणार नाहीत. या उलट राजा धर्म राज्यावर आला तर, प्रजेचे हित आहे. म्हणून त्याकरता इच्छा नसली तरी युद्ध कर. जाता जाता एखादी वस्तू सहज मिळाली तर तिचे महत्त्व नसते. पण अर्जुना, हे युद्ध पराक्रमाने मिळणारे आहे. म्हणून या युद्धाचा अवश्य स्वीकार कर.

**सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ ।**
**ततो युद्धाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यासि ॥ ३८ ॥**

सुखदुःख, लाभालाभ, जयपराजय हे सर्व समान मानून युद्धाला सज्ज हो. अशी तुझी युद्धाची तयारी झाली म्हणजे तुला पाप लागणार नाही.

कल्याण कशात आहे? असे अर्जुनाने मागे विचारले होते. कल्याण म्हणजे पुनः दुःख येता उपयोगी नाही. भगवान म्हणाले, 'तू कोणत्या दृष्टिकोनातून हा प्रश्न विचारत आहेस? सकाम की निष्काम? प्रायःसर्व लोक सकाम असतात. त्यांच्या पूर्तीकरताच म्हणजे वैषयिक सुखप्राप्ती-करता वेदाचा जो भाग प्रवृत्त झाला, त्यालाच धर्म म्हणतात. सर्वांना सुख हवे आहे; पण ते बायकामुले, धन, याने मिळेलच असे नाही.

सुखं तु जगतां काम्यं इष्टं धर्मेण जायते ।

असे शास्त्र म्हणते. परमेश्वराची प्राप्ती व्हावी, मोक्ष मिळावा, अशा इच्छा असतील तर 'कामना नैव कामना ।' त्या कामनाच नव्हेत. पण प्रखर विवेक व पुण्यपुंज याशिवाय निष्कामता येत नाही. म्हणून हे अवघड आहे. तू जर सकाम असशील तर राज्य व स्वर्ग

ही फळे सांगितली आहेत. पण मोक्ष हवा असेल तर सुखदु:खादी समान मानून युद्ध केले पाहिजे. युद्धात जय झाला तर राज्य मिळेल. पराजय झाला तर राज्य मिळणार नाही. दु:ख होईल. काहीही होवो, तू दोन्ही समान मान.

व्यवहारात साधी विद्या मिळवताना हेच करावे लागते. रात्री कमी खायचे, जागायचे, पुन: पहाटे उठायचे. फी भरायची, बस मिळाली नाही तर न कुरकुरता पायी चालत जायचे, अभ्यास करताना पाठ व कंबर भरून येते. पण यात कष्ट आहेत म्हणून हॉटेलात नोकरी पत्करायची काय? तिथे सकाळी चहा, दुपारी चिवडा, रात्री कांद्याची खमंग भजी खायला मिळतात. लौकिक विद्येसाठी इतके कष्ट सोसावे लागतात. मग राजविद्येसाठी सोसलेच पाहिजेत. विद्या शिकताना पैसे खर्च होतात म्हणून कुरकुरून उपयोगी नाही. कारण त्याच्या शतपट ती पूर्ण झाल्यावर मिळतात.

सुखदु:खे समान झाली तर ' नैवं पापमवाप्स्यसि । ' इथे पाप म्हणजे दु:खरूपी संसार हा अर्थ घेतला पाहिजे. संसारात सुख कशाने होईल? सागा. धनाने? बायकामुलांनी? मोटारगाड्यांनी? कशानेच होत नाही. एखाद्याचा सुखाचा संसार आहे असे म्हणतात. याचा अर्थ सुखाची विपुलता त्यात आहे, पण दु:ख मुळीच नाही, नाही. तो जरी वरून सुखी वाटला, तरी आतून दु:खाने पोखरलेलाच असतो. अधिकार हातात आला म्हणजेही सुख होईल असे नाही. अर्जुन म्हणाला, ' असे जर आहे तर, अवघाचि संसार सुखाचा करीन ' अशी प्रतिज्ञा साधुसंत कसे करतात?' भगवान म्हणाले, ' तुमच्या घरी दहा पाहुणे एकदम आले तर सुख आहे की नाही? एकनाथाच्या घरी सारखे यायचे. तेथे ज्ञानसत्राबरोबरच अन्नसत्रही चालायचे. त्यापायी नाथांना कर्जदेखील झाले व ते उद्धवाने फेडले.

संन्यासापेक्षाही गृहस्थाश्रम श्रेष्ठ आहे. कारण तो सर्वोपकारक्षम आहे म्हणूनच. पण आता कोणीही आला तरी दार बडवून घेतो. म्हणून अधन्यता आमच्या वाट्याला येते. साधुसंत म्हणतात, ' मी मुलगा निर्माण करीन तो देवपूजा करणाराच निर्माण करीन. मुलगी निर्माण करीन ती उभयकुलानंदिनी अशीच असेल. म्हणजेच संसारातील प्रत्येक साधन परमार्थासाठीच उपयोगात आणीन. त्यामुळे त्यांचा सारा संसार सुखाचा होतो. पण तो खरा दुःखमयच आहे.

शिवाय युद्ध हा तुझा स्वधर्म आहे. ' स्वधर्मे निधनं श्रेयः ' असे म्हटले आहे. युद्ध हा शिष्टाचार आहे. धर्म चांगलाच. यात वाद नाही. पण जर तो शिष्टांच्या आचरणातून आला असेल तर विलक्षण प्रभावी ठरतो. हा स्वधर्म न केल्यास प्रत्यवाय येतो. अपकीर्ती होते. म्हणून युद्ध कर. पाप शब्दाचा अर्थ संसार न घेतल्यास जर लढाई निष्कामपणे केली तर भीष्मद्रोणांना मारून पाप लागणार नाही हे जमते. पण जर स्वर्ग व राज्य या फलाकरता केली तर पाप लागते, असे ठरते. त्यामुळे मागच्या श्लोकाची संगती लागत नाही. म्हणून तसा अर्थ करता येत नाही.

**एषा तेऽभिहिता सांख्ये बुद्धिर्योगे त्विमां शृणु ।**
**बुद्ध्या युक्तो यया पार्थ कर्मबंधं प्रहास्यसि ॥ ३९ ॥**

अर्जुना, आतापर्यंत मी तुला सांख्यबुद्धी सांगितली.आता योगबुद्धी ऐक. अर्जुना, ती प्राप्त झाली असता तू कर्मबंधनापासून मुक्त होशील.

'सांख्य म्हणजे कपिलाने सांगितलेले पण तो अर्थ इथे घ्यायचा नाही. कारण ' प्रथमं प्रकृतिस्ततो महान्ततो अहंकारः । ' असे वर्णन यात मुळीच आलेले नाही. तसेच, योग म्हणजे पतंजलीचा नव्हे. कारण ' योगश्चित्तवृत्तिनिरोधः । ' वगैरेचेही विवेचन यात नाही. ' सम्यक् ख्यायते अनया इति सांख्यम् । ' म्हणजे उपनिषदे. हा अर्थ

इथे घ्यायचा. कोशातसुद्धा सांख्य शब्दाचा अर्थ चर्चा, विचारणा असाच आहे.अर्जुनाला शोक झाल्यावर'अशोच्यानन्वशोचस्त्वम्'पासून तत्त्वज्ञानच सांगितले. या अध्यायाच्या शेवटी 'एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ .... नैनां प्राप्य विमुह्यति ।' या श्लोकानेही तेच सांगितले आहे. गीतेच्या१८ व्या अध्यायात 'इदं ते ज्ञानमाख्यातम् ।' असे स्पष्ट म्हटले आहे, यावरून गीता हे ज्ञानशास्त्रच आहे हे स्पष्ट होते. युज्यते अनेन इति योगः । तो आता ऐका.

अर्जुन म्हणाला, 'ज्ञानच प्रधान मग मी कर्म कशाला करू? कारण'कर्मणा बध्यते जन्तुः विद्यया च विमुच्यते । असे शास्त्रवचन आहे. भगवान म्हणाले, 'अरे कर्म नुसते स्वतःसाठीच केले तर ते बंधक होते, पण दुसऱ्यासाठी केले तर ते तसे होत नाही. राष्ट्रसेवा केली, तर जयजयकार होतो. तसेच कर्म निष्काम व ईश्वरार्पण केले की होते, पण त्यात इतर पदार्थांचे मिश्रण केले तर तेच तारक होते. तसेच कर्म शास्त्रोक्त, निष्काम करून ईश्वरार्पण केल्यास मोचक होते. म्हणून त्याला कर्मयोग म्हणतात.

ती निष्काम कर्मे आपल्याजवळ साठून उपयोगी नाही. पैसा जसा बँकेत ठेवायचा तशी ही ईश्वराजवळ ठेवली पाहिजेत. ईश्वराची बँक कधीही न बुडणारी अशी आहे. खात्रीची आहे.तुम्ही निष्काम कर्मे ईश्वराला दिल्यावर ईश्वर विचार करतो, याने ही कर्मे मला का दिली आहेत? तर अधिक होण्याकरता. तो ती कर्मे वेगळी काढून ठेवतो व साठल्यावर भक्ताच्या चित्तशुद्धीसाठी त्याचा उपयोग करतो. चित्तशुद्धी-झाली की ज्ञानसाक्षात्कार होतो. प्रत्येक कर्म ईश्वराकडे जावे, म्हणून प्रत्येक संकल्पात 'श्री परमेश्वरप्रीत्यर्थम्' म्हटलेले असते. आम्हांला फळ हवे असते म्हणून सौभाग्यद्वारा म्हणजे फलनिर्देश करून त्याने ईश्वर-संतोषार्थ म्हटलेले असते. अर्जुन म्हणाला, 'मी निष्काम भक्तच आहे. मला ज्ञानच सांगा.

ज्ञान सोपे कारण त्यात गुरू व शिष्य फक्त दोघेच असतात; इतर भानगड नाही. भगवान म्हणाले, ' ज्ञान सर्वांकरताच निर्माण झाले आहे. पण ते प्रयत्नाशिवाय मिळत नाही. त्याकरताच कर्मयोग सांगितला आहे. आता म्हणतोस, ' मी निष्काम आहे.' पण पूर्वीपासून निष्काम नव्हतास. ' सीदन्ति मम गात्राणि ' अशी स्थिती होऊन सर्वत्र गळचेपी झाल्यावरच निष्काम झालास.' अर्जुन म्हणाला, ' तुमच्यासारखा लोकोत्तर गुरू मिळून व मुमुक्षा निर्माण झाली असून मग उपयोग काय?

भगवान म्हणाले, ' कर्मयोग कर म्हणजे, ' नैवं पापमवाप्स्यासि ' ! कितीही उच्च अधिकारावर असला तरी कर्म शेवटी गोता देतेच. यमाचेच पहाना, आणिमांडव्य या ऋषींनी मागच्या २१ व्या जन्मात एका किड्याला टोचले होते. त्यामुळे तो किडा मेला होता. या अपराधाकरता त्यांना सुळावर चढविले. अज्ञानी असताना केलेल्या चुकीचे इतके मोठे शासन केले म्हणून त्यांनी यमाला रागावून ' तू दासीपुत्र म्हणून जन्माला येशील ' असा शाप दिला. त्यावरून यमधर्म विदुर झाला व यमाच्या खात्यावर तात्पुरती अर्यमाची नेमणूक झाली. अर्जुन म्हणाला,

' कर्मणा बध्यते जन्तुः विद्यया च विमुच्यते ' हेच खरे.

भगवान म्हणाले, नुसते कर्म बंधक ठरते. पण तेच निष्काम करून ईश्वरार्पण केल्यास तो कर्मयोग होतो. व कर्माची बंधकता जाते.

**नेहाभिक्रमनाशोऽस्ति प्रत्यवायो न विद्यते ।**
**स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् ॥४०॥**

हा निष्काम कर्मयोग आचरत असताना, कर्मात पूर्ण खंड पडला तरी म्हणजेच ते अर्धवट राहिले तरी त्याचे फळ नष्ट होत नाही. तसेच कर्माची सर्व अंगे बरोबर साधली नाहीत, तरी दोष नाही. याचे थोडे जरी आचरण केले तरी ते महाभयापासून रक्षण करते.

अर्जुन म्हणाला, ' अशोच्यानन्वशोचस्त्वम् ' पासून तुम्ही मला ज्ञान सांगितले. ' स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकंपितुमर्हसि । ' याने लौकिक न्याय व सुखदुःखे ' समे कृत्वा ' याने कर्मयोग सांगितला. या तीन गोष्टी आल्या असताना मी तुला सांख्य म्हणजे ज्ञान सांगितले असे म्हणता व शेवटी या अध्यायात ' एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनां प्राप्य विमुह्यति । ' यानेही ज्ञानच सांगितले. गीतेच्या शेवटी देखील ' इदं ते ज्ञानमाख्यातम् । ' म्हणता. यावरून गीता हे ज्ञानशास्त्रच आहे हे सिद्ध होते. ' शेवटी अर्जुन ' नष्टो मोहः ' असे म्हणतो. मोह क्रियेने कधीच जात नाही. ज्ञानानेच जातो. यावरूनदेखील हे ज्ञानशास्त्रच आहे हे सिद्ध होते. त्याची योग्यता येण्यासाठी कर्मयोग लागतो.

अर्जुन म्हणाला, ' हे सारे मला मान्य आहे. पण जमणे फार कठीण आहे. कारण शास्त्राने अनंत कर्मे सांगितली आहेत. सकाळी उठल्या-पासून रात्री निजेपर्यंत केली तरी ती संपणार नाहीत. ' मुंबईसारख्या शहरात मनुष्य सकाळी ८ वाजता डबा घेऊन कामाला जातो, रात्री आठ वाजता परत येतो. ' शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम्। ' त्याचे रक्षण करण्यासाठी नोकरी करावीच लागते. तिथून आल्यावर कर्म करावे म्हटले तर उत्साहच नसतो. शिवाय शास्त्रीय कर्मांचे सम्यक्ज्ञान तरी कुठे असते ? त्यामुळे त्यात चुका होतात. सारांश या साऱ्यामुळे कर्मे तडीस जाऊन मोक्ष मिळणे महत्कठीण आहे. '

भगवान म्हणाले, ' जगात खाण्याचे पदार्थ किती आहेत ? पूर्वी अशी पद्धत होती की, पानात उजवीकडे १८ व डावीकडे १८ पदार्थ व मध्ये मीठ असे. भात, वरण, तूप, पक्वान्नें व बाजूच्या आमट्या वगैरे त्याशिवाय असत. ४० । ५० तरी जिन्नस असत, पण सध्या तितके असतात काय ? जिन्नस राहू देत; पण तितके तादूळ तरी खाण्यात येतात काय ? पण म्हणून जेवण राहिले आहे काय ? ५ । ७

पदार्थात ते होतेच. तसेच अनतकर्मे सांगतली असली तरी ती सगळी केलीच पाहिजेत असे कुठे आहे ? जमतील तितकीच रुचतील तितकीच करा. निवड करण्याकरता अनेक सांगितली आहेत.

उपास्यानां अनियमः साधनानां अनेकता।

हे हिंदुधर्माचे प्रधान वैशिष्ट्य आहे. राजवाड्याला अनेक प्रवेशद्वारे असतात. एक स्त्रियांसाठी, दुसरे पाहुण्यांसाठी, तिसरे नोकरांसाठी, चौथे गाईम्हशींसाठी, पाचवे मोटारींसाठी. पण त्यामुळे त्याला वैगुण्य येते काय ? मुळीच नाही. उलट ती त्याची शोभा ठरते. तसेच साधने व उपास्य यांच्या अनेकतेमुळे हिंदुधर्माला भूषणच येते. सकाळी व रात्री जेवणानंतर रोज चार पाच फळे खा, की आरोग्य सुंदर राहते. पण लोक म्हणतात की आम्हांला एकादशीला फळे मिळेनात मग रोज कशी खायची ? आंब्याच्या हंगामात तुम्ही ५०--६० रु. देऊन पेटी घेऊ शकणार नाही हे कबूल. पण हंगाम संपेपर्यंत एक पेटी तरी घ्याल की नाही ? तसेच अर्जुना, सारी कर्मे साधली नाहीत तरी एखादे तरी साधेल की नाही ? बस. तेवढेच पुरे आहे. म्हणूनच अल्प न म्हणता स्वल्प म्हटले आहे. ( सुष्ठु अल्प म्हणजे स्वल्प ) ते चालेल. इतकेच नव्हे तर ते महाभयापासून रक्षण करते.

कर्म करायला घेतले की ते तडीला जात नाही. ४।५ दिवस होतात न होतात इतक्यात पाहुणे येतात. स्वास्थ्य तरी बिघडते. परगावी तरी जावे लागते. या साऱ्या गोष्टी शास्त्रकारांनी जमेस धरलेल्या असतात. त्यामुळे ते अपुरेच राहते. डॉक्टरांनी ऑपरेशन निम्मे सुंदर केले. नंतर महत्वाचे काम आले म्हणून ते मध्येच निघून गेले. भरभर टाके घालून टाकले. चालेल काय? किंवा पुत्रकामेष्टी करत असताना ती निम्म्यातच सोडली तर मुलगा होईल ? याप्रमाणे कर्म मध्येच सोडले तर फळ कसे मिळेल? दुसरी शंका अशी– सध्या तूप फार महाग आहे. अत्यंत दुर्मिळ आहे.

म्हणून तुपाऐवजी गाईच्या कोऱ्या दुधाच्या आहुती दिल्यातर चालेल ? सध्या तूप दुर्मिळ म्हणून अन्नशुद्धीसाठी दूध घेऊन आपोशन घेत नाहीत काय ? तेही नसल्यास पाणी. भगवान म्हणाले, ' इकडे आहुतीत बदलाबदल केल्यास मुलाऐवजी मुलगी होईल. सकाम कर्म असेल तर ते शेवटपर्यंत त्याच विशिष्ट पद्धतीने कडेला गेले तर फळ मिळेल. नाहीतर फललाभ होणार नाही. वैगुण्य खपणार नाही. मध्येच सोडले तर प्रत्यवाय निर्माण होतात. पण ' इह ' म्हणजे निष्काम कर्मयोगात या दोन्ही चुका खपतात. अर्जुन म्हणाला, ' यांनाच सवलती व फलाची इच्छा धरून करणाऱ्यांना सवलती का नाहीत ? ' तुमचा एक लहान मुलगा आहे. त्याने वाटेल ते वेडेवाकडे बोलल्यास तुम्हांला चालते. पण दुसऱ्या मोठ्या माणसाने वाटेल ते बोललेले चालत नाही. तसेच हे आहे. लहान मुलाची तो वाटेल ते बोलला तरी मागची भावना चांगली आहे. फक्त त्याला बोलता येत नाही म्हणून चुका होतात. मोठ्या माणसाची वाटेल ते बोलल्यास पाठीमागची भावना चांगली नसते. म्हणून ते बिलकूल खपत नाही. त्याचप्रमाणे अर्जुना, कर्म तडीला नेण्याची व ते निर्दोष करण्याची भक्ताची इच्छा असते. हे मला सर्वज्ञतेमुळे कळते. म्हणून केवळ निष्काम भक्तीने कर्माला प्रारंभ केला व ते तडीला गेले नाही आणि सदोष असले तरी त्याचे फल देऊन मी मोकळा होतो. सुदाम्याने माझ्यासाठी पोह्यांचा सर्वांत शेवटचा गाळ, तरकुटेच ( कोंडा ) आणला होता. पण द्वारकेत गेल्यावर पंचपक्वान्नाचे भोजन ज्याने सुवर्णाच्या ताटात घातले, पीतांबर नेसायला दिला, त्याला असले पोहे कसे द्यायचे, म्हणून. त्याने लज्जित होऊन दिले नाहीत. पण भगवंतांनी ते पोहे सुदाम्याकडून हिसकावून घेतले, ते मुद्दामच. त्यांना पोह्यांची भूक नव्हती तर भावनेची भूक होती.

तसेच विदुराच्या कण्या खाल्ल्या. दुर्योधन होता तर तिकडे भगवान गेले नव्हते. ' भक्त्या हि तुष्यन्ति महानुभावा: ' प्रिय व्यक्तीने तुम्हांला बोलावून मिलोचे पोहे दिले तरी खाता. का ? तर प्रेमाकरताच. ' तद्वतच भक्तांच्या सद्भावनेकरता भगवान अर्घ्यप्रदान म्हणजे ओंजळभर किंवा पळीभर पाण्यानेही संतुष्ट होतो.'

भगवान म्हणतात, ' पळीभर किंवा ओंजळभर पाण्याने मी भक्तांवर थोडासा संतुष्ट होतो. पण मी ' कर्तुं अकर्तुं अन्यथा कर्तुम् ' समर्थ असून अनंतकोटी ब्रह्मांडांचा नायक असल्याने अशाची थोडी प्रसन्नताही भक्तांच्या दृष्टीने विपुलच ठरते. मात्र या करता कर्मे निष्काम व ईश्वरार्पण केली पाहिजेत ही अट आहे.

तुम्ही सकाळपासून रात्रीपर्यंत आपल्या घरची सर्व कामे निष्काम करीत नाहीं काय ? पतीला असे म्हणता काय ? की मी तुमच्याशी विवाह केला आहे म्हणून तुमचे कपडे धुईन, जेवायला वाढीन. पण पाहुण्यांना काय म्हणून वाढू ? घरकामाचे पैसे उठल्यासुटल्या मागता काय ? स्वत:साठी चोवीस तास उद्योग करता; मग ईश्वरासाठी एखादा करायला काय हरकत आहे ? विष्णुसहस्रनाम रोज म्हणायचे. १०।१५ मिनिटे लागतील. रोजची १० मिनिटे साठता साठता वर्षाची ३६०० मिनिटे होतील. त्यावेळी तुम्हांला प्रसन्न वाटेल. अशी चाळीस वर्षे गेल्यावर ईश्वर म्हणतो, ' तुमचे हे सुंदर कर्म माझ्या उरावर बसते व मला त्याचे फळ देणे भाग पडते. ते जरी त्यांच्या म्हणजे अर्थात भक्तांच्या दृष्टीने अल्प असले, तरी माझ्या दृष्टीने महानच असते. भक्ताचे पुरे झाले नाही, अदृष्ट म्हणून. त्याच्या इच्छेला प्रतिबंध आला पण माझ्या इच्छेला प्रतिरोध कोण करू शकेल ? ईश्वर म्हणतो, ' माझ्या भक्ताला मी काय देणार ? कारण असा भक्त भार्या, पुत्र, धन वगैरे पदार्थांना, ऐश्वर्यालाही तो फळ म्हणायला तयार नसतो. माझ्याविषयी उत्कृष्ट प्रेम किंवा ज्ञान हेच त्या भक्ताला देणे मला भाग पडते.

दददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते ।

पण हे दिले हे मी दाखवत मात्र मुळीच नाही. त्यामुळे मला हे ईश्वराचे कर्म करायची बुद्धी झाली, चांगले झाले असे म्हणतो व उत्कृष्ट भक्त असेल तरच मला ही सुंदर बुद्धी ईश्वरानेच दिली हे जाणतो.

व्यवहारात मोठ्या माणसाचे काम केल्यावर फळ मागता काय ? मुळीच नाही. कारण त्याने ते फळ तत्काळ न देण्यातच समाधान असते. कलेक्टर मंडईत आले असताना त्यांची पिशवी खाली पडली; ती तुम्ही उचलून दिली तर लगेच पैसे मागायचे का? दुसऱ्या दिवशी पेपरमध्ये जाहीर होऊन तुमचा गौरव होतो. म्हणून ईश्वरासारख्या महान पुरुषाजवळ काही मागण्यात तात्पर्य नाही. न मागण्यातच लाघव आहे, न मागताच क्रमाक्रमाने तो देत असतो. पेपर तपासणारा उदार असेल तर विद्यार्थ्यांच्या चार ओळी वाचून म्हणतो, याला कळले आहे पण मांडता आले नाही. म्हणून चार मार्क देऊन मोकळा होतो. ( पण कद्रू असेल तर गुण देत नाही.) पण ईश्वर असा उदार स्वभावाचाच आहे. केलेल्या कर्मामागची भावना पाहून तो फळ देऊन मोकळा होतो. केलेल्या कर्माचे फळ तुम्ही न घेतले तरी ईश्वरमात्र तुम्हाला दिल्याशिवाय रहात नाही, म्हणून त्याने सांगितलेले एखादे निष्काम कर्म करा की त्यामुळे तो संतुष्ट होतो.

**व्यवसायात्मिका बुद्धिरेकेह कुरुनंदन ।**
**बहुशाखा ह्यनन्ताश्च बुद्धयोऽव्यवसायिनाम् ॥ ४१ ॥**

अर्जुना, निश्चयात्मक बुद्धी एकच असते. पण अव्यवसायी म्हणजे सकाम पुरुषांच्या बुद्धीला मात्र अनंत फाटे फुटलेले असतात.

अर्जुन म्हणाला, ' ईश्वराचा उदार स्वभाव असल्यामुळे आरंभलेले कर्म तडीला जरी गेले नाही तरी तो फळ देतो, हे कबूल, तसेच तो अनंत गुणशाली व अपरिमित ऐश्वर्यसंपन्न असल्यामुळे भक्ताने केलेले कोणतेच

कर्म त्याच्या योग्यतेचे होणार नाही. विगुणच होणार. कितीही खबरदारीने केले तरी. त्यामुळे त्यातल्या दोषांकडे तो दुर्लक्ष करीलच. केलेल्या अल्पानेही तो संतुष्ट होईल, हेही मान्य. पण ' स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात्। ' हे कसे जमणार? कारण ' ज्ञानादेव तु कैवल्यम् ' असे श्रुतिस्मृतिपुराणे एकमुखाने सांगतात. मृत्यूचे भय ज्ञानानेच जाते. बाकी कशानेही जात नाही. दवाखान्यात प्रवेश मिळण्यासाठी तुम्ही वशिला लावू शकाल. पण मृत्यूपुढे कुणाचा लावणार? तुम्ही साधी टाचणी किंवा सुई हरवली तरी बेचैन होता. मग अत्यंत प्रिय असणारा देह सुखासुखी मरणकाळीं सोडाल काय? पण ज्ञानी मात्र अगदी सहज आनंदाने सोडतो. त्याअर्थी त्याची मृत्यूची भीती गेलेली असते हेच सिद्ध होते. तो म्हणतो, ' देह पंचमहाभूतांचा अत्यंत परिमित व जड आणि आत्मा चेतन, व्यापक त्यापेक्षा पूर्णपणे वेगळा आहे तोच मी. हे ज्ञात झाल्यावर देह हा धर्मशाळेप्रमाणे मानतो. धर्मशाळेत तुम्ही जाता. कामापुरता तिचा उपयोग करून पुन: चालू लागता. देहाचेदेखील तसेच. तो ज्ञानापुरता घेतलेला असतो. ज्ञान झाल्यावर तो सोडून द्यायचा. अशाप्रकारे ज्ञानानेच मृत्युभय जाते, असे शास्त्र म्हणते व तुम्ही तर कर्मयोगाने जाते म्हणता. यापैकी खरे कोणते? '

भगवान म्हणाले, ' कर्मयोगाने देखील मृत्युमय जाते. फक्त ज्ञानद्वारा येवढेच. ' ' एकं सांख्यं च योगं च य: पश्यति स पश्यति। ' कर्मयोग व सांख्य दोन्ही एकच आहेत. साधनसाध्य किंवा जन्यजनक भाव आहे. इथे ऐश्वर्य मिळाले असेल तर गतजन्मी सुकृत केले असले पाहिजे. इथे सुकृत केले तर पुढे मिळेल.

ऐश्वर्य, बल, बुद्धी हे सारे सुकृताशिवाय मिळत नाही. कारण ते भगवदंश आहेत म्हणून. त्रिविक्रम अवतारामध्ये भगवंतांनी वामनरूपाने

बळीकडे त्रिपादभूमी मागितली. शुक्राचार्यांनी सांगितले, ' तू याला देऊ नकोस. हा सामान्य नसून महाविष्णू आहे.' तरीसुद्धा बळीने दिली. भगवान म्हणाले, ' तू देतो म्हणालास त्याचे फळ म्हणून तुला पाताळाचे राज्य देतो. मी स्वतः गदापाणी होऊन त्याचे रक्षण करीन.' ज्ञानरुपाने हे जे बळीला मिळाले ते सुकृताशिवाय असेल काय? मागे ते होतेच. त्याचप्रमाणे इथे ज्ञान झाले असेल तर मागे कर्मयोग असलाच पाहिजे. इथे कर्मयोग केला तर पुढे ज्ञान अवश्य होणारच. असा त्यांचा जन्यजनक-भाव आहे. कर्म हे जनक किंवा साधन व ज्ञान हे जन्य किंवा साध्य आहे. म्हणून अर्जुना, मी सांगितलेले व शास्त्र यात विरोध बिलकूल येत नाही. कर्म हीं ज्ञानाचे अंग असून ज्ञान हे अंगी आहे. व्यवसायात्मिका बुद्धी म्हणजेच कर्म व ज्ञान एकच ही बुद्धी.

मीमांसक म्हणतात, कोणतेही कर्म स्वतः फल देत नाही. त्यामागे संकल्प असेल तरच देते. पण भक्ताने कर्मे निष्काम केलेली असतात. त्यामुळे ईश्वर म्हणतो, ' त्याचे फळ देता येत नाही. ' म्हणून तो त्याचा विनियोग भक्ताच्या चित्तशुद्धीकडे करतो. कर्म करताना मागे बुद्धी कोणती आहे यावर फल अवलंबून असते. क्रिया निमित्तमात्र असल्याने अल्प असली तरी हरकत नाही. गजेंद्र पशू होता. पण, ' त्रैलोक्यगुरो भगवन् नमस्ते ' म्हणाला. ईश्वराचे पूजन करावे या बुद्धीने त्याने पुष्प फेकले, तर त्याला भगवंताने मुक्त केले. ' विध्यामीति धिया तदेव कुसुमं भस्मीकृतो मन्मथः । तेच फूल, तुला ठार करतो या बुद्धीने मदनाने फेकल्यावर त्याला ईश्वराने भस्म केले.' आपण जयंतीला व पुण्यतिथीला देवावर किंवा साधुसंतांवर फुले टाकत नाही काय? पण झाडावरचे आंबे, चिंचा, आवळे पाडताना, दगड मारताना जी बुद्धी असते ती यावेळी नसते. पूज्यबुद्धी असते. त्यामुळे ईश्वर प्रसन्न होतो. तुकाराम ' रामकृष्णहरि ' मंत्राचा जप करतात व आम्हीही

करतो पण त्यांच्यापुढे तो साक्षात प्रकट होतो व आमच्या पुढे मात्र म्हैसच येते. आमचा जप वाचिकच ठरतो. हा फरक बुद्धीमुळेच पडतो.

ज्या वकिलाला अशिलांची वाण असते, तो शंभर रुपये घेऊन खटला चालवतो. पण बॅरिस्टर म्हणतो सतराशेहे रुपये पाहिजेत. ते आधी हातात पडले तरच तासभर बोलेन. कारण त्याची बुद्धीच तितकी वाढलेली असते. ज्यांना बुद्धी नसते त्यांचे फक्त तास मोजायचे. किती काम केले? ९ ते १२ पर्यंत गवंड्याला म्हणायचे तासी १ रु. प्रमाणे ३ रु. घे. तो पाट्या टाक म्हटले की टाकतो, नको म्हटले की गप्प बसतो. सुतार रंधा मारतो. त्याने थोडा अधिक अभ्यास केलेला असतो. म्हणून त्याला थोडे जास्त पैसे द्यायचे. इंजिनियरला सर्वात जास्त. कारण त्याने नकाशा तयार केलेला असतो.

सत्यनारायणाचे पूजन करताना, खुद्द पूजेकडे लक्ष बेताचेच असते. विद्‍युत् रोषणाई, रांगोळ्या, फोनो, केळीचे खुंट, फळे याकडेच अधिक लक्ष असते. पूजा करताना कोणी ओळखीचा असल्यास भटजींना थांबवितो. 'साहेब या, या. आसनावर बसा म्हणतो. तो म्हणतो, 'त्यांचे जर स्वागत केले नाही तर बरे दिसणार नाही. गैरमर्जी होईल. पण त्या खुळ्याला एवढे कळत नाही की, तिकडे देवाचे आवाहन करून त्याला आसनसुद्धा दिलेले नाही. त्याची गैरमर्जी होणार नाही काय? पाहुण्यांना खुशाल बोलवा. पण त्याकरता तुम्ही स्वत: पूजा करताना का उठता? त्याकरता स्वागताध्यक्ष स्वतंत्र नेमा. पण ईश्वर म्हणतो, 'हे सर्व करायच्या आधी त्याची पूजा करण्याची भावना होती ना? मग ती पुढे गेली असली तरी मी तेवढ्याचेही फल देतो.'

दहा माणसांनी स्वर्गप्राप्तीकरता एकच कर्म केले तरी ते सर्वांचे सारखे होत नाही. स्वर्ग जरी झाला तरी तिथे शिपाई आहेतच, ज्याची

बुद्धी सुंदर त्याला देवेन्द्र किंवा बृहस्पती करायचे. बेताची बुद्धी असेल त्याला तिथला शिपाई करायचा.

सांख्य व कर्मयोग एक मानल्याशिवाय, निश्चय केल्याशिवाय मागची कर्मे थांबणार नाहीत. म्हातारा झाला तरी कर्मे संपत नाहीत व ती दुसऱ्यांना पटत नाहीत. नको म्हटले तरी भाजी आणतोच. तरुण म्हणतो, चार पैशाचा शिळा पाला याने कशाला आणला? मी एक रुपया किलोप्रमाणे छानदार बटाटे आणतो. याकरता फक्त मागचा निश्चय बदला. ' ईश्वरसंतोषात् सर्वं लभते । ' हा निश्चय असू दे, की काम होते. मात्र हा निश्चय ज्यांचा नसतो, त्यांच्या मागचे कर्म कधीच संपत नाही. त्यांना ज्ञानही होत नाही. एकच कर्म दहा जणांनी केले तर भिन्न भिन्न होते. पण ज्ञानात मात्र फरक नसतो. वामदेवाला गर्भात ज्ञान झाले म्हणून त्याचे लहान व चांगदेवाला चौदाशेहे वर्षांनी झाले म्हणून त्याचे मोठे नव्हे. साऱ्यांचे सारखेच. कारण ' सर्वे ते ज्ञानिनः समाः । ' असा सिद्धांतच आहे.

**यामिमां पुष्पितां वाचं प्रवदन्त्यविपश्चितः ।**
**वेदवादरताः पार्थ नान्यदस्तीति वादिनः ॥ ४२ ॥**

अविद्वान लोक पुष्पित वाणीला म्हणजे सकाम कर्मकांडालाच प्रवदन्ति म्हणजे उत्कृष्ट वाणी म्हणतात. हे लोक वेदवाद करतात व ( स्वर्गाचीच इच्छा करणारे ) या खेरीज वेदामध्ये दुसरे काहीच नाही असे मानतात.

खरे म्हणजे फुले येणारी झाडे चांगली का फळे येणारी चांगली? केव्हांही फळे येणे हीच शेवटची अवस्था आहे. त्याचप्रमाणे स्वर्गापेक्षा ज्ञान श्रेष्ठ हे याज्ञिकांना समजायला पाहिजे. पण समजत नाही. वेदवाद म्हणजे अर्थवाद-स्तुती. सकाम कर्मांचीच स्तुती करतात. उदा. चातुर्मास याग केला की अक्षय्य स्वर्ग मिळतो. अशी स्तुती वेदात आहे. याज्ञिक हेच धरून बसतात. दर्शपूर्णमास यागाने, ज्योतिष्टोमाने, पूर्णाहुती

दिली की स्वर्ग मिळतो. ही पूर्णाहुती पाच मिनिटात होते व खण आणि नारळ व तूप एवढाच खर्च हिला येतो. दर्शपूर्णमास यागाला ४ब्राह्मण व ४ तास लागतात. ज्योतिष्टोमाला सहा दिवस लागतात. सोळा ऋत्विज, यजमान व यजमानपत्नी असे अठराजण लागतात. हजार रुपये खर्च येतो. यज्ञ करण्यापूर्वीच ब्राह्मण ' को यागः का दक्षिणा ' म्हणून प्रश्न करतात. यज्ञ निम्मा झाल्यावर निम्मी दक्षिणा आधीच द्यावी लागते. ब्राह्मण म्हणतात, ' कदाचित यजमान यज्ञ पूर्ण न करताच निघून गेला तर? म्हणून आधी दक्षिणा घेतात. वरील दोन्ही स्वर्गप्राप्तीची साधने आहेत. पण दोन्हीने मिळणारा स्वर्ग एकाच तऱ्हेचा नाही.' जैमिनी म्हणतो, ' साधनात जर तरतमभाव असेल तर फळात तरतमभाव येणारच.' हे मानणे भाग आहे. मान्य नसेल तर चार ब्राह्मणांच्या भोजनाने जिथे भागते, तिथे सोळा ब्राह्मण जेवायला घालायचा आटापिटा कोण करणार? कमी प्रतीचे कर्म करणाऱ्याला कमी प्रतीचा स्वर्ग मिळतो. व त्यापेक्षा उत्कृष्ट कर्म करणाऱ्यालाच उत्कृष्ट प्रतीचा स्वर्ग मिळतो. उत्कृष्ट मिळालेला पाहिला की कमी प्रतीचा मिळालेला असतो, त्याला दुःख होते.

परसंपदुत्कर्षः हीनसंपदं दुःखीकरोति।

स्वर्गाबद्दलच नव्हे तर व्यवहारातही हा नियम लागू आहे. त्याकरताच शास्त्रकार म्हणतात, 'दुसऱ्याची संपत्ती पाहूच नका, असे नाही. पण फक्त दृष्टिकोन बदला.' मैत्री, मुदिता, करुणा, उपेक्षा या चार भावना आहेत. त्यापैकी तो धनवान आपला मित्र आहे अशी भावना करा. मित्राचा पगार वाढला की तुम्हांला सुख होते का दुःख होते? सुख होते. हे न जमल्यास आपल्यापेक्षा कमी प्रतीच्या लोकाकडे पहा. त्याला ५० रु. पगार आहे. मला १५० रु. म्हणजे त्याच्यापेक्षा तिप्पट आहे. या विचाराने सुख अधिक होते.

**कामात्मानः स्वर्गपरा जन्मकर्मफलप्रदाम् ।**
**क्रियाविशेषबहुलां भोगैश्वर्यगतिं प्रति ।। ४३ ।।**

इंद्रियजन्यसुखाची इच्छा करणारे स्वर्गालाच परमपुरुषार्थ मानतात. ज्या वाणीत पुष्कळ क्रिया सांगितलेल्या आहेत व जी भोग आणि ऐश्वर्य देते व जन्ममरणरूपी फल देते, तिला प्राधान्य देतात.

स्वर्गात अप्सरांचे विलास आहेत. कामधेनू, नंदनवने, चिंतामणी यासारखे पदार्थ आहेत. अशा स्वर्गाला कामात्मानः म्हणजे विषयी लोक परमपुरुषार्थ मानतात. मर्त्य लोकात भोग असतील तर ऐश्वर्य नसते. ते असेल तर भोग नसतात. उदा० एक राजा आहे, त्याला ऐश्वर्य आहे, पण जन्मभर तो आजारीच आहे, त्याला खाण्याची इच्छाच होत नाही. खाल्ले तर रुची नाही, पचत नाही. म्हणजे ऐश्वर्य असून भोग घडत नाही. पण त्या उलट त्याचा शिपाई मात्र शिरा, फळे, पक्वान्ने या सर्वांवर ताव मारतो. त्याची प्रकृती सुंदर आहे, म्हणजे शिपायाला ऐश्वर्य नसताना भोग मिळतात. एखादाच भाग्यवान असतो; त्याला ऐश्वर्य व भोग दोन्ही अनुकूल होतात. पण स्वर्गात मात्र भोग सर्वांना घडतात. हेच स्वर्गाचे वैशिष्ट्य. जास्त आवडणारा पदार्थ कितीही खा. अजीर्ण कदापि होणार नाही. म्हणूनच लौकिक क्रियेने स्वर्ग मिळत नाही. त्यासाठी शास्त्रीय क्रिया, यज्ञादी कराव्या लागतात.

आता स्वर्गातले दोष पहा. मेल्यावाचून स्वर्ग दिसत नाही, हे सर्वांना माहितच आहे. हा प्रधान दोष. असे का असावे ? याचे कारण स्वर्गीय भोग घेण्याचे सामर्थ्यच आपल्या मानवी शरीरात नसते. ग्रामसूकर आहे, त्याला अत्तर किंवा चंदन लावले तर त्याचा सुवास कळेल काय ? त्या शरीराची ती योग्यताच नाही. त्याचप्रमाणे मर्त्य देह स्वर्गीय भोगाकरता अयोग्य ठरतो. त्याकरता येथील देह सोडला पाहिजे. म्हणजे मृत्यू आला व ' जातस्य हि ध्रुवो मृत्युः ध्रुवं

जन्म मृतस्य च ' या न्यायाने स्वर्गात जन्म घेतला पाहिजे. जन्म म्हटला की क्लेश आलेच. शिवाय पुण्य संपले म्हणजे स्वर्गातून खाली मर्त्यलोकात ढकलून देतात. ' क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति ।' यावर ज्ञानेश्वर म्हणतात ' तुमच्याकडचे धन संपले की, तुम्ही आलेले पाहून वेश्या ज्याप्रमाणे द्वार लावून घेते, त्याप्रमाणे पुण्य संपले की तुम्हांला मर्त्यलोकात ढकलून स्वर्गाचे द्वार लावले जाते ! म्हणून स्वर्ग हा परमपुरुषार्थ कदापि होऊ शकत नाही.

पण मोक्षात तसे नाही. कारण त्याचे साधन ज्ञान आहे त्यात तरतमभाव नाही. म्हणजे साधनात तरतमभाव नाही. मग साध्यात कसा येईल? शिवाय ' याचि देही याचि डोळा ' मुक्तीचा सोहळा पाहता येतो, पण याच जन्मी, म्हणजे मेल्याशिवाय स्वर्ग नाही, हा प्रकार येथे नाही. ' क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति ' हा अधःपात स्वर्गात आहे. पण मोक्षापासून च्युती कदापि नाही. ' यद्गत्वा न निवर्तन्ते तद् धाम परमं मम ! '

**भोगैश्वर्यप्रसक्तानां तयापहृतचेतसाम् ।**
**व्यवसायात्मिका बुद्धिः समाधौ न विधीयते ॥४४॥**

भोग आणि ऐश्वर्य यांच्या ठिकाणी आसक्त होण्याच्या योगाने ज्यांची विवेकबुद्धी आच्छादित झाली आहे, अशा पुरुषांच्या अंतःकरणात आत्मविषयक बुद्धी स्थिर होत नाही.

हे लोक इंद्रियजन्य सुखातच इतके गर्क झालेले असतात की, त्यामुळे ' अपहृतचेतसां । ' म्हणजे त्यांचा विवेक पूर्ण नष्ट झालेला असतो. मनुष्यजीवन हे विवेकप्रधान आहे. पशूपुढे वैरण टाकल्यास तो ती पाहिजे तेवढी खातो व बाकीची पायाखाली तुडवून त्यात लघुशंकाही करून मोकळा होतो. त्यातील उरलेली वैरण उद्या खावी हा विचारही त्याच्या मनात येत नाही. पण मानवाचे पहा. त्याला शंभर आंबे दिले

तर त्यातील मऊ मऊ आंबे तो प्रथम खातो. घट्ट व कच्चे उद्यासाठी, परवासाठी, चार दिवसांसाठीही टिकणारे व्यवस्थित टिकतील अशा तऱ्हेने ठेवतो. काही प्रियजनांना, मित्रांना देतो. म्हणजे पुढचा विचार मानवाला आहे. पण पशूला नाही. म्हणूनच मानव सर्वांत श्रेष्ठ आहे.

अर्जुन म्हणतो, ' वेदांमध्ये जसे सकाम कर्मांचे वर्णन आहे, तसेच पुढे भक्तीचे व ज्ञानाचेही आहे, मग तो ते का पहात नाही ? " भगवान म्हणाले, ' हे लोक विवेकांध असतात म्हणून ' व्यवसायात्मिका बुद्धिः समाधौ न विधीयते ' निष्काम कर्मयोगाने किंवा भक्तीने ज्ञान होते हे त्यांना पटत नाही. त्यांचा तसा निश्चय नसतो.' ' शास्त्रकार म्हणतात, ' आपल्या उत्कर्षार्थ तुम्ही खुशाल सकाम कर्मे करा. पण स्वतःसाठी एखादे तरी निष्काम कर्म करा. '

ज्ञानेश्वर म्हणतात, ' तरी गा ऐसे करीं । यया आठा पहारां माझारीं । मोटकें निमिषभरी । देतु जाय ॥ ' तेवीस तास व्यवहाराकरता घालवा पण ईश्वराकरता एखादा तरी तास द्या. जप, तप, ध्यान पाच मिनिटे तरी करा. भगवान म्हणतात, ' अर्जुना, तू साठ वर्षांचा आहेस. आतापर्यंत तू काय केलेस ? फक्त धनुर्वेदाचा अभ्यास. पण तो अभ्यास पुढे तुझ्याबरोबर येणार आहे काय ? लोक कष्ट करून पैसा साठवितात. पण तो शेवटी त्यांच्याबरोबर जातो काय ?

धनं च भूमौ पशवश्च गोष्ठे कांता गृहद्वारि जनः श्मशाने ।
देहश्चितायां परलोकमार्गे कर्मानुगो गच्छति जीव एकः ॥

असे असतानाही त्याने साधक का होऊ नये ?

समजा, धन तुम्ही साठविले तर त्याचा विनियोग वार्धक्यात तुमच्या मनाप्रमाणे करता येईल काय ? तो खर्च करताना मुलगा नको म्हणतो, किंवा नातू, काहीवेळा प्रत्यक्ष बायको आड येते. तुमची इंद्रिये शिथिल झालेली असतात व किल्लया त्यांच्या ताब्यात असतात.

त्यामुळे कांही एक चालत नाही. संपत्तीत मुलगा हट्टाने वाटणी मागतो. पण एकशेहे एकवीस एकादष्ण्या तुम्ही केलेल्या असतील तर त्यातल्या साठ मुलगा मागू शकतो काय? समजा, त्याने मागितल्या तरी मिळतील कशा? तुम्ही पैशाच्या राशी मुलाकरता ठेवल्या तरी तो तुमचे गुण गाईलच असे नाही. म्हणून बायकामुलांसाठी तुम्ही अवश्य कर्म करा. ते देखील कर्तव्यच आहे. पण 'आत्मार्थं सततं रक्षेत् दारैरपि धनैरपि।' हे विसरू नका.

निष्काम कर्माचा दोष हाच की, 'बहूनां जन्मनामन्ते ज्ञानवान् मां प्रपद्यते।' त्याचे फळ दीर्घकाळानंतर येते. याउलट सकाम कर्माचे फल इथेच किंवा पुढच्या जन्मी मिळते. 'क्षिप्रं हि मानुषे लोके सिद्धिर्भवति कर्मणां' असे त्याकरताच म्हटले आहे. तरीसुद्धा महत्फलाकडे दृष्टी देऊन दिवसातून एखादे तरी निष्काम कर्म ईश्वरार्पण बुद्धीने कराच.

**त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन।**
**निर्द्वन्द्वो नित्यसत्त्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान् ॥४५॥**

अर्जुना, वेद त्रिगुणाचे प्रतिपादन करणारे आहेत. पण तू मात्र त्रिगुणातीत, द्वन्द्वरहित, सत्त्वगुणामध्ये नेहमी राहणारा, योगक्षेमाची चिंता न करणारा व आत्मनिष्ठ असा हो.

स्वर्गालाच परमपुरुषार्थ मानून लोक सकाम कर्मे करतात, ते मोक्षाला मुकतात. हे ऐकल्यावर अर्जुन म्हणाला, 'सहस्रमातृपितृभ्य: अपि हितैषी वेद: ।' अशी ह्या वेदाची महती आहे.

परी अहितापासूनि काढिती । हित देऊनी वाटवती ।
नाही श्रुतिपरौती । माउली जगा ॥

मातापित्या पेक्षाही अनंतपटीने ज्यांना वात्सल्य आहे. त्या वेदांनी मुळात सकाम कर्मे कशाला सांगावीत? अज्ञ लोक ती करतात, त्यामुळे त्यांचा मार्ग चुकतो.

भगवान् म्हणाले, ‘ लहान मुलगा, प्रथम सुखासुखी शाळेला जातो काय ? तो रडतो. आकांत करतो. त्याला ओढून नेत असताना भर रस्त्यात गडबडा लोळतो. शाळेतून मध्येच पळून येतो. मग त्याला माता म्हणते, ‘ तू शाळेत गेलास तर तुला मोठा छानदार लाडू देईन.’ ह्या आमिषाने तो रोज शाळेत जाऊ लागतो. अमुकच रंगाचे पाकीट हवे म्हणतो. फाउन्टनपेन मागतो. खरे म्हणजे त्याला धड लिहायलासुद्धा येत नसते. ते कसे धरावे याचा गंधही नसतो. पण त्याच्या समजुतीकरता चार आण्याचे का होईना घेऊन द्यावे लागते. भाजी भाकरी घालून डबा भरून द्यावा लागतो. तिथे जाण्यापूर्वी घरी काय तो जेवलेला नसतो ? परत घरी आल्यावर जेवता येत नाही ? पण देतातच. दोन चार महिने असे गेले म्हणजे सवय होते. मित्र मित्र मिळतात. मग आई म्हणते, ‘ लाडू संपले बर का ! ’ तो म्हणतो, ‘ हरकत नाही. उद्या करून दे. पण शाळा बुडविणार नाही. कारण आज परीक्षा आहे ना ! ’

अर्जुना, या लहान मुलाप्रमाणेच काही हट्टी लोक असतात. फळ दाखविल्याशिवाय ते हलतच नाहीत. त्यांच्याकरता सकाम कर्माची युक्ती श्रुतीने केली आहे. जग रजोगुण व तमोगुण असलेल्या लोकांनीच व्यापलेले आहे ‘ कट्वम्ललवणात्युष्णतीक्ष्णरूक्षविदाहिनः । ’ अशा रजोगुणी लोकांना दूध,केळी,रवा,म्हटल्यावर ते म्हणतात,हे नको. कांद्याची गरमगरम खमंग भजी आणा. शाळेमध्ये किंवा अन्य कुठल्याही संस्थेत हुशार किती असतात ? हाताच्या बोटावर मोजण्याइतकेच. मंदमात्र हजारो असतात.

एकाच मातापित्याच्या दहा मुलांपैकी एखादाच सत्त्वगुणी असतो. सारांश, जगात रजोगुणी व तमोगुणी लोकांची संख्याच फार आहे. त्यांच्याकरता श्रुतीने सकाम कर्म सांगितले आहे.

चष्मा लावल्यावर प्रथम सवय नसते म्हणून लोक फारच कुरकुरतात. पण कांहीं दिवसानी चष्मा लावला नाही तर डोके दुखते. अक्षरे नीट दिसत नाहीत. इचलकरंजीला रात्रंदिवस माग सुरू असतात. त्याची खटखट चालू असते. त्यामुळे नवख्या माणसाला रात्री झोप लागत नाही. पण तिथले लोक म्हणतात की, खटखट थांबली की आम्ही दचकून जागे होतो. पोटाचे काय? हा प्रश्न दत्त म्हणून समोर उभा राहतो.

लग्नात वराला धोतर नेसून व उपरणे पांघरून उभा रहा म्हटले तर नाही म्हणतो. त्यावेळी ' संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते । ' इतके अतोनात दुःख होते. गोठ्यात शेण काढता तेव्हा तुमचा पोशाख कसा असतो? मोटार स्वच्छ करताना तिच्या खाली पडता, तेव्हा कसा असतो? तोच पोशाख वरातीतून वाजत गाजत जात असताना असतो काय? विवाहप्रसंगी ' साक्षिण्यः सर्वदेवताः ' ' देवाग्निद्विजसंनिधौ ' हे जवळ असतात. मग त्यांच्या प्रसन्नतेसाठी त्यांच्या मनाप्रमाणे पोशाख, आचार असायला नको काय? यावेळी तयार नसला तरी लग्नानंतर दुकान घातल्यावर उद्घाटनाकरता, सत्यनारायण केल्यावर, सुटाबुटात न बसता शुचिर्भूत होऊन सोवळ्याने पूजेला बसतो. कामना असते म्हणून नियम पाळतो. सोवळ्याचे वारेसुद्धा नसलेल्यांना सोवळ्यात स्वयंपाक करा म्हटले की, अतोनात दुःख होते. इकडे लागायचे नाही, तिकडे लागायचे नाही, ही काय कटकट, असे म्हणतात. पण एकदा ते अंगवळणी पडल्यावर सहज करतात. हाताखाली बरेच पदार्थ द्यायला नसले तरी अगोदर सारी जुळणी करून घेतात. त्याचप्रमाणे एकदा सकाम कर्माची सवय झाल्यावर निष्काम कर्म जड जात नाही. सवय होण्याकरताच वेदाने प्रथम सकाम कर्म सांगितले आहे.

पण अर्जुना, तू मात्र हट्टी नाहीस, म्हणून फळ मागू नकोस. शुद्ध स्वभावाचा आहेस. म्हणून एकदम निष्काम कर्मच कर. त्रिगुणातीत

होणे हेच ध्येय आहे. पण एकदम ती उडी मारता येत नाही. म्हणून सत्त्वगुण वाढव, की रजोगुण, तमोगुण हतबल होतात. ‘ सत्त्वात् संजायते ज्ञानम् । ’ तो वाढण्याकरता आहार, विहार, उच्चार, झोपणे, बसणे यात विशिष्ट नियम पाळावे लागतात. हे नियम म्हणजेच धर्मशास्त्र. इथे बसा, तिथे बसू नका, म्हटल्यावर अधार्मिक मनुष्य म्हणतो, ‘ मी काय म्हणून बाजूला बसू? खाली बसू? मी काय बहिष्कृत आहे? ’ पण धर्मशास्त्र ज्याच्या अंगवळणी पडले, तो खाली बसण्यात मुळीच कमीपणा मानीत नाही. उलट जो नम्र असतो तोच मोठा असतो. म्हणूनच तर ज्ञानेश्वर म्हणतात,

> थोरपणा पऱ्हा सांडिजे । एथ व्युत्पत्ति आवधी विसरिजे ।
> जै जगा धाकुटे होईजे । तै जवळीक माझी ॥

अर्जुन म्हणाला, ‘ सर्वोत्कर्ष व्हावा हे मान्य आहे. पण व्यवहारात हे जमायचे कसे? सुखदुःख, शीतउष्ण, लाभअलाभ यासारखी द्वन्द्वे आघात करत असतात. ’ भगवान म्हणाले, ‘ ती सहन कर. जरी विलाप केला तरी सहन केल्याखेरीज गत्यंतर नसते. मग ईश्वरसंतोषाकरता प्रथमच का सहन करू नयेत? जो ती सहन करतो त्यावर विघ्नेसुद्धा विचार करूनच येतात. कारण हा असले काही एक चालू देत नाही; हे ती जाणतात. आपला रक्षणकर्ता परमेश्वर आहे, ही बुद्धी ठेव. म्हणजे अडचण नाही. युद्धाच्या आरंभी राजा धर्माने तुला माझ्या स्वाधीन केले व तुझे रक्षण करायला सांगितले. सर्वांपासून रक्षण करणे सोपे आहे. पण मृत्यूपासून रक्षण करणे फार अवघड आहे. अर्जुना, जो मी तुझे मृत्यूपासून रक्षण करतो तो साध्या जीवनाचे रक्षण करू शकणार नाही काय? सत्त्वगुण वाढव. पण तो वाढला हे तरी कशावरून ओळखायचे? निष्कामता आली असेल तर. रागद्वेष मावळले असतील तर.

**यावानर्थ उदपाने सर्वतः संप्लुतोदके ।**
**तावान् सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानतः ॥ ४६ ॥**

सर्वत्र पाणीच पाणी झाले तरी, आपणास तहान असेल तेवढेच घ्यावे. त्याप्रमाणे ज्ञानी संपूर्ण वेदाचा विचार करून त्यातील आपणाला जे अपेक्षित आहे, त्याचे ग्रहण करतात.

अर्जुन म्हणाला, ' तुम्ही मला फक्त नित्य नैमित्तिक कर्मेच कर व काम्य कर्मे करू नको म्हणता. वेदासारख्या श्रेष्ठ वाक्यांनी सांगितलेली कर्मे, जरी ती सकाम असली तरी मी ती सोडल्यावर सोडल्यावर आज्ञाभंगाचा दोष नाही का लागणार ? प्रत्यवाय नाही का येणार ? ' भगवान म्हणाले, ' एक सरोवर तुडुंब भरलेले आहे. तहान भागवण्यासाठी तू तिथे गेलास. तर किती पाणी पिशील ? फार तर तांब्या, दोन तांबे एवढेच. पण बाकीचे प्याला नाहीस म्हणून दोष लागेल काय ? दवाखान्यात हजारो औषधे असतात; पण त्यातली सर्व घ्यायची काय? त्याचप्रमाणे श्रुतीने सांगितलेली काम्यकर्मे डावलल्यास तो दोष ठरणार नाही.' अर्जुन म्हणाला, ' हे मला पटले. पण सकाम कर्मांचा आनंद मला कसा मिळणार ? मी त्यांना मुकणार नाही काय ? प्रत्येकाला वेगवेगळ्या साधनापासून आनंद मिळत असतो. एकाच पदार्थापासून नाही. म्हणूनच तर आनंदप्राप्तीसाठी प्रत्येक जण आपल्या मनाप्रमाणे वेगळेच साधन स्वीकारतो. कुणाला स्वकष्टाने पण मानाने पैसा मिळून निर्वाह करण्यात आनंद वाटतो. पण भिकारी म्हणतो, ' मला दारोदार भीक मागण्यात सुख होते.' सम्राट म्हणतो, ' मी लोकांवर सत्ता गाजवतो. सर्वांत मोठा म्हणून लोक माझा बहुमान करतात. माझा हा आनंद सर्वांत मोठा आहे.'

आनंद हा अमूर्त आहे. तो मोजायचा कसा? अशी शंका घेऊ नका. शास्त्रकारांनी तेही माप ठरवले आहे. ' सम्राटाचा आनंद ' हे एक माप. उदा. राजा धर्माने राजसूय यज्ञ केला. तेव्हा तो

स्वतः रूपवान होता. गुणवान होता. धार्मिक असून आरोग्यसंपन्न होता. सर्व प्रजा त्याच्यावर अनुरक्त होती. द्रौपदीसारखी सुंदर पतिव्रता पत्नी, प्रतिविंध्यासारखे पुत्र, भीमार्जुनासारखे प्रतापी व आज्ञाधारक बंधू, श्रीकृष्णासारखा मुत्सद्दी मित्र हे त्याला मिळाले होते. हा त्याचा आनंद एक मानला तर, त्याच्या शंभर पटीने गंधर्वांचा, त्यापेक्षा शंभर पटीने कर्मदेवांचा, त्यापेक्षा शंभर पटीने अजान देवांचा, त्यापेक्षा शंभर पटीने इंद्राचा, त्यापेक्षा शंभर पटीने बृहस्पतीचा. त्यापेक्षा शंभर पटीने हिरण्यगर्भाचा आनंद असतो. हे सर्व आनंद सकाम कर्मापासून मिळतात. माझे ते जाणार नाहीत काय? '

भगवान म्हणाले, ' एका माणसाला रोज ५ रुपये पगार मिळतो १५ दिवसाचे ७५ रु. झाले. पण त्याला एकदम १०० रु. ची नोकरी लागली. मग त्यातच ७५ रु. नाही का आले? त्याचप्रमाणे ब्रह्मानंदात हे सगळे वैषयिक आनंद येतातच. ' क्षुद्रानंदानां महति आनन्दे अंतर्भावः ।' हे कसे तुझ्यासारख्या प्रज्ञावंताच्या लक्षात येत नाही? हे ऐकल्यावर अर्जुन म्हणाला, ' तर मग मी एकदम ज्ञानमार्गाच स्वीकारतो. भगवान म्हणाले, ' छे! छे! तसे करू नकोस. कारण—

**कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन ।**
**मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते संगोऽस्त्वकर्मणि ॥ ४७ ॥**

तुझा अधिकार फक्त कर्म करण्याचाच आहे. कर्मफलाची इच्छा धरता कामा नये. कर्मफलाचा हेतू म्हणजे संकल्प मनात नसावा. कर्मे न करण्याचा हट्ट तू करू नकोस.

अर्जुन म्हणाला, असे जर आहे, तर ' अशोच्यानन्वशोचस्त्वम् ' पासून आपण मला ज्ञान का सांगितले? मी जर ज्ञानाधिकारी नाही तर तुमचाच नियम तुम्ही मोडला असे नाही का होत? ' अर्जुन हुषार आहे. देवांना दोन्ही बाजूने अडवतो. भगवान म्हणाले, ' मी तुझा गुरू

आहे हे लक्षात ठेव. कर्माचा अधिकार तुला आहे व ज्ञानाचा नाही, असे मी तुला कोठे म्हटले ?' 'मग एवकार का घातला ?' 'परोक्ष म्हणजेच शाब्दिक ज्ञानाचा तुला अधिकार आहे. पण प्रत्यक्ष साक्षात्काराचा तुला नाही. त्याकरता बुद्धीतले दोष, रागद्वेष पूर्णपणे जावे लागतात. म्हणूनच पुढे १८ व्या अध्यायात 'यदा ते मोहकलिलं बुद्धिर्व्यतितरिष्यासि ।' हे सांगून अजून अवकाश आहे, हे स्पष्ट सांगितले आहे.

झाडावरचे फळ पक्व झाल्यावर आपोआपच पडते. तेव्हा वाऱ्याची, धोंडयाची किंवा हातसुद्धा लावण्याची गरज लागत नाही. पिकण्याकरताच तर फणस ढेप्यात घालतात. आंबे, केळी वगैरे आढीत घालून ऊब देतात. तोपर्यंत ती पाडास आली एवढेच म्हणायचे. पिकली असे म्हणायचे नाही. अंतःकरणात रागद्वेषादी दोष असतात. ते पक्व होण्यासाठी नित्य, नैमित्तिक कर्मे केली पाहिजेत. म्हणजे ते दोष गळून जातात व ज्ञानाधिकार येतो. ते जाईपर्यंत तुला ज्ञानाधिकार नाही. अर्जुन म्हणाला, 'मी कर्मे करीन, पण कर्मामुळे जन्म येणारच व त्याची फळे भोगावी लागणारच ना ? 'आनिच्छया संस्पृष्टः दहत्येव च पावकः ।' पाय भाजावा अशी इच्छा नाही, पण अग्निवर पाय पडल्यावर भाजणारच ना ? कारण तो त्याचा स्वभाव आहे. तसेच जन्म देणे व फल देणे हा कर्माचा स्वभावच आहे.

भगवान म्हणाले, 'सर्वेभ्यः किल कामेभ्यः दर्शपूर्णमासौ ' दर्शपूर्णमास केला की सर्व कामना पूर्ण होतात असे वेदाने सांगितले आहे. पण याच साधनाने जर सर्व फळे मिळतात; तर बाकीची साधने करण्याची काय आवश्यकता आहे ? याचा अर्थ असा की मान्यतेकरता तो केल्यास मान्यता, पुत्राकरता केल्यास पुत्र, धनाकरता केल्यास धन मिळेल, म्हणजे जी जी कामना धरून केला असेल, ते ते फळ मिळेल. इतकेच काय पण निष्काम केल्यास काहीच फळ मिळणार नाही.

मीमांसक यावरून सिद्धांत काढतात की मागे हेतू म्हणजे संकल्प असेल तरच कर्म फल देते. म्हणूनच तर कर्माच्या मागे ' मम इह जन्मानि जन्मान्तरे ' असे संकल्प लावतात. पण मागे कोणताच हेतू नसेल तर कर्माला फळ देता येत नाही. ' मा कर्मफलहेतुर्भूः । ' तूसुद्धा मागे संकल्प न धरता नित्यनैमित्तिक कर्मे कर, की तुला जन्म मरणाची किंवा अन्य फळाची भीती बाळगण्याचे कारण नाही.

अर्जुन म्हणाला, ' माझी ज्ञानाची इच्छा असताना व तो मार्ग जवळचा असताना तुम्ही अनुमती देत नाही. फक्त कर्मच कर व फळ मागू नको म्हणता. असे निष्काम कर्म करून ते सोडून देण्यापेक्षा कर्म न केलेलेच चांगले नव्हे काय ? ' भगवान म्हणाले, ' छे! तसे चालायचे नाही, ' मा ते संगोऽस्त्वकर्मणि । ' कर्मे केलीच पाहिजेत. ती न करण्याचा हट्ट तू धरू नकोस. '

ज्ञानच हवे म्हणतोस. 'मा शुचः संपदं दैवीमभिजातोऽसि पांडव ।' त्याकरताच तू जन्मला आहेस, हेही कबूल. पण एकदम उडी कशी मारता येईल? लहान मुलाने पहिलीपासून अकरा इयत्ता केल्या व मॅट्रिक नंतर सहा वर्षे काढली तर तो एम्. ए. होतो. पण तो सर्व इयत्ता गाळून एकदमच एम्.ए.होतो म्हणू लागला तर चालेल का ? म्हणून प्रथम निष्काम कर्मयोग करून ज्ञानाची योग्यता संपादन कर. कितीही अभ्यास केला, घोकंपट्टी केली, शिकवण्या लावल्या तरी परीक्षेत काय होईल हे सांगता येत नाही. प्रश्नपत्रिका वाचून प्रश्नाचा रोख न ओळखता विद्यार्थी भलतेच लिहितो. पेपर देऊन बाहेर आल्यावर आपली चूक त्याच्या लक्षात येते. पण तेव्हा उपयोग नसतो. अभ्यास केला तरी पास होणे आपल्या हातात नसते. ऐनवेळी काय होईल ते सांगता येत नाही. त्याचप्रमाणे अर्जुना, तू ज्ञानाकडे गेलास तरी साक्षात्कार होईलच असे नाही. योग्यता नाही. म्हणून ती येण्याकरता

प्रथम शब्दज्ञान संपादन कर. शब्दज्ञानाने पाप जाऊन योग्यता येईल, मात्र कर्मामागे हेतू लावू नये. न्यायाधीशानेच सर्व लिहिले असेल पण त्यावर त्याची सही शिक्का नसेल तर तो निर्णय मान्य होत नाही. त्याच्या सही शिक्क्याला जी किंमत आहे, तीच कर्मामागील हेतूला म्हणजेच संकल्पाला आहे. म्हणून तो न करता कर्म कर. म्हणजे फळ येणार नाही. मात्र अकरणाचा हट्ट धरू नकोस.

फळाचा हक्क आहे, म्हणू नकोस. हक्क आहे हे प्रथम ठरवावे लागते. त्याकरता तीनतीन कोर्टांत येरझाऱ्या कराव्या लागतात. त्यातूनही निर्णय होईलच असे नाही. तोपर्यंत दोघेही संपतात. पण कर्तव्य म्हणून केले तर ही भानगडच उपस्थित होत नाही. मुलाने बापाच्या इस्टेटीवर हक्क आहे म्हणून दावा केल्यास वाटण्या पडतात. तो म्हणतो हे निम्मे घे. निम्याचे वाटेल ते करायला मी मुखत्यार आहे. पण त्या आधी तू माझाच मुलगा कशावरून? मला ते कबूल नाही म्हटले तर? पण आईवडिलांची सेवा करणे कर्तव्य आहे असे मानून पुंडलिकाप्रमाणे केल्यास चांगले नाही का? एखाद्या गुणवानाची सेवा केल्यास तो स्वतःचा मुलगा नसताना देखील त्याला इस्टेट देऊ शकतो. भीष्मांनी पित्याकरता ब्रह्मचर्य, तेही आजन्म स्वीकारले व राज्यत्याग केला. म्हणून त्यांना स्वच्छंद मृत्यू मिळाला. प्रत्यक्ष परमेश्वराचा अवतार परशुराम याला त्यांनी पराभूत केले व त्रिकाल ज्ञान मिळवले. कर्तव्याच्या बळावर. म्हणून अर्जुना, कर्तव्य कर. म्हणजेच नित्य, नैमित्तिक कर्म निष्काम व ईश्वरार्पण बुद्धीने कर कारण, कर्तव्यात जो जोर आहे तो फळात मुळीच नाही. शिवाय भक्तीप्रमाणेच कर्तव्यसुद्धा स्वतःच फलरूप आहे. ते आचरताना मृत्यू आला तर फळ देणे ईश्वराला भागच पडते. सध्या लोक कर्तव्य सोडून हक्काकरता भांडत आहेत. त्यामुळे 'अन्नं नास्ति उदकं नास्ति ।' अशी बिकट परिस्थिती निर्माण झाली आहे.

**योगस्थः कुरु कर्माणि संगं त्यक्त्वा धनंजय ।**
**सिद्धयसिद्धयोः समो भूत्वा समत्वं योग उच्यते ॥४८॥**

हे धनंजया योगयुक्त होऊन, फळाची अभिलाषा सोडून, पूर्ण व अपूर्ण कर्माविषयी मनाचा समतोलपणा ठेवून तू कर्मे कर. मनाच्या या समतोलपणास योग म्हणतात.

'एषा तेऽभिहिता सांख्ये बुद्धिर्योगे त्विमांशृणु ।' या शब्दांनी कर्मयोगाचा उपक्रम केला. 'बुद्धया युक्तो यया पार्थ कर्मबंधं प्रहास्यसि' याने कर्मयोगाचे प्राशस्त्य सांगितले. 'यामिमां पुष्पितां वाचं' पासून 'समाधौ न विधीयते' पर्यंतच्या तीन श्लोकांनी काम्य कर्मांची निंदा केली. भगवान म्हणतात, 'अर्जुना, योगस्थ होऊन कर्मे कर. 'योग' म्हणजे निष्काम कर्मयोग. याची पाच अंगे आहेत. १) निष्कामत्व २) निर्द्वन्द्वत्व ३) नित्यसत्त्वत्व ४) ईश्वरनिष्ठत्व. याकरता बुद्धीची समानता ठेव.' अर्जुन म्हणाला, 'हे फार कठिण आहे. कारण बुद्धी तराजू सारखी आहे. जरा मनासारखे झाले की तिचे पारडे खाली जाते व मनाविरुद्ध झाले की हलके होऊन पारडे वर येते. तेव्हा हे जमायचे कसे ?'

भगवान म्हणाले, 'शास्त्रकार जे सांगतात ते अशक्यकोटीतले व असंभवनीय कधीच नसते. हरितालिकेचे उपोषण पाणीसुद्धा न पिता करणाऱ्या स्त्रिया नाहीत काय ? तुम्हांला ते होत नसले म्हणून काय झाले ? तसेच बुद्धीचे साम्य कठीण असले तरी एखाद्या उच्च साधकाला जमणारे आहे. तसा तू प्रयत्न कर म्हणजे झाले.'

अर्जुन म्हणाला, 'बुद्धीच्या साम्याकरता उपाय सांगा.' 'अर्जुना, त्यासाठी संग सोड.'

कोर्टात खटले चालतात. त्यात सारख्या पुढेपुढे तारखा पडत असतात. त्यामुळे सारखे हेलपाटे घालावे लागतात. मनस्ताप होतो.

अशीलाला वाईट वाटते, पण वकिलाला वाईट वाटत नाही. तो म्हणतो, ' निकाल केव्हां का होईना. मी पैसे आधीच घेऊन मोकळा झालो आहे. तुम्ही तुमचे घर बांधताना भिंत ठराविक मुदतीत पूर्ण न झाल्यास दुःखी होता, पण गवंडी दुःखी होत नाही. तो म्हणतो, ' तेवढेच जरा काम मिळाले. ' वकील व गवंडी या दोघांना खटल्याची व घराविषयीच्या फळाची इच्छा ( संग ) नसते. म्हणून ते साम्यबुद्धीने राहू शकतात. ' अर्जुना, तू तरी धनंजय आहेस.' हे संबोधन मुद्दाम वापरले आहे. राजा धर्माने राजसूय यज्ञ केला तेव्हा चारी भाऊ, भीम, अर्जुन, नकुल, सहदेव हे दिग्विजयासाठी चार दिशेला गेले. त्यापैकी अर्जुन उत्तर दिशेला गेला. तेथून अपरंपार धन त्याने आणले. ते जरी कमी मिळाले असते तरी चालले असते. कारण धनापेक्षा अर्जुनाची दृष्टी विजयाकडेच होती. इंद्रप्रस्थाला आल्यावर त्याने सर्व धन राजा धर्माला देऊन टाकले. म्हणजे त्यामागे त्याची इच्छा नव्हती, म्हणून दुःख झाले नाही. साम्य बुद्धीने राहता आले.

शास्त्रकार म्हणतात, ' तुम्ही खुशाल फळ घ्या. कोण नको म्हणतो? पण इच्छा का धरता? ' मंडईत चार पैशाची आंबाड्याची भाजी आणायला गेला असताना एखादा अत्तर लावून चालला असता तो सुगंध अचानक मिळाला तर खुशाल घ्या. पण तोच सुगंध मिळावा म्हणून मंडईतून चार चकरा मारल्या तर पुनः मिळेल काय? भाजी मात्र संपून व हात हालवीत परत यावे लागेल. कमलाचा सुगंध आपोआप आला तर काय नाकाला रुमाल लावायचा? खुशाल तो सुगंध घ्या. पण आधीच तो मिळावा, मिळावा म्हणून जप करीत बसू नका. अर्जुन म्हणाला, ' शेवटी तरी तुम्ही फल देणारच ना? मग आम्ही आधी मागितले तर कुठे बिघडले?' भगवान म्हणतात, 'फल टाका म्हटले की फल मिळतच नाही. पण मागणारा मनुष्य मात्र टाकावू ठरतो. त्यापेक्षा

फल मागितले नाही तर योग्यता वाढते. ती योग्यताच वाढवलेली काय वाईट? त्याने फल हमखास मिळते.'

अर्जुन म्हणाला, 'सुखदु:खे समे कृत्वा' यात आपण सुखदु:ख-विषयक साम्य सांगितले. 'त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन' यातही सांगितले व आता 'सिद्ध्यसिद्ध्यो: समो भूत्वा' यातही साम्यच सांगता. पुन: पुन: तेच ते सांगायचे कारण काय? श्रोत्याचे अवधान नसेल तर तेच ते विवेचन पुन: पुन: येऊ शकते. पण मी तसा अनव-धानी श्रोता आहे काय? मुळीच नाही. कारण आपण सांगितलेला प्रत्येक शब्द मी अवधानपूर्वक ऐकतो. इतकेच नव्हे तर त्याचा विचारही करतो. 'सुखदु:खे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ' याने फक्त युद्धाकरता साम्य सांगितले व बाकीच्याने 'सिद्ध्यसिध्दयो: समो भूत्वा' याने सर्व व्यवहारातही साम्यच ठेवावे असे सांगितले, असे मानू काय? पुन:पुन: सांगण्यात काय रहस्य आहे ते सांगा.'

भगवान म्हणाले, 'रहस्य आहे म्हणूनच तीनतीनदा सांगतो. काम्य कर्म मानवाच्या दृष्टीने फार उज्ज्वल आहे. म्हणून त्याला ते करावेसे वाटते. कुत्र्याला स्नान करावे व साबण लावावा असे वाटेल काय? वाटले तरी उपयोग काय? एखाद्या कुत्र्याला प्रारब्धाने साबण लावून स्नान घडेलही. पण प्रारब्धात असतील तेच भोग भोगल्याशिवाय पशुपक्ष्यांना गत्यंतर नसते. त्यात बदल करता येत नाही. पण मानवाला मात्र आपल्या प्रज्ञाबलाने त्यात बदल करता येतो. त्याकरताच मानवाला कर्मेन्द्रिये, ज्ञानेंद्रिये, मन, बुद्धी सर्व सुंदर दिली आहेत. आहार, निद्रा, भय, मैथुन याबाबतीत पशू व मनुष्य यात साम्य आहे. पण दोघांच्या बुद्धीत व मनात मात्र फरक आहे. तोच त्यांच्यामधला विशेष आहे. म्हणून तो प्रारब्धानेच जे मिळेल त्याने कधीच स्वस्थ बसत नाही. स्वत:ला इष्ट असलेली वस्तू इथे न मिळाल्यास मुंबईला जाईन, तिथे न

मिळाल्यास दिल्लीला जाईन, तिथे न मिळाल्यास परदेशात व तिथेही न मिळाल्यास स्वर्गात जाईन, पण ती मिळवीनच असे म्हणतो; व त्याकरता काम्यकर्माची कास धरतो. असे त्याने करू नये म्हणूनच संग सोडा. इच्छा सोडा. हे पुनः पुनः सांगितले आहे.

सुदामा माझ्याकडे आला. बाळपणाच्या मित्राला भेटण्यासाठी. मी त्याला सुंदर पीतांबर दिला. सुवर्णाच्या ताटात पंचपक्वान्नांचे सुग्रास भोजन घातले. तो घरी परत निघाल्यावर त्याचाच फाटका मळका पंचा त्याच्यापुढे ठेवला. तुम्ही मित्राकडे गेल्यावर त्याने प्रथम उत्कृष्ट स्वागत करून नंतर अशी वर्तणूक दिली तर तुम्हांला काय वाटेल, याची कल्पना करा. पण सुदाम्याने तत्काळ पीतांबर सोडून दिला. पंचा नेसला. माझ्या प्रारब्धात जर पंचा आहे तर मला तोच स्वीकारला पाहिजे. त्याने कांही एक मागितले नाही; म्हणूनच तर मी त्याला सुवर्णाची नगरी दिली. म्हणून फळ न मागण्यातच श्रेष्ठता आहे. फायदा आहे. तुम्ही फल मुळात मागताच का? तुमच्या सर्व कर्मांचा अगदी झाकून केलेल्या कर्मांचासुद्धा मी जामिनदार आहे, हे कसे तुम्हाला कळत नाही? व्यवहारातले जामिनदार गोता देतात. पण मी तसा नाही. मी सर्वकर्म-फलाध्यक्ष आहे, सर्वज्ञ आहे. म्हणून फल मागूच नका. फल मागणे म्हणजे माझे ईश्वरत्व नाकारणे होय.'

**दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद् धनंजय ।**
**बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणाः फलहेतवः ॥४९॥**

अर्जुना, बुद्धियोग म्हणजे निष्काम कर्मयोग. यापेक्षा सकाम कर्म फारच 'अवर' म्हणजे कमी प्रतीचे आहे. म्हणून तू बुद्धीलाच शरण जा.

निष्काम कर्म कर. फलाचा हेतू धरून कर्म करणारे दीन होत. ते केल्यानेच ईश्वराज्ञेचे परिपालन होते. कर्म न केल्याने येणारा तमोगुण जातो व फलाशेमुळे येणारा रजोगुण जातो. सत्त्वगुणाचे कर्म होते.

म्हणून ईश्वर संतुष्ट होतो. ' कार्पण्यदोषोपहतस्वभावः ' म्हणून मला शरण आलास. तुला ते कार्पण्य नको होते, तर आता फलाशेमुळे येणारी कृपणता का घेऊ इच्छितोस ? कृपण स्वतः खात नाही व बायकामुलांनासुध्दा खाऊ देत नाही. म्हणून तू कृपण होऊ नको.

**बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते ।**
**तस्माद्योगाय युज्यस्व योगः कर्मसु कौशलम् ॥५०॥**

बुद्धियुक्त पुरुष या लोकीच पुण्य व पाप या दोन्हींचा त्याग करतो. म्हणून योगाकरिता प्रयत्न कर. कारण योग म्हणजेच कर्मातील कौशल्य होय.

भगवंतांनी सांगितले, निष्काम कर्मयोगाने सुकृत व दुष्कृत दोन्ही जातात. हे ऐकल्यावर अर्जुन म्हणाला, ' दुष्कृत गेले तर छान झाले. पण सुकृताचे गाठोडे जाणे बरोबर नाही. कारण हा तोटा आहे.' भगवान म्हणाले, ' फळ मिळणे महत्त्वाचे, की भोग घडणे महत्त्वाचे ? ' तांदळाची टंचाई असतानासुद्धा एकाकडे त्याच्या कणगीच्या कणगी भरलेल्या आहेत. पण त्याला मधुमेह आहे. मग काय उपयोग ? एका माणसाची सर्व तपासणी करून डॉक्टरांनी सांगितले, ' रोग कांहीच नाही. पण कमालीची अशक्तता असल्याने दूध, केळी, भात कांहीच पचत नाही. मग त्याचा आजार केव्हा संपायचा ? त्याच्या मृत्यूबरोबरच. दुसरे काय ? काम्य कर्मे करून सुकृत संपादन केले. त्यामुळे भोग्य पदार्थ मिळाले खरे, पण दुष्कृतामुळे भोग घडत मात्र नाहीत. मग ते मिळून तरी काय उपयोग ?

पुष्कळ ऐश्वर्य असतानाही श्रीमंत म्हणतो, ' जीवाला चैन नाही. दोन्ही बाजूला दोन शत्रू आहेत. त्यांना पाहिले की तळपायाची आग मस्तकाला जाते. या उलट एखादा दरिद्री असतो. पण समाधिसुखात मग्न असतो. लोक त्याला जाता येता नमस्कार करतात. सुकृताने तुम्हांला वैभव जरी मिळाले; तरी त्याचे रक्षण केलेच पाहिजे.

ही जबाबदारी येतेच. शिवाय ते वाढविलेही पाहिजे. ‘ अकृतशतेनापि रक्षणीयम् कुटुंबकम् । ’ असे मनू म्हणतो. पण सध्याच्या रामराज्यात तरी रक्षण करणे फारच अवघड आहे. दुष्कृते परिपक्व झाली असतील तर ती व्याधिरूपाने भोगावी लागतात. अपरिपक्व असतील तर ज्ञानास प्रतिबंध निर्माण करतात. ही दोन्ही गेली तर आपले खरे स्वरूप कळते. आत्मदर्शन हे फल मिळते. दुष्कृत वाढले तर पाय दुखतो, वेदना होतात. सुकृत वाढले असेल तर पैसा हातात येतो, सिनेमाला जातो. दोन्ही विलयाला गेली की झोप येते. रोजच्या रोज गाढ झोप लागली की समाधान वाटते. कारण जीव गाढ झोपेत सताशी संपन्न झालेला असतो, असे श्रुती सांगते. दुष्कृताने अधःपात होतो. सुकृत असेल तर तोही ज्ञानमार्गातील अडथळाच आहे. ‘ देहग्रहणहेतुत्वात् । ’ सुकृत हीं जन्म देतेच. जन्माला आला की रडणारच. ते ठरलेले आहे. सर्वात सुंदर कर्म म्हणून देवेन्द्र झाला तरी रावणासारखा शत्रू निर्माण होतो. नंदनवन तोडून टाकले. अप्सराच पळवतो. एखादा तपस्वी प्रखर तप करतो. तो आपले पद घेतो की काय, अशीही भीती इंद्राला असते. दिलीपासारखा राजा यज्ञ करू लागतो. त्याचे ९९ अश्वमेध याग होईपर्यंत इंद्र स्वस्थ बसतो. पण १०० व्या यज्ञाचे वेळी तो विघ्न करतो. यज्ञाचा घोडाच पळवितो. कारण १०० अश्वमेध यज्ञ केल्यावर इंद्रपद मिळते. मग पूर्वीच्या इंद्राचे इंद्रपद जाणार.

कुबेराचे विमान रावणाने पळविले. मग काय करायचे? ते आमचे नाही, दुसऱ्याचे. म्हणून स्वस्थ बसायचे. दुसरे काय ? राजा मरुत्ताने यज्ञ केला. त्यात इंद्रादी देवही होते. तिथे रावण आल्यावर पळून जाऊ लागले. राजा म्हणाला, ‘ जाऊ नका. मी रावणाशी युद्ध करतो. ’ देवांच्या अंगी सामर्थ्य नव्हते, असे नाही. पण रावणाला ब्रह्मदेवाचा वर होता की देवांपासून मरण नाही, म्हणून ते गप्प बसले. भरसभेत

द्रौपदीची विटंबना करण्याचा प्रयत्न करून तिचे वस्त्राकर्षण व केशाकर्षण केले. त्यावेळी पांडव विद्यमान होते. पण वचनबद्ध असल्याने त्यांना कांही करता आले नाही. तसेच इथे झाले. या युद्धातून देव आपली रूपे बदलून पळाले. इंद्र मोर होऊन पळाला. म्हणून मोराला त्याने वर दिला, की तुझ्या पिसाऱ्यावर डोळे होतील. ते झाले. मेघ पाहून तुला आनंद होईल असेही सांगितले. यम कावळा होऊन पळून गेला होता. कुणी मारले तर मरशील. आपणहून मुळीच मरणार नाहीस, असा वर कावळ्याला दिला. म्हणून कावळ्याचे दवाखाने जगात नाहीत. म्हणून मनू म्हणतो, ' तस्माद् अंतरायो देवेन्द्रादिपदम्। '

अर्जुन म्हणतो, ' कर्मणा बध्यते जन्तुः विद्यया च विमुच्यते। ' अशी स्मृती आहे. बालक लहान असताना मातापित्याचे बंधन असते. त्यांच्या धाकात रहावे लागते. जरा मोठा झाल्यावर गुरूचे ऐकावे लागते. पुढे विवाह झाल्यावर पत्नीचे ऐकावे लागते. अशारीतीने जन्मापासून मरेपर्यंत बंधनात रहावे लागते. म्हणून मी कर्म नको म्हणतो.' भगवान म्हणाले, ' विष मारक आहे. पण त्यात विशिष्ट मिश्रण केल्यास तेच तारक होते. कणिक पचायला कठीण. पण तिच्यावर काकडी खाल्ली की ती पचते. चिंच आंबट असते पण तिच्यात मीठ घातले की तिचा आंबटपणा कमी होतो. अत्यंत आंबट दही भरपूर साखर घातली की मधुर बनते. वरील उदाहरणाप्रमाणेच कर्म बंधक खरे; पण ते निष्काम करून ईश्वरार्पण केल्यास त्याचा स्वभाव पालटतो. तो एक योग होतो. योग म्हणजे उपाय किंवा चातुर्य. त्यामुळे ते मोचक होते.

**कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिणः।**
**जन्मबंधविनिर्मुक्ता पदं गच्छन्त्यनामयम् ॥५१॥**

बुद्धियोगाचा अवलंब करणारे ज्ञानी कर्मजन्य फळाचा त्याग करून जन्मबंधनातून मुक्त होतात व निर्दुःखपदाला ते जातात.

अर्जुन म्हणाला, 'तुम्ही निष्काम कर्माने ज्ञान मिळते, म्हणता. पण वेदामध्ये

'न कर्मणा न धनेन न प्रजया । त्यागेनैकेनामृतत्वमानशुः । '

असे स्पष्ट म्हटले आहे. तेव्हा खरे कुणाचे ? तुमचे की वेदांचे ? यावर आपण म्हणाल, 'तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते ' तुमचे म्हणणे युक्तियुक्त आहे, हे कबूल. 'श्रुतिमतस्तर्कोनुसंधीयताम् ' वेदाला जुळणारा तर्क असेल तरच तो ग्राह्य असतो. आपला तर्क मला वेदविरुद्ध वाटतो. भगवान म्हणाले, 'मी सांगण्यात मुळीच चुकलो नाही. वेदाशी विसंगतही सांगितले नाही. तू मात्र अर्थ लावताना चुकलास. न कर्मणा अमृतत्वम् याचा अर्थ, न सकामकर्मणा । असा करायचा. त्यागेन म्हणजे 'कर्मफलत्यागेन ' असा अर्थ कर, की सारे जमते.

शास्त्राने चार आश्रम सांगितले. त्यापैकी ब्रह्मचर्यात वेदाध्ययन, गृहस्थाश्रमात आतिथ्य व यज्ञ, वानप्रस्थाश्रमात तप प्रधान सांगितले आहे. ते ते कर्तव्य जर उत्कृष्ट रीतीने पार पाडले तर, त्याचे फळ म्हणून विविदिषा म्हणजेच मुमुक्षा निर्माण होते. अत्यंत भूक लागल्यावर जेवणाशिवाय काही एक सुचत नाही. अशावेळी काही एक खायला न मिळाल्यास लहान मुले अक्षरशः रडू लागतात. 'बुभुक्षितः किं न करोति पापम् ' काहीही करून तो कसल्याही प्रकारचे अन्न मिळवतोच. म्हणूनच वरील म्हण पडली आहे. त्याच-प्रमाणे अत्यंत तीव्रतम ज्ञानेच्छा निर्माण झाल्यावर ते मिळवल्याशिवाय त्याला चैन पडत नाही. सुचत नाही. म्हणून तो तेव्हा संन्यास घेऊन मोकळा होता. अर्जुना, त्याग चांगला हे कबूल. पण आधी मिळवा. मग त्याचा त्याग करा. मिळवल्याशिवाय सोडणार तरी काय ? सध्याचे लोक म्हणतात, 'आम्ही विद्येचा त्याग केलेला आहे.' त्यांनी ती संपादनच केलेली नसते. मग तो त्याग कसा होईल ? आम्ही

महामंत्रीपदाचा त्याग केला म्हटले तर ? तसेच हास्यापद होईल. मंत्रीपदाकरता अगोदर निवडणुकीला उभे रहा. त्यात निवडून या. पुनः दिल्लीला मंत्र्यामंत्र्यात निवडणूक होते. त्यात बहुमताने निवडून या. मग त्याग करण्याचा अधिकार येईल. त्याशिवाय नाही.

साठलेले पाणी किती काळ पुरणार ? त्यातले तुम्ही अवश्य प्या. पण भरसुद्धा घालत जा. तसेच सुकृताचे आहे. मनुष्य गतजन्मीच्या सुकृताचा इथे आस्वाद घेत बसतो. त्यात भर घालत नाही, पण घातली पाहिजे. ते त्याचे कर्तव्य आहे. म्हणून अर्जुना, नवी नवी सुंदर सुकृते आधी कर, मग त्याचा त्याग कर, तरच तो खरा त्याग होईल. मनुष्य पैशाचा त्याग करू लागला; तो पैसा त्याने स्वकष्टाने संपादन केलेला असला तरी बायका, मुले, मित्र यांपैकी कुणालाच ते पसंत पडत नाही. म्हणून ते या कार्यात प्रचंड विघ्ने आणतात, मोडता घालतात. पण तो कर्मफलत्याग करू लागला तर त्यांची तक्रार नसते. उदा. म्हातारा रोज पहाटे पाच वाजता उठून जप करतो. त्याची संख्या मासिकात किंवा अन्य कोणत्याही संस्थेत पाठवायच्या फंदात मुळीच पडत नाही. त्याचे फल मनाने सोडून देतो. तर लोक त्याला त्रास देत नाहीत. उलट त्याचे ते कर्म पाहून त्यांना संतोषच होतो. त्यालाही समाधान मिळते. म्हणून असा त्याग करावा.

शास्त्र म्हणते, की कर्म करताना कुणाचाही विरोध नसावा. पण त्याकरता कर्मफलत्यागच केला पाहिजे. तरच शक्य आहे. तुम्ही आपल्यासमोर अगदी लक्ष देऊन, उभे राहून दूध पिळून आणले. त्यात पाण्याचा थेंबसुद्धा नाही. असे दूध एखाद्या सत्पुरुषाला तो नको म्हणत असतानाही जर सन्मानपूर्वक दिले तर केवढा आनंद होतो. पण तेच दूध मांजर पिऊन गेले तर मात्र होत नाही. सर्व प्राणिमात्रात ईश्वर आहे ना ? मग मांजराने प्यायल्यानंतर आनंद व्हायला काय हरकत

आहे? पण होत नाही एवढे मात्र खरे. तसेच कधीतरी येणाऱ्या पाहुण्याला तो नको म्हणत असता चहा आग्रहाने पाजता. रोजरोज येणाऱ्या पाहुण्याला देताना मात्र दुःख होते. ईश्वरालाच फळे का अर्पण करायची? याचे उत्तर वरील उदाहरणात आहे. ईश्वर निरपेक्ष असून निसर्गसुंदर आहे. म्हणून त्यालाच देण्यात आनंद आहे. इतरांना देण्यात मुळीच नाही. अर्जुना, मी हे तुला उगीचच सांगत नाही. सर्व उपनिषदे पाहून त्याचे सार म्हणून सांगतो. इतकेच नव्हे, तर तसे लोक माझ्या प्रत्यक्ष पाहण्यातसुद्धा आहेत. कर्माचे फल सोडतात, त्यामुळे ते ज्ञानी होतात. त्यांचा जन्मबंध सुटतो. निरामय म्हणजेच निर्दुःख पदाला ते जातात. व्यवहारामध्ये कितीही सुंदर फल असले तरी त्यातले दुःख गेलेले नसते. राजा जरी झाला, तरी त्याच्या डोक्यावर काटेरी मुकुट असतो. काटे सुंदर दिसत असले तरी घालणाऱ्याला ते टोचल्याशिवाय कसे राहतील? जबाबदारी असते. प्रतिपक्षाचे लोक तोंडावर उघड उघड टीका करत असतात. अशावेळी त्यांच्या मताप्रमाणे वागल्यास आपली सर्व मते सोडावी लागतात. न वागावे तर ते दुप्पट त्रास देऊ लागतात. मग काय होईल ते होईल. म्हणून राज्य करायचे. त्यांच्याकडे दुर्लक्ष करायचे. पण जगात एकच असे पद आहे की, तिथे दुःख अजिबात नाही. निर्भेळ सुखच. ते पद म्हणजेच ‘ यद्‌ गत्वा न निवर्तन्ते तद्‌धाम परमं मम । ’

मिथिलेमध्ये राजा बहुलाश्व व श्रुतदेव नावाचा ब्राह्मण हे दोघे रहात होते. शास्त्राने सांगितलेली आपल्या वाट्याला आलेली नित्यनैमित्तिक कर्मे ते निष्कामपणे आनंदाने करत होते. भगवंतांनी व्यास, शुक वगैरे ऋषींना सांगितले, मला मिथिलेला जायचे आहे. तुम्हीसुद्धा माझ्याबरोबर चला. मिथिलेला गेल्यावर श्रुतदेव व बहुलाश्व दोघेही त्यांना सामोरे आले. त्यांनी आपल्या घरी येण्याचे आमंत्रण दिले. आज एकाकडे व

उद्या दुसऱ्याकडे बोलावले असते तर प्रश्नच नव्हता. पण एकदम दोन्ही आल्यावर काय करावयाचे ? राजाला होकार दिला असता तर श्रुतदेव म्हणाला असता, ' मी दरिद्री म्हणून त्यांनी मला डावलले. ' ब्राह्मणाकडे येतो म्हटले असते तर, राजा लगेच म्हणाला असता, ' मग मी शुचीनां श्रीमतां गेहे ' जन्मून काय उपयोग ? म्हणून दोघांकडे एकदम जाणे भाग होते. त्याकरता प्रत्येकाने दोन दोन रूपे घेतली. एक गट ब्राह्मणाकडे गेला व दुसरा गट राजाकडे गेला. त्या दोघांनी यांचे आपापल्या वैभवाला साजेसे आतिथ्य केले. पण केलेल्या निष्काम कर्मयोगामुळे हा सर्वात्मक परमात्मा आहे हे ज्ञान भगवंताला पाहताच त्यांना झाले. दोघांचे पदार्थ भिन्न भिन्न असले तरी त्यांच्या बुद्धीत मुळीच फरक नव्हता.

अर्जुन म्हणाला, ' मीसुद्धा निष्काम कर्मयोग करतो. पण त्याने ज्ञान किती दिवसात होईल ? ' एखादा कोर्स वर्षाचा असतो. एखादा तीन वर्षांचा, एखादा पाच वर्षांचा सुद्धा असतो. इंजेक्शनचा कोर्ससुद्धा १०।१५ दिवसांचा असतो. तसा हा कोर्स किती दिवसांचा आहे ?

**यदा ते मोहकलिलं बुद्धिर्व्यतितरिष्यति ।**
**तदा गन्तासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्य च ।।५२।।**

जेव्हा तुझी बुद्धी मोहरूपी मालिन्याचे अतिक्रमण करील, तेव्हा तू पूर्वी ऐकलेल्या व पुढे ऐकण्याच्या गोष्टीसंबंधी विरक्त होशील. तेव्हा तुला ज्ञान होईल. तथापि याचा काल निश्चित सांगता येत नाही. कारण हा प्रश्न ज्ञानाचा आहे. अर्जुना, तू सात्यकीला धनुर्विद्या शिकवली आहेस. स्वतः गुरुपदात आलेला आहेस. तेव्हा सांग, तुझ्यासारखा धनुर्धर व्हायला किती काळ लागेल ? ' ते शिकणाऱ्यावर अवलंबून आहे. त्याच्या प्रयत्नांवर अवलंबून आहे. ' ' इथेही तसेच आहे. शिष्याची बुद्धिमत्ता, त्याचा अभ्यास, गुरूचे सांनिध्य यावर हे अवलंबून आहे. ' अर्जुन

म्हणाला, ' मी स्वतः बुद्धिमान आहे. तुमच्यासारखे लोकोत्तर गुरू मला मिळाले आहेत. तेव्हां ज्ञान केव्हा होईल ते सांगा. ' भगवान म्हणाले, ' अभ्यास करशील तर दोन दिवसातही ज्ञान होईल. जेव्हां तुझ्या बुद्धीचे कालुष्य जाईल तेव्हा. म्हणजे अजून ते पूर्णपणे गेलेले नाही. पण ते गेले हे तरी केव्हा समजायचे ? मागच्या गोष्टी स्मराव्यात व पुढील गोष्टी ऐकाव्यात. या दोन्हीबद्दल वैराग्य येईल तेव्हा. नाचिकेताला यमाने सांगितले, ' तुला स्वर्गाचे राज्य देतो.' पण तो म्हणाला, ' हे सारे, तुझे तुलाच घे. ' ' मला नको. मला ज्ञानच दे. ' असे वैराग्य निर्माण झाल्यावर बुद्धींचे कालुष्य गेले असे समजावे. म्हणून शब्दज्ञान म्हणजेच परोक्ष ज्ञान जरी झाले तरी लगेच साक्षात्कार होत नाही. प्रतिबंध असतात. भरताने ज्ञानासाठी राज्य सोडले. गंडकी नदीच्या तीरावर तपश्चर्या केली तरी त्याला तीन जन्म घ्यावे लागले. प्रतिबंध संपताच ज्ञान होते. वामदेवाचे प्रतिबंध गर्भात असतानाच संपले. म्हणून त्याला गर्भातच ज्ञान झाले.

**श्रुतिविप्रतिपन्ना ते यदा स्थास्यति निश्चला ।**
**समाधावचला बुद्धिस्तदा योगमवाप्स्यसि ॥५३॥**

जेव्हा नानाप्रकारच्या श्रवणांनी संशयग्रस्त झालेली तुझी बुद्धी निश्चल होऊन समाधिसुखाच्या ठिकाणी स्थिर होईल. तेव्हा तुला संपूर्ण योगस्थिती प्राप्त होईल.

बुद्धीतील कालुष्य गेल्यानंतर श्रुत आणि श्रोतव्य पदार्थाबद्दल निर्वेद म्हणजेच वैराग्य प्राप्त होते. हे ऐकल्यावर अर्जुन म्हणाला, वैराग्याचे दोन प्रकार आहेत. पर आणि अपर. पर वैराग्य म्हणजे सर्वच पदार्थ नको वाटणे. मला अपर वैराग्य झाले आहे म्हणजे कर्मफलत्याग करायला मी तयार आहे. हेच साधन कांही काल सातत्याने करीत गेलो तर त्यात माझा हातखंडा होईल.' भगवान म्हणाले, ' नुसते

वैराग्य प्राप्त होऊन भागायचे नाही. त्याकरता विप्रतिपन्ना म्हणजे असंभावना जावी लागते. शास्त्रामध्ये, ' एकं सत् विप्रा बहुधा वदन्ति ' म्हणजेच ' एकच पदार्थ आहे, ते ब्रह्म, असे वर्णन आलेले असते.' पण मनुष्य म्हणतो, ' व्यवहारात हजारो पदार्थ दिसत असताना, अनुभवाला येत असताना एकच आहे हे कसे शक्य आहे ?

आमचे राज्य आल्यावर अखिल प्राणिमात्राला सुख व्हायला पाहिजे म्हणतात. पण ते कृतीत येणे फारच कठीण आहे. असंभावना म्हणतात ती हीच. सतत मनन केल्याने ही जाते. भक्त म्हणतो, जगात ईश्वर आहे, तो जगच्चालक असून ' कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम् ' समर्थ आहे. मला त्याचे दर्शन झाले नाही म्हणून काय झाले ? तो आहे हे निश्चित. धर्म सुद्धा आहे. तो जर नसेल तर ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम वगैरे पुरुष कसे उत्पन्न झाले ? वेदांचे प्रामाण्य मनू, याज्ञ-वल्क्य वगैरेंनी पूर्वीपासून मान्य केले आहे. त्यात धर्माचे विवेचन आलेले आहे. धर्माचरण करणाऱ्यांचा असाधारण पुण्योत्कर्ष दिसून येतो. इतकेच नव्हे तर शंकराचार्य म्हणतात, ' धर्मोत्कर्ष-वशात् व्यासादिभिः सह प्रत्यक्षं व्यवहरन्ति देवताः ' त्यामुळे ते लोक त्रिकालज्ञानी होऊन पुढील घडणाऱ्या घटनासुद्धा लिहून ठेवतात. धर्म जरी दिसला नाही तरी तो आहे हे मान्य करावे लागते. तसेच हजारो पदार्थ जरी अनुभवाला येत असले, तरी प्रत्यक्ष चर्मचक्षूंनी दिसत असले, तरी शास्त्राने सांगितलेला अखंड एक पदार्थ असणे शक्य आहे, असंभावना असणे शक्यच नाही. अखंड एक ब्रह्म आहे. हे कपोलकल्पित आहे, ही भावना जाते. मननाने ती जाणे ही शब्दज्ञानाची परमावधी होय. समाधी म्हणजे सम्यक् अधीयते चित्तं यस्मिन् । मन आत्म्याच्याच ठिकाणी राहणे म्हणजे समाधी. मनन अवघड नाही. ' श्रुतस्य अर्थस्य युक्तिभिः

अनुचिंतनं मननं, ' श्रवण केले की ते पुनः पुनः आळवून मनन घडतेच. नाही तर तुम्ही चांगले श्रवण केलेच नाही, असा त्याचा अर्थ होतो. पण निदिध्यासन मात्र कठिण आहे. तोच तोच विषय सतत चित्तात यायला पाहिजे. हे दोन्ही साधल्यास योगाचे फल मिळाले असे समजावे. अर्जुन म्हणाला, ' मी मनन व निदिध्यासनही करीन. पण मला साक्षात्कार झाला की नाही हे कसे कळायचे? त्याकरता स्थितप्रज्ञाची लक्षणे सांगा.'

अर्जुन उवाच–

**स्थितप्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव ।**
**स्थितधीः किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किम् ॥५४॥**

' स्थितप्रज्ञाची व्याख्या काय? तो बोलतो कसा? बसतो कसा? कसा राहतो? कसा चालतो? हे केशवा मला सांगा.'

भगवान म्हणाले, ' स्थितप्रज्ञाचे दोन प्रकार आहेत. १) समाधिस्थ स्थितप्रज्ञ. हा समाधी लावून बसलेला असतो. ' यथा दीपो निवातस्थो नेङ्गते सोऽपमा स्मृता ' असा शांत असतो. २) व्युत्थितस्थितप्रज्ञ. हा साक्षात्कारसंपन्न असूनही व्यवहार करीत असतो. अर्जुन म्हणाला, ' तो जर व्यवहार करीत असेल, तर त्याला स्थितप्रज्ञ म्हणायचे तरी कसे? भगवान म्हणाले, ' तो जरी व्यवहार करीत असला तरी त्यामुळे त्याच्यात दोष येत नाहीत. योगवासिष्ठकारांनी याला पुढील दृष्टांत दिला आहे.

परव्यसनिनी नारी व्यग्रापि गृहकर्मणि ।
तदेवास्वादयत्येव नवरंगरसायनम् ॥

परपुरुषावर आसक्त असणारी स्त्री आपले घरातील सर्व व्यवहार करीत असतानासुद्धा तिचे सर्व चित्त आपल्या पर प्रियकराकडेच असते. तसेच स्थितप्रज्ञाचे सर्व लक्ष व्यवहार करीत असतानाही आत्म्याकडेच असते.

प्रत्येकाच्या अंत:करणाचे दोन कप्पे असतात. सामान्य व्यवहारालाच प्राधान्य देतात, म्हणून त्यांच्या मनाचा तोच कप्पा मोठा असतो. अशांनी ईश्वराचे ध्यान केले तरी एखादा क्षणच मूर्ती चित्तात येते व पुन: लगेच जाते. पण स्थितप्रज्ञ परमार्थालाच प्राधान्य देतो. इतकेच काय पण अत्यंत विषयासक्तांच्या चित्तात जसे परमार्थाला बिलकुल स्थान नसते, तसेच स्थितप्रज्ञाच्या जीवनात व्यवहाराला बिलकुल स्थानच नसते. अंबाबाईच्या दर्शनाला गेल्यावर तिला कुठल्या रंगाचे पातळ नेसविले होते हे तुम्हांला अचूक सांगता येत नाही. कारण चित्त देवळात असेल, म्हणजे देवीकडे असेल तरच पातळाचा रंग, काठ, अंगावर कोणते अलंकार घातले होते, तिच्या हातात कोणती आयुधे आहेत, हे सांगता येईल.

लहान मुलाला खेळणे जसे मनापासून आवडते, तसा अभ्यास आवडतो काय? मुळीच नाही. तुम्ही काहीतरी म्हणाल, रागवाल, म्हणून 'काय रे अभ्यास करतोस की नाही?' असे विचारल्यावर आपल्या गोटया, पत्ते लगेच बाजूला सारतो, लपवितो व तोंडापुढे पुस्तक धरून आपण अभ्यास करतो असे भासवितो. वेठीला धरलेली माणसेसुद्धा काम करतात पण मनापासून नव्हे. पण तेच लोक आपल्या घरातील काम करताना रमून जातात. कारण ते मनापासून केलेले असते. अत्यंत लोभी माणसाचे चित्त पैशाकडे असते. तरी त्याचे व्यवहार होतातच. तसे मन आत्म्याकडे असतानाही स्थितप्रज्ञाचे व्यवहार होतात.

'तो समाधीतून उठल्यावर त्याचा व्यवहार कसा असतो?' असा अर्जुनाचा प्रश्न होता. व्यवहार म्हणजे बोलणे, चालणे व बसणे. तिन्ही त्यात येते. म्हातारा काही करीत नाही. स्वस्थ असतो, म्हटले तरी तो बगीच्यात जातो, बाथरूममध्ये जातो, देवळात जातो, तसेच

ह्रा काय करतो ? आमचे चित्त व्यवहारातच असते. एखाद्याला बायको परब्रह्म आहे म्हणतात, म्हणजे अत्यंत आवडती-प्रिय विषय. पैसा असेल तर विवाह होऊन भार्या मिळते. ती आल्यावर मुलगा होतो. एकावर एक अवलंबून आहे. पण यांपैकी प्राधान्य कोणाला ? सर्वकाल कुणालाच नसते. पण ज्ञानी सर्वकाल आत्म्यालाच प्राधान्य देतो. तो म्हणतो, 'आत्म्यासारखा दुसरा पदार्थच जगात नाही. प्राधान्य आत्म्यालाच दिल्याने तो त्याच्या मनातून केव्हाच जात नाही. खरा अभ्यासू असेल व त्याच्याशी बोलायला कोणी आले तर तो बेतानेच बोलतो. संभाषण आखडते घेतो व ते मुळीच वाढवू देत नाही. कारण लक्ष अभ्यासाकडेच असते. तसेच स्थितप्रज्ञ जरी व्युत्थित झाला, तरी व्यवहार बेताचेच करतो. योगाचे फल म्हणजे 'ब्रह्मास्मि' वृत्ती होणे व ती टिकून राहणे. अशाप्रकारचे स्थितप्रज्ञ अखंड ब्रह्माकार वृत्तीमध्येच—काहीही व्यवहार करीत असले तरी—असतात. त्रैलोक्याचे राज्य देतो, एक क्षण ब्रह्माकार-वृत्ती सोडा म्हटले, तरी तो तयार होत नाही.

योगवासिष्ठकारांनी ज्ञानाच्या सात भूमिका सांगितल्या आहेत. त्यांपैकी शुभेच्छा पहिली, हिलाच जिज्ञासा ज्ञातुमिच्छा जिज्ञासा किंवा मुमुक्षा असेही म्हणतात. फक्त मला मोक्षच मिळावा अशी इच्छा होणे म्हणजेच शुभेच्छा. बाकीच्या व्यवहारातील कुठल्याही इच्छेला शुभेच्छा म्हणत नाहीत. कारण कोणतीही व्यवहारातील इच्छा पूर्ण झाली तरी पुन: पुन: दुसऱ्या इच्छा निर्माण होतच राहतात. प्रथम पदवीधर व्हावेसे वाटते, नंतर जास्त पगाराची नोकरी लागावी असे वाटते, नंतर सुंदर भार्या मिळावी असे वाटते, नंतर अर्थात पुत्रेच्छा होते, मुलगा झाल्यावर त्याचा विवाह, नंतर नातू पहावा असे वाटते. म्हणजे या इच्छा वाढतच राहतात पण मोक्षेच्छेनंतर ज्ञान मिळाले की सर्व इच्छा मावळतात. म्हणून

हीच शुभेच्छा. केवळ मुमुक्षा निर्माण झाली व त्यासाठी प्रयत्न केले नाहीत तरी दोष नाही व प्रयत्न म्हणजे श्रवण, मननादी साधने अपुरी राहिली तरी दोष नाही. आमच्या गावात एक ज्ञानी आहे, तो गावाबाहेर राहतो, कांहीही करीत नाही, असे जरी लोकांनी म्हटले तरी त्यापासून त्याचे कांहीही नुकसान होत नाही, हे निश्चित. म्हणून 'शुभेच्छा प्रथमा प्रोक्ता' हीच सुंदर.

दुसरी भूमिका विचारणा ही होय. मुमुक्षा निर्माण झाल्यावर साधक गुरू शोधतो, गुरूकडे जातो. आत्म्याचे व सत् शास्त्राचे श्रवण, मनन करतो. गुरू वाटेल ते सांगतील, पण ते मनाला पटेल की नाही याचा विचार करतो. क्रमाक्रमाने गुरूबद्दल इतकी श्रद्धा निर्माण होते की, गुरुपादुका अक्षरशः डोक्यावर घेतो.

तिसरी भूमिका म्हणजे निदिध्यासन. हिलाच तनुमानसा असेही म्हणतात. या भूमिकेत मन 'तनु' म्हणजे कृश होते. व्यवहार-पराङ्मुख होते. साधक सतत आत्म्याचाच विचार करीत असतो. चिंतन करीत असतो. या तीन भूमिकेत तो साधक असतो. सर्व जगत् खरे आहे व मीही खरा आहे ही त्याची भावना असते. या तिन्ही भूमिकांना शास्त्रकार 'जाग्रत' (जागृति) म्हणतात. व्यवहार करतो व सत्य आत्मा मानतो. म्हणजे अज्ञानातून जागा होऊन मोक्षमार्गाला लागला म्हणून 'जाग्रत्' म्हणतात.

चौथ्या भूमिकेला 'सत्त्वापत्ति' म्हणतात, यात साक्षात्कार होतो. 'स्वप्नाभं यत्र वै जगत्' या भूमिकेत सर्व जगत् त्याला स्वप्नवत् वाटते. तरी तो व्यवहार करतोच. कारण स्वप्न पडले तरी त्यातही इच्छा असतातच. स्वप्नातील गाईला पाडा व्हावा असे वाटते ना? ज्ञान्यापुढे गाई म्हशी आल्या तरी तो बाजूला होतोच. शंकराचार्य काशीत रहात असताना एकदा गंगास्नानाला निघाले होते. समोरून

एक हत्ती आला. आचार्य चटकन बाजूला झाले. कारण रस्ता अरुंद होता. शिष्यांनी आचार्यांना विचारले, ' भगवन्, सर्व जगत् मिथ्या, खोटे आहे ना ? मग हत्ती ही मिथ्याच, मग आपण का पळाला ? आचार्य म्हणाले, ' गजोऽपि मिथ्या पलायनमपि मिथ्या । ' पलायन खरे म्हणून कोणी सांगितले ? अशा रीतीने जरी जगत् स्वप्न वाटत असले, तरी व्यवहार होतातच.

पाचवी भूमिका ' असंसक्ति ' ही होय. काही लोकांना झोप लागते; पण तास दोन तासांनी ते लगेच जागे होतात. मग या कुशीवरून त्या कुशीवर करीत राहतात. वृद्धांची झोप अशीच असते. या भूमिकेत साधक समाधी लावतो. ती तास दोन तास लागते. पण तिच्यातून तो आपोआप जागृत होतो.

सहावी भूमिका 'पदार्थाभावनी' होय. तरुण पुरुषाला झोप लागते ती गाढ असते. रात्री दहा वाजता झोप लागली की सकाळी ६ वाजताच जागा होतो, तशी या भूमिकेत गाढ समाधी लागते. हिला शिथिल सुषुप्ती म्हणतात. या अवस्थेत जागे केले, हाक मारली, तरच भानावर येतो, ( व्यवहाराविषयी ) जागृत होतो.

सातवी ' तुर्यावस्था किंवा तुरीया '. या भूमिकेत दुसऱ्यांनी हलविले, हाका मारल्या तरी तो जागा होत नाही, हलत नाही. म्हणून हिला घन सुषुप्ती म्हणतात. हीच सर्वोच्च भूमिका. या अवस्थेत साधकाचे शरीराकडे बिलकुल लक्ष नसते. शरीर अत्यंत कृश झालेले असते. खाणे, पिणे सर्व बंद झालेले असते. आमच्या शरिराला जरा खाणे, पिणे कमी झाले, अगर बंद झाले की प्राण कासावीस होतात, दंगा करतात. प्राण म्हणतात फार तर ४।५ दिवस आम्ही वाट पाहू. नाही तर या शरिरातून उडून जाऊ ! पण ज्ञानी पुरुषाच्या शरिराचे रक्षण, निर्वाह ईश्वर करतो. ' ईश्वरप्रेरितप्राणवायुना तेषां निर्वाहः । '

ग्लुकोजच्या इंजेक्शनची अगर सलाईनची गरज नाही. चौथी अवस्था सत्त्वावस्था. हिला पोहोचल्यावर त्या साधकाला 'ब्रह्मविद्' म्हणतात. पाचवीतल्या म्हणजे असंसक्तीतील साधकाला ब्रह्मविद्वर म्हणतात. सहावी पदार्थाभावनी. या अवस्थेतील साधकाला ब्रह्मविद्वरीयान् व सातव्या म्हणजे तुर्यावस्थेतील साधकाला ब्रह्मविद्वरिष्ठ असे म्हणतात. पाचवी, सहावी व सातवी अवस्था म्हणजे जीवनमुक्ती. तरी त्यात तरतमभाव असतो. हे त्या भूमिकांच्या नावावरून दिसून येते. या अवस्थेत असतो, तोच स्थितप्रज्ञ. त्याला उद्देशूनच अर्जुनाचा प्रश्न आहे. त्यावर भगवान् सांगतात.

श्रीभगवानुवाच –

> प्रजहाति यदा कामान् सर्वान् पार्थ मनोगतान् ।
> आत्मन्येवात्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते ॥५५॥

भगवान म्हणाले, 'अर्जुना, जेव्हा मनातील सर्व इच्छा तो सर्वथा टाकून देतो व स्वतः स्वस्वरूपाच्या ठिकाणी संतुष्ट होतो तेव्हा अशा पुरुषाला स्थितप्रज्ञ म्हणतात. अंतःकरणात सहा विकार असतात. काम, क्रोध, लोभ, मोह, मत्सर व अहंकार. यांपैकी काम हा मुख्य–पहिला विकार होय. पदार्थांची, विषयांची इच्छा म्हणजे काम. कामाच्या मागे लोभ, मोह, मद, मत्सर हे दडून बसलेले असतात. झोपेत काम, क्रोध नसतात. पण त्यांचे बीज अज्ञान कायम असते. त्यामुळे उठला की लगेच 'चहा आणा' म्हणतो. पण समाधीत हे विकार पूर्णपणे नष्ट झालेले असतात. म्हणून 'प्रकृष्टेन जहाति' म्हटले आहे. कामक्रोधादी हे कुणाचे धर्म? आत्म्याचे? मुळीच नव्हेत. कारण नित्य पदार्थ आत्मा. त्याचे धर्मही नित्यच असतात व अनित्य पदार्थांचे धर्म अनित्य असतात. म्हणून विकार व आत्मा यात धर्म व धर्मी हा भाव नाही ते विकार मनाचे असतात म्हणून मनोगतान्–मनात उत्पन्न

झालेले असे म्हटले आहे. ' आत्मा मनसा संयुज्यते । मनः इंद्रियेण । इंद्रियाणि अर्थेन । ' अशारीतीने विषयांचे ज्ञान होते. झोपेतसुद्धा काही लोक डोळे अर्धवट उघडे ठेवून झोपतात. पण त्यांचा उपयोग नसतो. मन हे आत्म्याशी संलग्न व्हावे लागते. तरच ज्ञान होते. विजेचे बल्ब नुसते आहेत, पण त्यांचा प्रकाश पडत नाही. त्याकरता मेन स्विचला कनेक्शन जोडावे लागते. तसेच आत्म्याशी मनाचे कनेक्शन जोडावे लागते.

सविकल्प समाधीत मन असते. त्याने समाधीचा आनंद घेता येतो. पण निर्विकल्प समाधीत मनच नसते. मग त्यातील विकार कसे असतील? केवळ आत्मलाभानेच तो संतुष्ट असतो. संतोष हे आत्म्याचेच स्वरूप आहे. तुम्ही झोपल्यावर कसली इच्छा असते? झोपेत रस किंवा दूध मागता? नाही. झोप लागली असता उचलून कोठेही नेले तरी कळत नाही. तशीच मनाच्या अभावी स्थितप्रज्ञाची स्थिती असते.' हे वर्णन अर्जुनाने ऐकले व तो म्हणाला, ' ही अवस्था सुंदर आहे पण मला उपयोगी नाही. ' पूर्वीच्या एखाद्या राजाचे, रघूचेच म्हणाना, अत्यंत सुंदर वर्णन तुम्ही ऐकले की त्याने ' विश्वजित् ' यागामध्ये सर्वस्वाचे दान केले. त्यामुळे त्याच्याकडे शेवटी मातीची भांडी उरली. इतका तो दानशूर होता. पण हे वर्णन ऐकून सध्या आम्हांला याचा काय उपयोग आहे? त्यामुळे या दुष्काळाच्या काळात आम्हांला तांदूळ, जोंधळे मिळणार काय? मग काय करायचे? तसेच समाधिस्थ स्थितप्रज्ञाची अवस्था चांगली, यात वाद नाही. पण मला तिचा उपयोग व्हायचा नाही. म्हणून व्युत्थित स्थितप्रज्ञाचे लक्षण सांगा. ते ऐकून मी स्वस्थ बसणार नाही. मला त्यातले काय जमेल? काय करता येईल? ते पाहीन. अध्यात्म नुसते ऐकले व ते समजले नाही तरी पापक्षालन होते. पुण्योत्कर्ष

होतो. तरीसुद्धा मी तेवढ्याने स्वस्थ बसणार नाही. सोडून देणार नाही. त्याचा किल्ला गिरवणार.

लहान मुलाला रामरक्षा किंवा महिम्न शिकवत असताना तो गडबड करतो. मी म्हणतो, मी वाचतो, म्हणतो, पण त्याला तसे करू द्यायचे नाही. मी म्हणतो. माझ्या मागून तू तसेच म्हण म्हणायचे, तरच ते .बरोबर येते. 'गुरूच्चारणपूर्वकमनूच्चारणमध्ययनम् ।' अशी त्याची व्याख्याच आहे. तुमचे बरोबर कशावरून? मी माझ्या वडिलां-कडून किंवा गुरूकडून त्यांच्याचसारखे शिकलो आहे म्हणून. अशी परंपरा मागे जाता जाता ती ईश्वरापर्यंत जाते. ईश्वराकडून आले, म्हणून निर्दोष ठरते. वेद असेच आले आहेत. म्हणून त्याच्या काना-मात्रेतसुद्धा फरक पडलेला नाही. तुमची तुम्ही रस्त्याने जाता जाता तान मारता की नाही? खुशाल मारा. पण गवयाची ऐकून तान मारा की चुकणार नाही. तसेच ज्ञात्याचे अनुकरण करा की चुकणार नाही.

**दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः ।**
**वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते ॥ ५६ ॥**

दुःखे आली असता ज्याचे मन उद्विग्न होत नाही, सुखे आली असता त्याविषयी जो निरिच्छ असतो, राग म्हणजे विषयाबद्दलची आसक्ती, भय व क्रोध ही ज्याची गेलेली असतात, त्याला स्थितप्रज्ञ म्हणतात.

सामान्य माणसाला दुःख आले की तो तात्काळ उद्विग्न होतो. ते जावे असे त्याला वाटते. सुख आले की हे असेच रहावे असे त्याचे म्हणणे असते. पण स्थितप्रज्ञ म्हणतो, 'दुःख जरी आले तरी मी खिन्न होत नाही. कारण माझ्याच दुष्कर्माचे ते फल आहे.' म्हणूनच राम म्हणतो,

'सुखस्य दुःखस्य न कोऽपि दाता परो ददातीति कुबुद्धिरेषा ।
अहंकरोमीति वृथाभिमानः स्वकर्मसूत्रग्रथितो हि लोकः ॥'

सुख आल्यावर ते तसेच रहावे असेही स्थितप्रज्ञ म्हणत नाही. तो म्हणतो, 'नुसते रहावे म्हणून काय उपयोग? तशी क्रिया करायला नको काय? मी अशी क्रिया करतो की ते सुख आपोआप तसेच राहते.'

तुमची तब्बेत इतकी नाजुक आहे की आपले सामान घेऊन स्टेशनपासून २।३ मैल असलेल्या आपल्या घरी चालत जाणे मुष्कील आहे. पण अशा परिस्थितीतही दुसऱ्याच्या सोन्याचा बोजा सापडला. तो (दुसऱ्याकडे) हमालाकडे देता येत नाही. कारण त्याने तो मध्येच लांबविला तर? पण मग तो ऐवज तसाच सोडायचा काय? नाही. 'हुश्श हुश्श' करत ठिकठिकाणी टेकवत,थांबत घरी आणायचाच. असे करताना दुःख आहे काय? हात दुखतात, अवघडतात. पायही बोलू लागतात. पण सोन्याच्या लाभाने ते जाणवत नाही. त्याचप्रमाणे आत्मलाभ झालेला असल्यामुळे ज्ञान्याला सुखदुःखाचे काहीच वाटत नाही. तो समाधीत असताना प्रारब्धाचे काहीही चालत नाही. पण ती सुटल्यावर ती त्याच्यावर सुखदुःखे आणते. तरीसुद्धा आत्मलाभ झाल्यामुळे त्याची झळ त्याच्या मनापर्यंत पोचतच नाही.

तो दुःखाने उद्विग्न होत नाही. सुखाने हुरळून जात नाही. स्थितप्रज्ञाला कुठल्याहि पदार्थाबद्दल अनुराग नसतो. उत्कृष्ट पदार्थाचा लाभ झाल्यावर अन्यत्र जावेसे वाटतच नाही. याबद्दल योगवासिष्ठकार म्हणतात, 'नागरं नागरी कांतं कुग्रामललना यथा ।' शहरातच जन्मलेला तिथेच वाढलेला एक तरुण आहे, व त्याला तिथलीच फॅशनेबल तरुण पत्नी मिळालेली आहे. त्याच्यामागे खेडवळ स्त्री 'माझा स्वीकार करा,' म्हणू लागली तर तो घेईल काय? समजा, त्याचे लग्न अजून व्हायचे आहे, तरीसुद्धा तिला बघणारही नाही. मग प्रत्यक्ष लग्न झालेले असल्यावर

विचारायलाच नको. त्याचप्रमाणे स्थितप्रज्ञाचे असते. तो म्हणतो, 'आत्माच सर्वोत्कृष्ट असून मला नित्य प्राप्त आहे. मग बाकीच्या पदार्थांची इच्छा मी काय म्हणून करू ?'

इष्टाचा वियोग व अनिष्टाची प्राप्ती झाली की भीती वाटते. पण हा म्हणतो, 'जगात दोन पदार्थ असतील तरच इष्ट व अनिष्ट हा भेद येणार. पण आत्मा 'एकमेव अद्वितीय' असल्याचा माझा अनुभव आहे. म्हणून मला इष्टानिष्ट दोन्ही नाहीत. भीतीही नाही. त्याला क्रोधही नसतो. रागावणार कुणावर ? दुसऱ्यावरच. पण दुसरा पदार्थच त्याच्या दृष्टीने अस्तित्वात नाही. मग काय स्वतःवर रागावेल? म्हणून त्याला क्रोध नसतो. 'समलोष्टाश्मकांचनः' असतो. तुम्हांला छत्रचामरे आल्यावर परत पाठवाल? पण तुकारामाकडे शिवाजीने पाठविल्यावर ती त्याने परत केली. शंकराचार्य सात वर्षांचे असताना केरळच्या राजाने अमात्याकडून हत्ती व दहा हजार सुवर्णमोहरा त्यांच्याकडे पाठविल्या. पण आचार्यांनी त्या परत केल्या. वीतराग होते म्हणूनच. अर्जुना, 'व्युत्थित स्थितप्रज्ञ' असा वागतो. तूही तसे वागण्याचा प्रयत्न कर.

**यः सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत्प्राप्य शुभाशुभम् ।**
**नाभिनन्दति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥५७॥**

ज्याला कुठेही आसक्ती नसते. शुभ व अशुभ यांची प्राप्ती झाल्यावर ज्याला त्याबद्दल आनंद किंवा विषाद वाटत नाही, त्याची बुद्धी स्थिर झाली असे समजावे.

स्थितप्रज्ञाला जगातील कुठलाच पदार्थ अभितः म्हणजे सर्वबाजूंनी प्रेमाचा वाटत नाही. स्वतःला उपकारक, स्वकीयांना उपकारक, परांना उपकारक व अनर्थनिवारक हे चार गुण ज्यात असतील, तोच पदार्थ अत्यंत प्रिय होतो. हे चारी गुण आत्म्यात आहेत. म्हणून तो

परम प्रेमास्पद आहे. लोक म्हणतात, 'बायकामुलांवर आपले प्रेम आहे.' पण ते एकदेशीयच असते. म्हणूनच तर पाऊस आल्यावर दुसऱ्याला छत्रीत घेता. पण अर्धी त्याला देता व अर्धी स्वतःसाठी राखता. कारण स्वतःच्या देहावरही प्रेम असतेच. धनावरसुद्धा प्रेम असते, पण तुम्हाला वाटेल तितके धन देतो पण त्याचा विनियोग आपल्या मनाप्रमाणे करायचा नाही अशी अट घातली तर? पूर्वीचे राजे अपरंपार धन साठवीत. दुसऱ्याला दान देण्यासाठी. त्यासाठीच उत्पन्नाचा ⅙ भाग त्यांना द्यावा लागे. ऋषीसुद्धा देत असत. पण राजांनी त्या पैशाची चैन करायची नाही. सूर्याकडे पहा. तुम्ही म्हणता, 'हा किती तापतो?' पण तो आठ महिन्यात सर्व पाणी आपल्या किरणांनी शोषून वर ओढून घेतो. पंपाशिवाय. कशाकरता? उत्स्रष्टुम्। सोडण्यासाठी. तेच पाणी झारीप्रमाणे सर्व पृथ्वीवर सोडतो.

काही सुंदर वस्तू आपणाला मिळाल्या तर त्यांची तोंड फाटे-पर्यंत स्तुती करायची माणसाला सवय असते. दुसऱ्याने तुमचे गुणगान केले तर ते एकवेळ चांगले म्हणता येईल. पण आपणच आपल्याला दिवे कशाला ओवाळायचे? आपलेच गुण आपण कथन करणे याला 'अभिनंदन' म्हणतात. दुसऱ्याचा त्यात तिळमात्रही फायदा नसतो. उलट ते दुःखालाच कारणीभूत होते. म्हणून ज्ञानी तसे करत नाही. न द्वेष्टि। उत्कृष्ट विद्वान आहे, त्याला पारितोषिक मिळाले. त्याची विद्या सुंदर आहे, त्यात वाद नाही. पण तो तुमचा शत्रू असल्यामुळे तुम्हांला त्यापासून संतोष होत नाही. द्वेष वाटतो. तुम्ही त्याची निंदा करू लागता. पण ज्ञानी तसे करत नाही. तो म्हणतो, 'त्याची निंदा करण्यामुळे दोष प्रगट होत नसून उलट गुणच उठून दिसतात. म्हणूनच तर 'निंदकाचे घर असावे शेजारी' असे म्हणतात. निंदेमुळे गुणच प्रकट होतो, म्हणून तो निंदा करत नाही. म्हणजेच पराचा द्वेष करत नाही. प्रारब्धाने शुभ पदार्थ आले तर ते आपल्याच सुकृताचे फळ, या

उलट अशुभ पदार्थ आले तर ते आपल्याच दुष्कृताचे फळ मानून स्वस्थ राहतो. सामान्य माणसाप्रमाणे अभिनंदन म्हणजेच स्तुती व निंदा करत नाही. अर्जुना तूही असाच वाग.

**यदा संहरते चायं कूर्मोऽङ्गानीव सर्वशः ।**
**इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥५८॥**

कासव ज्याप्रमाणे आपले अवयव सर्व बाजूंनी आखडून घेते, त्याप्रमाणे आपली सर्व इंद्रिये विषयापासून जेव्हा परावृत्त करतो, तेव्हा त्याची बुद्धी स्थिर झाली असे समजावे.

आतापर्यंत तो बोलतो कसा ते सांगितले. आता तो बसतो कसा, ते सांगतात. कासव बसताना पाय आत घेऊन बसते. व्यवहारात आम्ही केव्हां बसतो? अगदी दमल्यावरच. पण याचे बसणे म्हणजेच ती समाधी असते. बसल्यावर तो एक एक विषय सोडू लागतो. तेव्हां समजावे की हा समाधीकडे निघाला आहे. याउलट आम्ही गादीवर जर लवंडलो, स्वस्थ बसलो, तरी मनात विषय असतातच. इतकेच काय पूजेला देवासमोर बसलो, किंवा ध्यान करायचे म्हटले तरी विषय मनात असतातच. पण हा सतत समाधीतच असतो. प्रारब्ध आले की भानावर येतो. तेवढ्यापुरते विषय ग्रहण करून पुनः निर्विषय होतो. अर्जुन म्हणाला, ‘ हे अगदी सोपे आहे, मीसुद्धा करू शकेन.’ भगवान म्हणाले तू समजतोस तसे ते नाही. कारण,

**विषया विनिवर्तन्ते निराहारस्य देहिनः ।**
**रसवर्जं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते ॥५९॥**

आहार न घेणाऱ्या पुरुषाचे रसविषय सोडून बाकीचे विषय निवृत्त होतात. पण परब्रह्माचे ज्ञान झाल्यावर गोडीदेखील नष्ट होते.

एखादा मनुष्य अत्यंत रागावलेला असेल व ऑफिसची वेळ झाली असेल तर जेवतो. फक्त क्षुधा निवारण करण्याकरता. पण तोच खुशीत

असताना जेवू लागला तर; घालेल तेच मुकाट्याने खात नाही. आवडलेले पदार्थ पुन: आणा म्हणतो. पण रागावला असताना उदासीनपणे विषय घेतो. जेवतो. त्याचप्रमाणे ज्ञानी उदासीनपणे विषय ग्रहण करतो. अर्जुन म्हणाला, 'आजारी पडल्यावर मनुष्य अशक्त होतो. आतुर बनतो. त्याच्या तोंडाला मुळीच चव नसते. सुंदर आंबेमोहोर तांदळाचा भात खायला दिला. रसरशीत फळे दिली तरी नकोच म्हणतो. म्हणजे त्यानेही विषयत्याग केलाच की नाही? मग तो स्थितप्रज्ञ नव्हे काय ?

भगवान म्हणाले, 'तो विषयत्यान करतो हे कबूल. पण मनापासून मुळीच नव्हे. नाइलाज म्हणून. अशक्ततेने किंवा सामर्थ्यहीनतेने. त्यामुळेच तर आपणाला काही अन्न जात नाही म्हणून तो अत्यंत दुःखी असतो व ते दुःख दुसऱ्याला बोलूनही दाखवितो. पण स्थितप्रज्ञ मात्र विषयत्यागाने मुळीच दुःखी झालेला दिसत नाही. त्याच्या पोटात अन्नपाण्याचा लेश नसताना कित्येक दिवस गेले तरीसुद्धा दुःख व्यक्त करत नाही. स्वतःची इंद्रिये समर्थ असताना तो विषयत्याग करतो हे वैशिष्ट्य आहे. कारण बिषयाची गोडी त्याची पारच मावळलेली असते व सामान्याची ती कायम असते हा फरक आहे.

एका श्रीमंताला आंबेमोहोर तांदळाचा भात रोजच्या रोज भरपूर मिळतो, तोही विनायास. मग तो, मिलो स्वस्त म्हणून, आणील काय? मी शिष्टाईकरता कौरवांकडे गेलो होतो. तिथे दुर्योधनाचे भोजनाचे आमंत्रण नाकारून मी विदुराकडे जेवलो. त्याने कण्या घातल्या. भक्ती-मुळे मी त्या आनंदाने खाल्ल्या. पण म्हणून द्वारकेत परत गेल्यावर त्याच मी रोज खाण्यात काय? मग तिथे कशा खाल्ल्या ? उदासीनपणे. तसेच ज्ञानी उदासीनपणे विषय सेवन करतो. मनातलाच अभिलाष गेलेला असतो म्हणून. अर्जुना, तुला स्थितप्रज्ञ व्हायचे झाल्यास तूसुद्धा

मनातली विषयासक्ती सोड. युद्धात उभा असशील तेव्हा हातात धनुष्यबाण घे. पण एरवी खाली ठेव. त्याचप्रमाणे काम असतानाच मनात विषय आण. एरवी ते बंद करायला शिक. विद्वान बापाचा ' ढ ' मुलगा आहे. तो आपल्याप्रमाणेच विद्वान व्हावा म्हणून पित्याने अतोनात श्रम घेतले. पण मुलाच्या डोक्यातच शिरत नसे. मारूनसुद्धा उपयोग झाला नाही. तेव्हां त्याच्याबद्दल पिता उदासीन राहिला. ज्ञान्याला प्रारब्धाने भोग मिळाले तर तो त्याबद्दल असाच उदासीन असतो. तोच स्थितप्रज्ञ असे समज.

**यततो ह्यपि कौन्तेय पुरुषस्य विपश्चितः ।**
**इंद्रियाणि प्रमाथीनि हरन्ति प्रसभं मनः ॥ ६० ॥**

अर्जुना, बुद्धी स्थिर करण्याकरता प्रयत्न करीत असलेल्या विवेकी पुरुषाचेही मन उच्छृंखल इंद्रिये बलात्काराने विषयाकडे ओढतात.

अर्जुन म्हणाला, ' आत्मा हा एकच नित्य पदार्थ आहे व विषयात दोष आहेत. असे निश्चित ठरवून त्याचप्रमाणे वागल्यास मनातली आसक्ती जाऊन ते निर्दोष, निरिच्छ नाही का होणार ? त्याकरता स्थितप्रज्ञच कशाला व्हायला पाहिजे ? तुमच्यापुढे सुंदर सुग्रास पंच-पक्वान्नांचे भोजन आणून ठेवले. तुम्ही घास घेणार इतक्यात यात थोडे विष मिश्रित केले आहे, असे सांगितले. खरोखर तसे केले नसतानाही, तरी तुम्ही जेवाल काय ? भूक सडकून लागली असतानाही जेवणाची इच्छाच होणार नाही. त्याचप्रमाणे विषयातले दोषदर्शन मनाला रोज करवत गेल्यास ते निरिच्छ का होणार नाही ? ' भगवान म्हणाले, ' तू म्हणतोस त्याप्रमाणे व्हायला हरकत नाही. पण तसे होत मात्र नाही. कारण इंद्रिये प्रबल असतात. ती मनुष्याला लगेच बहिर्मुख करतात. त्यांच्यापुढे मनाचे कांही एक चालत नाही. चोरात दोन प्रकार आहेत. एक भुरटे व

दुसरे पक्के. तुमचे लक्ष दुसरीकडे वेधून पाठ फिरली की पाकीट चोरणारे ते भुरटे. पण तुमचे लक्ष पैशाकडे असताना भरदिवसा इतरांना सुद्धा सुगावा लागू न देता चोरी करणारे ते पक्के चोर. ते म्हणतात, पोलीसांना आम्ही भीक घालत नाही. उलट त्यांनाच पकडून त्यांच्या मोटारी पेटवून देतो. अर्जुना, इंद्रिये या पक्क्या चोराच्याच जातीची आहेत. म्हणून विषयातले दोष दाखवून, ठरवून, मन निर्दोष व्हायचे नाही.

**तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः ।**
**वशे हि यस्येन्द्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६१ ॥**

ती सर्व इंद्रिये ज्याने माझ्या ठिकाणी मन ठेवल्यामुळे आवरली व ती ज्याच्या स्वाधीन आहेत, त्याची बुद्धी स्थिर झाली असे समजावे.

तुमच्या धनाचे रक्षण तुम्हांला करता येत नाही. म्हणून ते सुरक्षित राहण्यासाठी राजाकडे द्यायचे. सध्याच्या नव्हे, तर पूर्वीच्या रघूसारख्या राजाकडे दिल्यास धनाची काळजी करण्याचे कारण नाही. नुसते मन दुर्बळ असते, पण ते माझ्या स्वाधीन कर, की ते प्रबळ होते. मग त्याच्यापुढे इंद्रियांचे कांही एक चालत नाही. राजा केव्हां प्रबळ असतो? मंत्रिमंडळ त्याच्या स्वाधीन असेल तर. तो मंत्र्यांना म्हणतो, ' मला तुम्ही फक्त माहिती आणून द्या. बाकी लुडबूड करू नका. तुम्ही सांगता ते खरे की खोटे ते मी जातीने पाहून तपास करून नंतर निर्णय देईन. ' पण मंत्रिमंडळ बलवान असेल तर ? राजा त्यांच्या हातातले निव्वळ बाहुले बनतो. ते त्याला निष्कारण भीती घालतात, अमुक करा, तमुक नको, असे दडपण घालतात.

इथे मन हे राजा आहे, व विवेक हा त्याचा मंत्री. तो सुंदर असेल तर इंद्रियरूपी कारकून वचकून असतात. अग्नीने जसे गवत जळते त्याप्रमाणे ईश्वरचिंतनाने मनातले दोष जातात, ते प्रबल होते.

अर्जुना, तू मत्पर होऊन आधी मनोजय कर, म्हणजे इंद्रियजय आपोआपच होईल. अर्जुन म्हणाला, ' मनोजयाशिवाय इंद्रियजय नाही व इंद्रियजयाशिवाय मनोजय नाही. एका मनुष्याला वेळेवर लग्न झाले नाही म्हणून वेड लागले. डॉक्टरांनी सांगितले, ' त्याच्या मेंदूवर परिणाम झाला आहे. तो जाण्याकरता त्याचे लग्न करा.' तो लग्न करायला एका पायावर तयार होता; पण खुळ्याला मुलगी कोण देणार ? मुलीनेच स्वतः पसंती करायची असली, तरी ती त्याला पसंत कशी करणार ? म्हणून लग्नाशिवाय वेड जात नाही व वेड गेल्याशिवाय लग्न होत नाही. तसेच मनोजयाशिवाय इंद्रियजय नाही व ती जिंकल्याशिवाय मनोजय होत नाही. मग मोक्षच व्यर्थ झाला. अध्यात्मशास्त्रावरच सारी शास्त्रे ( कामशास्त्र, अर्थशास्त्रसुद्धा ) अवलंबून आहेत. तोच त्यांचा पाया आहे. पण तोच पाया ढासळला तर ? सर्व शास्त्रे कोलमडून पडणार. अनवस्था प्रसंग निर्माण होणार.

अमानित्व, अदंभित्व वगैरे गुण हा स्थितप्रज्ञांचा स्वभाव बनलेला असतो. तेच गुण साधकाने साधने म्हणून स्वीकारायचे असतात. पण मोक्ष व्यर्थ झाल्यामुळे हे सर्व वर्णन कादंबरीतलेच होणार. आधी मनोजयच का करायचा ? इंद्रियजय का नाही ? नाक हाताने एकदम धरून प्राणायाम करता येत असताना ' शिरोवेष्टनेन नासिकास्पर्शः किमर्थम् ? ' त्या त्या इंद्रियांचे गोलक आपले आपणाला आवरता येत नाहीत काय ? समोर दृश्य आले तर डोळे बंद करायचे. जोराचा आवाज येऊ लागला तर कानात बोळे घालायचे. वास आला की, नाकाला रुमाल लावायचा. असे करायला येत असताना मनोजयाची गरजच काय ?

भगवान म्हणाले, ' डोळे झाकले असतील पण मनातले विषय गेले नसतील तर डोळे आपोआपच उघडले जातात. तू विसरला असशील पण मी विसरलो नाही. तू त्रिदंडी संन्यास घेतला होतास. पण

सुभद्रा समोर दिसल्याबरोबर ते सर्व विसरलास. तिला रथात घालून पळवून नेलेस. पाहुण्यांच्या घरी जाऊन त्यांची मुलगी संन्याशाने पळवून नेणे बरे दिसते काय? असे का झाले माहीत आहे? मन साभिलाष राहिले म्हणूनच. बगळा नदीच्या काठावर डोळे मिटून स्वस्थ बसतो. पण त्याच्या मनात काय चाललेले असते? माशांचे विचार. मासा आला की तत्काळ उडी मारतो. मनातली आसक्ती कायम ठेवून बाह्य इंद्रिये बंद करून ध्यान करशील तर ते बकध्यान होईल. त्याचा मुळीच उपयोग नाही. लोहार धार लावत बसलेला असतो. त्याच्या समोरून राजाची थाटामाटाची, अनेक बत्त्या असलेली, पंचरंगी बँडची वरात जाते. पण त्याला तिची दाद नसते. त्याचे डोळे उघडेच असतात, पण मन कामाकडेच एकाग्र झाले असल्याने त्याला वरात दिसत नाही. अर्जुना, अशा प्रकारे मनोजय झाला असेल तर इंद्रियांचे कांही एक चालत नाही. हे यावरून तुझ्या लक्षात आले असेलच. अर्जुन म्हणाला, 'एकदा सुभद्रेच्या बाबतीत माझी फजिती झाली, पण नेहमी तसे होते असे थोडेच आहे?' भगवान् म्हणाले, 'इंद्रिये हे विश्वासाचे कुळ नव्हे. 'बलवान् इंद्रियग्रामो विद्वांसमपि कर्षति।' म्हणून सावध रहा. प्रथम मनोजय करून मोकळा हो.

**ध्यायतो विषयान् पुंसः संगस्तेषूपजायते ।**
**संगात् संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते ॥६२॥**
**क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः ।**
**स्मृतिभ्रंशाद् बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ॥६३॥**

अर्जुना, विषयचिंतनाची अनर्थपरंपरा आता ऐक. मनुष्य विषयचिंतन करतो, सतत तेच केल्याने त्याचा संग म्हणजे आवड निर्माण होते. नंतर त्याचा काम म्हणजे तो पदार्थ आपणालाच मिळावा अशी उत्कट इच्छा निर्माण होते. कोणी त्यामध्ये अडथळा

आणला की क्रोध निर्माण होतो. रागामुळे आपण कोण व काय करत आहो, याचे विस्मरण होते. बुद्धिनाश होऊन शेवटी सर्वस्वी घात होऊन तो जन्ममरणाच्या फेऱ्यात पुनःपुनः पडतो. पुरुषार्थ संपादन करण्यास सर्वस्वी अयोग्य होतो.

मनुष्याला विषयच सुंदर वाटतात. कारण त्याचा जन्मोजन्मीचा तसा अभ्यास आहे. पण ईशचिंतनाचा तसा नाही. ईश्वरचिंतनाची ज्याला गोडी लागली, तो विषयाकडे ढुंकूनही पहात नाही. सतत साखरेचाच चहा जो पितो, त्याच्यापुढे गुळाचा चहा ठेवला तर तो घेईल काय ? हातसुद्धा लावणार नाही. तसेच हे आहे, अर्जुना, त्याकरता विषयचिंतन सोडून, तू ईश्वरचिंतन करत जा.

**रागद्वेषवियुक्तैस्तु विषयानिन्द्रियैश्चरन् ।**
**आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति ॥६४॥**

परंतु ज्याच्या इंद्रियातील विषयाबद्दल असलेली आवड व नावड मावळलेली आहे, मन ज्याच्या स्वाधीन झालेले आहे, त्याला मनाची प्रसन्नता लाभते.

भगवंतांनी अर्जुनाला सांगितले, ' तू मत्पर हो. मन माझ्या सगुण रूपावर केंद्रित कर. महामंत्र्याच्या शिपायाला साखर हवी तेवढी मिळते. त्याला उन्हातान्हाचा त्रास बिलकुल होत नाही. मंत्र्याबरोबर तो एअरकंडिशन्ड जागेत वावरतो. श्रीमंताजवळ राहिल्यास त्याचे वैभव आपोआप येते. आले नाही तर तो खरा श्रीमंतच नव्हे. अप्पासाहेब सांगलीकरांची याबद्दल एक गोष्ट प्रसिद्ध आहे. ते जेवायच्या आधी पावलाभार केशर गंधाच्या थाटीत घालून त्यांच्या पानाजवळ ठेवलेले असे. जेवणाच्या आधी त्यात पाणी घालून त्याचा टिळा कपाळावर लावून जेवण सुरू होई. एकदा दिवाणाने ते केशर पाहिले. तो नोकरांना म्हणाला, ' इतके केशर कशाला ठेवता ? ' ते म्हणाले, ' महाराजांच्या

आज्ञेप्रमाणे असे करावे लागते.' दुसऱ्या दिवशी दिवाणाने चार काड्याच केशर थाटीत ठेवले. 'आज केशर कमी का?' असे सरकारांनी तत्काळ विचारले. दिवाणजीने दिले, हे कळताच तत्काळ त्याला बोलावून आणून विचारले. तो म्हणाला, 'आपण एकच टिळा तर लावता, बाकीचे वाया जाते, म्हणून मुद्दाम कमी दिले.' 'तुम्हाला 'पगार किती आहे?' '३०० रुपये.' 'तुम्ही दोघे तर आहात. मग इतका पगार कशाला? मी २५ रुपये पगार करतो. (तेव्हा स्वस्ताई होती त्यामुळे त्यात उत्कृष्ट रीतीने भागायचे. आता २५० रु. मध्ये सुद्धा भागत नाही.) मला टिळ्याला केशर किती लागते हे मी जाणतो. त्यातून उरलेले हे लोक विकतात. खुशाल विकू देत. त्यामुळे त्यांच्या संसाराला मदत होते. खबरदार पुनः कमी ठेवाल तर.'

तुम्ही म्हणाल, पाटल्या सतत घातल्या तर सोने वाढते कुठे? उलट ४।६ गुंजा झिजून ते कमीच होते. पण असा सिद्धांत आहे की, 'व्यये कृते वर्धत एव नित्यम्।' नुसती विद्याच नव्हे तर धनसुद्धा दानाने वाढते. धर्मराजाकडे रोज ८८ हजार ऋषी सुवर्णाच्या ताटात जेवत असत. शिवाय दहा हजार स्नातक म्हणजे ब्रह्मचारीसुद्धा. पण त्यामुळे राज्य गेले नाही. कमी पडले असे नाही. तर द्यूतामुळे राज्य गेले असे तो स्वतः म्हणतो. इतका दानधर्म करणारे हृदय केवढे उदार असले पाहिजे? सध्या सुवर्णाच्या राहू दे. पण चांदीच्या ताटात एका संन्याशाला वाढण्याची तुमची तयारी आहे काय? तो घेऊन जाईल म्हणता. म्हणून सर्व जिन्नस बँकेत किंवा कुलपात झाकून ठेवता.

पूर्वी राजांच्या पदरी हत्ती असायचे. एकेका हत्तीला दोन दोन पायलीचे रोट लागायचे. त्याशिवाय माहुताचा खर्च व वैरण हे वेगळेच. खुद्द कोल्हापुरला असे दोनशेहे हत्ती होते. मग इतक्याला किती गहू लागले असते? त्यांचा उपयोग काय? फक्त स्वारीवर

जाताना वर्षातून एकदा, दोनदा बाहेर काढायचे एवढेच. ते हत्ती आता गेले म्हणून बरे झाले की नाही? अहो, त्यामुळे कित्येक टन गहू वाचला. तो घालायला अमेरिका तरी कशी पुरली असती? पण लोकांना हे कळत नाही की देण्याचे प्रमाण कमी केल्यामुळे पूर्वीचे पोते जाऊन पिशवी आली व यापुढे खिसा येणार. गुऱ्हाळात येणाऱ्या जाणाऱ्याला ऊस, रस फुकट दिला तर दोन ढेपा जास्त पडतात व ते बंद केल्यास उत्पादन तर वाढत नाहीच. पण कमी होते, असा अनुभव आपोआपच येतो. म्हणजेच श्रीमंताच्या आश्रयाला राहिल्यास त्याची श्रीमंती तुमच्याकडे आपोआपच येते. उत्कृष्ट गायकाकडे राहिल्यास त्याचे ऐकून ऐकून सर्व राग आपोआपच येतात. आम्हाला एकच राग माहीत असतो. रागावणे. पण तो नव्हे. गायनातले सर्व राग त्याला संगतीमुळे येतात. मोठ्या दुकानात १०।१२ वर्षे राहिल्यास त्यातले सर्व ज्ञान आपोआप होते. चव्हाट्यावर ४।८ दिवस बसल्यास अस्सल शिव्या द्यायला येतात. न शिकवता. सारांश, मनाला जशी संगती लावावी, तसे ते चांगले किंवा वाईट बनते. याकरता मी तुला सांगतो, 'ते ईश्वराकडे लाव, की त्याचे वैभवच नव्हे तर अशेष गुण त्याला येतील. ते निर्विषय व सुंदर बनेल.

इंद्रियनिग्रह अवश्य केलाच पाहिजे, यात वाद नाही. ज्याला कुठलेच बंधन पाळता येत नाही, त्याला नोकरीसुद्धा लागत नाही. यदाकदाचित लागली तरी इकडे तिकडे जाण्यामुळे ती टिकत नाही. शास्त्राने दोनच मुख्य गोष्टी सांगितल्या आहेत. त्या अशा —

आपदां कथितो मार्गः इंद्रियाणामसंयमः ।
तज्जयः संपदां पन्थाः येनेष्टं तेन गम्यताम् ॥

इंद्रिये मोकाट सोडली तर सर्व संकटे न बोलावता येतात. या उलट ती जिंकल्यास, सर्व संपत्ती चालून येते. म्हणून यांपैकी हवे ते

करा. पण आधी तू मनोनिग्रहच कर. नंतर इंद्रियनिग्रह कर. कारण राग येऊन डोळे लाल होतात हे कबूल. पण त्या आधी आतील मन तापलेले असते. नंतरच त्याची प्रतिक्रिया बाहेर उमटते. मन हे राग-द्वेषांचे अधिष्ठान आहे. म्हणून आधी तेच जिंकले पाहिजे.

'स्थितप्रज्ञ व्यवहार करतो. पण रागद्वेष सोडून. पण विषयांचे नुसते चिंतन मानवाला सर्व पुरुषार्थांपासून भ्रष्ट करते, च्युत करते. आणि हा तर विषयग्रहण करतो, मग त्याच्यापुढची पायरी झाली. तरी त्याला आनंद कसा मिळतो?' तो विषयग्रहण करतो ते स्वभाव म्हणून. वेताचे अन्न खाल्ले की शरीराला पुष्टी येते, तुष्टी येते. आरोग्य व तेज येते. पण तेच अधिक खाल्ले तर? सुस्ती येते. जेवून वाचायला बसले की डोळे आपोआप मिटतात. झोपही धड लागत नाही. मग या कुशीवरून त्या कुशीवर लोळत पडतो. अजीर्ण होते. स्थितप्रज्ञ वेताचेच विषय घेतो. ते देखील रागद्वेष नसलेल्या इंद्रियांनी. त्यामुळे त्याला प्रसन्नता मिळते, तीच पुढे वाढत जाऊन 'प्रसन्नेषु चित्तेषु आत्मा आविर्भवति।' इंद्रिये ही शिपाई आहेत व मन त्यांचा राजा आहे. ते सामर्थ्यवान असले तरी त्यांच्या चौकटीत सापडल्यामुळे, त्याचे काहीएक चालत नाही, त्याकरता त्याने इंद्रियजयसुद्धा केला पाहिजे.

**प्रसादे सर्वदुःखानां हानिरस्योपजायते ।**
**प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धिः पर्यवतिष्ठते ॥ ६५ ॥**

मन प्रसन्न झाल्यावर सर्व दुःखे आपोआप जातात. मन प्रसन्न झालेल्याची बुद्धी परमात्मस्वरूपीं लवकर स्थिर होते.

भगवान म्हणाले, 'स्थितप्रज्ञ जेव्हा समाधिमग्न असतो तेव्हा तो काहीच करत नाही. पण तो जेव्हा समाधीतून उठतो तेव्हा व्यवहार करणारच व विषयग्रहणही होणारच. सर्वच विषय सोडता येणे केव्हाच शक्य नाही. पण तो रागद्वेष सोडून विषय घेतो, त्याच्या इंद्रियात रागद्वेष

नसतात. कारण रागद्वेषांचे अधिष्ठान मन. तिथेच ते लयाला गेलेले असतात. मग इंद्रियात ते दोष कसे येतील? मुळात नदीलाच पाणी नसेल तर पाटाला पाणी कसे येणार? मन प्रसन्न होते त्यामुळे दुःखे जातात व बुद्धी आत्म्याला चहूबाजूंनी वेष्टून राहते.

दुःखे तीन प्रकारची असतात. १) आध्यात्मिक- इथे आत्मा म्हणजे देह हा अर्थ घ्यायचा आहे. डोके दुखते, पोटातच कळा येतात. ताप येतो. ही सारी व्याधिरूप दुःखे आध्यात्मिक आहेत. वास्तविक यांचे यायचे काही एक काम नसते पण ती येतातच. २) आधिभौतिक– व्याघ्रतस्करादिजन्यं दुःखम्। भूतांनी भूतांना त्रास देणे. उदा. चोरी होते. शत्रू पीडा देतो. राजासुद्धा पीडा देतो. कर वाढतात. सध्या एस्. टी. चे भाडे वाढले आहे. त्यामुळे तुम्हांला दुःख होते की नाही? ते प्रजेला द्यावे अशी राजाची इच्छा असो अथवा नसो. पण आम्हांला दुःख होते हे निश्चित. ३) आधिदैविक– शीतातपवातवैद्युतादि दुःखम्। अतिवृष्टी, अनावृष्टी, भूकंप, प्रचंड वादळे, थंडीची व उष्णतेची लाट, वीज पडणे. त्यामुळे माणसे मृत्युमुखी पडतात. पशुपक्षीसुद्धा मरतात. सध्याचे लोक ईश्वर नाही म्हणतात. मग हे दुःख कुणी दिले? देवतेंच्या कोपामुळेच ही दुःखे येतात. पण अर्जुना, ही तिन्ही दुःखे स्थितप्रज्ञाला नसतात. मन प्रसन्न असल्यामुळे.

अर्जुन म्हणाला, 'तरति शोकम् आत्मवित्।' असे श्रुती म्हणते. आत्मज्ञानानेच सर्वदुःखनिवृत्ती व परमानंदप्राप्ती होते. आणि तुम्ही तरी म्हणता, मनःप्रसन्नतेमुळे होते. यांपैकी खरे कोणते?

भगवान म्हणाले, 'माझे मुळीच चुकले नाही. शास्त्राचे सुद्धा चुकले नाही. प्रसन्नतेमुळे दुःखे जातात. ज्ञानाच्या द्वारा, असे म्हण की अर्थ लागतो. एखाद्या सूक्ष्मतर वस्तूचे ज्ञान करून घ्यायचे असेल तर 'आता मी फार गडबडीत आहे, थोडा स्वस्थ होतो मग पाहतो,' असे

आपण म्हणतो. मन तरी प्रसन्न असावेच लागते, शिवाय विशिष्ट योग्यता पाहिजे, तरच ज्ञान होते. एक शेतकरी त्याच्या कामात फार हुषार आहे. पण जर तो एखाद्या रोग्याची नाडी तासभर धरून बसला तर त्याला त्यातले काही कळेल काय ?

म्हणून योग्यता पाहिजे. उत्कृष्ट रत्नपारखी आहे. त्याच्याकडे रत्न दिले व किंमत सांग म्हटले, तर त्याला ते रत्न दिसते यात वाद नाही. पण तितक्यात रंभेसारखी अप्सरा समोर उभी राहिल्यास तो तिच्याकडे पहात राहतो आणि म्हणतो की ही इथून जाऊ दे. मग किंमत सांगतो. कारण डोळ्यातून त्यावेळी मन बरोबर बाहेर गेलेले असते किंवा त्याला अचानक सुंदर अशी बालगंधर्वाची रेकॉर्ड ऐकू आली तर? 'थांबा एवढे पद ऐकून मग सांगतो' असे म्हणतो. रात्री दुकान बंद होण्याच्यावेळी धान्य खरेदी केले. ७४ पैसे किलो प्रमाणे १३ किलो मिलो घेतला. दुकानदार म्हणतो, 'धान्य तुम्ही खुशाल घेऊन जा. पण पैसे हिशोब बरोबर करून उद्या द्या. तुमची ओळख आहे. पैसे कुठे पळून जात नाहीत. आता गडबडीत हा किचकट हिशोब नको. कारण गडबडीने मन हिशोब करण्याला तयार नसते.

रूपामुळे पतंगाचा, नादामुळे मृगाचा, स्पर्शासक्तीने गजाचा, रसामुळे माशाचा व गंधासक्तीने भ्रमराचा नाश होतो. एकेका इंद्रियाच्या आसक्तीने जर असे होते, तर सर्वच इंद्रियांमागे मन धावत सुटले तर कसे होईल? सर्वस्वाचा घात होईल. याकरता इंद्रिये त्या त्या विषयांच्या आसक्तीपासून रोधली पाहिजेत. म्हणजे मन एकाग्र होऊन प्रसन्न होते व आत्मज्ञान होते. जितकी मनःप्रसन्नता अधिक तितके लवकर ज्ञान होते. हा अनुभव व्यवहारातही येतो. भगवान म्हणतात, हाच सिद्धांत मी तुला अन्वय आणि व्यतिरेक या दोन्ही तऱ्हेने सांगतो. डॉक्टर म्हणतात, 'मी होतो म्हणून हा वाचला,' हे

होकारात्मक कथन, याला अन्वय म्हणतात. 'मी नसतो, तर हा वाचलाच नसता.' या कथनाला व्यतिरेक म्हणतात. इंद्रिये वश होऊन मन:प्रसन्नतेने ज्ञान होते, असे सांगितले, हा अन्वय झाला. हेच पुढे भगवान व्यतिरेकाने सांगतात.

**नास्ति बुद्धिरयुक्तस्य नचायुक्तस्य भावना।**
**नचाभावयतः शान्तिरशान्तस्य कुतः सुखम् ॥ ६६ ॥**

योगयुक्त नसलेल्या पुरुषाची बुद्धी स्थिर नसते. आणि त्याला बुद्धिस्थैर्याची इच्छाही नसते. ज्याला स्थिरतेची इच्छा नाही, त्याला शांती नाही; आणि शांतिरहिताला सुख कुठले येणार ?

इंद्रियजय ज्याने केला नाही तो अयुक्त. त्याला बुद्धी नसते. म्हणजे त्याच्या हातून श्रवण, मनन घडत नाही. अर्जुनाने यावर आक्षेप घेतला. इंद्रिये मोकाट सुटली तरी मानापमान समजतातच. समोरून येणारी म्हैस समजते. म्हणजे सर्व पदार्थांचे ज्ञान होते. मग इंद्रियजय नसताना आत्मज्ञान का होऊ नये ? भगवान म्हणाले, 'तुम्ही सर्व द्रोणाचार्यांकडे धनुर्वेद शिकत असताना त्यांनी परीक्षा घेतली होती. त्या परीक्षेत तू एकटाच पास झाला होतास.'

द्रोणांनी मुलांना सांगितले की समोरच्या चिमणीला मारायचे आहे. तिचा कंठ हे लक्ष्य आहे. ज्येष्ठापासून परीक्षा घ्यायची म्हणून राजा धर्माला बोलावले, आणि विचारले, 'तुला काय काय दिसते, ते सांग! तो म्हणाला, 'गुरुजी, मला आपण दिसता, झाड दिसते, चिमणी दिसते. तेव्हा द्रोणाचार्य म्हणाले, मग ठेव ते धनुष्यबाण खाली.' दुर्योधन, दु:शासन, भीम सर्वजणांनी असेच सांगितल्यामुळे, ते सर्व नापास झाले. शेवटी अर्जुनाला बोलावून विचारले, तुला मी दिसतो ? तो म्हणाला, 'नाही' 'मग झाडे' ? 'नाही.' 'मग काय दिसते ?' अर्जुन उत्तरला, 'फक्त चिमणीचा कंठ हे लक्ष्य मला दिसते. बाकी

काही दिसत नाही,' मग अर्जुनाने बाण सोडताच तत्काळ कंठभेद झाला. या वेळी सर्व इंद्रिये बंद करून अर्जुनाचे मन लक्ष्यावरच केंद्रित झाले होते; म्हणूनच त्याला लक्ष्यभेद अचूक करता आला.

यावरून इंद्रियजय असला तरच कार्य होते, हे सिद्ध होते. 'नचायुक्तस्य भावना' । श्रवण ज्याला झाले नाही, त्याला भावना म्हणजे मननही होत नाही, निदिध्यासन होत नाही, हे कसे? वेदामध्ये 'घृतं आयुः ।' असे सांगितले आहे. याचा अर्थ तूप म्हणजे आयुष्य असा घ्यायचा काय? तूप घटात असते, तसेच आयुष्यही घटात असते की काय? तर तसे नाही. तर तूप हे आयुर्वर्धक व आरोग्यदायक आहे, असा करायचा. आम्ही सध्या तूप खाणेच सोडल्यामुळे आरोग्य गेलेले आहे. त्याचप्रमाणे श्रवण हे मनन व निदिध्यासनाला जनक आहे. त्यांचा पाया आहे, कारण ऐकलेच नाही तर मनन कशाचे करणार? 'न चा भावयतः शांतिः ।' ही दोन्ही ज्याला नाहीत, त्याला शांती म्हणजे तत्त्वसाक्षात्कार नाही. 'अशान्तस्य कुतः सुखम् ।' साक्षात्कार नाही त्याला मोक्षसुख कुठले?

**इंद्रियाणां हि चरतां यन्मनोऽनुविधीयते ।**
**तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवाम्भसि ॥ ६७ ॥**

विषयांच्या ठिकाणी इंद्रिये स्वैर संचार करू लागली असताना जे मन त्यांच्यामागे धावते, ते पाण्यातील नौकेला भलतीकडे नेणाऱ्या वायूप्रमाणे बुद्धीला भलतीकडे नेते.

नौका नदीत सोडलेली आहे. ती पूर्वेकडून पश्चिमेकडे न्यायची आहे. पण वारा उलट दिशेने वाहात आहे. मग काय करायचे? तर नौका इच्छित दिशेला न का जाईना. पण भलतीकडे वहात जाऊ नये म्हणून तिथल्या तिथेच तिला डांबून ठेवायची. त्याचप्रमाणे आत्मज्ञान मिळवायचे असेल व इंद्रिये जर ऐकत नसतील तर मन ईश्वराच्या सगुण साकार रूपावर डांबून ठेवायचे. म्हणजे इंद्रिये स्थिर राहतात.

भगवान अर्जुनाला म्हणतात, ' अर्जुना, इंद्रियजय हा फक्त परमार्थतः आवश्यक आहे, असे नव्हे तर व्यवहारातही त्याची आवश्यकता आहे. एकवेळ परमार्थातील साधक, ' मला लोकांशी काय कर्तव्य ? ' असे म्हणून त्यांच्याशी फटकून वागेल. पण व्यवहाऱ्याला असे करता येणार नाही. अगदी लहान व्यक्तीला, क्षुल्लकालाही त्याला प्रसन्न ठेवावे लागते. त्याकरता तो म्हणेल, ते कबूल करावे लागते. म्हणून तर ' अडला नारायण गाढवाचे पाय धरी ' ही म्हण पडली आहे. क्षुल्लक पुरुषास अप्रसन्न ठेवल्यास, तो गावभर तुमची नाचक्की करीत फिरतो.

लग्नाचा मुहूर्त रात्री साडेसातला आहे. हजारो दिव्यांची रोषणाई करायचे ठरले आहे. ऐनवेळी इकडून नवरा वाजत आला की नेमके त्यावेळीच वाजंत्रीवाले बेपत्ता होतात. दिवे एकदम जाऊन बेरंग करत नाहीत काय ? याकरता प्रत्येकाला संतुष्ट ठेवावे लागते. त्याकरता स्वतःच्या वाणीवर व मनावर मोठा ताबा ठेवावा लागतो.

शास्त्रकार म्हणतात, ' तुम्हांला काम, क्रोध आवरता आले नाहीत तरी हरकत नाही. तुम्ही त्यांचे फक्त वेग आवरा.

' शक्नोतीहैव यः सोढुं प्राक् शरीरविमोक्षणात् ।
कामक्रोधोद्भवं वेगं स युक्तः स सुखी नरः ।।

लोक म्हणतात, ' ते आवरण्याचा फायदा काय ? समाधान. माझ्या आयुष्यात अत्यंत आणीबाणीच्या प्रसंगी मी चार वेळा राग आवरला आहे; असे दुसऱ्याला सांगण्यात व हे आठवण्यात केवढे समाधान आहे ? त्याच्या शतांशसुद्धां पैशाने होत नाही. शरिराला किती गोष्टी पाहिजेत ? दोनच. अन्न आणि वस्त्र. पण घरात तुम्ही हजारो पदार्थ साठवता त्यातले निरुपयोगी बाहेत टाकतच नाही. उलट त्याकरता माळा तयार करता. इतकेच नव्हे तर दुसऱ्याने टाकलेले निरुपयोगी पदार्थसुद्धा घेऊन येता. कितीही पगारदार जरी असला व त्याने लग्नात वरदक्षिणा जरी भरपूर घेतलेली असली तरी त्याला प्रपंचातले सर्व पदार्थ एकदम मुळीच

घेता येत नाहीत. मग एका वर्षी बंब, एका वर्षी गॅस, एका वर्षी रेडिओ, असे दरवर्षी करत जायचे. असे करता, करता दहा पंधरा वर्षांनी प्रपंच थाटतो. अर्जुना, तुम्ही कामक्रोधादी आवरत गेल्यास ती पुंजी साठत जाते. याप्रमाणेच परमार्थ नाही का साठणार? कारण इंद्रिये व मन यांच्या निग्रहाची पूर्णता म्हणजेच ज्ञानप्राप्ती.

भगवान विष्णू लक्ष्मीसह अंत:पुरात झोपले असताना भृगू ऋषी आले. पत्नीसह एकांतात असताना तुम्हांला दुसरा कोणी आत आला तर खपणे शक्य आहे का? इतकेच नव्हे तर लक्ष्मी पहात असताना त्यानी भगवंताच्या छातीवर लत्ताप्रहार केला. पत्नीदेखत असा अपमान केल्यावर तुम्ही गप्प बसाल? समजा, गप्प बसला, तरी ती गप्प बसेल? उठा, नेभळटासारखे, नपुंसकासारखे स्वस्थ काय बसला?' असे म्हणेल. कीचकाने द्रौपदीचा अपमान केल्यावर तिने भीमाला असे डिवचले होते. त्यामुळे एकशेहेएक कीचक व अनुकीचक यांचा वध झाला होता. पण इथे भगवान गप्प बसले व ते भृगूंना म्हणाले, ' अनेक दैत्यांशी युद्ध करून माझे वक्ष:स्थळ कठीण झाले आहे. त्यामुळे आपल्या पायांना पीडा झाली असेल. थांबा. मी ते तेल लावून चोळतो. लक्ष्मीला तेल आणायला सांगितले व तिनेही मुकाट्याने आणले.

भृगूंनी तरी लत्ताप्रहार का केला? द्वेषामुळे? मुळीच नाही. सभा भरली होती. सामान्यांची नव्हे, तर मुनींची. त्यात श्रेष्ठ देव कोणता, हा प्रश्न निघाला होता. भृगू म्हणाले, ' मी प्रत्यक्ष परीक्षा करून हे ठरवितो. म्हणून त्यांनी लत्ताप्रहार केला. त्यावेळी विष्णूनी चार शब्द काढले असते तर कनिष्ठपणा कायमचा आला असता. पण इंद्रियनिग्रह केल्यामुळे कायमचे श्रेष्ठत्व मिळाले. या उलट इंद्रियनिग्रह नसल्यामुळे ब्रह्मदेवाला कायमचे गौणत्व आले. लोक म्हणतात, इंद्रिय निग्रहामुळे तोटा होतो. पण त्यांना शास्त्रकार म्हणतात, ' तुम्ही

आपली इंद्रिये बेलगाम सोडल्यामुळे किती वेळा फायदा झाला आहे? फारच थोड्या वेळा. म्हणून इंद्रिये रोधाच. त्यावेळी तोटा झाला, तर मुळीच घाबरू नका. कारण ईश्वर म्हणतो, 'हे याने माझ्याकरता केले; म्हणून मी याला जबाबदार आहे.' तो दुप्पट भरपाई करून देतो.

**तस्माद्यस्य महाबाहो निगृहीतानि सर्वशः ।**
**इंद्रियाणींन्द्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६८ ॥**

म्हणून, हे महाबाहो, ज्याची इंद्रिये विषयांपासून पूर्णपणे आवरलेली असतात, त्याची बुद्धी आत्मस्वरूपी स्थिर झाली असे समज.

अर्जुन म्हणाला, 'इथे यस्य हे एकवचन का? येषां हे बहुवचन का वापरत नाही?' भगवान म्हणाले, 'जगात स्थितप्रज्ञ किंवा निग्रही लोक किती आहेत? अत्यंत दुर्लभ.' एखादाच असतो. म्हणूनच 'महात्मा सुदुर्लभः' असे म्हटले आहे. शिवाय अत्यंत सुंदराचा उल्लेख करताना एकवचन वापरावे असा नियम आहे. 'त्वंकारयुक्ता हि गिरः प्रशस्ताः ।' म्हणून एकवचन घातले. मी आतापर्यंत तुला समाधिस्थ व व्युत्थित अशा दोन्ही स्थितप्रज्ञांची वेगवेगळी लक्षणे सांगितली. पण आता एक समान लक्षण सांगतो.

**या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी ।**
**यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ॥६९॥**

सर्व प्राणी ज्याविषयीं निद्रिस्त असतात, त्याविषयीं संयमी पुरुष म्हणजेच स्थितप्रज्ञ जागा असतो व ज्याठिकाणी प्राणिमात्र जागरूक असतात, त्याठिकाणी ज्ञानी निद्रिस्त असतो.

रात्र म्हणजे तरी काय? सर्व विषयांचे अज्ञान. इतके की मी झोपलो आहे; हे सुद्धा भान नसते. दिवस की रात्र आहे, याचीसुद्धा शुद्ध नसते. सर्व भूतांना ब्रह्माबद्दल असेच गाढ अज्ञान आहे. ब्रह्माचे अज्ञान हीच त्यांची रात्र. त्याबद्दल स्थितप्रज्ञ जागा असतो. ज्ञान झालेले असते

म्हणून. अशा अज्ञानी अवस्थेत सर्व लोक व्यवहार करतात कसे? स्वप्नात होतात ना? सध्या अन्नाची महागाई आहे. पन्नास माणसांवर जेवण घालता येत नाही. पण स्वप्नात तुम्ही लक्ष भोजन घातले तरी चालते. स्थितप्रज्ञ तसेच व्यवहार करतो. प्रत्यक्ष साक्षात्कार ज्याला झाला व प्रपंचाच्या वासना ज्याला नाहीत, तोच स्थितप्रज्ञ असे समज.

याज्ञवल्क्यांना दोन बायका होत्या. एक कात्यायनी व दुसरी मैत्रेयी. ते संसार करायचे. राजा जनकाकडे जाऊन त्याच्या प्रश्नाची उत्तरे द्यायचे. प्रत्येक प्रश्नाच्या उत्तराला दहा हजार गाई घ्यायचे. साक्षात्कार झाल्यावर त्यांनी संन्यास घेतला. त्यामुळे सर्व वासना गेल्या. आत्मज्ञान जरी झाले तरी लगेच स्थितप्रज्ञता येत नाही. उत्कृष्ट रीतीने एम्. बी. बी. एस्. झाला तरी त्याने एकदम ऑपरेशन करायचे नाही. फाडाफाडीच जरी करायची असली तरी ते कुठे कसे करायचे, हे कळण्याकरता सर्जनच्या हाताखाली प्रथम दोन-चार वर्षे राहिले पाहिजे. चहा केल्यावर तो झाकतात. तो काय चोरून आणलेला असतो? मग का झाकता? मुरण्याकरता. तसा झाकल्यावर तो अधिक गोड लागतो. चविष्ट लागतो. भात चुलीवरून उतरला की झाकतात. सामावण्याकरता. गडबड असली तर ऑफीसात तसाच खाऊन जातो. त्यामुळे चवदार लागत नाही. तुमच्याच झाडाचा मोठा आंबा लागलेला आहे. पण तो पिकण्याकरता चार दिवस तसाच आढीत झाकून ठेवला पाहिजे.

**आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं समुद्रमापः प्रविशन्ति यद्वत् ।**
**तद्वत्कामा यं प्रविशन्ति सर्वे स शान्तिमाप्नोति न कामकामी ।।७० ।।**

पाणी सर्व बाजूंनी भरत असतानाही समुद्र आपली मर्यादा उल्लंघन करत नाही. अशा समुद्रामध्ये पाणी ज्याप्रमाणे प्रवेश करते, त्याप्रमाणे ज्या पुरुषामध्ये विकार उत्पन्न न करता सर्व इच्छा प्रवेश करतात त्याला शांती मिळते. पण विषयाची इच्छा असणाऱ्याला मिळत नाही.

भगवान म्हणाले, 'व्युत्थित व समाधिस्थ' या दोन्ही स्थितप्रज्ञांचे आणखी एक समान लक्षण सांगतो. ते ऐक. 'परिपूर्णआनंदत्वे सति विषयलाभे अविकारित्वम्।' साक्षात्कार तर झालेला असतोच. पण जर विषय समोर आले तर ते दोघेही निर्विकार असतात. अर्जुन म्हणाला, 'स्थितप्रज्ञ जरी झाला तरी तो मनुष्यच आहे ना? त्यालाही मन आहे ना? सुखदुःखे त्याला सुद्धा समजतात ना? मग पदार्थ समोर दिसल्यावर त्याला विकार कसे होत नाहीत? भगवान म्हणाले, 'समुद्र तू पाहिलेला आहेस. पावसाळ्यात नद्यांना महापूर येतात. ते पाणी त्याला मिळते. तो वाढतो काय? मर्यादा सोडतो काय? या उलट उन्हाळ्यात नद्यांचे पाणी आटते पण म्हणून त्याचे पाणी कधी कमी होते काय? या दोन्ही वेळी तो निर्विकार असतो. जडामध्ये जर हे उदाहरण प्रत्यक्ष आहे, तर त्यापेक्षा अनंतपटींनी श्रेष्ठ असलेल्या चेतनामध्ये का असू नये?'

क्षुल्लक पदार्थ दिसला तरी आमचे मन तत्काळ तिकडे धावते. कारण त्याला त्याची इच्छा असते. पण समर्थासारख्यांच्या झोळीत राज्य टाकले तरी ते स्वीकारत नाहीत. सर्व इच्छा मावळलेल्या असतात, म्हणूनच. अर्जुन म्हणाला, 'पदार्थ सांनिध असतानासुद्धा निर्विकार राहिल्याचे फळ कोणते?' भगवान म्हणाले, 'स शांतिमाप्नोति' हेच.

लक्ष्मणाची परीक्षा घेण्यासाठी त्याच्याजवळ सीता झोपलेली असताना, शुकरूप घेतलेल्या रामचंद्राने विचारले,

'अग्निकुंडसमा नारी घृतकुंभसमो नरः ।
जानुस्थिता परस्त्री चेत् कस्य न च्यवते मनः' ॥

लक्ष्मण म्हणाला,

'मनो धावति सर्वत्र मदोन्मत्तगजेन्द्रवत् ।
ज्ञानांकुशे समुत्पन्ने तस्य न च्यवते मनः ॥

म्हणजे अग्नी जवळ असला की तूप पाघळलेच पाहिजे. त्यात विकार झालेच पाहिजेत. किंवा तरुण सुंदर स्त्री जवळ असून एकान्त असल्यास काम जागृत झालाच पाहिजे. तसेच सर्व विषय. दूर असताना त्याबद्दल निर्विकार राहता येईल, पण ते सन्निध असताना निर्विकारत्व फारच कठीण आहे. पण ज्ञानांकुश हाती असल्यास काय अशक्य आहे? तो अंकुश फक्त स्थितप्रज्ञाजवळच असतो. म्हणून त्याला शांती मिळते.

**विहाय कामान्यः सर्वान्पुमांश्चरति निःस्पृहः ।**
**निर्ममो निरहंकारः स शान्तिमधिगच्छति ॥ ७१ ॥**

जो पुरुष सर्व इच्छांचा त्याग करून निरिच्छ, ममत्वरहित व अहंकाररहित होऊन संचार करतो, तोच शांतीला प्राप्त होतो.

पदार्थ जरी असंख्य असले तरी त्यांचे तीन प्रकार आहेत. १) बाह्य पदार्थ—स्त्री, पुत्र, धन, गृह याबद्दल तीव्र इच्छा असते. २) आंतरकामना—यामुळेच मनोराज्ये होतात. प्रत्येकजण मनात वासना असतात, म्हणून मनचे मांडे खातच असतो. या मनोराज्यातून हाका मारून जागा केल्यास त्याला राग येतो. कारण त्यांची इच्छा असते म्हणूनच. ३) वासनात्मक—तुम्ही इथून तिरुपतीला गेला किंवा काशीला गेला. देव दर्शनाला नव्हे तर सृष्टिसौंदर्य पहायला असे म्हणा. कारण काही लोक इतके नास्तिक असतात. तिथे भागिरथीचे स्नान करून परतत असताना एकाने चार शब्द लागण्यासारखे उच्चारले तर वाईट वाटते व सन्मानाचे चार शब्द बोलल्यास बरे वाटते. म्हणजे प्रत्यक्ष पदार्थ नको असले तरी मानाच्या व प्रतिष्ठेच्या इच्छा अंतःकरणात सूक्ष्मरूपाने असतातच. वरील तीन प्रकारच्या कामना प्रत्येकाच्या अंतःकरणात असतातच. या पुऱ्या करायला गेलो की पूर्ण होत नाहीत. उलट दुप्पट वाढतात. पण स्थितप्रज्ञाने या सर्व सोडलेल्या असतात. त्याला जीवनाचीसुद्धा अपेक्षा नसते. मग देहाला अपेक्षित असलेल्या अन्नवस्त्राची कशी असेल?

'यद् भव्यं तद् भवतु भगवन् पूर्वकर्मानुरूपम् ।' असे म्हणून तो पृथ्वीवर प्रारब्धाला मान देऊन हिंडत असतो. एखादा प्रारब्धाप्रमाणे समाधीतच राहतो. एखादा गुहेत, एखादा वनात, एखादा गृहातही राहतो.

तो कुठे राहील ते सांगता येत नाही. तो पृथ्वीवर संचार करीत असतो. त्याला कशाचीही अपेक्षा नसते. अमुक माझे असे तो चुकूनसुद्धा म्हणत नाही. अर्जुन म्हणाला, 'तो का म्हणत नाही व आम्ही का 'माझे माझे' असे प्रत्येक पदार्थाला म्हणत सुटतो?' तो निरहंकारी असतो. अरे, 'अहं देहः' असे तो म्हणत नाही, कारण देहापेक्षा आत्मा वेगळा आहे, हे तो जाणतो. म्हणून त्याला अहंकार नसतो. झोपेमध्ये अहंकार नसतो. म्हणूनच कशाचीही इच्छा नसते. अहंकाराचा व देहाचा संबंध झोपेमुळे सुटलेला असतो, त्याचप्रमाणे ज्ञानामुळे स्थितप्रज्ञाचा व देहाचा संबंध तादात्म्य सुटलेले असते. कांही तासापुरते नव्हे तर कायमचे. म्हणून त्याला कशाचाही अहंकार नसतो, इच्छा नसते. मनुष्य झोपला असताना त्याला स्वप्न पडते, त्यात तो कधी हसतो तर कधी रडतो. पण मी हे केले असे जागृत झाल्यावर म्हणत नाही; कारण त्या क्रिया स्वप्न शक्तीने होत असतात. तद्वत ज्ञानी म्हणतो, 'देहाचे सर्व व्यवहार प्रारब्धानुसार होतात. त्यांचा कर्ता मी नव्हे. म्हणून त्याला अहंकार व ममत्व नसते.

**एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनां प्राप्य विमुह्यति ।**
**स्थित्वा स्यामन्तकालेऽपि ब्रह्मनिर्वाणमृच्छति ॥७२॥**

अर्जुना, ही ब्रह्मविषयक अवस्था आहे. एकदा ही प्राप्त झाल्यावर पुनः मोह प्राप्त होत नाही. ही अवस्था म्हणजेच ब्राह्मी स्थिती. अंतकाली जरी प्राप्त झाली तरी त्या अवस्थेत स्थिर होऊन तो ब्रह्मानंदाला प्राप्त होतो.

भगवान् म्हणतात, 'दुसऱ्या अध्यायात अनेक विषय येऊन गेले; तरी मुख्यतः ब्राह्मी स्थितीच सांगितली आहे. अर्जुना हे लक्षात घे.

ज्ञानच सांगितले. ' अशोच्यानन्वशोचस्त्वं ' पासून ज्ञानच प्रतिपादन केले. ' नेहाभिक्रमनाशोऽस्ति........स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् ॥ ' याने निष्काम कर्मयोग हे ज्ञानाचे साधन सांगितले. ' प्रजहाति यदा कामान् ' या श्लोकापासून स्थितप्रज्ञाची म्हणजेच ज्ञानी पुरुषाची लक्षणे सांगतली. आता फल सांगतो. ' नैनां प्राप्य विमुह्यति ॥ ' या ज्ञानाने मोह होत नाही. सावकाराकडे गेल्यास तो जेवढे धन मागाल तेवढेच देतो. सरकारकडे मागितल्यास निम्मे मिळते. शंभर पोती सिमेंट मागितल्यास पन्नास पोतीच सिमेंट मिळते. पण भगवंताकडे एक मागितल्यास तो सर्व काही देतो. त्याचे नाव ईश्वर.

अर्जुन फक्त युद्धविषयक मोह दूर व्हावा म्हणून शरण गेला. तर देवाने त्याचा सर्व संसारविषयक मोहच दूर केला. अर्जुन म्हणाला, ' तुम्ही फल सांगितले म्हणजे उपसंहार केला. पण मला मात्र त्याचे फल मिळाले नाही. प्रत्यक्ष आपण त्रैलोक्याधिपती सांगत आहात; व मी पूर्ण अवधान देऊन, जिवाचे कान करून ऐकतो आहे, तरी मला ज्ञान झाले नाही. मोह गेला नाही. आपण विद्यमान असताना जर हे होत नाही, तर आपल्या पश्चात् कसे होईल ? म्हणून अर्जुन विषण्ण झाला. त्याचा पूर्वीचा विचार फक्त स्वजनांबद्दल होता. पण आता मात्र ज्ञान झाले नाही म्हणून होता. त्याची भूमिका बदलली होती. म्हणून त्याचा हा विषाद होता. हे सर्वज्ञ असलेल्या भगवंतांच्या ध्यानी आले व ते म्हणाले, ' विषादं मा कार्षीः ' ' साधनाशिवाय फल हाती यावे ' असे म्हणायला अर्जुना तू काय अविचारी आहेस ? तुला साधने सांगितली आहेत. निष्काम कर्मयोग करून श्रवण मनन कर. निराश का होतोस ? साधने करून ती परिपक्व झाली तर मरणसमयीही ज्ञान होईल. घाबरायचे काम नाही. म्हातारपणी कर्माला सुरवात केली व ते अपुरे राहिले तर लगेच फळ येणार नाही. म्हणजे त्याचे संस्कार होतील व

पुढील जन्मी ते उपयोगी पडतील. पण मरेपर्यंत ते केले पाहिजे. कर्म केल्यावर त्याचे अदृष्ट बनते. नंतर त्याला सहकारी साधने मिळतात व मग फल मिळते.

एक मनुष्य बी. ए. बी. कॉम्. झाला आहे व तो घरातच बसला तर काय उपयोग? फार तर नुसती पाटी लावता येईल, एवढेच. पण खऱ्या उपयोगाकरता नोकरी मिळून वरवरची जागा मिळाली पाहिजे. म्हणजे इथे शिक्षण हे कर्म फलद्रूप होण्यासाठी नोकरी हे सहकारी साधन झाले. पण ज्ञानाला मात्र सहकारी साधनाची अपेक्षा नाही. कारण ज्याक्षणी ज्ञान होते त्याचक्षणी अज्ञान जाते. ज्याक्षणी दिवा लावाल, त्याचक्षणी अंधकार नष्ट होतो. म्हणून ज्ञानच श्रेष्ठ. 'अंतकालेऽपि ।' मरणकाली जरी ज्ञान झाले तरी ते साक्षात्कार करून देते. म्हणून ज्ञान हे कर्मा-पेक्षा श्रेष्ठ हे 'अपि' या शब्दाने सांगितले आहे.

एक अत्यंत अवघड गणित आहे, त्याचा सतत विचार करता करता ते केव्हा, कुठे व कशा अवस्थेत सुटेल हे सांगता येत नाही. मनाला त्याचाच ध्यास लागला व सतत चिंतन घडले तर सुटेल. सुप्रसिद्ध शास्त्रज्ञ आर्किमेडीज हा स्नानाला बसला असता त्याला राजाने घातलेल्या प्रश्नाचे उत्तर सापडले व आपण कशा अवस्थेत आहोत, हे भान न राहिल्यामुळे त्याच अवस्थेत तो राजदरबारी गेला.

म्हणून अर्जुना, 'ईश्वराने ज्ञान सांगितले तरी मला ते झाले नाही, म्हणून 'धिङ् माम्' असे म्हणून निराश होऊ नकोस. अभ्यास चालू ठेव म्हणजे साधने परिपक्व होऊन ज्ञान प्राप्त होईल; पण अवघड गणिता-प्रमाणे ते केव्हां व कुठे होईल हे सांगता येणार नाही. म्हणून सतत प्रयत्न करीत रहा.

◊ ◊ ◊

# अध्याय ३ रा.

अर्जुन उवाच–

**ज्यायसी चेत् कर्मणस्ते मता बुद्धिर्जनार्दन ।**
**तत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसि केशव ॥१॥**

अर्जुन म्हणाला, 'हे जनार्दना, कर्मापेक्षा ज्ञान श्रेष्ठ आहे असे तुझे मत आहे, तर हे केशवा, घोर कर्माच्या ठिकाणी तूं माझी योजना कां करीत आहेस ?'

दुसऱ्या अध्यायात भगवंतानी ज्ञान व कर्म (अर्थात् निष्काम) या दोहोबद्दल सांगितले, या दोन्ही साधनांनी मोक्ष मिळतो असेहि प्रतिपादन केले. पण ज्ञान व कर्म ह्यातील श्रेष्ठ साधन कोणते हा प्रश्न राहतोच. 'दूरेण ह्यवरं कर्म' असे सकाम कर्माबद्दल सांगितले व निष्काम कर्म व ज्ञान ही दोन्ही सारखीच असल्याचे भासवितात. या गोष्टीचा स्पष्ट उलगडा करून घेण्यासाठी अर्जुनाने हा प्रश्न केला आहे. अर्जुनाने भगवंताना येथे जनार्दन व केशव असे संबोधिले आहे. धर्म–मर्यादेचे उल्लंघन करणाऱ्या जनांना पीडा देतो (अर्दयति) तो जनार्दन व केशव म्हणजे क्लेश नाहीसे करणारा. आपण धर्मनिष्ठ व भक्त असल्याने भगवान आपणास पीडा न देता शंका निरसन करून आपणाला होणारे क्लेश भगवंताने नाहीसे करावे असेच अर्जुनाला सुचवावयाचे आहे.

दुसऱ्या अध्यायात भगवंतानी अनेक साधने सांगितली. त्यातील ज्ञान व निष्काम कर्म ही प्रमुख आहेत. वैद्य प्रथम एखाद्या रोगावर खात्रीचा उपाय म्हणून मौक्तिक भस्म घेण्यास सांगतो, मोती मुळात

दुर्मिळ त्यामुळे महाग, मग त्याचे भस्म अतीशय महाग असणार. सामान्य रोग्यास ते परवडणार नाही म्हणून त्याच्यासाठी शौक्तिक भस्माची योजना करतो. प्रथम उत्कृष्ट साधन सांगितले जाते, ते जमत नसेल तर पर्यायी योजना म्हणून कमी प्रतीचे साधन सांगण्यात येते.

'नानुशोचितुमर्हसि' असा उपक्रम करून प्रथम भगवंत ज्ञानाचा उपदेश करतात, त्याअर्थी तेच श्रेष्ठ असले पाहिजे. ज्ञान व निष्काम कर्म ही दोन्ही साधने समान असली तरी अर्जुनाच्या दृष्टीने ज्ञानच स्वीकारणीय, कारण ते सौम्य व मृदु आहे. निष्काम कर्म करायचे म्हणजे स्वजन, गुरुजन यांचा वध करावा लागणार; म्हणून अर्जुन विचारतो आहे की, असे घोर कर्म करण्याचा उपदेश मला कां करता?

जेवताना दोन पक्वान्ने वाढली तर त्यांतील मुख्य कोणते हे समजले पाहिजे. पूर्वी जेव्हा टंचाई हा शब्द नव्हता, तेव्हा पांच पांच पक्वान्ने करीत. एकाचा हात दुसऱ्यास लागून चवीत बिघाड होऊ नये म्हणून चांदीच्या वाटीत केशराचे पाणी ठेवले जाई. एक पक्वान्न खाऊन झाल्यावर दुसऱ्या पक्वान्नास हात लावण्यापूर्वी केशराच्या पाण्यात हात बुचकळावयाचा, अशी प्रथा होती. पऱ्हे म्हणून केशराचेच पाणी कोणी प्याला तर तो मूर्ख ठरे. तसेच भोजनात भात प्रधान की पक्वान्न प्रधान? भात न वाढता एकदम पक्वान्न वाढले जात नाही. एक वेळ नुसत्या तूपभाताचा नैवेद्य चालतो, पण नुसत्या पक्वान्नाचा चालत नाही. म्हणजे भात व पक्वान्न दोन्ही तुल्यबळ ठरतात. त्याचप्रमाणे ज्ञान व कर्म दोन्ही समानच आहेत.

**व्यामिश्रेणेव वाक्येन बुद्धिं मोहयसीव मे ।**
**तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम् ॥ २ ॥**

घोटाळयाच्या दिसणाऱ्या या भाषणाने तू माझ्या बुद्धीला मोह पाडल्यासारखे करीत आहेस. तर ज्यायोगे माझे हित होईल असे एक निश्चित करून सांग.

ज्ञान व निष्काम कर्म याचे भगवंतानी पृथक् विवरण केले. पण दोन्ही मते एकमेकांत मिसळलेली–संकीर्ण–वाटतात. मंदबुद्धीच्या लोकांना खरे कोणते ते कळणार नाही. म्हणून दोन्हींपैकी कोणते श्रेष्ठ ते स्पष्ट करून सांगण्याची अर्जुनाची विनंती भगवंतानी मान्य केली.

भगवान उवाच :–

**लोकेऽस्मिन् द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता मयाऽनघ।**
**ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनाम् ॥३॥**

भगवान म्हणाले, ' हे निष्पाप अर्जुना, मी या लोकामध्ये ज्ञानयोगाने सांख्यांचा व कर्मयोगाने कर्म करणारांचा असे दोन मार्ग ( वर्तनक्रम ) पूर्वी सांगितले आहेत. '

वास्तविक भगवंतानी दोन साधने सांगितलीच नाहीत. सांख्य म्हणजे ज्ञानयोग सांगितला. मोक्षाचे साधन ज्ञान व ज्ञानाचे साधन निष्काम कर्म असा हा ज्ञानयोग आहे. ' व्यवसायात्मिका बुद्धिरेकेह कुरुनंदन ' असेच भगवंतानी सांगितले आहे. अर्जुनास येथे अनघ असे म्हटले आहे. अनघ म्हणजे निष्पाप. अशा व्यक्तीनेसुद्धा कर्म केलेच पाहिजे. कारण केवळ निष्पाप असण्याने श्रवणाला आवश्यक तेवढी चित्तशुद्धी होते; पण तेवढ्याने चालत नाही. साक्षात्कारासाठी अतिशय शुद्धचित्त असावे लागते व चित्तशुद्धीसाठी निष्काम कर्म करायलाच हवे.

श्रवणालासुद्धा चित्तशुद्धी झालेली असणे आवश्यक असते. चित्त शुद्ध नसेल तर वक्ता काय सांगत आहे हे न समजून वक्ता व इतर श्रोते यांना मूर्खात काढून असा मनुष्य सभेतून उठून जातो.

' दिने दिने वेदान्तवचनात् भक्तिसंयुतात् ।
गुरुशुश्रूषया लब्धात् कृच्छ्राशीति फलं लभते ॥ '

म्हणजे श्रवणाचे फल ऐंशी कृच्छ्राच्या पुण्याइतके असते. श्रवण केल्यास ते समजले नाही तरी त्याचे संस्कार होतात व ते पुढे उपयोगी पडतात. वृद्धांना काही उद्योग नसतो व लहानांना खेळणे येवढा एकच उद्योग असतो. त्यांचे ज्ञानाकडे लक्ष नसते. म्हणून वृद्धांनी लहान मुलांना बसवून काही श्लोक शिकविले तर वृद्धांचा वेळ सत्कारणी लागेल व मुलांवर चांगले संस्कार होतील. पुढे जेव्हा तो श्लोक आठवेल त्या वेळी त्यांना आजोबांची आठवण झाल्याशिवाय राहणार नाही. लहान मुलांवर उत्कृष्ट संस्कार करणे हेच वृद्धांचे खरे कार्य आहे. पण सध्या तसे घडत नाही. आजोबा असतात वृद्धाश्रमात आणि नातवंडे गोकुळसारख्या एखाद्या संस्थेत !

ऐंशीच्या वर्षी एखादा सायकल शिकू लागला तर सायकल खड्ड्यात आणि हातपाय गळ्यात अशी अवस्था व्हायची. लहानपणीच सायकल शिकलेला असला तर तो ऐंशीच्या वर्षीही सायकल चालवू शकतो. लहानपणी झालेले संस्कार अखेरपर्यन्त टिकतात. तसेच संस्कार सतत चालू ठेवल्याशिवाय साधे कामही सुकर होत नाही. नवी चप्पल एकदम वापरता येत नाही. प्रथम काही दिवस बेताबेताने वापरून एकदा सवय झाल्यावर सतत वापरता येते. चष्मासुद्धा प्रथम सतत वापरता येत नाही. जरी तो हलका असला तरी नाक कान ते ओझे पेलण्यास तयार नसतात. कालान्तराने माणसाचे चष्म्याशिवाय चालत नाही.

' यदा ते मोहकलिलं ' या श्लोकात भगवंतानी हेच प्रतिपादन केले आहे. बुद्धीचे मालिन्य गेल्याखेरीज वैराग्य निर्माण होणार नाही व वैराग्याशिवाय काही समजून घ्यावे किंवा मागे मिळविलेले ज्ञान पुन्हा आठवावे अशी बुद्धी होणार नाही.

**न कर्मणामनारंभान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते ।**
**न च संन्यसनादेव सिद्धिं समधिगच्छति ॥ ४ ॥**

कर्म न आरंभता पुरुषाला नैष्कर्म्य प्राप्त होत नाहीं. व केवळ प्राप्त कर्माचा संन्यास केल्यानेही नैष्कर्म्यसिद्धी प्राप्त होत नाही.

पूर्वजन्मीच्या कर्मामुळे ज्याची पूर्णपणे चित्तशुद्धी झाली आहे तो उत्कृष्ट. 'न निर्विण्णः नचाधिसक्तः' म्हणजे ज्याला पूर्ण वैराग्य झालेले नाही पण प्रबळ आसक्तीही नाही असा मध्यम पण मंदही नव्हे अशा दोघांसाठी परमार्थातील साधने सांगितलेली असतात. तिसऱ्या प्रकारचे लोक म्हणजे व्यवहारात गुरफटलेले, त्यांना शास्त्राशी काहीच कर्तव्य नसते.

'न कर्मणा न धनेन न प्रजया त्यागेनैकेनामृतत्वमानशुः' अशी श्रुति आहे. त्याचप्रमाणे यज्ञ, दान, तपानेही मोक्ष मिळतो. ब्रह्मचर्यात सर्व सेवा येतात, गृहस्थाश्रमात सर्व यज्ञ व दान व वानप्रस्थाश्रमात सर्व तपांचा समावेश होतो. पण परमार्थात वेद हेच श्रेष्ठ व प्रमाण आहेत व त्यात त्यागाचेच महत्त्व वर्णिलेले आहे म्हणून संन्यास घेणे इष्ट असा अर्जुनाचा मानस लक्षात घेऊन भगवंतानी हा श्लोक सांगितला आहे.

परस्परविरुद्ध वेदवचनांचा अर्थ समजण्यासाठी मीमांसाशास्त्राचे अध्ययन आवश्यक आहे. त्या शास्त्रानुसार यज्ञ, दान व तप यांनी मोक्ष मिळतो, याचा अर्थ या साधनांनी विविदिषा निर्माण होते असा आहे. म्हणून ती वचने परस्पर विरोधी म्हणता येत नाहीत, हाच अर्थ अन्वय व व्यतिरेक या दोन्ही पद्धतींनी ते सांगतात. कर्माच्या प्रारंभाने नैष्कर्म्य मिळते हा अन्वय व कर्मारंभाशिवाय नैष्कर्म्य नाहीं हा व्यतिरेक. निष्काम कर्म तडीला गेले नाही तरी हरकत नाही. कारण त्याचे फळ हे मिळतेच, हे भगवंतानी 'नेहाभिक्रमनाशोस्ति' या श्लोकात पूर्वीच सांगितले आहे.

पूर्ण वैराग्य निर्माण झाल्याखेरीज संन्यास साधत नाही. वैराग्याचे फळ संन्यास व संन्यासाचे फळ मोक्ष. संन्यास घेणे सोपे आहे. पण तो टिकविणे महा कठीण आहे. पुन: विवाह करतो असे कोणी संन्यासी म्हणू लागला तर ज्ञानदेवांच्या वडिलासारखी योग्यता हवी तरच निभाव लागायचा. पण निष्काम कर्मानुष्ठानात विवाह चालू शकतो.

पैशाचा हव्यास असणाऱ्या व्यक्तीस पैसे-नोटांनी भरलेल्या खोलीत कोंडून ठेवले तर त्याला त्या पैशाचा लाभ होईल का? साखरेची आवड असणाऱ्याला साखरेच्या गुदामात डांबून ठेवले तर त्यालाही सुख लागणार नाही. साखर मिळाली तरी इतर सामुग्री हवी, तरच त्या साखरेचे सुख घेता येते. तसेच नुसता संन्यास हे मुक्तीचे पाथेय होऊ शकत नाही. मुक्तीसाठी संन्यासाबरोबर वैराग्य असणे आवश्यक आहे.

सुटी आहे म्हणून निवांतपणे ज्ञानसाधना करण्याचा बेत केला तर संसारांतील इतकी कामे निघतात की रोजच्यापेक्षा अधिक राबावे लागते. संसारात निवांतपणा कधीच मिळत नाही व ज्ञानसाधनाही होत नाही. ज्ञानसाधनाला अवसर मिळावा म्हणून संसार सोडून संन्यास घेतल्यास शास्त्रकारानी सांगितलेली चांगली कर्मे तेवढी सुटतात व वाईट कर्मे हातून होतच राहतात व संन्यास घेण्याचा हेतू निष्फळ होतो. शिवाय—

न हि कश्चित् क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् ।
कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः ॥५॥

कोणीही काहीतरी कर्म न करता क्षणभर देखील केव्हाही रहात नाही. कारण प्रत्येकजण प्रकृतिजन्य गुणांच्या आधीन असल्याने ते गुण प्रत्येकाकडून कर्म करवीतच असतात.

मानवालाच नव्हे तर कोणत्याही प्राणिमात्राला कर्म न करता क्षणभरसुद्धा राहता येत नाही. झोपेतही श्वासोच्छ्वासाचे कर्म चालूच

असते. ते बंद पडून कसे चालेल? कर्म न करण्याचा तीव्र निश्चय केला तरी तो तडीस जाणार नाही.

मनुष्याच्या अंतःकरणात सत्त्व, रज व तम हे तीन गुण असतात. मोठ्या प्रेमाने एखादा प्रवचन ऐकायला येतो, पण तमोगुणाच्या आहारी जाऊन पेंगू लागतो. रजोगुण वाढला की स्वस्थ बसवतच नाही. निदान रेघोटया तरी मारत बसतो. उन्हाळा, पावसाळा व हिवाळा यांचे काल जसे ठरलेले आहेत तसे सत्त्व, रज व तम यांचे नाही. कोण केव्हा उसळी मारेल हे सांगता येत नाही. हे तिन्ही गुण मानवाला पराधीन करून त्याच्याकडून कर्मे करून घेतात. मानवाच्या न करण्याच्या निश्चयाला काही अर्थ नाही. समुद्राच्या मनात नसले तरी वारा सुटला की लाटा उसळतातच, तशीच प्रकृतीच्या या गुणांमुळे कर्मेही होतातच. पराधीन मानवाचा काही इलाज चालत नाही.

यावर मानवाच्या वाटणीला संन्यास कधीच येणे शक्य नाही अशी शंका येणे साहजीक आहे, पण असे निराश होण्याचे कारण नाही. संन्यास दोन प्रकारचा आहे. पहिला स्वरूपतः संन्यास. हा फक्त ज्ञानी पुरुषच घेऊ शकतो. पाहणे ऐकणे श्वासोच्छवास घेणे इ. क्रिया 'इंद्रियाणींद्रियार्थेषु वर्तन्त इति धारयन् ' अशी त्याची भावना असते. चुंबकाच्या सान्निध्याने जशी लोखंडाची सुई नाचते, तसेच आत्म्याच्या सान्निध्यामुळे मन, बुद्धी व इंद्रिये सर्व कर्मे करतात. पण तो स्वतः काहीच करीत नाही. ज्ञान्याच्या हातून कर्मे होतात ती संस्कारामुळे. त्यात त्याचे मन गुंतलेले नसते. पूजा करताना मनात भाजीचे विचार चालू असले तरी देवाचे स्नान होते, गंधफुले वाहिली जातात व पूजाविधी पुरा केला जातो. ज्ञान होण्यापूर्वी मन व आत्मा हे एक आहेत अशी कल्पना असल्यामुळे कर्तृत्व आत्म्याकडे मानले जाई. पण आत्मा या सर्वांहून वेगळा आहे हे समजले, प्रत्यक्ष ज्ञान झाले, की सर्व क्रिया करूनही

कर्तृत्व आपल्याकडे नाही अशी प्रचीती येते. झोपेत बडबड करणारा जागा झाल्यावर आपण बोललोच नाही असे म्हणतो, तसेच ज्ञानी कर्मे माझी नसून इंद्रियांची आहेत असे म्हणतो.

'मनःकृतं कृतं मन्ये न शरीरकृतं कृतं' असे योगवासिष्ठात सांगितले आहे. रोजचा स्वयंपाक करताना बायकांना मुळीच प्रयास पडत नाहीत. पण कोणी पाहुणा—विशेषतः जावई-जेवायला येणार असेल तर सर्व लक्ष स्वयंपाकाकडे केंद्रित करावे लागल्यामुळे त्यांची तारांबळ उडते. आत्मा अकर्ता व पृथक् आहे हे स्पष्टपणे अनुभवलेला ज्ञानी कर्मे मनःपूर्वक कशाला करील. असा त्याचा स्वरूपतः संन्यास म्हणजे खरा संन्यास असतो.

**कर्मेन्द्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन् ।**
**इंद्रियार्थान् विमूढात्मा मिथ्याचारः स उच्यते ॥६॥**

नुसती कर्मेंद्रिये आवरून जो मनात विषयांचे चिंतन करीत राहतो तो अत्यंत मूढबुद्धी होय. त्याला दांभिक म्हणतात.

ज्ञानी पुरुषासारखा स्वरूपतः संन्यास घेता आला नाही तरी कर्मेन्द्रियांना रोखून ठेवता येते. नुसती कर्मेन्द्रिये बंद केली तरी आत मन चौपट दंगा करू लागते. इंद्रियांना आवरणे हे एक मानसिक कर्म होऊन बसते. मनाची थोडीसी ढिलाई झाली की कर्मेन्द्रिये मोकाट सुटतात. म्हणून केवळ इंद्रियांना डांबून ठेवणे हा मिथ्याचार होय व असे करणारा दांभिक व पापी म्हणून गणला जातो.

कर्मेन्द्रियाना रोखण्यापेक्षा ज्ञानेंद्रियांना आवरणे उत्तम, त्यासाठी कर्मफलत्याग करणे चांगले व ते शक्य आहे. स्नानसंध्यादी दैनिक नित्यकर्मे अशीच निष्काम करावयाची असतात. त्याने काही प्राप्ती होत नाही. ती फुकटच जातात असे लोकांना वाटते. पण सत्कर्मे कधीही फुकट जात नाहीत. शेतात पडलेला पाऊस तेवढा उपयोगी आणि

शहरावर वा समुद्रावर पडलेला पाऊस फुकट गेला असे समजावयाचे काय? निष्कामपणे केलेली नित्यनैमित्तिक कर्मे फुकट जात नाहीत, जगच्चक्र चालविण्यासाठी परमेश्वर त्यांचा उपयोग करून घेतो. उत्तम हवा, विपुल धान्य, सार्वजनिक आरोग्य इत्यादीसाठी त्या सत्कर्मांचा विनियोग होतो. अशी निष्काम कर्मे ईश्वरार्पण केली तर ईश्वर न मागता गुप्तरूपाने जे जे लागेल ते ते पुरवीत असतो.

मन सहसा फल सोडायला तयार नसते. पुढे जर मोठे फळ दाखविले तर क्षुद्र फळ सोडायला मन तयार होते. व कर्मफळ-त्याग आपोआप घडतो. कर्मे सुंदर करून शिवाय ती निष्काम बुद्धीने करायची, मग ती कर्मे ठेवायलाही सुंदर स्थान हवे. आणि परमेश्वराहुन दुसरे सुंदर स्थान कोठे आहे? म्हणून सर्व कर्मे शेवटी ईश्वरार्पण करून टाकावी.

पैठणचा एकजण यात्रेला निघाला. त्याचेजवळ एक परीस होता. तो कोठे ठेवावा असा त्याला प्रश्न पडला. तेव्हा त्याला नाथांची आठवण झाली. नाथानी तो परीस घेतला व देवात ठेवून दिला. एके दिवशी निर्माल्याबरोबर तो गोदावरीत टाकला गेला. नाथाना या गोष्टीची कल्पनाही नव्हती. पुढे जेव्हा यात्रेकरू परत आल्यावर नाथानी देवांत पाहिले, तो परीस नाही. तेव्हा नाथानी खरे ते सांगितले. पण अशा गोष्टीवर कोण विश्वास ठेवील? नाथ त्या गृहस्थाला घेऊन गंगेवर गेले, नाथानी एक बुचकळी मारली व ओंजळभर गोटे वर काढले आणि यातला एक घे असे त्याला सांगितले. त्या गृहस्थाने प्रत्येक दगड लोखडाला लावून पाहिला तो ते सर्व परीसच आहेत असे त्याला कळून आले. महापुरुषाच्या स्पर्शाने साधा नदीतला गोटाही परीसरूप झाला. ईश्वरार्पण केलेली कर्मे ईश्वराच्या स्पर्शाने सुंदर बनतात व तो सर्वज्ञ असल्याने जरूरीच्या वेळी त्याचे फल दिल्याशिवाय रहात नाही.

तुमचा शेजारी तुमच्याशी शत्रुत्वाने वागतो. इतका की तुमचे मांजर त्याच्या घरी गेले तरी त्याला राग येतो. मांजराला काठीने मारतो व शिव्याही देतो. तुम्हीही त्याच्याशी शत्रुत्वाने वागलात तर रोज हाणामाऱ्या होतील. पण तुम्ही त्याच्यावर प्रेमच करीत राहिलात तर ? आपल्याबरोबर त्याचेही अंगण झाडायचे. रांगोळी काढायची. तो प्रथम विरोध करील, पण आपले काम सोडायचे नाही. कालान्तराने शेजाऱ्याचे मतपरिवर्तन झाल्याशिवाय राहणार नाही. तो तुमचा मित्र बनेल. सत्कर्माने शत्रूचे अंतःकरणसुद्धा पालटते. मग ईश्वर तर दयाघन आहे. भक्तवत्सल आहे. समजा, पूर्वकर्मामुळे तो तुमच्याबद्दल उदासीन आहे. तुम्ही निष्काम कर्मे त्याला अर्पण करीत गेलात तर तो प्रसन्न व्हायला वेळ लागणार नाही. एकदा प्रसन्न झाल्यावर तो कृपेचा वर्षाव करील. मग काय कमी आहे ?

**यस्त्विन्द्रियाणि मनसा नियम्यारभतेऽर्जुन ।**
**कर्मेन्द्रियैः कर्मयोगमसक्तः स विशिष्यते ।।७।।**

पण अर्जुना, मनाने इंद्रियांचे नियमन करून जो आसक्त न होता कर्मेंद्रियांनी कर्मयोगाला आरंभ करतो, त्याची योग्यता विशेष होय.

मनांतून विषय मावळले नसता फक्त कर्मेंद्रियांचा निरोध केल्यास तो मिथ्याचार होतो व असे करणे अनर्थाला कारण होते. पण या उलट म्हणजे ज्ञानेंद्रियांचा निरोध करून कर्मेंद्रियांनी कर्मे केल्यास कृतार्थता येते. म्हणूनच येथे ‘ स विशिष्यते ’ असे म्हटले आहे. पुढे भगवंत सहाव्या अध्यायात ‘ स संन्यासी च योगी च ’ म्हणजे तो दोन्ही होतो असे सांगतात. फल सोडले म्हणून संन्यासी व तृष्णा सोडली म्हणून योगी होतो. नुसती कर्मे करणाऱ्यापेक्षा निष्काम कर्मे करणारा श्रेष्ठ होय. पण याकरिता कर्मेंद्रियांनी कर्मे केलीच पाहिजेत. त्यांनी मरेपर्यन्त राबलेच पाहिजे. त्यांना काम दिले नाही तर त्यांची

शक्ती क्षीण होते, वर्ष दोन वर्ष तुम्ही चालला नाहीत तर पुढे चालण्याची शक्तीच राहणार नाही. म्हणून कर्मेंद्रियांना राबविलेच पाहिजे. फक्त त्यांना बेफाम होऊ देता कामा नये, कर्मेंद्रियांनी कर्मे करावयाची व त्याचे फळ ज्ञानेंद्रियांनी घ्यायचे. शास्त्र म्हणते, निष्काम कर्म केल्यास त्याचे फळ ज्ञानेंद्रियांनाही मिळणार नाही.

**नियतं कुरु कर्म त्वं कर्म ज्यायो ह्यकर्मणः ।**
**शरीरयात्राऽपि च ते न प्रसिद्ध्येदकर्मणः ॥८॥**

तू विहित असे कर्म करीत जा. कर्म न करण्यापेक्षा कर्म करणे अधिक चांगले. कर्म न करण्याने तुझी देहयात्राही सिद्धीस जाणार नाही.

आळशासारखे बसू नका. कर्म न करण्यापेक्षा कर्म करणे हेच श्रेष्ठ आहे. संन्यास घेतला तर भिक्षा मागावीच लागते. तेही एक कर्मच आहे, नाही मागितली तर उपजीविका कशी होईल ?

यावर अर्जुन अशी शंका घेतो की, निष्काम कर्मयोगातही ही अडचण आहेच. सर्व कर्मफळे ईश्वराला अर्पण करून स्वतःसाठी जर काही ठेवले नाही तर निर्वाह कसा होईल ? त्यावर भगवंत सांगतात, ' ईश्वराला फळासकट कर्मे अर्पण केल्यावर ती मागे फिरतात. ईश्वर काही ती घेत नाही. पण त्याच्या स्पर्शाने तो प्रसाद बनतो व तो प्रसाद अर्पण करणाऱ्यांनाच परत मिळतो व अनायासे निर्वाह होतो. देवाला अर्पण केलेल्या नैवेद्यातला देव एक कणसुद्धा घेत नाही, त्याचा लाभ नैवेद्य दाखविणाऱ्यालाच होतो. जी जी कर्मे शास्त्राने सांगितली आहेत ती केली असता अनायासेच निर्वाह होतो. '

चतुर कारकून साहेब घाईगडबडीत असता त्याच्यापुढे सह्याचे कागद ठेवतो. साहेबाची सही झाली की वरील मजकुरातील सर्व चुका खपून जातात. ईश्वराला कर्मे अर्पण केली की कर्मावर त्याची दृष्टी पडते, म्हणजेच त्यावर सही शिक्का होतो व कर्मांतील सर्व दोष खपून जातात.

त्यांची जबाबदारी आपोआपच ईश्वरावर पडते. तुम्ही कोठे काही कामासाठी गेलात व तेथे जर तुमची ओळख निघाली तर तुमच्या चुकांकडे दुर्लक्ष केले जाते. तशीच ईश्वराच्या ओळखीने तुमची कर्मे निर्दोष होतात.

आपण स्वतःसाठी जन्मोजन्मी कर्मे करीतच आलो, पण त्याचा फायदा काय तर शून्य. उलट जो सर्व कर्मे ईश्वरार्पण बुद्धीने करतो, तो एकच जन्मात सर्वांहून श्रेष्ठ ठरतो. लोहचुंबकाप्रमाणे सर्व जग त्याच्याकडे आकर्षिले जाते. लोक त्याच्या मागे लागतात. मनात किंचितही स्वार्थ न ठेवता समर्थासाठी भिक्षा मागितली तर ते कार्य उत्कृष्ट ठरते. त्या भिक्षेतून आपलाही थोडा स्वार्थ साधावा असा हेतु असेल तर ते कार्य मध्यम होईल व समर्थांच्या नांवावर स्वतःचे पोट भरायचे हे निकृष्ट कार्य होय. उद्देशाप्रमाणे फल बदलत जाते.

निष्काम कर्माने उत्कर्ष होतो. तसेच त्यामागील भावनाही चांगली असते. तरीसुद्धा ' कर्मणा बध्यते जंतुः विद्यया च विमुच्यते ' या वचनाप्रमाणे कर्म निष्काम असले तरी त्याचा बंधकत्व हा स्वभाव काही जाणार नाही. ऐश्वर्य केवळ प्रयत्नाने येत नाहीं. तसे असते तर बारा बारा तास राबणारा श्रीमंत झाला असता. पण कष्ट करणारे गरीबच राहतात. त्यांची गरीबी काही हटत नाही. ज्ञानेश्वर माऊली म्हणते,—

भाग्याचेनि भडसे । उद्योगाचेनि मिसे ।<br>मग समृद्धिजात आपैसे । घर रिघे ॥

म्हणजे प्रयत्नाला भाग्याची जोड असावी लागते. भाग्य म्हणजे पूर्वकर्मांचे फळ. व भाग्यशाली मनुष्य सुखात असल्याने त्याला देवाची आठवण होत नाही. म्हणजे कर्मफळ ईश्वरप्राप्तीत अडथळा निर्माण करते. म्हणून निष्काम कर्मसुद्धा बंधनकारक आहे असे काही लोक आक्षेप घेतात. त्याचे खंडण भगवंत पुढील श्लोकात करतात.

**यज्ञार्थात् कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबंधनः ।**
**तदर्थं कर्म कौंतेय मुक्तसंगः समाचर ॥९॥**

ईश्वराप्रीत्यर्थ कर्मावाचून दुसरे कर्म लोकांना बंधनाला कारणीभूत होते, त्याकरिता हे अर्जुना कर्मफलाविषयी अनासक्त होऊम कर्म कर.

यज्ञ म्हणजे परमेश्वर, कारण यज्ञ हे त्याचे एक स्वरूप आहे व तोच यज्ञाचा भोक्ता आहे. म्हणून त्याच्यासाठी केलेले कर्म बंधक होत नाही. त्याशिवाय अन्यत्र केलेली कर्मे बंधक होतात. दही आंबट असते. त्याचा चक्का बनवून त्यात साखर मिसळली की दह्याचा स्वभाव पालटून अत्यंत मधुर असा श्रीखंड नावाचा पदार्थ बनतो. नुसते दही किंवा नुसती साखर आपण फार खाऊ शकत नाही. पण दोहोंच्या प्रमाणशीर मिश्रणाने वेगळाच गुण प्रगट होतो. तसेच साधेच कर्म ईश्वरार्पण केल्यास कर्माचा बंधक हा गुण जाऊन ते मोचक बनते. ईश्वरार्पण कर्मांनी बंध निर्माण होत नाहीत. ईश्वर नित्यमुक्त आहे. फळ मागितल्यास ते देण्यास तो बांधलेला आहे. पण न मागितल्यास फळदानाचे त्याचे स्वातंत्र्य अबाधित राहते. शिवाय त्याची प्रसन्नता लाभते.

खरा भक्त ईश्वर प्रसन्न झाला असता ' तुला काय वाटेल ते दे ' असे त्याला देण्याचे स्वातंत्र्य देऊन टाकतो. प्रल्हाद म्हणाला, ' यदुदारतमं वेत्सि तदेवादिश मे विभो ' याउलट एकाने यज्ञ केला व भगवंताजवळ स्वर्ग मागितला. इहलोकी मरताच तो स्वर्गात गेला. त्याच वेळी स्वर्गात देव व दैत्यांची लढाई चालू होती. त्यात तो सापडला व त्याचा नाश झाला. मग स्वर्ग मागून काय उपयोग झाला ? स्वतः फळ मागण्यात चुका होतात.

रावण सगळीकडे हिंडत होता. प्रत्येकाला तो म्हणे, एक युद्ध तरी कर नाहीतर विजयपत्र लिहून दे. हिंडता हिंडता तो कपिलाश्रमात आला. त्यांचे ते भव्य शरीर पाहून तो कपिलानाही इतराप्रमाणे

म्हणाला. पण कपिल काहीच बोलले नाहीत. तेव्हा रावणाने एक एक आयुध त्यांचेवर सोडायला सुरवात केली तरी ते स्वस्थच बसले. फारच कटकट करू लागला तेव्हा ते उठले आणि एक थप्पड लगावली; तो रावण सात कोलांट्या खाऊन खाली पडला, तो बेशुद्धच झाला. शुद्धीवर आल्यावर त्याने चौकशी केली. तेव्हा कपिल देव सभेत संगीत ऐकत बसल्याचे त्याला कळले. पुनः त्यांच्यापुढे जाण्याची त्याची छाती झाली नाही. ज्या कपिलानी एका दृष्टीक्षेपात साठ हजार सगर-पुत्रांचा नाश केला, त्याना रावणाला चिरडून टाकणे काय अशक्य होते? पण रावणाला ब्रह्मदेवाचा वर आहे व त्याचे मरण रामाकडून आहे हे ते जाणत असल्याने रावणाकडे त्यानी विशेष लक्ष दिले नाही. परमेश्वर भूत—भविष्य सर्व जाणत असतो, म्हणून तो योग्य तेच देतो. शिक्षासुद्धा. आपण मागणी केली की घोटाळा होण्याचा संभव असतो, म्हणून स्वतः फळ न मागता ते कामही ईश्वरावरच सोपवावे.

**सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः ।**
**अनेन प्रसविष्यध्वं एष वोऽस्त्विष्टकामधुक् ॥१०॥**

पूर्वी ब्रह्मदेव यज्ञासहवर्तमान प्रजा निर्माण करून त्या प्रजेला म्हणाला की, या यज्ञाच्या योगाने तुम्ही आपली अभिवृद्धी करून घ्या. हा तुमच्या इष्ट कामना पूर्ण करील.

यज्ञ म्हणजे प्रत्येकाला विहित असलेली नित्यनैमित्तिक कर्मे. ती ब्रह्मदेवाने प्रजेबरोबरच निर्माण केली व म्हणाला, या यज्ञाच्या सहाय्याने आपला उत्कर्ष साधा. ही कर्मे तुम्हाला कामधेनूप्रमाणे जी इच्छा कराल ते प्राप्त करून देतील.

निष्काम कर्माचे प्रतिपादन चालू असता मध्येच हे भगवंताचे सकाम कर्माबद्दल सांगणे काहीसे विसंगत वाटले, तरी निष्काम कर्माचे महत्त्व पटवून देण्यासाठीच ते हे सांगत आहेत.

यज्ञ किंवा संकष्टीसारखी व्रते ही फळाच्या आशेने केली तर फळ मिळते. आणि फलाशा सोडून केले तर ते कर्मही नित्यनैमित्तिकात गणले जाते व ते मोक्षाला साधनीभूत होते. प्रत्येक कर्माची प्रधान व गौण अशी दोन फळे असतात. आंबा मिळावा म्हणून आंब्याचे झाड लावायचे. पण आंब्याशिवाय शीतल छाया, सुगंधी मोहोर, शुभ कार्यासाठी आंब्याची डहाळी, मोहोर शंकरास वाहून पुण्य जोडणे, अशी दुय्यम फळेही मिळतात. गाय पाळली की शेण मिळते व शेणाचे अनेक उपयोग होतात, तरी शेणासाठी कोणी गाय पाळीत नाही. ते गौण फळ. दूध हे मुख्य फळ व त्यासाठीच गाय पाळली जाते. तसेच निष्काम कर्माचे ज्ञान हे प्रधान फळ असले तरी ते हाती यायला 'बहूनां जन्मनां अन्ते' म्हणजे दीर्घकाल जावा लागतो. तोपर्यंत त्याची आनुषंगिक फळे तीही न मागता मिळत असतात. म्हणून त्यांचा स्वीकार करायला हरकत नाही. आपस्तंभ म्हणतात, 'धर्मं चर्यमाणमर्था अनूत्पद्यन्ते' म्हणजे धर्म-करता आनुषंगिक अर्थ उत्पन्न होतात.

**देवान् भावयतानेन ते देवा भावयन्तु वः ।**
**परस्परं भावयन्तः श्रेयः परमवाप्स्यथ ॥ ११ ॥**

यज्ञाच्या योगाने तुम्ही देवांना संतुष्ट करा म्हणजे ते देव तुमची समृद्धी करतील, परस्परांची अभिवृद्धी करणारे तुम्ही उत्कृष्ट प्रकारचे कल्याण करून घ्याल.

नित्यनैमित्तिक कर्मे करा म्हणजे देव संतुष्ट होतील. पूजेसारखी कर्मे देवांना आवडतात. ती त्यांना अर्पण करा म्हणजे देव तुमच्यावर प्रसन्न होतील. आपण देवांना दिलेले पदार्थ आपणास प्रत्यक्ष दिसतात, पण देव देतात ते अदृष्टद्वारा. वनस्पतींच्या वाढीसाठी सूर्यचंद्राच्या किरणांची आवश्यकता असते. ती रोज पडत असतात म्हणून त्यांची किंमत आपणास कळत नाही. पण एखादे वर्ष पाऊस पडला नाही की कसा हाहाःकार उडतो हा अनुभव आपण घेत आहोत. ट्रॅक्टरने

नांगरून त्यात संकरित बी पेरले व भरपूर खत दिले आणि पाऊसच पडला नाही तर सर्व प्रयत्न व्यर्थ ठरतात. पाऊस पाडणे माणसाच्या हाती नाही. देव संतुष्ट असतील तरच पाऊस पडेल व समृद्धी होईल. शेवटी मानवाची शेंडी देवाच्या हाती आहे हे विसरून चालणार नाही. म्हणून इतर प्रयत्नाआधी देवांना संतुष्ट करण्याची योजना हवी.

**इष्टान् भोगान् हि वो देवा दास्यन्ते यज्ञभाविताः ।**
**तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुङ्क्ते स्तेन एव सः ॥ १२ ॥**

यज्ञाने संतुष्ट केलेले देव तुम्हाला इष्टभोग देतील. त्यांनी दिलेल्या वस्तूंचा त्यांना न देता जो उपभोग घेतो, तो चोर होय.

नित्यकर्मरूपी यज्ञाने देवांना संतुष्ट केले की देव हवे ते देतात. उत्कृष्ट भोगातच त्याचा जन्म होतो. त्याला कोणत्याही वस्तूची वाण पडत नाही. जे मनात येईल ते तो मुक्त हस्ताने दान करतो. या उलट देवांना न देता उपभोग घेणे म्हणजे चोरी होय. देव म्हणतात, जो मिळालेल्या संपत्तीचा केवळ स्वतःसाठी उपभोग घेतो, अशा माणसाचा अपराध सिद्ध करण्याच्या भानगडीत आम्ही पडत नाही. अपराधी खरा की खोटा हे ठरविण्याची संधी दिली की पुराव्याच्या अभावी खुनीसुद्धा सुटण्याची शक्यता असते. म्हणून देव त्याला अशा घरांत जन्मास घालतात की जेथे त्याला आई, वडील, भाऊ, बहीण कुणाचाही काडीमात्र उपयोग होत नाही. सर्वजण त्याच्याकडून काम करून घेतात, पण काही मागितले की मिळतात फक्त शिव्या.

**यज्ञशिष्टाशिनः संतो मुच्यन्ते सर्वकिल्बिषैः ।**
**भुञ्जते ते त्वघं पापा ये पचन्त्यात्मकारणात् ॥ १३ ॥**

यज्ञशेष भक्षण करणारे सज्जन सर्व पापापासून मुक्त होतात. जे यज्ञ न करता केवळ स्वतःसाठी पाकसिद्धी करतात, ते पापी लोक पाप भक्षण करतात.

देव तुमच्याकडे अधिक मागत नाही. खंडीभर धान्य पिकले तरी त्यातले मूठभर धान्य शिजवून त्याचा नैवेद्य दाखवायचा. तीन बोटात मावेल येवढ्याच अन्नाच्या दोन किंवा तीन आहुती द्यायच्या व बाकीचे अन्न देवाने दिलेला प्रसाद म्हणून भक्षण करावयाचे. दिवाळीत आपण चार आठ दिवस फराळ करीत असतो. पण फक्त पहिले दिवशी एक एक जिनसाचा नैवेद्य दाखवायचा असतो. असे केल्याने कळत न कळत घडलेल्या पातकांचा नाश होतो. आपण चालतो, काम करतो, श्वासोच्छ्वास करतो, झोपतो, इत्यादी क्रिया करताना आपल्या हातून किडे, मुंग्या, जंतू, ढेकूण इत्यादींची हत्या होत असते. अशा हत्या झाल्याशिवाय कोणतेच कार्य होऊ शकत नाही. अशा अजाणता होणाऱ्या पापांच्या नाशासाठी वैश्वदेव सांगितलेला आहे. हल्ली कोठे वैश्वदेव होत असेल की नाही, शंकाच आहे. लौकरच वैश्वदेव या शब्दाचा अर्थ कोषात पाहिल्याशिवाय समजणे कठीण होईल. काहींच्या मते अग्नीत अन्न टाकणे म्हणजे वाया घालविणे, पण ही समजूत चुकीची आहे. पूर्वी कधी धान्याची टंचाई हा शब्द ऐकिवातही नव्हता. पण आता प्रत्येक वस्तूची टंचाई आहे. देवांना देण्याचे बंद केल्याचा हा परिणाम आहे.

शास्त्राने सांगितल्याप्रमाणे वागल्यास मानवांचाच काय पण पशुपक्ष्यांचाही निर्वाह होतो. पूर्वी भोजनापूर्वी काकबळी देण्याची प्रथा होती. चार शिताने गावांतील कावळ्यांचे पोट भरणार नाही. पण प्रत्येकाने चार चार शिते दिली तर त्यांचे पोट निश्चित भरते. यम म्हणतो, जो काकबळी देतो त्याला यमयातना भोगाव्या लागणार नाहीत. शेतात पांखरांना कितीही हाका, ती आपला निर्वाह केल्याशिवाय राहात नाहीत. चिमण्या कधी पिशव्या घेऊन रेशनला रांगेत उभ्या राहतात का? त्या धान्य पिकवीत नाहीत. विकत घेत नाहीत किंवा त्याचा

साठीही करीत नाहीत. मानव पिकवितो त्यातूनच त्यांचा परस्पर निर्वाह होतो. म्हणून जे अन्न तयार करावयाचे ते देवासाठी म्हणून शिजवा. तयार झाले की प्रथम देवांना द्या. असे न करता अन्न सेवन केल्यास तुम्ही चोर ठराल व तुम्हास चोरीच्या पातकाची शिक्षा भोगावी लागेल.

**अन्नाद् भवन्ति भूतानि पर्जन्यादन्नसंभवः।**
**यज्ञाद् भवति पर्ज्यन्यो यज्ञः कर्मसमुद्भवः ॥ १४ ॥**

अन्नापासून भूते उत्पन्न होतात. पर्जन्यापासून अन्नाची उत्पत्ती होते. यज्ञापासून पर्जन्य उत्पन्न होतो व कर्मापासून यज्ञाची उत्पत्ती होते.

स्वतःच्या निर्वाहासाठी तरी कर्म करावेच लागते. शिवाय हे अबाधित जगच्चक्र चालू राहण्यासाठीसुद्धा कर्म करावेच लागते. भूते म्हणजे निर्माण होणारी ही शरीरे. अन्नापासून वीर्य व त्यापासून शरीर तयार होते. पाऊस पडल्याशिवाय अन्न उत्पन्न होत नाही व यज्ञ केल्याशिवाय पाऊस पडत नाही. हे आजकालच्या लोकांना पटत नाही. कारण तसे दिसत नाही. जे दिसत नाही त्यावर त्यांचा विश्वास नाही; म्हणून परमेश्वरावरही त्यांचा विश्वास नाही. कारण तोही दिसत नाही. पण शास्त्र सांगते की, यज्ञात दिलेल्या आहुती सूर्याला मिळतात. सूर्य संतुष्ट झाल्यावर पावसाला काय तोटा? असे देवतांना संतुष्ट करणारे यज्ञ कर्मे केल्याशिवाय होऊ शकत नाहीत.

**कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि ब्रह्माक्षरसमुद्भवम् ।**
**तस्मात् सर्वगतं ब्रह्म नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम् ॥१५॥**

कर्म वेदापासून उत्पन्न झाले असे जाण. आणि परमात्मा वेदांचे कारण आहे. म्हणून सर्वव्यापी वेद यज्ञामध्ये नित्य स्थिर आहे. ( वेदाने चित्तशुद्धीकरता यज्ञ म्हणजे विहित कर्म करावे असे सांगितले आहे. )

नुसत्या कर्मांनी यज्ञ संभवत नाही, तर ती कर्मे ब्रह्मोद्भव म्हणजे वेदांनी सांगितल्याप्रमाणे केली पाहिजेत. वेद अक्षर–ओंकारापासून निर्माण झाले. वेदांचा उच्चार करण्यासाठी भूते हवीत, असे हे चक्र आहे.

**एवं प्रवर्तितं चक्रं नानुवर्तयतीह यः ।**
**अघायुरिन्द्रियारामो मोघं पार्थ स जीवति ॥१६॥**

हे अर्जुना, याप्रमाणे सुरू केलेल्या कर्माला अनुसरून जो इहलोकी वागत नाही व इंद्रियांमध्ये रममाण होतो, त्याचे आयुष्य पापमय होय. त्याचे जगणेही व्यर्थ होय.

या चक्रापैकी कर्म केले नाही तर ते चक्र खंडित होते. मधला सांधा तुटल्यामुळे बिघाड निर्माण होतो. पण त्याहीपेक्षा मनुष्य विहित कर्म करणार नाही असे म्हणेल तर चोवीस तास तो करणार तरी काय? फक्त निषिद्ध कर्मेच त्याचे हातून घडणार. अर्थात त्याचे जीवनही निषिद्ध-व्यर्थ होईल. स्वतः व पशुपक्ष्यांचा निर्वाह, देवतांचा संतोष, जगच्चक्र चालू राहणे व मोक्षप्राप्ती या सर्वांसाठी कर्म आवश्यक आहे. कर्मांचे इतके फायदे आहेत. म्हणूनच ‘ कर्मयोगो विशिष्यते ’ असे म्हटले आहे.

अल्पशा त्यागाने देवता संतुष्ट होतात. चिमूटभर तीळ दिलेत तरी देव संतुष्ट होतो. पण मानव कितीही दिले तरी संतुष्ट होत नाही. जावयाला नुसते तीळ दिले तर तो भडकेल. तो म्हणतो– तीळ चांगले साखरेत घोळून आणि चांदीच्या वाटीत घालून द्या. असे नाही केले तर तो नाराज होतो. देव मात्र अल्पसंतुष्ट असतात. कारण तो थोरांचा स्वभाव आहे.

अन्न कोणाच्यातही व कसेही खाल्ले तरी ते पोट भरण्याचे आपले काम करते. पण देह पवित्र व्हावा असे वाटत असेल तर पवित्र अन्नच

सेवन केले पाहिजे. आपण खातो त्या अन्नाचे तीन भाग होतात. स्थूल भाग मळरुपाने बाहेर टाकला जातो, सूक्ष्म भागाचे रक्त व सप्तधातू बनतात. पवित्र अन्न असेल तरच त्यातील सूक्ष्मतम भाग पवित्र असतो. त्याने मन पवित्र बनते. प्रथम देवांना देऊन मग अन्न सेवन केले की त्या अन्नास पवित्रता येते. म्हणून आधी द्या मग घ्या. परमार्थ करून मग स्वार्थ साधा.

**यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तश्च मानवः ।**
**आत्मन्येव च संतुष्टः तस्य कार्यं न विद्यते ॥१७॥**

पण जो आत्म्याच्याच ठिकाणी रत असतो, आत्म्याच्या योगाने तृप्त असतो आणि आत्म्यामध्येच संतुष्ट असतो त्याला काही अर्थ रहात नाही.

आतापर्यन्त सर्वसामान्य मानवाला कर्मापासून सुटका नाही हे भगवंतानी प्रतिपादन केले, पण यातूनही सुटका झालेले काही अधिकार-संपन्न पुरुष असू शकतात. त्यांचे भगवंत आता वर्णन करीत आहेत.

पदार्थांची विपुलता पाहूनही माणसास संतोष होतो. मंडईत जाऊन भरगच्च भरलेला भाजीबाजार पाहण्यात काहीना आनंद होतो. अशी मंडळी बाजारातून नुसती चक्कर टाकतात. खरेदी काहीच करीत नाहीत. ढीग पाहूनच त्यांचे मन आनंदित होते. काहीना ताजी ताजी भाजी आणून खाण्यात आनंद होतो व तृप्ती होते. पाहून झालेला आनंद व भोगून झालेली तृप्ती येवढ्यानेच मनुष्याचे समाधान होत नाही. त्याकरता रती म्हणजे क्रीडा हा एक प्रकार आवश्यक आहे. त्यासाठी धनिक लोक शेकडो रुपये वर्गणी देऊन क्लबात जातात. लहान मुलांना तर खेळणे येवढाच उद्योग असतो. संसारी माणसेही खेळण्यात किंवा खेळ पाहण्यात रमतात. संतोष, तृप्ती आणि क्रीडा या तीनही गोष्टी ज्ञानी पुरुषास एका आत्म्यातच मिळतात.

आत्म्याच्या दर्शनाने आनंद व आत्म्याच्या अनुभवाने तृप्तीही होणे शक्य आहे. पण आत्म्याशी क्रीडा कशी काय करता येईल ?

एखादी सुंदर मूर्ती पाहून आनंद होतोच. पण त्या मूर्तीच्या सौंदर्याचे रसग्रहण केलेले वर्णन वाचून नंतर जर त्या मूर्तीचे निरीक्षण केले तर अधिक आनंद होतो. कारण आनंदाची पार्श्वभूमी तयार झालेली असते. नुसत्या दिव्यापेक्षा वर शेड असेल तर अधिक प्रकाश पडतो. प्रत्यक्ष आत्मानुभव झाल्याने ज्ञानी आनंदात असतोच. अशा वेळी आत्म्याचे उपनिषदातील अज, अमर, नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त इत्यादी वर्णन आठवून त्याचा आनंद द्विगुणित होतो. हचि आत्मक्रीडा होय. उपनिषद् वाक्यांच्या कोंदणात आत्म्याचे सौंदर्य हिऱ्याप्रमाणे शोभते. सामान्य माणसांना स्वतःच्या करमणुकीकरता दुसरे मित्र लागतात. राजे लोक तर त्यासाठी खुषमस्करे, विदूषक लोक पदरी बाळगत. सामान्य माणसाला करमणुकीसाठी दुसऱ्याची गरज लागते. ‘ न रमते एकाकी ’ असे श्रुतिवाक्य आहे. ते फक्त व्यवहारात लागू पडते. परमार्थात नाही. म्हणूनच ‘ विविक्तदेशसेवित्वम् ’ असे ज्ञान्याचे लक्षण पुनःपुनः मुद्दाम सांगितले आहे. ज्ञानी शास्त्रवाक्यांचा विचार करतो व त्यातच त्याचे मन रमते. चूडाला म्हणते :—

तनुविद्वेषरागाभिः प्रज्ञाभिः शास्त्रदृष्टिषु ।
रमे सह वयस्याभिः तेनाहं श्रीमती स्थिता ॥

रागद्वेष क्षीण झालेले असल्याने शास्त्रार्थांचे सूक्ष्म अर्थ तात्काळ आकलन होतात. अशा प्रज्ञा म्हणजेच त्याच्या मैत्रिणी असतात. त्यांच्याशी तो क्रीडा करतो. तीच आत्मक्रीडा होय. अशा आत्मानंदात संतुष्ट असलेल्या पुरुषाला कर्तव्य असे काही नसते.

मग अशा पुरुषांचा कर्म न करता निर्वाह कसा होतो ?

प्रारब्धानुसार त्यांचा योगक्षेम होतो. रंगनाथस्वामीसारखे कधी सुंदर भोग मिळतात, तर कधी समर्थासारखे भिक्षापात्र घ्यावे लागते. त्याबद्दल त्यांना सुखदुःख नसते. श्रीरामचंद्र राजकुळात जन्मले व सर्व गोष्टी अनुकूल असूनही त्याना वनवास पत्करावा लागला. याला कारण कैकेयी म्हणून लक्ष्मण व भरत तिला दोष देऊ लागले. तेव्हा प्रभु रामचंद्र म्हणाले, सुखस्य दुःखस्य न कोऽपि दाता ...... स्वकर्मसूत्रग्रथितोहि लोकः। आपल्याच कर्माची फळे आपण भोगत असतो. त्याची जबाबदारी दुसऱ्यावर टाकणे बरोबर नाही. केवळ वनवास पत्करण्याची आज्ञा असता रामाने राक्षसांचा निःपात केला. एवढे मोठे कार्य करूनही तो ज्ञानी असल्याने त्याची जबाबदारी राम स्वतःकडे घेत नाही.

संतोष, तृप्ती व रती या तीन्ही गोष्टी विषयापासूनही मिळतात. मग त्यासाठी आत्मज्ञानच कशाला हवे ?

विषयापासून या तीन्ही गोष्टी मिळतात पण त्याला मर्यादा आहे. शिवाय प्रारब्धाची अनुकूलता असेल, तरच विषयापासून आनंद मिळू शकतो. बापाने पोटाला चिमटा घेऊन पै पै करून जमविलेला पैसा आपणासच मिळणार हे माहीत असूनही मुले बापाच्या मर्जीनुसार वागत नाहीत. मुलासारख्या सचेतन पदार्थांची ही तऱ्हा, मग जड पदार्थ मनासारखे कसे वागतील? चौवीस तास देहाच्या तैनातीस असूनही ऐन सणासुदीस पोट बिघडल्यामुळे घरात गोडधोड केलेले असूनही आपण खाऊ शकत नाही. पदार्थापासून सुख व्हावे अशी अपेक्षा असेल तर शास्त्रानुसार कर्म केले पाहिजे, म्हणजे ज्ञानप्राप्ती होते व आनुषंगिक फळेही मिळतात.

'धनं च भूमौ पशवश्च गोष्ठे कांता गृहद्वारि जनः स्मशाने ।
देहश्चितायां परलोकमार्गे कर्मानुगो गच्छति जीव एकः ॥'

पण ज्ञानी पदार्थाबद्दल उदासीन का असतो ?

स्थूल शरीराची भूक कशानेही भागते. देशात अन्न पिकले नाही तर परदेशातील कुजके नासके मिलोसारखे कदान्न खाऊनही मनुष्य जगतो. पण तक्रार मनाची राहते. म्हातारपणी खायला प्यायला भरपूर असले तरी अशी व्यक्ती नाराज असते, कारण त्याच्या मनाप्रमाणे घरातील मंडळी वागत नाहीत. अन्न, वस्त्र व निवारा या मूलभूत गरजा एकत्र कुटुंब-व्यवस्थेत उत्तम प्रकारे भागतात. तरी तरुण मंडळी वेगळी बिऱ्हाडे थाटतात. कारण एकत्र कुटुंबात मन मानेल तसे वागता येत नाही. म्हणजे स्थूल शरीरापेक्षा मन प्रबळ आहे. ते संतुष्ट असेल तर स्थूल शरीर संतुष्ट राहते. मनाला भरपूर खाद्य मिळाले तर स्थूल शरीर उपाशी असले तरी फिकीर नसते. ज्ञानी पुरुषाचे मन आत्मानंदात मग्न असल्याने त्याला इतर बाह्य पदार्थांची गरजच भासत नाही.

एखाद्या मुलाला कितीही चांगले वळण लावण्याचे प्रयत्न केले तरी ते वाह्यातच निघते. विषयांचे तसेच आहे. ते सर्वकाळ चांगले व अनुकूल राहात नाहीत, बिघडतच जातात.

> अनुकूल काल येता यशवित्तबळ देतो ।
> प्रतिकूल तोचि होता दत्त सर्वही नेतो ॥

असे विषयांचे पारतंत्र्य असते. पण ज्ञानाचे तसे नाही. एकदा आत्मदर्शन झाले की पुनः बघायलाच नको. जातीने, वयाने कोणीही कसाही असो, ज्ञान झाले की तो स्वतःला कृतकृत्य समजून आनंदात निमग्न असतो. आचार्य म्हणतात,

'चाण्डालोऽस्तु सतु द्विजोऽस्तित गुरुरित्येषा मनीषाऽ मम'

कुठल्याही मानवाला हा आत्मानंद प्राप्त होऊ शकतो. फक्त त्याने कर्मयोग आचरला पाहिजे.

**नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन ।**
**न चास्य सर्वभूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रयः ॥ १८ ॥**

इहलोकी ज्ञान्याला कर्म केल्याने अथवा न केल्याने काही लाभ नाही. त्याला कोणत्याही प्राण्यापासून काही लाभ साधावयाचा नसतो.

अर्थ म्हणजे ऐश्वर्य, बायको, मुले, धन, घर, जमीन वगैरे गोष्टी. यापैकी ज्ञानी पुरुष कशाचीच अपेक्षा करीत नाही. मग तो कर्म तरी कशाला करील? त्याने जरी कर्म केले नाही, तरी त्याला दोष लागत नाही. कर्मे केली व फळाची अपेक्षा केली तर दोष लागणार. अशी कर्मे न केल्याने त्याला दोष लागत नाही.

श्रीमद् वासुदेवानंदसरस्वती याना परिभ्रमण करीत असता अतीशय भूक लागली. जवळपास खाण्यासारखे काहीच नव्हते. पुढे जात असता त्याना शाडूमातीचा ढीग दिसला. त्यांतली थोडी माती पाण्यात कालवून ती पिऊन त्यानी भूक भागविली, खाद्यपदार्थ ही पंचमहाभूतापासूनच निर्माण होतात. ही मातीही तशीच आहे. ती ही भूक भागवेलच असा त्यानी विचार केला. ज्ञानी जीवनाविषयी किती उदासीन असतो त्याचे हे उदाहरण.

अमुक अमुक सत्कृत्ये आपण करायला पाहिजे होती ती करता येण्यासारखी असून आपण केली नाहीत व जी सहज टाळता आली असती अशी काही पापकर्मे आपल्या हातून घडली, या दोन चिंता मनुष्य वयाने मोठा झाला की त्याला सतावत असतात. वार्धक्यात प्राय: यामुळेच पश्चात्ताप होत असतो. ज्ञानी पुरुष मात्र या दोन्ही काळज्यातून मुक्त असतो.

सर्वसामान्य मानवांना देवतांच्या संतोषासाठी कर्म करावेच लागते व न केले तर देवता कोपतात असे पूर्वी सांगितले. पण हा नियम ज्ञान्याला लागू नाही. कारण त्याचे सामर्थ्य साधनांनी तर वाढलेले असतेच शिवाय साक्षात्कारामुळे ते परमावधीला पोहोचलेले असते. त्यामुळे देवतांच्या रागालोभाचा त्याच्या मनावर काहीही परिणाम होत

नाही. ' ज्ञानी त्वात्मैव मे मतम्' म्हणजे ज्ञानी प्रत्यक्ष ईश्वराचाच आत्मा बनलेला असतो. त्याने नुसते ' अस्य कल्याणमस्तु ' असा आशीर्वाद दिला की त्याचे कल्याण झालेच पाहिजे. तो सिद्धसंकल्प असतो. म्हणजे केवळ संकल्पाने त्याला जग निर्माण करता येते. मग देवतांची तमा का म्हणून बाळगेल? तो प्रत्यक्ष परमेश्वराचा आत्मा बनून गेल्यामुळे देवता त्याच्याविरुद्ध जात नाहीत. कुऱ्हाडीला कितीही धार लावली तरी ती पाषाण तोडू शकत नाही. त्याचप्रमाणे ज्ञानी पुरुषापुढे विधिनिषेध बोथट होतात.

' को विधिः को निषेधः निस्त्रैगुण्ये पथि विचरताम् । '

असे ज्ञानी पुरुषाबद्दल म्हटले जाते. यालाच चरमावस्था म्हणतात.

**तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर ।**
**असक्तो ह्याचरन् कर्म परमाप्नोति पूरुषः ॥१९॥**

म्हणून सर्वदा अनासक्त राहून कर्म करीत रहा. कारण अनासक्त होऊन कर्म करणारा पुरुष मोक्षपद मिळवितो.

विरक्त आणि विषयासक्त असे दोन प्रकारचे लोक असतात. विरक्ताची आत्म्याकडे प्रवृत्ती असते, तर विषयासक्त विषयामध्ये गुरफटून गेलेले असतात. जे विषय मिळविण्यासाठी त्यांची सतत धडपड चालू असते, ते विषय क्षणभंगुर असल्याने मिळाले तरी अल्पकाळ टिकतात. म्हणून शहाण्या माणसाने त्यांच्यामागे लागू नये हे उत्तम. केवळ आत्म्याच्या लाभाची तीव्र इच्छा असेल त्यांच्यासाठी ज्ञानमार्ग आहे. ज्यांची विषयासक्ती पूर्णपणे गेलेली नाही, ज्यांना भोगाचीही अपेक्षा आहे व आत्माही लाभावा असे वाटते, ते कर्मयोगाचे अधिकारी होत. अर्जुनाच्या मनात निर्माण झालेले वैराग्य हे तात्कालिक होते. ते प्रकर्षाने उत्पन्न झालेले नव्हते. म्हणून भगवंत त्याला तू कर्मयोगाचाच अधिकारी आहेस असे बजावून सांगत आहेत. अनासक्त वृत्तीने कर्म करीत रहा, शिवाय कर्मात सातत्य हवे, चार

दिवस करायचे मग आळसाने सोडून द्यावयाचे, हे योग्य नाहीं. कर्तव्य म्हणून कर्म करावयाचे. भगवंताची व शास्त्राची आज्ञा आहे अशी बुद्धी ठेवून कार्य करावे. 'समाचर' म्हणजे आनंदाने कर्म कर. कुणीकडून तरी, कसे तरी, कंटाळवाणे कर्म करू नये. निष्काम बुद्धीने, सतत व सुंदर केलेली कर्मे नित्यकर्मांत गणली जातात.

मनु म्हणतो,

"स्वानि कर्माणि कुर्वाणाः प्रिया भवन्ति लोकस्य ।
दूरे स्थिताऽपि ॥ "

नित्य कर्म करणारे दूर गिरीकंदरात वास करीत असले तरी ते सर्वांना प्रिय होतात. मनुष्य आपणहून दुसऱ्याचे काम करण्यास राजी नसतो. कदाचित तयार झालाच तर त्याला त्याचे आप्त-सोबती विकतचे श्राद्ध कशाला घेतोस असे विचारून मोडता घालतात. नित्यकर्मे व्यवस्थित केली तर अनायासे परार्थ साधता येतो. नित्यकर्मे केली नाहीत तर मात्र आयुष्य वाया जाते. कर्मयोगाने स्वतःचा निर्वाह व्यवस्थित चालून शिवाय जगच्चक्र सुरळीत चालण्यासही मदत होते.

तुमच्याकडे एक अनाहूत ब्राह्मण जेवावयास आला व तुमचा जावईही आला. तुम्ही दोघांनाही जेवायला बसविता. पण वाढताना तुमची बुद्धी समान असते का, याचा विचार करा. ब्राह्मणाला वाढायचे म्हणून वाढायचे व जावयाला अगत्याने आग्रह कर करून जेऊ घालायचे. जावई प्रसन्न राहील तर तो आपल्या मुलीला सुख देईल हा त्यामागे हेतु असतो. येवढेच कशाला, जावयाची चिठी घेऊन जर कोणी आला तर त्या आलेल्या माणसाची लायकी वगैरे न बघता जावयाचा मान राखण्यासाठी आलेल्या माणसाची बडदास्त ठेवली जाते. जावई प्रसन्न रहावा म्हणून ही कर्मे केली जातात. तसेच ईश्वराच्या प्रसन्नतेसाठी नित्यकर्मे व्यवस्थित पार पाडली पाहिजेत. कारण 'अनेन प्रसविष्यध्वमू एष वोऽस्त्विष्टकामधुकू' अशी ब्रह्मदेवाची आज्ञा आहे.

पण असे केल्याने फायदा काय असा अर्जुनाने प्रश्न केला. तेव्हा भगवन्त म्हणाले, 'फळ मागायचे नाही हे एकदा मान्य केल्यावर पुनः फायदा विचारण्यात काय अर्थ आहे? सामान्य कर्मे केली तरी फुकट जात नाहीत. मग शास्त्राने सांगितलेली कर्मे वाया कशी जातील? फळ नाही. याचाच अर्थ महत्फळ आहे. महत्फळ मिळविण्याइतकी आपली योग्यता नाही असे लोकांना वाटते म्हणून त्यांना क्षुद्र फळ नाही असे सांगावे लागते.'

**कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः ।**
**लोकसंग्रहमेवापि संपश्यन् कर्तुमर्हसि ॥ २० ॥**

कर्माच्याच योगाने जनकादिकांना सिद्धी प्राप्त झाली. लोकसंग्रहाकडे दृष्टी देऊनही कर्म करणे तुला योग्य आहे.

जनकादिकांना नुसती सिद्धी नव्हे तर संसिद्धी मिळाली. संसिद्धी म्हणजे ज्ञान. आणिमा, गरिमासारख्या सिद्धी मिळाल्या तरी कर्म करीतच रहावे लागते. पण ज्ञान प्राप्त झाल्यावर काहीच करावे लागत नाही. कर्मयोगाशिवाय शम, दम, तितीक्षा, उपरती, समाधान व श्रद्धा या साधनाद्वारे श्रवण-मनन-निदिध्यास करीत आयुष्य व्यतीत केले तरी त्याला ज्ञान प्राप्त होईल. अशा ज्ञानी पुरुषाला लोकसंग्रहासाठी कर्म करावेच लागते.

एखादा निष्ठेने नित्य कर्मे करीत असेल तर त्याची लोक टिंगल करतात. त्याचा उपहास करतात. नियमितपणे संध्या करण्याची सवय असलेला लग्नघरी गेला असता संध्येची वेळ होताच सोवळे नेसून संध्या करू लागला तर इतर वऱ्हाडी मंडळी त्याला हसतात. लोक म्हणतात, लग्नात जमायचे ते काय स्नानसंध्या करायसाठी थोडेच यायचे असते. धुडगूस घालायचा, चैन करायची, खावे प्यावे, बाष्कळ बडबड करून लोकांची करमणूक करायची सोडून हा बेटा संध्या करीत

बसला आहे, अशी त्याची चेष्टा केली जाते. पण निष्ठावंत माणसाने असा विचार करावा की या जगात कोण कुणाला हसत नाही ? मूर्ख शहाण्यांना व शहाणे मूर्खांना हसत असतात, म्हणून आपला मार्ग सोडणे रास्त नव्हे. हसणारे अविवेकी म्हणून त्यांचेकडे दुर्लक्ष करावे. शिवाय साधुसंत हा कर्मयोग युगानुयुगे आचरत आले आहेत म्हणून तो सदाचार ठरला आहे.

जनक, धर्म आदि मंडळी अजातशत्रू होती. तरीही त्यांनी कर्मयोग आचरला व ज्ञान प्राप्त करून घेतले. आपल्या अशा आचरणाने त्यांनी लोकसंग्रह केला. लोकसंग्रह म्हणजे लोक गोळा करणे नव्हे. उन्मार्गगामी लोकांना सन्मार्गास लावणे हा खरा लोकसंग्रह होय.

**यद्यदाचरति श्रेष्ठस्तत् तदेवेतरो जनः ।**
**स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥ २१ ॥**

श्रेष्ठ पुरुष जसे आचरण करतो त्याचे इतरजन अनुकरण करतात. तो ज्या गोष्टीला प्रमाण मानतो, त्यालाच इतर लोकही प्रमाण मानतात.

पारतंत्र्यकाळात गीतेला शाळा कॉलेजात मान्यता नव्हती, पण आता आहे. कारण स्वातंत्र्याचे उद्गाते लोकमान्य टिळक, महात्मा गांधी, योगी अरविंद घोष इत्यादी थोर नेत्यांनी गीतेला आपल्या जीवनात अन्ययसाधारण महत्त्व दिले. ही नेते मंडळी लोकांची अत्यंत आवडती होती. म्हणून त्यांचे आचरणही अनुयायांना मान्य. थोरांचे अनुकरण सामान्यजन करतात. मुलाला संध्या कर असे सांगितले तर तो विचारतो, ‘ बाबा, तुम्ही कोठे करता ? ’ बाबा जर नियमितपणे संध्या करीत असतील तर मुले न सांगता तसे वागतील. ‘ आधी केले मग सांगितले ’ तर त्या सांगण्यात सामर्थ्य असते.

**न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन ।**
**नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्माणि ॥ २२ ॥**

हे पार्था, मला त्रैलोक्यामध्ये कर्तव्य असे काही नाही किंवा प्राप्त न झालेली एखादी गोष्ट प्राप्त करावयाची आहे असेही नाही. तरी मी कर्मे करीतच आहे.

भगवंताना कशाचीही अपेक्षा नव्हती, तरी ते नित्यकर्म बिनचूक व नियामितपणे करीत व शेवटपर्यन्त त्यांनी त्यांत खंड पडू दिला नाही. पंचावन्न वर्षे झाली की काम बंद करून निवृत्त व्हायचे. तसे नित्यकर्मापासून केव्हाही सुटका नाही. ते केलेच पाहिजे.

**यदि ह्यहं न वर्तेयं जातु कर्मण्यतंद्रितः ।**
**मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥२३॥**

मी जर कर्माविषयी उदासीन राहिलो तर, हे अर्जुना सर्व लोक माझेच अनुकरण करतील.

श्रीकृष्ण धर्मानुसार वागत होता. नित्यकर्मे निष्ठेने करीत असे, म्हणून यादव मंडळीही करीत. प्रल्हादाने विष्णूच्या सगुण मूर्तीची उपासना सुरू केल्यावर इतर असुरही राजाची मर्जी सांभाळण्यासाठी पूजा करू लागले. प्रल्हादच जर देवाचे शत्रुत्व करता, तर इतर असुरही तसेच वागले असते.

**उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्म चेदहम् ।**
**संकरस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजाः ॥२४॥**
**सक्ताः कर्मण्यविद्वांसो यथा कुर्वन्ति भारत ।**
**कुर्याद्विद्वांस्तथाऽसक्तश्चिकीर्षुर्लोकसंग्रहम् ॥२५॥**

जर मी कर्म केले नाही तर हे लोक नाश पावतील. संकर करण्याला व लोकांच्या नाशाला मी कारण होईन. हे अर्जुना, ज्याप्रमाणे अज्ञानी लोक कर्माच्या ठिकाणी आसक्त होऊन कर्म करतात, त्याप्रमाणे लोकसंग्रह करण्याची इच्छा करणाऱ्या ज्ञानी पुरुषाने आसक्त होऊन कर्म करावे.

ईश्वर सर्वशक्तिमान असल्याने त्याला कर्म बंधनकारक होणार नाही. पण सामान्य जीवांचे काय? अशी अर्जुनाने शंका घेतल्यावर भगवान म्हणाले, 'फळाच्या उत्कट इच्छेने मूर्ख जितक्या सावधपणे कर्म करतो तितक्याच सावधपणाने कर्म करावे. पण फळ मागू नये. म्हणजे कर्म बंधक न होता ते मोचक होते. ऋषीमुनींजवळ कशाचा साठा होता? ना धनाचा न धान्याचा, फक्त होती निष्काम बुद्धीने व सतत करत असलेली नित्य कर्मे. त्यामुळे त्यांना ज्ञानप्राप्ती होत असे. वसिष्ठ गृहस्थाश्रमीच होते. अरुंधतीसारखी त्याना पत्नी लाभली होती. 'प्रत्यग्दृष्टिररुंधतीसहचरो रामस्य पुण्यात्मनः' असे त्याना विशेषण लाभले होते. त्यानी रामाचे गुरुपद भूषविले. हा अधिकार त्याना कशामुळे लाभला? केवळ निष्काम कर्मयोगाचरणामुळे. माणसे शेवटी पैसा उपयोगी पडेल म्हणून सबंध आयुष्य पैसा साठविण्यात खर्च करतात. पण साठविलेले धन वार्धक्यात कोणी लांबविण्याची शक्यता असते. त्यामुळे पैसा उपयोगी पडतोच असे नाही. नित्यकर्मे करीत राहिल्यास मिळणारे पुण्य कोणी नेऊ शकत नाही. म्हणून नित्यकर्मेच उपयोगी पडतात.'

काही लोक म्हणतात, आम्ही नियमाने नित्यकर्मे केली पण परिस्थिती काही पालटत नाही. पण त्यांना हे कळत नाही की सध्याची अशांतता ही पूर्वीच्या कर्माचा परिपाक आहे. सध्या सत्कर्म कराल तर त्याचे फळ पुढे मिळेल. चांगले करूनही जर चांगले होत नाही, तर वाईट कर्मे करून चांगल्या परिणामाची अपेक्षा करणे हे शहाणपणाचे आहे काय? म्हणून आपल्याच भल्यासाठी निष्काम बुद्धीने नित्यकर्मे करीत राहिले पाहिजे.

**न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसंगिनाम् ।**
**जोषयेत् सर्वकर्माणि विद्वान् युक्तः समाचर ॥ २६ ॥**

कर्माच्या ठिकाणी आसक्त झालेल्या अज्ञजनांचा ज्ञानी पुरुषाने बुद्धिभेद करू नये. अवधानपूर्वक स्वतः कर्म करून समाहितचित्त राहून लोकांना सर्व कर्मे करण्याची गोडी लावावी.

कर्मयोगाने मनोरथांची पूर्तता होते, देवता प्रसन्न होतात, निर्वाह अनायासे चालतो व जगच्चक्र सुरळीत चालण्यास मदत होते. इतके फायदे सांगितले तरी अर्जुनाला नित्यकर्मांचे महत्त्व पटले नाही व 'भगवंता, आपली गणना नित्यमुक्तात होते. माझी व आपली बरोबरी होणार नाही' अशी शंका काढली. तेव्हा भगवंतानी त्याला लोकसंग्रहासाठी तरी कर्म केलेच पाहिजे हे पटवून दिले. तरीही अर्जुनाची शंका आहेच. तो म्हणतो, 'लोकसंग्रह करायची जबाबदारी पत्करायला मी काही महात्मा लागून गेलो नाही. कर्माची कटकट कुणालाच नको असते. त्यापेक्षा ज्ञानमार्ग सुटसुटीत तोच मी पसंत करतो. बरे लोकसंग्रहच करायचा म्हटले तर त्यासाठी कर्मयोगच कशाला हवा? ज्ञानोपदेश करूनही लोकसंग्रह करता येणार नाही का?'

भगवान् :— ज्ञानमार्ग सुटसुटीत आहे व ज्ञानोपदेशानेही लोकांना सन्मार्गाला लावता येईल यात शंका नाही. पण ज्ञानोपदेश ऐकून घ्यायलाही तशीच योग्यता हवी. तरच उपदेशाचा परिणाम होऊ शकतो. पाच वर्षाच्या बालकापुढे रंभा उर्वशी येऊन उभी राहिली व 'मी तुला वरते' असे त्या बालकाला म्हणाली, तर ते बालक धाबरून आपल्या आईलाच अधिक बिलगेल. त्या वयात त्याला आई हेच परब्रह्म असते. देवांगना ही काय चीज आहे हे कळायला त्याची योग्यता वाढून तो वयात यायला हवा. तसेच ज्ञानग्रहणाची योग्यता असेल तरच उपदेश कारणी लागेल.

'शास्त्रात जिथे जिथे ज्ञानाचे वर्णन आले आहे तेथे आधी योग्यतेचे प्रतिपादन केलेले असते. 'अथातो ब्रह्मजिज्ञासा' म्हणजे ज्ञान प्राप्त करून घेण्याची इच्छा होणे हेच दुर्मिळ. 'मनुष्याणां सहस्रेषु' एखादा जिज्ञासू

निघायचा. ऐकणाराची इच्छा नसता ज्ञानोपदेश केला तर ‘ नळी फुंकली सोनारे इकडून तिकडे गेले वारे ’ अशीच गत होणार. अर्जुना, तुझा माझा गेल्या छत्तीस वर्षांचा संबंध, पण आजवर एकदाही ‘ शाधि मां त्वां प्रपन्नम् ’ अशी विनंती तू केली नव्हतीस. प्रथम इच्छा होणे हे कठीण. ज्ञानग्रहणाची योग्यता आल्याखेरीज इच्छाही होत नाही.

कर्माची आसक्ती प्रबळ असणारांची ‘ हे कर्म मी केले व त्याचे फळ मीच घेणार ’ ही धारणा पक्की असते. अशा मंडळींना ज्ञानोपदेश केल्यास ‘ अतो भ्रष्टस्ततो भ्रष्टः ’ अशी गत होते. अशा प्रकारे उपदेश करण्याने लोकसंग्रह न होता पातक मात्र लागायचे. म्हणून शहाण्याने अज्ञानी व कर्मासक्तांना उपदेश करून त्यांचा बुद्धिभेद करू नये. त्यांचा बुद्धिभेद करण्यापेक्षा त्यांच्यापुढे निष्काम कर्म आचरून उत्कृष्ट आदर्श ठेवला तर त्यांना आपली सुधारणा करण्याची बुद्धी होईल.

**प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः ।**
**अहंकारविमूढात्मा कर्ताऽहमिति मन्यते ॥२७॥**

**तत्त्ववित्तु महाबाहो गुणकर्मविभागयोः ।**
**गुणा गुणेषु वर्तन्त इति मत्वा न सज्जते ॥२८॥**

प्रकृतीच्या गुणांनी सर्व कर्मे केली जातात. असे असता अहंकाराच्या योगाने ज्याचे मन मोहित झालेले आहे असा पुरुष त्या कर्माचा मीच कर्ता असे मानतो. परंतु हे महाबाहो, गुण व कर्म यांच्या विभागांचे तत्त्व जाणणारा गुणांच्या ( कर्मांच्या ) ठिकाणी गुणांची ( सत्त्वादी ) प्रवृत्ति असते असे समजून आसक्त होत नाही.

अज्ञानी जनापुढे आदर्श ठेवण्यासाठी केलेल्या कर्मामुळे कर्मबंध निर्माण होतील, अशी अर्जुनाची शंका जाणून भगवंतानी हे प्रतिपादन केले आहे.

प्रकृती–तिला कोणी माया–कोणी अज्ञान असे म्हणतात. तीच सर्व कर्मे करीत असते. पण अहंकारी पुरुष आत्मा कर्ता असे समजतो. सत्त्व, रज व तम या तीन गुणांची समानावस्था म्हणजे प्रकृती. हे गुण राहण्याचे ठिकाण म्हणजे अंतःकरण. या तीन गुणांपैकी कोणता गुण केव्हा जोर करील हे सांगता येत नाही. आहार, विहार, निद्रा, बसणे, बोलणे इत्यादी क्रियातून तो तो गुण प्रगट होतो. कर्मे ही शारीरिक, वाचिक व मानासिक अशी तीन प्रकारची असतात. प्रदक्षिणा घालणे हे शारीरिक कर्म, जप करणे हे वाचिक कर्म व ध्यान करणे हे मानसिक कर्म होय. या तीन्ही कर्मात मानासिक कर्म सर्वात श्रेष्ठ, वाचिक मध्यम व शारीरिक कनिष्ठ होय. या सर्वापेक्षा आत्मा श्रेष्ठ. तोच जर देह, इंद्रिये आणि बुद्धी यांनी केलेली कर्मे आपण केली असे म्हणू लागला तर तो अडचणीत आल्याशिवाय रहात नाही. जसा एखादा अधिकारी खालच्या लोकांनी केलेल्या कामावर डोळे झाकून सह्या केल्याने गोत्यात येतो. अधिकाऱ्यास सह्या करण्यासाठीच जादा पगार असतो, पण सह्या करण्यापूर्वी पूर्ण विचार करणे व आपण कशावर सही करतो हे समजून घेणे हे त्याचे कर्तव्य असते. राजा वास्तविक स्वतः काहीच करीत नाही. पण त्याच्या सान्निध्यामुळे सर्व कारभार सुरळीत चालू असतो. तसेच आत्मा काही करीत नाही. पण त्याच्या सान्निध्यामुळे देह-बुद्धी-मनाचे व्यापार व्यवस्थित चालू असतात. आत्मा अकर्ता असतो. त्याला फलाशा व कर्तृत्वाभिमान नसल्याने त्याला कर्म बंधक होत नाही. तसेच ज्ञानी पुरुष जरी अज्ञ जनात वावरला, तरी फळाशा व कर्तृत्वाभिमान सोडून कार्य करीत राहिल्याने त्याला कोणताही दोष लागत नाही. खरोखर जो मोठा असतो, तो 'मी केले' असे कधीही म्हणत नाही.

भारतीय युद्ध-समाप्तीनंतर श्रीकृष्ण धर्माला म्हणाले, ' राजा, या शौर्यशाली बंधूंनी युद्धात जय मिळविला.' वास्तविक भगवान श्रीकृष्ण पांडवांच्या पक्षास नसता तर म्हणजे त्याच्या कृपेशिवाय पांडवांना विजयश्री प्राप्त झालीच नसती. तरीही श्रीकृष्ण 'मी जय मिळवून दिला' असे चुकूनसुद्धा म्हणत नाहीत.

**प्रकृतेर्गुणसंमूढाः सज्जन्ते गुणकर्मसु ।**
**तान् कृत्स्नविदो मन्दान् कृत्स्नविन्न विचालयेत् ॥२९॥**

प्रकृतिजन्य गुणांनी मोहित झालेले लोक गुणांच्या कर्माच्या ठिकाणी आसक्त होतात. सर्वज्ञ पुरुषाने त्या असर्वज्ञ मंदबुद्धी पुरुषांना चाळवू नये.

सत्त्व, रज व तम हे प्रमुख तीन गुण अंतःकरणात असतात. हे परस्परात मिसळून त्याचे ८१ प्रकार होतात. वाऱ्याच्या संयोगाने समुद्रावर जशा लाटावर लाटा निर्माण होतात, तशा सत्त्व, रज व तमाच्या संयोगामुळे अंतःकरणात विविध वृत्ती बनत राहतात. या त्रिगुणामुळे जीव मूढ बनतो हा त्याचा दृश्य परिणाम. अशा अज्ञानी व मंद जीवांना ज्ञानोपदेश करू नये. कारण त्यांना ज्ञानग्रहण करण्याची योग्यता प्राप्त झालेली नसते. कर्मयोगाची पूर्णता गाठल्यावर अशी योग्यता येते.

' कृत्स्नवित् ' म्हणजे ब्रह्मवेत्ता. श्रुती व स्मृती या दोहोंमध्ये अनेक-वेळा विरोध आढळून येतो. तेव्हा प्रत्येक वेदातला एक एक निष्णात पुरुष बोलवून त्यांचेकडून निर्णय करून घ्यावा. असे निरनिराळे पुरुष न मिळा-ल्यास ब्रह्मवेत्ता शोधून त्याचेकडून शंका निरसन करून घ्यावी. त्याचा निर्णय योग्यच समजावा. सत् -चित् -आनंदरूपी ब्रह्मसाक्षात्काराने जो स्वतःच ब्रह्म बनलेला असतो, अशा पुरुषाची वाणी कधी असत्य असणार नाही. ' यत्र गच्छति सा काशी, यत् शृणोति तदुपनिषद्, संचारः तीर्थसंचारः ' अशी त्याला योग्यता प्राप्त झालेली असते. त्याचे पिसाट शब्दही वेदवाक्याच्या तोडीचे असतात. अशा अधिकारी

व्यक्तीच्या तोंडून अयोग्य शब्द निघतच नाहीत. अशा पुरुषानेही अनधिकारी व्यक्तीस उपदेश करू नये. ज्ञानेश्वरानी या बाबतीत सुंदर दृष्टांत दिला आहे. ते म्हणतात, 'जें सायासें स्तन्य सेवी। ते पक्वान्नें केवी जेवी। म्हणोनी बाळका जैशी नेदावी। धनुर्धरा॥' ज्याला दूध पिता येत नाही त्याला पक्वान्ने कशी पचतील?

मग अज्ञानी जनांचा उद्धार कसा होईल? अज्ञानी जनांना फलेच्छा सोडून कर्म करीत राहणे म्हणजे कर्मयोग आचरणे हाच एक मार्ग आहे. जगात जीवजंतु कर्म करीतच असतात. मुंगी एका कणासाठी सारखी हिंडत असते. दूध किंवा उंदरासाठी मांजर टपून बसते. 'नहि कश्चित् क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत्' हा तर सिद्धांतच आहे. पण नुसते कर्म करीत राहणे म्हणजे कर्मयोग नव्हे. कर्मयोगाचे स्वरूप आता भगवंत सांगत आहेत—

**मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्याध्यात्मचेतसा।**
**निराशीर्निर्ममो भूत्वा युध्यस्व विगतज्वरः॥ ३०॥**

चित्तवृत्ती माझ्या ठिकाणी ठेवून, मला सर्व उचित कर्मे समर्पून, निरिच्छ, निरहंकार होऊन, मनात कोणताही संशय न बाळगता तू युद्ध कर.

हा श्लोक म्हणजे कर्मयोगाचे सार आहे. सर्व गीता पाठ असेल तर उत्तमच, निदान हा एक श्लोक जरी आत्मसात केला, तरी समग्र गीता पठणाचे पुण्य लाभेल.

अंतर्यामी ब्राह्मण हा वेदाचा एक भाग आहे. त्यात जीव स्वतंत्र की परतंत्र यासंबंधी विचार केलेला आहे. प्रत्येक जीवाला आपण स्वतंत्र आहोत असे वाटत असते. पण

**'ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति।**

असे भगवंतानी सांगून जीवाची समजूत चुकीची असल्याचे स्पष्ट केले आहे. हृदयस्थ परमेश्वर ज्याच्या त्याच्या पापपुण्याप्रमाणे जीवाची कर्मात प्रवृत्ती करीत असतो. 'अज्ञो जन्तुः अनीशोऽयं।' म्हणजे जीवाकडून तो भलत्यासारखी कर्मे करून घेतो. दुर्योधनाला सर्वांनी उपदेश केल्यावर तो म्हणाला,

'केनापि देवेन हृदि स्थितेन यथा नियुक्तोऽस्मि तथा करोमि'।

हृदयस्थ देवता जशी आज्ञा देईल तसे वागावे लागते. त्याच्यापुढे माझे काही चालत नाही. आयुष्यातील तीनचतुर्थांश भाग असा पारतंत्र्यात जातो. उरलेल्या एक चतुर्थांश भागात आपणाला स्वातंत्र्य असते. त्यावेळी 'काशीस जावे नित्य वदावे' असे चांगले संकल्प तरी करावयास काय हरकत आहे? पण तसे घडत मात्र नाही. कुंभकर्णाने दहा हजार वर्षे उग्र तप केले व ब्रह्मदेवास प्रसन्न करून घेतले आणि वर मागायच्या वेळी 'सहा महिने झोप व एक दिवस पोटभर खाणे मिळावे' अशी मागणी केली. असे कां झाले? सरस्वतीने त्याच्या जिभेवर ठाण मांडून तसे वदविले. मागाहून कुंभकर्णाला पश्चात्ताप झाला. पण काय उपयोग? आयुष्यात क्वचित् संधी मिळते. हृदयस्थ परमेश्वर अनुकूल नसेल तर ती अशी वाया जाते.

ईश्वरच सर्व कर्मे करून घेत असल्यावर त्याचीच कर्मे त्याला अर्पण करण्यास काय हरकत आहे? भगवंताला कर्म अर्पण केले की आपली जबाबदारी एकदम कमी होते. कर्म ईश्वराची आराधना म्हणून करावयाचे, म्हणून त्याच्या फळाची आशा धरायची नाही. ईश्वराचा संतोष हेच खरे फळ. इतकी कर्मे केली व परमेश्वराला अर्पण केली असा अभिमानही बाळगू नये. तसेच कर्मे करीत बसलो, ज्ञानाकरिता काहीच केले नाही असा खेदही करू नये. ही कर्मेच मोक्षपद मिळवून देतील असा विश्वास बाळगला पाहिजे.

कर्मयोगाचे हे सार सुंदर आहे. पण युद्धासारखे हिंसात्मक व सदोष कर्म करावे हे पटत नाही.

जग हे वैचित्र्याने भरलेले आहे. ते सुरळीत चालण्यासाठी चांगल्याप्रमाणे वाईटही आवश्यक असते. तुमचे घर तुम्हीच पाडू लागला तर तुमची बायकामुले तुम्हाला अडथळा करतील, पण नगरपालिकेचे अधिकारी येऊन पाडापाडी करू लागले तर कोणी मध्ये येऊ शकत नाही. शहर सुधारण्यासाठी अशी पाडापाडी करावीच लागते. मधुमेहाच्या त्रासातून मुक्त होण्यासाठी पायही कापून टाकावा लागतो. तसेच युद्ध सदोष वाटले तरी ते आवश्यक आहे व ते ईश्वराची आज्ञा म्हणून करावयाचे आणि त्यालाच अर्पण करून टाकायचे, म्हणजे कसलेही कर्म असले तरी ते शुभ होते व दोष लागत नाही. संत ज्ञानेश्वर म्हणतात,

‘ अगा जया जे विहित । ते ईश्वराचे मनोगत ।
म्हणोनि केलिया निभ्रांत । सांपडेचि तो ॥ ’

**ये मे मतमिदं नित्यमनुतिष्ठन्ति मानवाः ।**
**श्रद्धावन्तोऽनसूयन्तो मुच्यन्ते तेऽपि कर्मभिः ॥ ३१ ॥**

जे मानव या माझ्या मताप्रमाणे वागतात, त्यावर जे श्रद्धा ठेवतात व जे त्याची निंदा करीत नाहीत तेही कर्मबंधापासून मुक्त होतात.

परमेश्वराच्या मताप्रमाणे वागतात तेच मानव म्हणवून घेण्यास पात्र आहेत. गीता तिघांना मानव म्हणून संबोधिते.

१ ) स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विंदति मानवः
२ ) यस्त्वात्मरतिरेव स्याद् आत्मतृप्तश्च मानवः
३ ) ये मे मतमिदं नित्यमनुतिष्ठन्ति मानवाः

पण बहुसंख्य व्यक्ती या व्याख्येत बसत नाहीत. भर्तृहरीच्या शब्दात सांगावयाचे झाल्यास ‘ मनुष्यरूपेण मृगाश्चरन्ति ’ असे जीवच

भूतलावर अधिक आहेत. मानव म्हटला की त्याने शास्त्राप्रमाणे वागले पाहिजे व देवांना संतुष्ट केले पाहिजे. दानव बरोबर त्याच्या विरुद्ध वागतो व राक्षस तर भक्षण करीत सुटतो.

आतापर्यंत भगवन्तानी अनेक सिद्धांत सांगितले पण 'माझे मत' असा शब्दप्रयोग येथेच केला आहे. कर्मयोगाला भगवंत किती महत्त्व देतात हेच यावरून स्पष्ट होते. भगवान नुसते सांगतात असे नव्हे तर स्वत: सामान्य वाटणारे सारथ्य कर्म करीत असता सांगत आहेत, यालाही महत्त्व आहे.

कर्मयोग आचरणारेच नव्हे तर त्यावर श्रद्धा ठेवणारेही मुक्त होतात असे येथे भगवंत सांगत आहेत. असे श्रद्धावंत म्हणतात की, कर्मयोग ईश्वराने सांगितला आहे, तो सुंदर आहे हे मान्य. पण आम्हाला तो जमत नाही व झेपतही नाही. पण त्यांत दोष नाही. अशा श्रद्धेने वागणारेही प्रत्यक्ष कर्मयोग न आचरताही मुक्त होतात. काही दुराग्रही कर्मयोगाला नावे ठेवतात. श्रीकृष्णाला काही उद्योग नव्हता म्हणून त्याने काहीतरी सांगितले आहे. केवळ कर्म करण्याने किंवा श्रद्धा ठेवण्याने मुक्ति मिळणेच शक्य नाही. आणि केवळ कर्मयोगाने मुक्ति मिळत असेल तर श्रद्धा कशाला हवी? अग्नीवर पाय पडल्यावर तो पोळणारच, कारण तो अग्नीचा स्वभावच आहे. तसे मोचकत्व हा जर कर्मयोगाचा स्वभाव असेल, तर श्रद्धेची आवश्यकता का असावी?

असा आक्षेप घेणाऱ्यांनी हे लक्षात ठेवावे की, श्रद्धा ही कर्माचे प्रधान अंग आहे. कर्मात श्रद्धा असावीच लागते. श्रद्धेमुळे कर्मात विशेष निर्माण होतो. पूर्वी कऱ्हाड येथे शांताश्रम नावाचे एक गृहस्थ रहात होते. त्याना विशेष संस्कृत येत नव्हते, पण मोठ्या श्रद्धेने ते रोज भागवत वाचत. अशी चाळीस वर्षे अखंड वाचन केल्यावर त्याना स्वप्नात प्रत्यक्ष देवानी दर्शन देऊन सांगितले की पोथीची पाने उडतात म्हणून

जो दगड ठेवला आहेस तो काढ, मला त्रास होतो. प्रत्यक्ष देव त्यांच्याशी बोलू लागले. पुढे त्यांचा अधिकार इतका वाढला की, काशीचे नित्यानंदासारखे संस्कृत पंडित भागवतातील सूक्ष्मार्थ विचारण्यासाठी त्यांचेकडे येत. हे केवळ श्रद्धेमुळे घडून आले.

तुम्ही एखाद्याला कार्ड आणायला पाठविले व त्याची तुमच्यावर श्रद्धा नसेल तर तो कार्ड आणेलच असे नाही. गर्दीच होती, पोस्टच बंद होते, अशा काहीतरी सबबी सांगेल. पण तुमच्यावर श्रद्धा असणारा कोठून तरी कार्ड आणून दिल्याशिवाय राहणार नाही.

हिंदुधर्माचे वैशिष्ट्य असे आहे की, त्यातील शास्त्रात निरतिशय सुखाचे प्रतिपादन केलेले आहे व तेच अंतिम ध्येय म्हणून ठासून सांगितले आहे. हे अंतिम ध्येय साधण्यास शास्त्रावर नितांत श्रद्धा हवी. शास्त्र हे केव्हाही निर्दोषच असते. दोष असतात ते शास्त्र वाचणाऱ्याच्या बुद्धीत. त्याच्या बुद्धीतील दोष शास्त्रावर प्रतिबिंबित होतात.

**ये त्वेतदभ्यसूयंतो नानुतिष्ठन्ति मे मतम् ।**
**सर्वज्ञानविमूढांस्तान्विद्धि नष्टानचेतसः ॥३२॥**

पण जे मत्सरी लोक माझे मत अनुसरत नाहीत, ते सर्व प्रकारच्या ज्ञानाविषयी मूढ, अविवेकी व नष्ट आहेत असे समज.

भगवंतानी सर्व वेदांचे सार सांगितले. ते गूढ, युक्तियुक्त व कल्याण करणारे आहे हे मान्य करायला हवे. पण कितीही सुंदर मत असले तरी ते न पटणारे काही लोक असतातच. अशा लोकांना काय फळ मिळते याचे विवेचन मागील श्लोकात अन्वयपद्धतीने सांगितले. या श्लोकात तेच व्यतिरेकपद्धतीने सांगितले आहे. काही औषधे घेतल्यावर रोग जातो. काही औषधे योग्य पद्धतीने घेतली तर उत्कृष्ट गूण येतो. पण वापरण्यात चूक झाली तर उलटा परिणाम होतो. त्याचप्रमाणे कर्मयोगावर दोषैकदृष्टी न ठेवल्यास एकपट फळ मिळते,

श्रद्धा ठेवल्यास दुप्पट फळ व प्रत्यक्ष आचरण केल्यास ईश्वर प्रसन्न होऊन तिप्पट फळ मिळते. दोष न ठेवल्याने श्रद्धा जडते. श्रद्धेने प्रत्यक्ष क्रिया घडते व क्रियेने मोक्ष मिळतो. याउलट कर्मयोगावर श्रद्धा न ठेवणारे सर्वज्ञान—विमूढ होतात.

**एक कर्मयोग मानला नाही तरी इतर कांही मते त्यांना ग्राह्य असतात, मग त्यांना सर्वज्ञान-शून्य कसे म्हणता येईल?**

अशा लोकांना अर्थ व काम संपादण्याचे ज्ञान असते. पण शास्त्र-कारांच्या मते ते ज्ञान नव्हे. कारण त्या गोष्टी पशुपक्षीही जाणतात, मग मानवाचे वैशिष्ठ्य ते काय ? धर्म व मोक्ष मानवांनी मिळवायचे नाहीत तर काय पशूंनी मिळवायचे ? एखाद्या वेळी बैल निवडून येईल, पण तो काही श्रवणमननादि कार्य करू शकणार नाही. घरात अधिक हुषार असलेल्याला अधिक कामे करावी लागतात. गवंड्याचे हाताखाली पाट्या टाकण्याचे काम कोणीही करू शकतो. पण अंदाज-पत्रक तयार करायला विशेष डोके लागते. अंदाजपत्रक बाहेर पडण्या-पूर्वीच कर देणाऱ्यांची डोकी फिरतात, मग ते तयार करणाऱ्याच्या डोक्याची काय अवस्था होत असेल याची कल्पना करा. त्याला त्याच्या बुद्धिमत्तेचा मोबदला मिळतो. मानव हा असाच सर्व पशुपक्ष्याहून बुद्धीने श्रेष्ठ आहे. त्या बुद्धीचा उपयोग धर्म व मोक्ष मिळविण्यासाठी करायला नको का? त्याने धर्ममोक्षासाठी प्रयत्न केला तर त्याचे बरोबर इतरांचेही कल्याण होते. हे न संपादल्यास बाकीचे सर्व ज्ञान व्यर्थ ठरते. कारण सर्व विद्यात अध्यात्मविद्या श्रेष्ठ आहे. अध्यात्म हाच सर्व ज्ञानाचा पाया आहे.

कर्मयोग आचरल्याने सर्वोत्कृष्ट फळ मिळते, हे भगवंतानी एका शब्दात सांगितले. तसे वा त्याच योग्यतेचे दुसरे साधन कोणी सांगू शकणार नाही. म्हणून अशा निर्दोष साधनातही जे दोष काढतात ते

पापी ( विद्धि नष्टान् ) आहेत असे भगवंत म्हणतात. चांगल्याला वाईट म्हणणे म्हणजेच पाप. या पापाचे फळ म्हणजे नरकवास व पुनरपि जननं पुनरपि मरणं या चक्रातून सुटका न होणे.

कर्मयोगावर श्रद्धा न ठेवणारे द्रव्य संपादणे व पोट भरणे येवढेच जाणतात. त्यासाठी ते चोऱ्यामाऱ्या, मारामारी, खून, लाचलुचपत, भेसळ, काय वाटेल ते करावयास मागेपुढे पहात नाहीत. आपल्या सध्याच्या रामराज्यात खून करूनही पुराव्याच्या अभावी सुटता येते. पण खऱ्या रामराज्यात म्हणजेच परमेश्वराच्या राज्यात कोणतीच गोष्ट झाकून ठेवता येत नाही. सर्व काही स्वत: परमेश्वर पहात असतो. म्हणून त्याला वेगळ्या पुराव्याची गरज भासत नाही. 'अथ प्रच्छन्न-पापानां शास्ता वैवस्वतो यम:' असे म्हटलेले आहे. तुम्ही येनकेन प्रकारेण द्रव्य मिळविले तर तोच प्रयोग अन्य कोणी तरी तुमच्यावर करतो. पापकर्माने कोणाचेच कल्याण होत नाही. म्हणून कर्मयोगावर श्रद्धा ठेवली पाहिजे. म्हणजे धर्म व मोक्ष मिळतील आणि सर्व ज्ञान जाण्याचा दुर्धर प्रसंग येणार नाही. कर्मयोगाचे अनुष्ठान केले नाही तर काष्ठ-वृक्ष-पाषाण असा अचेतन जन्म मिळतो. परमेश्वर म्हणतो, सुंदर मानव जन्म देऊनही ज्याने त्याचा दुरुपयोग केला, त्याला चेतन करून काय उपयोग ?

**सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि ।**
**प्रकृतिं यान्ति भूतानि निग्रहः किं करिष्यति ॥३३॥**

ज्ञानी पुरुषसुद्धा आपल्या प्रकृतीस अनुसरून वागत असतो. भूते आपआपल्या प्रकृतीस अनुसरतात, तेथे निग्रहाचा काय उपयोग ?

भगवंताचा इतका सुंदर उपदेश ऐकूनही त्यावर श्रद्धा न ठेवण्याची व तो आचरणात न आणण्याची दुर्बुद्धी मानवांना होते. कारण प्रत्येकाचा स्वभाव ! तो गतजन्मीच्या कर्मानुसार बनलेला असतो व मानव आपल्या

स्वभावाच्या आहारी जातो. दुर्योधन म्हणतो, ' पांडव सद्गुणी असतील म्हणून मी त्यांच्याप्रमाणे वागावे असे थोडेच आहे. मी माझ्या स्वभावानुसार वागणार. मी त्यात बदल करू शकत नाही.'

पूर्वजन्मानुसार बनलेल्या स्वभावात जर मानव बदल करू शकत नसेल तर सर्व गीताशास्त्रच व्यर्थ ठरेल, अशी कोणी शंका घेणे साहजिक आहे. पण हे लक्षात ठेवा की, विशिष्ट स्वभाव प्रयत्नाने बदलतो. अर्जुन उपजत धनुर्वेद कुठे जाणत होता? सर्वजण झोपले की अर्जुन बाण सोडण्याचा सराव सुरू करीत असे. बाकीचे विद्यार्थी उठले की अर्जुन झोपायचा. खरा हुषार विद्यार्थी आपल्या अभ्यासाचे प्रदर्शन करीत नाही. इतका अभ्यास केला म्हणून तो मत्स्यभेद करू शकला. त्याने जयद्रथाचे मस्तक उडवून बरोबर त्याच्या पित्याच्या मांडीवर नेऊन टाकले. हे प्रयत्नाचे फळ होय.

पण त्याचबरोबर दैव नावाचीही एक चीज आहे. त्या दैवामुळे होणारे भोग भोगूनच संपवावे लागतात. पांडव इतके पराक्रमी असताही त्यांना वनवास व अज्ञातवास चुकविता आला नाही. साध्वी द्रौपदीची भरसभेत विटंबना झाली. द्यूत खेळण्यापूर्वीच धर्माला त्यापासून परावृत्त करता आले असते. पण जे दैवात असते ते एकदा होऊन गेलेले उत्तम असते. पांडव हे तर भगवंताचे पंचप्राणच होते. तरीही त्याने त्यांचे दुःख दूर केले नाही. मात्र दुःख सहन करण्याची त्यांना शक्ती दिली. दुःख निवारण्यासाठी भगवंताची प्रार्थना केली, तर भगवंत म्हणतो ' जे प्राप्त झाले आहे ते सहन कर. मी तुला तेवढी शक्ती देईन. कारण ' नाभुक्तं क्षीयते कर्म जन्मकोटीशतैरपि ' असा सिद्धांतच आहे.

भीष्म शरपंजरी पडले असता भगवंतानी त्याना धर्माला ज्ञानोपदेश करायला सांगितले. भीष्म म्हणाले, ' भगवंता, तूच सांग. तू सर्वज्ञ व सशक्त आहेस व तुझा आवाजही ठणठणीत आहे. ' भगवान म्हणाले ' नको

तुम्हीच सांगा, मी तुम्हाला शक्ती देतो ' वास्तविक ज्ञानोपदेश करायला मन प्रसन्न व शरीर धडधाकट हवे. सर्वत्र शांतता हवी. व समोरचे श्रोते ज्ञानग्रहणास योग्य असले तर कोठे हळूहळू ज्ञान बाहेर पडू लागते. पण शरपंजरी भीष्मानी युद्धाच्या धामधुमीत सर्व धर्मज्ञान सांगोपांग सांगितले. भीष्माना उपदेश करायला लावून त्यांना त्यांच्या दुःखाचा विसर पाडला.

**इंद्रियस्येंद्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ ।**
**तयोर्न वशमागच्छेत् तौ ह्यस्य परिपंथिनौ ॥३४॥**

प्रत्येक इंद्रियाची विषयाची आवड व नावड असते. त्या आवडी नावडींच्या ताब्यात आपण जाऊ नये. कारण त्या त्याच्या ( मुमुक्षूच्या ) आड येणाऱ्या आहेत.

एखादा खोडकर मुलगा इतर मुलांना मारतो, पाडतो, त्रास देतो. पण त्याला एकटेच बसविले तर ? त्याला स्वस्थ बसावे लागते. तसेच एखाद्या तोंडाळ बाईला कुणाशी तरी भांडण काढून चार शिव्या दिल्याशिवाय चैन पडत नाही. पण तिला कोणी भेटलेच नाही तर ती स्वस्थ बसतेच की नाही. तसेच स्वभावाचे आहे. राग-द्वेष असले की ते त्रासदायक होतात. विंचवाची नांगी ठेचल्यावर किंवा सापाचे दात उपटल्यावर ते प्राणी जसे निर्बळ होतात, तसेच रागद्वेषाचे पाठबळ नसेल तर स्वभाव काही करू शकत नाही. राग म्हणजे अभिलाषा— आवड व द्वेष म्हणजे नावड. रागद्वेषविरहित स्वभाव बनला की शास्त्र व प्रयत्न दोन्हींचा जय होतो.

जगातले कांही पदार्थ आपणाला आवडतात, तर काही अजीबात आवडत नाहीत. आणि प्रत्येकाची आवडनिवडही वेगवेगळी असते. कारण ही आवडनिवड पूर्व जन्मापासून आलेली असते. उंदीर काही धान्य पिकवीत नाही किंवा विकत आणण्याच्याही भानगडीत पडत नाही.

दुसऱ्याने आणलेले चोरून खायचे हा त्याचा स्वभाव. अशा उंदराला पुढील जन्मी मानवजन्म लाभला तरी त्याचा चोरून खायचा स्वभाव जाणार नाही. दिसेल ते खिशात घालणे ही त्याची सवय जात नाही. पण विष दिले तर हात पुढे करणार नाही. कारण विषाबद्दल त्याच्या मनात आवड नसते.

ज्याला स्वभावावर मात करावयाची आहे, त्याने प्रथम रागद्वेषांचे उच्चाटन केले पाहिजे. रागद्वेष हे मोक्षमार्गातील मोठे अडथळे आहेत. शिवाय जगात एखाद्या पदार्थाने कायमचे सुख मिळते असे छातीठोकपणे कोणीही सांगू शकणार नाही. बायको, मुलगा, जमीन, घर या गोष्टी सुख देणाऱ्या आहेत यात शंका नाही. पण या गोष्टी सतत सुख देत नाहीत. कधी कधी त्यांची कटकटच अधिक होते. म्हणून विशिष्टाबद्दल राग म्हणजे प्रीती विशेष धरण्यात काही अर्थ नाही. शास्त्रकार म्हणतात, तुम्ही विषय खुशाल घ्या, पण त्याबद्दल रागद्वेष धरू नका.

एकदा इंद्राचे हातून ब्रह्महत्या घडली. त्यामुळे त्याला पदभ्रष्ट व्हावे लागले. देवांना राजा नाहीसा झाला. राजासाठी त्यांनी शोध सुरू केला. तेव्हा ' नहुष ' हा त्यांच्या पसंतीस पडला. अडल्या देवांनी नहुषाचे पाय धरले. नहुष म्हणाला, ' मी मानव. मी देवावर हुकमत कशी गाजवू ? '

देव म्हणाले, ' तूं काळजी करू नको, तू आमचा राज्यकारभार पहा. आम्ही तुला सर्व प्रकारे साहाय्य करू ' देवांच्या विनंतीला मान देऊन नहुष देवलोकांचा राजा झाला. आणि त्याने उत्कृष्ट प्रकारे राज्य चालविले. एकदा त्याच्या दृष्टीस इंद्राणी पडली. ते स्त्रीरत्न पाहून तो मोहित झाला. एका परस्त्रीचा अभिलाष बाळगणे योग्य नाही. हा विवेक राहिला नाही. तो इंद्राणी प्राप्त व्हावी म्हणून धडपडू लागला.

इंद्राणी बिचारी घाबरली. तिने बृहस्पतींच्या सल्ल्याप्रमाणे नहुषाची विनंती मान्य केली, पण एक अट घातली. ती म्हणजे राजाने महर्षींच्या दिव्य यानात बसून आपल्याकडे यावे. इंद्राणी मिळणार म्हणून खूष होऊन त्याने ते मान्य केले. आपली पालखी त्याने सप्तर्षींना वहायला लावली. त्यांना पालखी वहायची सवय कशी असणार. ते हळूहळू चालले होते. पण राजाला घाई झाली होती. तो त्यांना सारखा ' सर्प सर्प ' (भरभर चला) असा हुकूम करू लागला. शेवटी अगस्ती ऋषी रागावले आणि त्याला शाप देऊन सर्प करून टाकले. इंद्राणी राहिली बाजूला, देवांचे राज्य गेले आणि पृथ्वीवरचेही राजपद जाऊन एका आडबाजूच्या जंगलात सापाचे जिणे जगत रहाणे त्याच्या नशिबी आले.

नहुषाचे दैव बलवत्तर होते, तेव्हा देव त्याला शरण आले. व दैव पालटल्यावर त्याला दुर्बुद्धी होऊन त्याची अधोगती झाली. बेताचा पाऊस असेल तर छत्री बचाव करते, पण तुफान वाऱ्यात ती निकामी ठरते. नेहमी नदीपार करणारे होडगे महापूर आला की किनाऱ्याला बांधून ठेवणे शहाणपणाचे ठरते. पारब्ध प्रबल असता प्रयत्न फोल ठरले तरी ते मंद झाल्यावर विवेक आणि प्रयत्नाची सरशी होते. सतत शास्त्र-मर्यादा पाळून जो वागतो, त्याचा विवेक सतत जागृत असतो व त्यामुळे प्रारब्धाचे काही चालत नाही. आपण कोणतेच नियम वा मर्यादा पाळत नाही, म्हणून स्वभाव व दैव आपणास त्रास देतात. निष्ठापूर्वक व सातत्याने शास्त्रांचे पालन केले म्हणजे स्वभाव किंवा दैव निर्बळ होऊन प्रयत्न यशस्वी होतील.

**श्रेयान् स्वधर्मो विगुणः परधर्मात् स्वनुष्ठितात् ।**
**स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥३५॥**

उत्तम प्रकारे अनुष्ठान झालेल्या परधर्मापेक्षा आपला धर्म उणा असला म्हणजे आचरण्यास कठीण असला तरी तोच चांगला.

स्वधर्माचरण करीत असता मरण आले तरी ते चांगले, पण परधर्म हा भयप्रद होय.

कर्मयोग उत्तम आहे हे ठीक, पण इतर धर्मांतील काही चांगली तत्त्वे एकत्र करून एखादा नवा धर्म तयार करून त्याप्रमाणे आचरण केले तर काय हरकत आहे ?

असे करणे म्हणजे स्वतःची पत्नी कुरूप म्हणून दुसऱ्याची सुंदर स्त्री घरी आणण्यासारखे आहे व परस्त्री-हरणाचे काय परिणाम होतात हे रावणाच्या उदाहरणावरून स्पष्ट होते. आई कुरूप म्हणून त्याऐवजी रंभा आणून उभी केली तरी मूल तिच्याकडे न जाता आईलाच बिलगेल. स्वधर्म सोडणे म्हणजे राजप्रासाद पाहून स्वतःची चंद्रमौळी का असेना पण हक्काची झोपडी मोडून टाकण्यापैकी आहे. पाण्यापेक्षा तुपात कितीतरी अधिक गुण आहेत. पण पाण्यातील मासा तुपात सोडला तर तो जिवंत राहील काय ? तसेच आपला धर्म विगुण म्हणजे कमी प्रतीचा असेल, आचरण्यास कठीण असेल, साधनांचे दुर्भिक्ष असेल किंवा इंद्रियांच्या दुर्बलतेमुळे त्रास होत असेल, तरी स्वधर्मच आचरला पाहिजे. त्यात मरण आले तरी चालेल. अशा मरणाने येथे कीर्ती व परत्र सुखाचा लाभ होतो. पुढचा जन्म ' शुचीनां श्रीमतां ' अशा घरात होतो.

बँकेमध्ये तुम्ही मुलाच्या नांवावर पैसे ठेवले. मुलगा परगावी गेला व तुम्हाला पैशाची निकड भासली म्हणून जर तुम्हीच मुलाची सही करून पैसे काढण्याचा प्रयत्न केला तर तो गुन्हा ठरतो. दुसऱ्याचा धर्म स्वीकारला तर अशीच शिक्षा होते. स्वधर्म सोडला हा दोषही लागतो, परधर्माचे आचरण करणे असे भयावह आहे.

पूर्वीचे लोक जे अन्न रोज खात होते, तसे आज आपणास सणासुदीसही मिळत नाही. पण म्हणून कोणी जेवण सोडले आहे का ? प्रत्येक वराला रंभा अगर उर्वशीसारखी वधू हवी असते, पण तशी

काही मिळत नाही. शेवटी मिळेल त्या वधूला रंभा-उर्वशी समजून तो संसार करतोच की नाही? तसेच स्वधर्मात उणीवा असल्या तरी त्यालाच श्रेष्ठ समजून आचरण केले पाहिजे. मंत्रीपद स्वीकारताना मी राष्ट्राशी एकनिष्ठ राहीन, स्वार्थाला थारा देणार नाही अशी शपथ घ्यावयाची असते. हा शपथविधी करण्याचे एखाद्याने नाकारले तर तो मंत्री तर राहोच, पण त्याला सामान्य सभासद म्हणूनही तेथे बसता येणार नाही. शपथविधी हा एक धर्म आहे. तो सोडल्याने जसा नाश होतो, त्याप्रमाणे स्वधर्म सोडला तर उत्कर्ष होऊ शकत नाही.

मृत्युसमयी अंतःकरणात जो गुण असेल त्यानुसार पुढचा जन्म व त्या जन्मास अनुसरून स्वधर्म सांगितलेला असतो. प्रत्येकाचा धर्म अशा प्रकारे त्याच्या गर्भावस्थेतच निश्चित झालेला असतो. म्हणून गर्भावस्थेपासूनच सुंदर संस्कार करण्याची आवश्यकता शास्त्रात सांगितलेली आहे.

> उर्ध्वं गच्छन्ति सत्त्वस्थाः मध्ये तिष्ठंति राजसाः ।
> जघन्यगुणवृत्तिस्था अधो गच्छन्ति तामसाः ॥ ’

असा नियम असल्याने व ईश्वर सर्वज्ञ असल्याने गुण वाढीस लागतील असाच तो धर्म सांगतो.

धर्मराजाने जरासे नेत्र आरक्त केले तर समोरची प्रजा दग्ध होत असे. म्हणून वनवासात जाताना तो आपले तोंड झाकून घेऊन गेला. हा गुण अर्जुनाजवळ नाही. अर्जुनाचे धनुर्वेद–कौशल्य धर्मराजाजवळ नाही. भीमाचे बळ अर्जुनाला नाही किंवा सहदेवाचा सेवाधर्म भीमाला जमणार नाही. अर्जुनाला जपमाळ ओढत बैस म्हटले तर तो ते मान्य करणार नाही किंवा टोचलेलेही ज्याला सहन होत नाही असा प्राणी युद्धासारख्या कार्याकडे वळणारही नाही. प्रत्येकाचे गुण वाढीस लागतील अशीच परमेश्वरी व्यवस्था आहे. त्यात ढवळाढवळ

करणे इष्ट नाही. जरासंधाचे मरण भीमाच्या हातून होते. म्हणून श्रीकृष्णानी त्याच्या पुढे तेवीस वेळा माघार घेतली. प्रत्येकाचे मरण निश्चित असते. त्यात स्वत: परमेश्वरही ढवळाढवळ करीत नाही. तसेच स्वधर्मात फेरबदल करायचा नसतो.

अर्जुन उवाच–

**अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पूरुषः ।**
**अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः ॥ ३६ ॥**

अर्जुन म्हणाला, ' हे श्रीकृष्णा, तर मग स्वत:ची इच्छा नसतानाही जणू काय बळाने नियुक्त केल्यासारखा हा पुरुष कोणाच्या प्रेरणेने पापाचरण करतो ?

भगवंतानी इतका दूरदर्शीपणाने व कळकळीने उपदेश केला असताही मानव त्याविरुद्ध कां बरे वागतो, असा अर्जुनाचा सवाल आहे. पाप म्हणजे वेदांतमतानुसार काम्य कर्म व धर्मशास्त्रानुसार निषिद्ध कर्म. अशी पापकर्मे मानव कां करतो ? येथे अर्जुनाने श्रीकृष्णाला वार्ष्णेय असे संबोधिले आहे. श्रीकृष्ण वृष्णी कुलांतील व कुंतीही वृष्णी कुलातील म्हणून तिचा पुत्र अर्जुनही वार्ष्णेय. ' आपण दोघेही एकाच कुलांतील म्हणून आपण माझ्या प्रश्नाची उपेक्षा करणार नाही. ' असे अर्जुनाला सुचवावयाचे आहे.

भगवान म्हणाले,

**" काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः ।**
**महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम् ॥ ३७ ॥**

श्रीकृष्ण भगवान म्हणाले, ' ( बलात्कार करणारा ) हा काम आहे. हा क्रोध आहे. रजोगुणापासून उत्पन्न झालेला हा अधाशी व महापापी आहे. या लोकी हा आपला वैरी आहे असे समज. '

मागे भगवंतानी रागद्वेष यापासून सावध राहण्यास सांगितले. येथे काम व क्रोध यांचा उल्लेख आहे. काम प्रतिरुद्ध झाला की त्याचेच रूपांतर क्रोधात होते. म्हणून खरा शत्रू एक कामच. हा काम रजोगुणापासून निर्माण होतो. तो भयंकर खादाड व अत्यंत पापी आहे. हा मानवाचा वैरी आहे म्हणून त्याला ठार केले पाहिजे. इतर शत्रूंशी प्रथम साम मग दाम, भेद अशा पायरीने सामना करावा असा नियम आहे. पण काम हा अत्यंत उद्दाम असल्याने त्याचेपुढे सामोपचार अगर गोडीगुलाबी व्यर्थ ठरते. त्याला कितीही दाम द्या.

' पृथिव्यां यानि रत्नानि हिरण्यं पशवो तथा ।
नालं एकस्य पर्याप्तम्— ' ॥

असे सर्व दिले तरी काम तृप्त होत नाही. उलट ' हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते ' असा तो वृद्धिंगत होतो. तिसरा मार्ग भेद पण भेदही रजोगुणापासूनच झालेला असल्याने भेदामुळे कामाचीच वाढ होते. हे तिन्ही उपाय निरुपयोगी ठरतात म्हणून वधाचाच उपाय योजावा लागतो.

कामना असते म्हणून मनुष्य प्रयत्न करतो. प्रयत्नामुळे इष्ट पदार्थ मिळतात. म्हणून काम हा खरे पाहता मानवाचा मित्रच आहे. त्याला शत्रू मानणे योग्य नाही असे कांही लोक म्हणतात.

अन्न व आसरा या दोन गोष्टी पशुपक्ष्यांनाही आवश्यक आहेत. मानवाला आणखी एक गरज आहे ती म्हणजे वस्त्राची. या तीन गरजांसाठी धडपडणे येवढेच मानवाचे कर्तव्य आहे का? तसे मानले तर मानव व पशुपक्ष्यांत फरक राहणार नाही. मनुष्य ही ब्रह्मदेवाची एक अलौकिक निर्मिती आहे. राक्षस, दानव आणि देव यांच्यापेक्षाही मानव श्रेष्ठ आहे. कारण त्या तिघांना न मिळविता

येणारी एक गोष्ट फक्त मानवच मिळवू शकतो. ती म्हणजे परमार्थ किंवा मुक्ती. म्हणून देवसुद्धा मानवजन्म मिळावा म्हणून परमेश्वराची प्रार्थना करतात.

मानव कधी स्वस्थ बसत नाही. कसलेना कसले आंदोलन चालू ठेवणे हा त्याचा स्वभावच आहे. वेळ पडल्यास तो हिंस्र पशूंपेक्षाही हिंसक बनतो. पण विवेकाने वागून तो हिंस्र पशूंनाही आपल्या काबूत ठेवतो. बैलापुढे वैरण टाकली तर प्रथम वाळलेली खावी, हिरवी दुसऱ्या दिवसासाठी राखून ठेवावी असा विचार तो करीत नाही. पण मानवाला फळांची करंडी दिली तर प्रथम तो तयार झालेली फळे खाईल, अपक्व फळे दुसऱ्या दिवसासाठी राखून ठेवील. विवेकाने वागतो तो मनुष्य. काम हा शत्रू प्रथम विवेकावर हल्ला करून तोच नाहीसा करतो. विवेक गेला की त्याची पशूतच गणना करावी लागते. म्हणून या भयंकर कामशत्रूचा नायनाट केला पाहिजे.

**धूमेनाव्रियते वन्हिर्यथादर्शो मलेन च ।**
**यथोल्बेनावृतो गर्भस्तथा तेनेदमावृतम् ॥३८॥**

ज्याप्रमाणे धुराने अग्नी, मळाने आरसा व वेष्टनाने गर्भ आच्छादिलेला असतो, त्याप्रमाणे कामाने ज्ञान आच्छादिले आहे.

सूर्य उगवल्याबरोबरचे कोवळे ऊन, नऊ वाजताचे जरा उबदार ऊन व बारा वाजताचे रखरखीत ऊन अशा उन्हाच्या चढत्या क्रमाने तीन अवस्था होतात. कामाच्याही तीन अवस्था आहेत. अग्नी नुकताच पेटविला असेल तर हात लागल्यावर पोळतो. पण त्याच्या ठिणग्या किंवा ज्वाला दिसत नाहीत. तो धुराने आच्छादलेला असतो. त्याचप्रमाणे काम प्रथम सूक्ष्म अवस्थेत असतो. अंतःकरणात अनंत प्रकारच्या वासना असतात. प्रत्येकाला आपण कोणीतरी मोठे व्हावेसे वाटत असते. या सूक्ष्म कामामुळे ज्ञानाला प्रतिबंध होतो. आरशावर धुळीची पुटे चढली

की प्रतिबिंब स्पष्ट दिसत नाही, त्याप्रमाणे काम स्थूल झाला की विवेक राहात नाही. गर्भावर एक आवरण असते त्याला जरायू किंवा उल्व म्हणतात. त्या उल्बाच्या खोलीत गर्भ वाढत असतो, पण बाहेरच्या आवरणामुळे तो दिसत नाही. काम अतिस्थूल झाला की त्या पुरुषाला स्वतःचीही विस्मृती होते.

**आवृतं ज्ञानमेतेन ज्ञानिनो नित्यवैरिणा ।**
**कामरूपेण कौन्तेय दुष्पूरेणानलेन च ॥ ३९ ॥**

हे अर्जुना, ज्ञानी पुरुषांचा नित्य वैरी, ज्याची पूर्तता होणे कठीण आहे असा हा जो कामरूपी अग्नी आहे त्याने ज्ञान आच्छादिले आहे.

स्वतःची विस्मृती झाली की मनुष्य बहकतो. स्वधर्म सोडून परधर्म स्वीकारतो. बाल्य, तारुण्य व वृद्धावस्था या शरीराच्या तीन अवस्था आहेत. बालाप्रमाणे तरुण वागू शकत नाही. तरूण १२।१२ तास न दमता काम करतो. म्हातारा तासभर काम केले की थकून जातो. वृद्ध जशी एकाग्रतेने देवपूजा करतो, तशी तरूण करू शकत नाही. त्याच्या मागे अनेक व्याप असल्याने त्याचे मन एकाग्र होत नाही.

**इंद्रियाणि मनो बुद्धिरस्याधिष्ठानमुच्यते ।**
**एतैर्विमोहयत्येव ज्ञानमावृत्य देहिनम् ॥ ४० ॥**

इंद्रिये मन व बुद्धी ही याची आश्रयस्थाने आहेत असे म्हणतात. हा इंद्रियादिकांच्या योगाने ज्ञान आच्छादित करून प्राण्याला मोह पाडतो.

शरीराप्रमाणे कामाच्याही तीन अवस्था असतात. इच्छित पदार्थ मिळाला की अज्ञानी पुरुषास सुख होते. म्हणून तो काम हा आपला मित्र आहे असे समजतो. पण इष्ट वस्तुलाभाने ज्ञानमार्गात अडथळे येतात म्हणून ज्ञानी त्यास शत्रूच मानतो. तपस्वी विश्वामित्रापुढे मेनका येऊन उभी राहताच आपण तपस्वी आहोत हे तो विसरून गेला व

सरळ तिच्याशी संसार करू लागला. काही काळाने त्याला आपली चूक लक्षात आली व तो पश्चात्ताप करू लागला. 'बायकोच हवी होती तर मी राज्यवैभव सोडून येथे कशाला आलो?' तपोभंग करणाऱ्या या स्त्रीला शाप द्यावा असे त्याला वाटले. पण लगेच त्याला वाटले, 'त्या बिचारीची काय चूक, मीच कामाच्या आहारी जाऊन केलेले सर्व तप वाया घालविले.'

**तस्मात्त्वमिंद्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ ।**
**पाप्मानं प्रजहि ह्येनं ज्ञानविज्ञाननाशनम् ॥४१॥**

हे भरत श्रेष्ठा म्हणून तू अगोदर इंद्रियांचे नियमन करून ज्ञान व विज्ञान यांचा नाश करणाऱ्या या पापरूपी कामाचा त्याग कर.

रावणसुद्धा काही वाईट नव्हता. त्याने तप केले होते व तो शंकराचा अनन्य भक्तही होता. तो अतिशय पराक्रमी होता. 'आज्ञाचक्र-शिखामणि' असे त्याचे वर्णन केलेले आहे. पण कामाच्या आहारी गेल्यामुळे त्याचे सर्व गुण झाकले गेले. शूर्पणखेने सीतेचे वर्णन केल्यामुळे त्याच्या मनात सूक्ष्म काम निर्माण झाला. भिक्षामिषाने सीतेला प्रत्यक्ष पाहिल्यावर काम प्रदीप्त झाला. सीतेला पळवून लंकेमध्ये ठेविले ही कामाची तिसरी अवस्था. मिळालेल्या वराने उन्मत्त होऊन तो लोकांना पीडा देऊ लागला. आपणास जसे श्रेष्ठत्व हवे तसे इतरांना देखील हवे असते ही कल्पनाच उन्मत्त कामी जनांना सुचत नाही. कामाच्या आहारी जाऊन तो वाटेल ते करतो. सुकृत असेपर्यन्त तो विजयी होतो. पण एकदा शंभर अपराध भरले की सुदर्शन त्याच्यामागे लागलेच म्हणून समजावे. म्हणून काम पूर्णावस्थेत कधीही सुखकर होत नाही. मिळालेला इष्ट पदार्थ क्षणकाळ सुख देऊन नष्ट होतो किंवा विकृत होतो. म्हणून अशा कामाला शत्रू मानून त्याला नष्टच केले पाहिजे.

ध्रुवाने अढळपद मागितले ते भगवंताने दिले. रावणाने सीते-सारखी सुंदर पत्नी मिळावी म्हणून देवाजवळ हट्ट धरला असता तर हट्ट पुरवणे देवाला काही अशक्य नव्हते. पण काम प्रबळ झाला की काय मागावे हा विवेकच रहात नाही. काम अमूर्त असल्याने त्याला शस्त्रास्त्राने मारता येत नाही. इंद्रिये मन व बुद्धी यांच्या साहाय्याने काम बलवान होत असतो. म्हणून त्यांना काबूत ठेवले की कामही क्षीण होतो.

**इंद्रियाणि पराण्याहुरिंद्रियेभ्यः परं मनः ।**
**मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः ॥ ४२ ॥**

इंद्रिये श्रेष्ठ आहेत असे म्हणतात. इंद्रियांपेक्षा मन श्रेष्ठ आहे. मनापेक्षा बुद्धी श्रेष्ठ व बुद्धीपेक्षा तो आत्मा श्रेष्ठ आहे.

कामाला काबूत ठेवण्यासाठी इंद्रियांचे नियमन करा असे प्रथम सांगितले. पण त्यामुळे कामाचे निर्मूलन होत नाही. पूर्वी दुसऱ्या अध्यायात 'परं दृष्ट्वा निवर्तते' (श्लोक ५९) या श्लोकात सांगितलेला 'पर' पदार्थ सांगणेकरता प्रस्तुत श्लोक आहे. चक्षुरादि इंद्रिये ही बाह्य देहादिक अर्थापेक्षा श्रेष्ठ आहेत. कारण ती देहादिकांचे प्रकाशन करतात. इंद्रियांचे प्रवर्तक मन आहे म्हणून इंद्रियांपेक्षा मन उत्कृष्ट. मनाचा संकल्प बुद्धीमुळे होतो म्हणून मनापेक्षा बुद्धी श्रेष्ठ आणि बुद्धीचाही साक्षी असलेला आत्मा हा सर्वश्रेष्ठ होय. जीवात्म्याला काम मोह निर्माण करतो असे पूर्वी सांगितले आहे. येथे बुद्धी शब्दाने महत्तत्व व अव्यक्त या दोन्हींचा संग्रह केलेला आहे. म्हणून अव्यक्ता-पेक्षाही आत्मा 'पर' म्हणजे सर्वश्रेष्ठ आहे.

**एवं बुद्धेः परं बुद्ध्वा संस्तभ्यात्मानमात्मना ।**
**जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम् ॥४३॥**

अशाप्रकारे बुद्धीपेक्षा श्रेष्ठ असलेल्या आत्म्याला जाणून स्वतः मन तेथे स्थिर करून दुरासद अशा कामरूपी शत्रूचा निर्बीज-समूळ नाश करावा.

आत्म्याचे ज्ञान झाले की काम जात असेल तर इंद्रिये, मन, बुद्धी यांचे नियमन कशाला करायचे? एकदम ज्ञान संपादन केले की कार्य होईल असे कोणी म्हणेल. पण काम गेल्याशिवाय ज्ञान होत नाही. म्हणून इंद्रियांना आवर घालावा लागतो. गिरिकंदरात जाऊन तप करावे लागते. अशा ठिकाणी इंद्रियांना विषयच सापडत नसल्याने काम निर्माण होत नाही. इंद्रिये, मन व बुद्धी यांचे नियमन केले की कामना कमी कमी होत जातात व अशाप्रकारे काम नष्ट होऊन एकदा ज्ञान झाले की काम पुनः उद्भवत नाही.

'रसवर्जं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते' या दुसऱ्या अध्यायातील श्लोकात एकदा परब्रह्माचे ज्ञान झाल्यावर विषयांची गोडीदेखील नाहीशी होते हे सांगितले आहे. येथे आत्मा हा एकच सत्य पदार्थ असून बाकी सर्व मिथ्या आहे हे प्रतिपादन केले आहे. सत्य पदार्थ मिथ्या गोष्टींची अभिलाषा कशाला बाळगेल? म्हणून आत्मज्ञान झाले की काम नष्ट होतो. पण त्याकरिता विवेकी मनाने अविवेकी मनाचे नियमन करावे लागते. मनात नेहमी अनात्म पदार्थच गर्दी करीत असतात. मनाला क्षणभर आत्मचिंतन करण्याची विनंती केली की त्याला शत्रूच्या समुदायात सांपडल्यासारखे दुःख होते. लहान मुलाला नव्यानेच शाळेत घातले की त्याला कोणीतरी पोहोचवायला जावे लागते प्रथम मूल शाळेत बसायला तयार नसते. ते पोहोचवावयास गेलेल्या व्यक्तीबरोबरच घरी परत येते. तसेच प्रथम मनाला आत्मचिंतनाच्या शाळेत दाखल केले की ते लगेच व्यवहारी घरात परत येते.

येषु येषु पदार्थेषु मनो मज्जति बालवत् ।
तेभ्यः तेभ्यः समुद्धृत्य त्वद् हि तत्त्वे नियोजयेत् ॥

असे योगवासिष्ठकार म्हणतात. असे करण्याचे कारण की आत्मा शुद्ध असल्याने त्याचे चिंतनाने मनही सूक्ष्म बनते व मनातील दोष नाहीसे होतात. उलट विषय स्थूल असल्याने त्याच्या चिंतनाने मनही

स्थूल होऊन त्यात अनेक दोष निर्माण होतात. मनाला आत्मचिंतनाकडे वळविण्यासाठी मनावर सारखे संस्कार करावे लागतात. लोखंड अत्यंत कठीण असते. त्यावर अनेक संस्कार केल्यावर त्याचे पोलाद बनते. पोलादावर आणखी काही संस्कार केल्यावर त्याची लवचिक स्प्रिंग बनू शकते. उजव्या हाताप्रमाणे डावा हात काम करीत नाही. कारण उजव्या हातावर काम करण्याचे सारखे संस्कार होत असतात. डाव्या हातावर जर संस्कार करीत राहिले तर तोही उजव्याप्रमाणे काम करतो. अर्जुन सव्यसाची होता. त्याने दोन्ही हातांवर सारखेच संस्कार करून त्यांना तसे वळण लावले होते.

अध्यात्मावर प्रवचन असेल तर नवखा श्रोता एकदम पुढे येऊन बसत नाही. प्रथम लांब उभे राहून ऐकतो. गोडी वाटू लागली की श्रोत्यात सामील होतो. प्रथम तो अशा ठिकाणी सातत्याने जात नाही. पण एकदा गोडी लागली की एक दिवसही चुकवत नाही. मुळात अध्यात्माची गोडी लागणे कठीण. पण एकदा गोडी लागली की मग मात्र त्याला दुसरे कांहीच गोड लागत नाही. हा एक मनाचा चांगला स्वभाव आहे. एकदा एका विषयाची गोडी लागली की, मन तिथेच रमते. म्हणून त्याला कौतुकाने आत्मानुभवसुखच वारंवार दाखवीत जावे, असे ज्ञानेश्वरांनी सांगून ठेवले आहे.

> ‘ कां जे यया मनाचे एक निके ।
> जे हे देखिले गोडीचिया ठाया सोके ।
> म्हणोनि अनुभवसुखचि कवतिके ।
> दावीत जाईजे ।। ६/४२०

इति श्रीमद्‌भगवद्‌गीतासूपनिषद्‌सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुन--
संवादे कर्मयोगो नाम तृतीयोऽध्यायः ।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।

हरये नमः हरये नमः हरये नमः

◊ ◊ ◊

# अध्याय ४ था.

श्रीभगवान् उवाच :—

> इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम् ।
> विवस्वान् मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत् ॥ १ ॥

श्रीभगवान म्हणाले, ' मी हा अविनाशी योग सूर्याला सांगितला. सूर्याने मनूला सांगितला व मनूने इक्ष्वाकूला सांगितला. '

आतापर्यंत भगवंतानी ज्ञानयोग सांगितला व ज्ञान व कर्म हे वेगवेगळे नव्हेत हेही प्रतिपादन केले. सांख्य व योग हे दोन्ही एकच आहेत हे जो जाणतो तो ज्ञानी होय. या दोन्हीमध्ये साध्यसाधन भाव आहे. कर्म हा उपाय असून ज्ञान हे उपेय आहे.

भगवंताचा आतापर्यंतचा उपदेश ऐकून अर्जुनाच्या मनात अशी एक शंका आली की, हे सिध्दांत कोणी प्रत्यक्ष पडताळून पाहिले आहेत की नाही. हा योग पूर्वी कोणी आचरणात आणलेला आहे का? एखादे नवे औषध निघाले की डॉक्टर त्याचे प्रयोग रोग्यावर करतात. डॉक्टरांचे प्रयोग होतात पण रोग्यांचे प्राण जातात. तसे तर होणार नाही? अशा प्रकारची अर्जुनाच्या मनातील शंका दूर करण्यासाठी भगवंत सांगतात की हा योग काही मी प्रथमच सांगत नाही. हा योग प्रायोगिक नसून सिध्द आहे. प्रथम तो सूर्याला सांगितला. कारण सूर्याला जगाचे राज्य करावयाचे असते व त्यासाठी त्याच्याजवळ भरपूर तेज हवे. पुढे सूर्याने मनूला व मनूने ईक्ष्वाकूला हा योग सांगितला. हा योग राजेलोकांकडे गेला. त्यामुळे ते राजे राजर्षी या पदवीला पोहोचले. हल्ली कुणालाही महर्षी अशी पदवी देण्यात येते, राजर्षी ही इतकी स्वस्त पदवी नव्हती. आत्मज्ञान झालेले व उत्तम राज्यकारभार हाकणारे या पदवीचे धनी होत.

ह्या योग क्षत्रियांनाच सांगितला आहे, हे एक विशेष आहे. कारण ‘ क्षत्रियाणां बलाधानाय ’ असे म्हटले आहे. क्षत्रियांना स्वतःचे रक्षण करायचे असते येवढेच नव्हे, तर ब्राह्मण वैश्य शूद्र या त्रैवर्णिकांचेही संरक्षण करावयाचे असते. अनार्यांना शासन करण्याचे सामर्थ्य यावे म्हणून त्यांना प्रथम ह्या योग सांगितला.

**एवं परंपराप्राप्तमिमं राजर्षयो विदुः ।**
**स कालेनेह महता योगो नष्टः परंतप ॥ २ ॥**

याप्रमाणे परंपरेने प्राप्त झालेल्या ह्या योगाला राजर्षि जाणते झाले. हे अर्जुना, पुष्कळ काळ लोटल्यामुळे तो योग या लोकी नष्ट झाला आहे.

कालप्रवाहात ह्या योग लुप्त झाला. कारण योगाचे फळ मिळायला दीर्घ काळ लागतो. लोकांना तात्काळ फळ हवे असते. त्यामुळे लोक या योगाचा अंगीकार करीत नाहीत. लोक हे विसरतात की, तात्काळ मिळालेले फळही तात्काळ नष्ट होते.

**स एवायं मया तेऽद्य योगः प्रोक्तः पुरातनः ।**
**भक्तोऽसि मे सखा चेति रहस्यं ह्येतदुत्तमम् ॥ ३ ॥**

तू माझा भक्त व सखा आहेस, म्हणून तोच पुरातन योग आज तुला सांगितला आहे. कारण हे सर्व रहस्यांमधील उत्तम रहस्य आहे.

ह्या योग लुप्त झाल्यामुळेच अर्जुनाला ऐन युद्धाच्यावेळी मोह निर्माण झाला व तो मोह घालविण्यासाठी भगवंतांना पुनः सांगावा लागला. येथे भगवंत अर्जुनाला भक्त आणि सखा ही दोन्ही विशेषणे लावतात. जगात काही भक्त असतात तर काही ईश्वराचे सखे असतात. अर्जुनाची श्रीकृष्णावर भक्तीही होती व त्याच्याशी अर्जुनाचे मैत्रीचेही संबंध होते. रहस्यातील उत्तम रहस्य असे या योगास म्हणण्याचे कारण म्हणजे श्रुती, स्मृती, इतिहास व पुराण या चारींची शिकवण हीच आहे.

अर्जुन उवाच —

**अपरं भवतो जन्म परं जन्म विवस्वतः ।**
**कथमेतद् विजानीयां त्वमादौ प्रोक्तवानिति ॥ ४ ॥**

अर्जुन म्हणाला—'तुम्हीच हा योग पूर्वी सूर्याला सांगितला असे म्हणता यावर विश्वास कसा ठेवावा? तुमचा जन्म तर अलिकडचा आणि सूर्याचा जन्म तुमच्याहून फार पूर्वीचा, असे असता सुरवातीला त्याला योग सांगितला हे मी कसे जाणावे?'

श्री भगवान् उवाच—

**बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन ।**
**तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परंतप ॥५॥**

भगवान म्हणाले, 'अर्जुना माझे व तुझे यापूर्वी पुष्कळ जन्म होऊन गेले. त्या सर्वांना मी जाणतो हे शत्रुतापना, तू मात्र ते जाणत नाहीस.'

ईश्वर अनादि आहे. अर्जुनाबरोबर बोलत असलेल्या देहाने सूर्याला उपदेश केला असे नव्हे, त्यावेळी वेगळा देह असेल, असे कित्येक देह त्याने धारण केले. अर्जुनाचासुध्दा काही पहिलाच जन्म नव्हे. गत-जन्मीचे ज्ञान सर्वांना नसते अपवादात्मक एखाद्याला ते असते, त्यांना जातिस्मर म्हणतात, श्रीकृष्ण असे जातिस्मर होते, शिवाय ते परब्रह्म-स्वरूपी असल्याने दिव्यप्रभावी सूर्याला ते उपदेश करू शकले. अर्जुन परंतप म्हणजे शत्रूंना ताप देणारा आहे. त्याचे नाव काढताच शत्रू दचकत, कारण त्याच्या ठिकाणी शौर्याचा अतिशय होता. तसाच श्रीकृष्णाच्या ठिकाणी ज्ञानाचा अतिशय असल्याने ते सूर्यालाही उपदेश करू शकले.

**अजोऽपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोऽपि सन् ।**
**प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया ॥६॥**

मी जन्मरहित, अव्ययस्वरूप आणि भूतांचा अधिपती असूनही स्वकीय मायेला वश करून आपल्या मायेच्या योगाने जन्म घेतो.

निराकार ब्रह्माला शरीर कोठून आले? जीवाला शरीर मिळते ते कर्मामुळे. कर्मामुळेच सुखी–दुःखी, गरीब–श्रीमंत, हुषार–मठ्ठ, सुंदर–कुरूप अशी विविधता आढळून येते. येथे भगवान मी जन्म घेतो असे म्हणतात म्हणजे तेही कर्मपराधीन ठरतात. मग त्यांचे ईश्वरत्व राहिले कुठे? कर्म संपले की मृत्यु आणि पुनः परिपक्व झाले की जन्म हे ठरलेले आहे. जीवाला जन्म नको असतो, म्हणून तर जन्मल्याबरोबर तो रडतो. फक्त आईवडिलांना मूल जन्मावे असे वाटत असते.

खरे पाहता ईश्वराला जन्म नाही. तो अव्यय असून सर्व भूतमात्रांचा नियामक आहे. तरीसुद्धा प्रकृति किंवा मायेचा आश्रय करून तो स्वेच्छेने शरीर धारण करतो. जीव कर्मामुळे पराधीन असतो. कोठे जन्म घ्यायचा हे त्याच्या हातात नसते. ईश्वर स्वेच्छेने शरीर धारण करतो, त्यामुळे तो स्वतंत्र असतो.

जीवसुद्धा ब्रह्मरूपीच असता त्याला कर्म पारतंत्र्य का असावे?

कारण जीव आपण ब्रह्मरूपी आहोत हे जाणत नाही. आपण स्वतः कर्मभोक्ते आहोत अशी त्याची कल्पना असते व या कल्पनेने तो सुखदुःखे भोगीत असतो. ब्रह्मस्वरूपाचे ज्ञान झाले की जीवाला कर्मपारतंत्र्य राहणार नाही.

**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥७॥**
**परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।**
**धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥८॥**

हे भरतकुलोत्पन्ना, जेव्हा जेव्हा धर्माची ग्लानी होते आणि अधर्म बळावू लागतो, तेव्हा मी स्वतः जन्म घेतो–सज्जनांच्या संरक्षणाकरिता,

दुर्जनांच्या नाशाकरिता व धर्माची संस्थापना करण्यासाठी मी युगायुगाच्या ठिकाणी अवतार घेतो.

भगवान नुसता जन्म घेत नाही. संभवामि म्हणजे चांगल्यारीतीने ज्ञानैश्वर्य, बल, वीर्य व तेज अशा सर्व सामुग्रीसह व त्याला जेथे योग्य वाटेल तेथे तो जन्म घेतो. मानवाला जन्माला आल्यावर ज्ञान, बल, धन व भोग प्राप्त करून घेण्यासाठी प्रयत्न करावे लागतात. ईश्वराला काडी-मात्र प्रयत्न करावे लागत नाहीत हेच त्याचे श्रेष्ठत्व. जेव्हा धर्माचा ऱ्हास होतो व अधर्म शिगेला पोहोचतो तेव्हा भगवान अवतार घेतात.

याचा अर्थ ईश्वराला अधर्म आवडतो असा नाही का होत? कारण अधर्म वाढला की तो प्रगट होतो व धर्मोत्कर्षाच्या वेळी तो गुप्त होतो.

अर्जुनाला जसे युद्ध प्रिय तसा ईश्वराला धर्म आवडतो. ऐन मध्यरात्री 'माझ्या गायी चोरल्या, धावा, धावा' अशी आर्त हांक ऐकून अर्जुन धनुष्यबाण आणण्यासाठी धर्म-द्रौपदी एकांतात असलेल्या महालात गेला. त्याबद्दल बारा वर्षांची शिक्षा पत्करली. शूर पुरुष होणाऱ्या परिणामांची चिंता न करता गरिबांच्या मदतीला धावून जातो, तसाच परमेश्वर धर्म-रक्षणासाठी धावून येतो. धर्म हा अत्यंत रमणीय पदार्थ आहे. अशा धर्माचा नाश झालेला त्याला पाहवत नाही. मानव हा मुळात सुंदर आहे व त्याला सुंदरतम करण्यासाठीच वेदरूपी धर्म आहे. प्रत्येकाच्या योग्यतेनुरूप धर्म सांगितला आहे. प्रवृत्ती व निवृत्ती असे धर्माचे दोन प्रकार आहेत. असा धर्म जर नष्ट झाला तर जगात घोटाळे माजतील, म्हणून भगवान अवतार घेतात.

अजूनही अरुंधती, सावित्री इ. स्त्रियांची नावे ऐकू येतात. त्यांची पूजा केली जाते. सावित्रीने पातिव्रत्य धर्माचे पूर्ण पालन केले होते म्हणून ती प्रत्यक्ष यमाला प्रश्न करू शकली. 'पतिव्रतासि सावित्री तथैव च तपोन्विता। अतस्त्वामभिभाषामि' असे यमधर्म म्हणाला. ( तप-स्विनी व पतिव्रता असल्यामुळे सावित्री मी तुझ्याशी बोलतो. ) सुमतीने

सूर्याला उगवू नकोस अशी आज्ञा केली. तिच्या पातिव्रत्यामुळे सूर्यालाही तिची आज्ञा पाळावी लागली. धर्म हा अमूर्त आहे. त्याचे व्यवस्थित आचरण केले की त्याचे फळ मात्र प्रत्यक्ष दिसते.

सिद्धेश्वर महाराज ( गुरुमहाराज-- कोल्हापूर ) संध्येसाठी नदीवर गेले. किनाऱ्याला एक सुसर आली होती. महाराजांनी तिच्यावरच बैठक मारून संध्या आरंभिली. संध्या झाल्यावर त्यांनी तेथेच समाधी लावली. लोक ते दृश्य पाहून भयचकित झाले. आरडाओरडा सुरू झाल्याने महाराजांची समाधि भंग पावली. महाराज शांतपणे सुसरीवरून खाली उतरले. तेव्हा सुसर पाण्यात निघून गेली. सामान्य मनुष्य सुसरी-जवळ जाऊ तरी शकेल काय? तसेच ते एकदा नदीकाठी बसले असता नदीचे पाणी चढू लागले. पण आश्चर्य म्हणजे पाण्याने त्यांच्या आसनाला स्पर्शही केला नाही. अचेतन अशा पंचमहाभूतांवरही अधिकार चालविण्याचे त्यांना सामर्थ्य प्राप्त झाले होते कारण एकच ' धर्मोत्कर्षवशात् '.

जीव कर्मामुळे जन्म घेतो हे खरे, पण कर्म अचेतन आहे. त्याच्या-मागे चेतन असेल तरच कार्य सुरळीत चालते. सर्वांच्यामागे ईश्वर आहे म्हणून त्यास जगच्चालक म्हणतात. तो सर्वांना सर्व कर्मांची फळे व्यवस्थित देतो. मर्यादा स्थापन करतो. हे सर्व तो धर्माश्रयाने करतो. त्याच्या व्यवस्थेत पक्षपात, विद्वेष, निर्भर्त्सना नसते. कृष्णावतारात सांबाने दुर्वासांची थट्टा केली व त्यांच्या शापामुळे सर्व यादवकुलाचा नाश झाला. सांब प्रत्यक्ष श्रीकृष्णाचा मुलगा पण त्यालाही शिक्षा झाली. परमेश्वर पक्षपात करीत नाही हेच यावरून सिध्द होते.

कर्म परिपक्व झाले व इतर सहकारी कारणे जमून आली की मनुष्य जन्म घेतो. धर्माला उतरती कळा लागून अधर्माचा जोर होतो, तेव्हा ईश्वर अवतार घेतो. सुखदुःखांचे भोग घेणे हे मानव जन्माचे

उद्दिष्ट; पण ईश्वरजन्माचे प्रयोजन काय? असा अर्जुनाने प्रश्न केल्यावर भगवान सांगतात, ' साधूंचे संरक्षण, दुष्टांचे निर्दालन व धर्मसंस्थापना असे अवतारी पुरुषाचे त्रिविध कार्य असते.'

अर्जुनः—' धर्माचा ऱ्हास झालेला असल्यावर साधूंचे संरक्षण कसे करता येईल. '

भगवान :– ' धर्म पूर्णपणे कधीच नष्ट होत नाही. अत्यंत बिकट परिस्थितीतही धर्मपालन करणारे काही महात्मे असतातच, त्यांचे मी प्रथम रक्षण करतो. '

' धर्मं चर्यमाणं अर्थः अनुत्पद्यते ' असे आपस्तंब म्हणतात. धर्माचरणी पुरुषाला पोटाची चिंता करावी लागत नाही. पूर्वी— फार नव्हे— पन्नास वर्षांपूर्वी लोक धर्माने वागत होते. फार नसला तरी कुलपरंपरेने चालत आलेले आचार पाळले जात होते. म्हणून लोक सुखात होते. ' सुखवस्तु ' आहोत असे सांगणारे कितीतरी आढळत. लोकसंख्या वाढीमुळे धान्य कमी पडते असे म्हणतात. पण लोकसंख्या वाढीबरोबर धान्योत्पादनही वाढले आहे. सध्या लोक धर्माचरण करीत नाहीत. धर्माने वागत असेल तर त्याची टर उडवितात. म्हणून अन्नासाठी दाही दिशा फिरण्याची पाळी आली आहे.

धर्माचरणाने आपोआप निर्वाह होत असेल तर त्याचे संरक्षण करण्याचा प्रश्न कुठे येतो ?

धार्मिक माणूस स्वतः धर्माचरण करतो. तो लोकांना पीडा देत नाही; पण अधार्मिक इतरांना आपल्यासारखे वागण्याची सक्ती करतात. धर्माचरण दुसरा जरी करीत असला तरी ते बघवत नाही. आपण अधार्मिक आहोत याची त्याला खंत असते, म्हणून तो इतरांनाही आपल्या कळपात ओढत असतो. आपल्याबरोबर इतरांनाही मूर्ख बनविण्याचा त्याचा आग्रह असतो. दुसऱ्याला पीडा देणे हा त्याचा स्वभाव

बनून जातो. रावण कुंभकर्ण ऋषीमुनींचे आश्रम उध्वस्त करण्यात आनंद मानीत. ते आश्रम म्हणजे काय प्रासाद होते ? साध्या पर्णकुट्या. पण त्याही मोडून टाकायच्या. अशा पीडेमुळे धर्माचरण करणे कठीण होते. म्हणून भगवान प्रथम सज्जनांना संरक्षण देतात.

आणि धर्मसंस्थापना कशी करतात ?

घराची व मूर्तींची स्थापना करता येते पण धर्म तर अमूर्त आहे. म्हणून भगवान स्वतः धर्माप्रमाणे वागून आदर्श निर्माण करतात. मग लोक त्यांचे अनुकरण करतात. काही अवतार केवळ धर्मस्थापनेसाठी तर काही दुष्टांचे निर्दालन करण्यासाठी. नरसिंह अवतारात हिरण्यकश्यपूचा वध करून एक दुष्टांचा नायक नाहीसा केला. नेता पडला की अनुयायी पळू लागतात.

'व्यासो नारायणः साक्षात्' अशा व्यास महर्षींनी धर्मसंस्थापना केली. त्यांच्या ब्रह्मसूत्रांवर रामानुजाचार्य, मध्वाचार्य व शंकराचार्य या तिघांनीही टीका लिहिल्या. तिघांचे अर्थ वेगवेगळे असले तरी तिघांचीही व्यासांबद्दल पूज्यबुद्धी सारखीच होती. त्यांनी १८ पुराणे लिहिली. वेदार्थाच्या प्रतिपादनासाठी महाभारतासारखा महान ग्रंथ लिहिला. 'भारतः पंचमो वेदः' असे म्हटले जाते. त्यांनीच जैमिनीला शिक्षण देऊन पूर्वमीमांसा लिहविली. त्यांच्या लेखणीतून कोणताही विषय सुटलेला नाही, म्हणून 'व्यासोच्छिष्टं जगत् सर्वं' ही म्हण पडली. 'अचतुर्वदनो ब्रह्मा, द्विबाहुरपरो हरिः अभाललोचनः शंभुः' असे त्यांचे वर्णन केले जाते. त्यानी धर्मसंस्थापना केली.

रामकृष्णांनी तिन्ही कार्ये केली म्हणून त्यांना पूर्णावतार म्हणतात. ऋषीमुनींचे संरक्षण, राक्षसांचे निर्दालन व दीर्घकाळ रामराज्य करून धर्मसंस्थापना केली. वनवासात असता एकदा सीता रामाला म्हणाली. 'तपस्वी जीवन व्यतीत करणाऱ्याजवळ धनुष्यबाण कशाला पाहिजे ?'

प्रभु रामचंद्र म्हणाले, 'धर्माचरणी लोकांना त्रास देणाऱ्या राक्षसांचा निःपात करण्याठी हा रामबाण आहे'.

रामराज्यात प्रजा संतुष्ट होती. प्रत्येकाच्या गरजेप्रमाणे ज्याला जे हवे ते मिळत होते. त्यामुळे रामराज्यात चोरी हा प्रकारच नव्हता. (आज कांही हवे असेल तर अर्ज करावा लागतो. त्याला उत्तर मिळाले तर मिळाले. नाही तर नाही. प्रजेला काय हवे आहे हे ज्यांना कळते ते खरे राज्यकर्ते. अर्ज, विनंत्या, निदर्शने, मोर्चे, घेराव, संप, उपोषणे मग मोडतोड आणि जाळपोळ झाल्याखेरीज प्रजेच्या अडचणी हल्लीच्या राजकर्त्यांना समजत नाहीत.)

श्रीकृष्ण अवतार घेऊन भगवंतानी सज्जन पांडवांचे रक्षण केले. श्री ज्ञानेश्वर म्हणतात, 'देवकिया उदरी वाहिला। यशोदे सायासे पाळिला। शेखी उपेगा गेला। पांडवांसी ॥' गर्भधारणेचे कष्ट देवकीला सहन करावे लागले. अवखळ, खोडकर बाळकृष्णाचे लालन पोषणाचे सायासाचे काम यशोदेने केले आणि शेवटी त्याचा उपयोग झाला पांडवांना. कौरवांचा दुष्ट कावा हाणून पाडण्यासाठी अर्जुनाचे सारथ्य पत्करून पांडवांना पाठीशी घातले.

अज्ञातवास संपल्यावर पांडवांचा मुक्काम उपप्लव्य नगरात होता. पुढे काय करावे यावर त्यांची चर्चा चालू होती. श्रीकृष्णही त्यांना भेटण्यासाठी आले होते. अशा वेळी धृतराष्ट्राचा निरोप घेऊन संजय आला. संजय म्हणाला, 'धर्मा, तुम्ही बारा वर्षे वनवास व एक वर्ष अज्ञातवास पत्करून इतका काळ घालविला. आता तुमचे आयुष्य कितीसे उरले आहे? फार तर १०।१५ वर्षें एवढेच ना? हा काळही तुम्ही वनातच घालवा. त्यायोगे तुमचे तप होऊन तुम्हांला पुण्याचा लाभ घडेल. माझ्या मुलांना राज्य मिळेल. माझी मुले मूर्ख आहेत. ती माझे काही ऐकत नाहीत. तुम्ही लढाईला उभे राहिलात तर तेही

लढतील व विनाकारण मनुष्यहानी होईल. धर्मा, धृतराष्ट्रही तुझा पितृव्य आहे. तू सूज्ञ व विचारी आहेस, म्हणून तू धृतराष्ट्राची आज्ञा पाळावीस व पाळशील अशी राजाला खात्री आहे.'

धृतराष्ट्राचा हा मानभावी निरोप ऐकून सरळ स्वभावाचा धर्मराजा होकार देईल म्हणून श्रीकृष्णांनी धर्मराजाला बोलूच दिले नाही. ते म्हणाले, 'संजया, राजाला सांग की तुला धर्मोपदेश करण्याचा मुळीच अधिकार नाही. जो धर्माचरण करतो त्याने धर्माचा उपदेश केला तर ते शोभून दिसते. द्रौपदीची विटंबना चालू असता राजा असून गप्प बसला, त्याला उपदेश करायचा अधिकार नाही. द्रौपदीने 'गोविन्देति चुक्रोश कृष्णा मां दूरवासिनीम्' असा केलेला आक्रोश ऐकून मीच धावून आलो. "ऋणं एतद् प्रवृद्धम् हि हृदयात् मे नापसर्पति" स्त्रीची विटंबना मी सहन करणार नाही. त्याबद्दल मी कौरवांना शिक्षा केल्याशिवाय राहणार नाही. संजया, तू दूत आहेस, तेव्हा माझा हा निरोप जशाचा तसा राजाला जाऊन सांग.' श्रीकृष्णाचा निरोप ऐकून राजा काय समजायचे ते समजला.

शिशुपाल, कंस चाणूरादि राक्षसांचा वध, पांडवांचे संरक्षण व अर्जुन आणि उद्धवाला ज्ञानोपदेश करून श्रीकृष्णाने धर्मसंस्थापना केली.

**जन्म कर्म च मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्त्वतः ।**
**त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन ॥ ९ ॥**

हे अर्जुना, या प्रकारचे माझे दिव्य जन्म व कर्म जो यथार्थ जाणतो, तो आपला देह टाकल्यावर पुनः जन्मास येत नाही; तो मजप्रत येतो.

परमेश्वर अवतार घेतो, तो जन्म दिव्य असतो. श्रीकृष्णाचा जन्म होताक्षणी त्याच्या मातापितरांच्या पारतंत्र्यशृंखला खळकन् तुटून पडल्या.

सामान्य मनुष्य जन्मला की त्याचे आईबाप त्याच्या काळजीने बंधनात अधिकच गोवले जातात. श्रीकृष्णाची कर्मेसुद्धा दिव्यच. पूतनेचे विष-मिश्रित स्तनपान, गोवर्धनोद्धार, कालियामर्दन, कंसवध ही कृत्ये काय सामान्य आहेत? श्रीकृष्णवधाची प्रतिज्ञा करून गेलेले सर्व असुर नष्ट झाले. श्रीकृष्ण जशाचा तसा राहिला.

हे सर्व जाणून घेतल्याने फायदा काय? कोणत्याही गोष्टीचे ज्ञान झाल्यावर फायदा झाल्याशिवाय राहात नाही. अज्ञानाने मात्र कधी लाभ होत नाही. मानव पराधीन आहे. त्याला कुणाचा ना कुणाचा आधार घ्यावा लागतो. जन्मल्याबरोबर मातेचा आश्रय पाहिजे. आईने पाजलेच नाही तर तिथेच त्याचे जीवन संपेल. पुढे पित्याचा, नंतर गुरूचा, विद्या मिळाल्यावर नोकरीसाठी धन्याचा, पैसा मिळाला तरी भोजना-साठी पत्नीचा, वृद्धपणी पुत्राचा आणि शेवटी चौघांचा आश्रय हवा. त्याशिवाय अंतिम यात्रा पुरी कशी होणार? पण असे अनेकांचे आश्रय घेत जगण्यापेक्षा एका ईश्वराचा आश्रय घेतलेला काय वाईट?

ईश्वर भक्तवत्सल व अनंत शक्तिशाली आहे. शरणागतास तो काही कमी पडू देत नाही. पण त्याला शरण जाण्याची बुद्धीच होत नाही. त्याचे पूर्व पातक आड येत असते. भगवंताच्या जन्माबद्दल व त्याच्या दिव्य कर्मांबद्दल सतत ऐकत राहिल्याने पूर्व पातके नष्ट होऊन मानवाला सुबुद्धी होते. अर्जुनाला सद्बुद्धी झाली नसती तर त्यानेही दुर्योधना-प्रमाणे एकट्या श्रीकृष्णाऐवजी त्याची प्रचंड सेनाच मागून घेतली असती. मानवाने एकदा ईश्वराचा आश्रय घेतला व नंतर सोडले तरी ईश्वर अशा प्राण्यांचे संरक्षणच करतो. मनुष्य हा स्वार्थी असून दुसऱ्याचे नुकसान करण्यात त्याला आनंद होतो. पण सज्जनांचे संरक्षण, दुर्जनांचे निर्दालन व धर्मसंस्थापना यात भगवंताचा कोणताही स्वार्थ नाही व परार्थाची हानीही नाही.

**वीतरागभयक्रोधा मन्मया मामुपाश्रिताः ।**
**बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः ॥१०॥**

प्रीती, भय व क्रोध ही ज्यांच्यापासून निघून गेली आहेत, जे मत्परायण झाले आहेत, जे माझा आश्रय करून राहिले आहेत, असे अनेक लोक ज्ञानरूप तपाने शुद्ध झालेले मत्स्वरूपाला प्राप्त झाले आहेत.

भगवंताचा दिव्य जन्म व दिव्य कर्म यांचे ज्ञान झाले की तो मनुष्य भगवंताचा आश्रय करतो. त्यामुळे त्याला ईश्वराचे ज्ञान होते व तो मुक्त होतो. भगवंताच्या लीला ऐकता ऐकता तो तन्मय होतो. त्याच्या मनात परमेश्वराशिवाय इतर विचार येतच नाहीत.

आत्मारामश्च मुनयः निर्ग्रंथाप्युरुक्रमे ।
कुर्वंति अहैतुकीं भक्तिमित्थंभूतगुणो हरिः ॥

तो आत्मराम बनतो. आत्मा व अंतःकरण याची ग्रंथी तुटलेली असते. तरीसुद्धा तो भक्ति करतोच. कारण ईश्वराचे गुणच तसे विलक्षण व वेड लावणारे आहेत.

विश्वामित्र रामलक्ष्मणांना आपल्या सिद्धाश्रमात घेऊन आले. रामाचे ते मनमोहक रूप पाहून त्यांची तृप्तीच होईना. रामाला बोलावून घेण्याचा उद्देश त्राटिका, सुबाहू आदि राक्षसांचा वध करून यज्ञ यशस्वी करणे हा होता. ते कार्य झाल्यावर वास्तविक रामाला अयोध्येला परत पाठवायला काहीच हरकत नव्हती. पण रामाचा सहवास संपूच नये असे वाटत असल्याने त्यांनी मिथिला नगरीस जाण्याची कल्पना काढली. 'चला राघवा चला पाहुया जनकाची मिथिला' असा रामाला त्यांनी पुनः पुनः आग्रह केला.

ईश्वराच्या लीला ऐकता ऐकता तन्मय होऊन कर्तव्य करायचे राहून गेले तर ?

ईश्वराच्या नादी लागून कर्तव्य विसरायला ईश्वर म्हणजे काही सुंदर तरुणी नाही. वैषयिक सुखासाठी स्त्रीचे चिंतन करणे व ज्ञानपूर्वक भक्तीने भगवंताचे चिंतन करणे यात चिंतन समान असले तरी त्यात जमीनअस्मानाचा फरक आहे. सतत भगवच्चिंतनाने हृदयातील राग, भय व क्रोध यांचा निरास होतो. एखाद्या विषयाची उत्कट अभिलाषा असली व ती पूर्ण झाली नाही तर इतर असलेली सुखे त्याला तृणप्राय वाटतात. दशरथाला पुत्राची अभिलाषा होती. पुत्र नव्हता तोपर्यन्त राजवैभव त्याला विषासारखे वाटत होते. मुलासाठी समृद्ध राज्याचाही त्याग करण्यास तो तयार होता.

विषयासंबंधीच्या सर्व इच्छा पूर्ण होतीलच असे सांगता येत नाही. एखाद्याला लसणाची फोडणी दिलेली अंबाड्याची भाजी खाण्याची उत्कट इच्छा होते. म्हणून तो खरेदी करण्यासाठी बाजारात जातो, पण नेमकी त्या दिवशी बाजारात अंबाडाभाजी आलेली नसते. मिळाली तरी चवदार होत नाही. उत्तम झाली तरी त्याच वेळी अचानक चार पाहुणे येतात आणि तेच भाजी संपवून टाकतात. त्याच्या वाट्याला काहीच उरत नाही.

शिवाय विषयेच्छा ह्या ज्ञानाला विरोधी असतात. म्हणून अशा इच्छाचे मनातून उच्चाटन केले पाहिजे. एक भगवच्चिंतन केले तरच या विषयेच्छेचे उच्चाटन होऊ शकते.

फाशी जाण्याच्या आदले दिवशी कैद्याला त्याला आवडणारी पक्वान्ने व मेवामिठाई दिली तर त्याला तिकडे बघण्याचीही इच्छा होत नाही. मृत्यूच्या भयापुढे त्याला कांहीच गोड लागत नाही. क्रोध आला की मनुष्य अंध बनतो. त्याचा तोल सुटतो व तो जन्मदात्या आईवडिलांनाही मारायला कमी करीत नाही. तसेच कामाचे. तो प्रबळ झाला की, मनुष्य भय, लज्जा सोडून पशुसमान वागू लागतो. आपल्या घरी जर तीन पाहुणे अचानक आले तर आपले नेहमीचे व्यवहार व्यवस्थित होत

नाहीत. पूजाअर्चा सोडून तुम्हांला त्यांच्याशी गप्पा मारत बसावे लागते. तुम्ही प्रवचनाला जात असाल तर ते सोडून तुम्हांला सिनेमाला जावे लागते. काम, क्रोध व भय ही तीन पाहुणे मंडळी अशीच आहेत. ती तुम्हांला ईश्वरचिंतनाकडे फिरकूच देत नाहीत. म्हणून त्यांना घालविण्यासाठी आपण नेटाने ईश्वरचिंतन करत राहिले पाहिजे. ईशचिंतन चालू असता ती मंडळी मनात येत नाहीत.

भगवच्चिंतनाने भक्ताचा अभिलाष गेलेला असतो. परमसुंदर परमेश्वराखेरीज इतर सर्व पदार्थ तो तुच्छ मानतो. ज्याला रोज बासुंदीपुरी मिळते, तो गवळ्याकडील पांचट दुधाची इच्छा कशाला करील? ज्ञानेश्वरांनी फार सुंदर दृष्टांत दिला आहे, ते म्हणतात—

"जो आपुलेनि नागरपणे । इंद्रभवनाते बाबळे म्हणे ।। तो केवि रंजे पालिवणे । भिल्लांचेनि ।। जो अमृतासि ठी ठेवी । तो जैसा कांजी न सेवी ।। तैसा स्वसुखानुभवी । न भोगी ऋद्धी ।।

ज्याला भगवच्चिंतनाची गोडी लागली, त्याला स्वर्गसुखेसुद्धा कवडीकिंमतीची वाटतात. मग त्याला मर्त्य सुखे कशी गोड वाटतील? त्याला कशाचीच इच्छा रहात नाही.

आपली एखादी गुप्त गोष्ट कोणी फोडली तर आपणांस क्रोध येतो. त्यामुळे आपले नुकसान होईल अशी आपणास भीती असते. पण ज्ञानी म्हणतो, जगात माझे कोणी काहीही वाकडे करू शकत नाही. म्हणून मला कुणाची भीती वाटत नाही व रागही येत नाही. प्रीती, भय व क्रोध हे तीन दोष घालवून जो ईशचिंतन करतो, त्याला ज्ञानाचा लाभ होतो. 'यस्य ज्ञानमयं तपः' असे भगवंताचे स्वरूप आहे. तप म्हणजे तापविणे. सोने तापविले की हिणकसपणा जाऊन शुद्ध होते. तसेच तपाने मानवाचे दोष जळून जातात. शारीरिक, मानसिक व वाचिक असे त्रिविध तप आहे. त्यांपैकी कोणतेही ज्याला जे जमेल ते त्याने तप करावे.

कांही लोक म्हणतात, आमच्यात दोषच नाहीत, तर तप कशाला करायचे? आपण निर्दोष आहोत असे समजणे हाच मुळी एक मोठा दोष आहे. कारण मनुष्य हा मुळी दोषांचा पुतळा आहे. दोष घालविण्याचे सतत प्रयत्न करत राहिले तर थोडबिहुत सुधारणा होते. अभ्यासाशिवाय कामात सफाई येत नाही. अगदी चौर्यकर्म घेतले तरी त्या कलेत सराव नसेल तर तो पकडला जातो. अभ्यासाने दोष कमी होऊन ज्ञान होते. ज्ञान झाले की अज्ञान जाते व त्याचे कार्य अहंकार तोही जातो.

**ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम् ।**
**मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥११॥**

जे जसे मला भजतात त्यांना तसाच मीही भजतो—तसे फळ देतो. हे पार्था, मनुष्यमात्र सर्व प्रकारांनी (स्वभावतः) माझ्या मार्गाचेच अनुसरण करतात.

वर वर्णन केलेले तीन दोष गेलेल्यांनाच भगवंत ज्ञान देतात. इतरांना नाही. भगवंताजवळ कशाचीही कमतरता नसता त्याने असा भेदभाव का करावा अशी अर्जुनाच्या मनातील शंका जाणून भगवंतानी हा श्लोक सांगितला आहे.

जसे पेरावे तसे उगवते; हाच न्याय येथेही आहे. जोंधळे पेरून गव्हाची अपेक्षा करण्यात अर्थ नाही. कोणी पैसा मिळावा म्हणून तर कोणी चांगली पत्नी मिळावी असा हेतू मनात धरून माझी पूजा करतात. लग्न झाल्यावर मुलासाठी प्रार्थना चालू असते. ऐश्वर्य, विवाह, पुत्र अशी ज्यांची मागणी असते, त्यांना त्यांच्या मागणीप्रमाणे ईश्वर देतो. त्यांची—सकाम उपासकांची—ज्ञानासाठी मागणीच नसते. निष्काम बुद्धीने भजणाऱ्याला मात्र ईश्वर ज्ञान देतो.

ईश्वराला भजणाऱ्यालाच तेवढे ईश्वर फळ देतो असे नव्हे, तर अन्य देवतांना भजणाऱ्यांनाही तोच फळ देतो. परमेश्वर अंशी असून इतर

देवता ह्या त्याचे अंश आहेत. फलदाता एकच असल्याने फलदानात विरोध येत नाही. कोणी भैरवाची आराधना करतात, कोणी शंकराची, कोणी गणेशाची उपासना करतात. परमेश्वरच त्या त्या रूपाने त्यांच्या उपासकांना फळ देतो.

एखादा मित्र तुमच्याकडे सारखी चहाची मागणी करीत असतो. त्याला तुम्ही काही सबब सांगून वाटेला लावता. दुसरा एखादा मित्र तुमच्याकडून कशाचीच अपेक्षा करीत नाही, त्याला तुम्ही आग्रह करून चहा पाजता. इतर देवतांचे भक्त सकाम भक्ती करतात. सारखे काहीतरी मागत असतात. अशांना भगवान ज्ञान देण्याच्या भानगडीत पडत नाही. पण निष्काम भक्तांना ज्ञान घेण्याचा आग्रह करतात.

कुत्र्यापुढे गायन केले तर ते त्याला समजते का? मुळीच नाही. कारण सर्व शास्त्रे ही मानवाकरताच निर्माण झालेली आहेत. म्हणून शास्त्रांचा मानवाने उपयोग करून घेतला पाहिजे तरच तो मानव. सर्व शास्त्रांनी ईश्वराचेच प्रतिपादन केलेले आहे. म्हणून त्या ईश्वराचीच उपासना केली पाहिजे.

**काङ्क्षन्तः कर्मणां सिद्धिं यजंत इह देवताः ।**
**क्षिप्रं हि मानुषे लोके सिद्धिर्भवति कर्मजा ॥१२॥**

कर्मफलाची इच्छा करणारे या लोकी देवतांची पूजारूप कर्मे करतात. कारण या मनुष्य लोकात कर्मापासून लवकर सिद्धि प्राप्त होते.

मानव ज्या फलाच्या इच्छेने कर्म करतो, त्याप्रमाणे त्याला फळ मिळते. पुत्र, ऐश्वर्य, विवाह ही ऐहिक म्हणजे या जन्मींची फळे आहेत व लोकांना तीच हवी असतात. एकाद्या जन्मदरिद्री माणसाला लक्ष्मीची उपासना कर म्हणजे पुढचा जन्म तुला राजकुळात मिळेल असे सांगितले तर तो म्हणेल, 'पुढच्या जन्मीचे राहू दे. सध्या मी जगू कसा हा माझा प्रश्न आहे.' ऐहिक फळे तात्काळ मिळावी अशी प्रत्येकाची इच्छा

असते. पण ज्ञान हे तात्काळ मिळणारे फळ नाही, तर अनेक जन्मानंतर मिळणारे आहे. म्हणून लोक त्यासाठी व त्यामुळे मिळणाऱ्या मोक्षासाठी प्रयत्नच करीत नाहीत.

आज आंबा खाल्यावर पुनः दुसरे दिवशी खावासा वाटतो. याचा अर्थ आंबा हा नित्य तृप्ती देत नाही. नाटकात वापरले जाणारे नकली दागिने कितीही चमचम करणारे असले तरी ते नेहमी वापरता येत नाहीत तसेच पुत्र, कलत्र वा ऐश्वर्य ही नश्वर फळे आहेत व केवळ ज्ञान हेच नित्य तृप्ती देणारे आहे. मनुष्य हा विचारशील प्राणी असूनही नित्यानंद देणाऱ्या ज्ञानासाठी तो प्रयत्न करीत नाही. कारण अनेक जन्मींच्या पापकर्मामुळे त्याचे मन स्थूल बनलेले असते. मलिन झालेले असते. त्यामुळे त्याला मोक्षाची सद्‌वासना होत नाही. ईश्वर कोणाहीवर अनुग्रह करावयास सर्वदा सिद्ध असतो, पण मानव त्याचेकडे त्या हेतूने जातच नाही.

**चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः ।**
**तस्य कर्तारमपि मां विद्ध्यकर्तारमव्ययम् ॥ १३ ॥**

गुणकर्मानुसार मी चार वर्णांचे लोक निर्माण केले. या कर्मांचा जरी मी कर्ता आहे, तरी परमार्थतः मी अकर्ता व अव्यय आहे असे जाण.

ईश्वर हाच जगाचा कर्ता व जगताच्या व्यवस्थेसाठी त्यानेच ब्राह्मण क्षत्रिय, वैश्य व शूद्र असे चार वर्ण निर्माण केले. भगवंताने अशी विषमता का बरे निर्माण केली असावी, असा प्रश्न पडतो. पण विचार केला तर सर्वांना आपला उत्कर्ष करून घेता यावा हाच त्याचा उद्देश असल्याचे कळून येईल. शाळांमधून अ--ब--क--ड अशा तुकड्या असतात. हुषार मुले अ मध्ये तर, ढ मुले ड तुकडीत पाठविली जातात. अ तुकडीतील विद्यार्थ्यांना जो विषय चटकन समजतो, तोच ड मधील विद्यार्थ्यांपुढे डोकेफोड केली तरी, त्यांना समजत नाही. खरे पाहता, शाळा

एकच. शिकवायचे विषय सारखे. फी सारखी, पण शाळा व विद्यार्थ्यांच्या उत्कर्षासाठी व शाळा व्यवस्थित चालविण्यासाठी अशी विभागणी करावीच लागते.

आपल्या राहत्या घराकडे पहा. त्यात अनेक दालने असतात. बैठकीची खोली, स्वयंपाकगृह व न्हाणी अशा वेगवेगळ्या खोल्या असतात. न्हाणीचा उपयोग सर्वात अधिक असतो, म्हणून काही दर्शनी भागी कोणी न्हाणी बांधत नाही. जुन्या घरांना माजघर असे व मधेच असे व त्यात पूर्ण अंधार असे. कुठला जिन्नस कुठे ठेवला आहे हे चोरालाही समजू नये असा त्या रचनेमागे हेतु होता. आता घराला सगळीकडे दारे आणि खिडक्या. उजेडच उजेड. लोक म्हणतात, आता दडवून ठेवण्यासारखे आमचेजवळ काही राहिलेच नाही. घरांच्या दालनाच्या बाबतीतही मागेपुढे करावे लागते. त्याशिवाय घराची व्यवस्था होत नाही. सर्व गोष्टी एकाच खोलीत कराव्या लागल्यामुळे किती कुचंबणा होते हे मुंबईकर चांगले जाणतात.

जगद्‌व्यवहारासाठी ईश्वराने चातुर्वर्ण्य व्यवस्था केलेली आहे. उत्तम, मध्यम, मंद आणि मंदतर असे चार प्रकारचे लोक असतात. एखाद्याचा सत्त्वगुण उत्कर्ष पावलेला असतो, त्याला ज्ञानाशी संबंधित असलेली कामे सांगितली पाहिजेत. त्याला पाट्या टाकायची कामे सांगून काय उपयोग? एखादा जेवायला बसला की अकरा भाकरी संपवल्याशिवाय पानावरून उठतच नाही. त्याला शिक्षणाचे काम दिले तर झोपा काढेल. त्याला कष्टाची कामेच सांगितली पाहिजेत.

नुसती माणसेच नव्हे तर जगांतील सर्व पदार्थ त्रिगुणांनी व्याप्त आहेत. गतजन्माप्रमाणे सत्त्व, रज, तम यांपैकी जो गुण वाढला असेल त्याच वर्णात त्याला घातले तर त्याला आवडते. इतकेच नव्हे तर ते उत्कर्षाला उपयुक्त ठरते. हाताची पाची बोटे सारखी आहेत का?

ती सारखी नाहीत म्हणूनच पदार्थ उचलता येतात. कमी अधिक केल्याखेरीज कोणताच व्यवहार होत नाही. व्यवहारात भेद पाहिजेच. ज्यांना साम्यवाद पाहिजे त्यांनी वेदांत मान्य केला पाहिजे. कारण वेदान्त जगांतील सर्व पदार्थ जरी भिन्न दिसले तरी ती एकाच परब्रह्माची रूपे आहेत असे मानतो. पण साम्यवादी वेदान्तही पेलू शकत नाहीत.

शिपाई आणि फौजदार, सैनिक आणि सेनापति यांना सारखाच पगार देऊन चालेल का? सर्वांनी बैलगाडीच वापरली पाहिजे असा हुकूम काढला तर? प्रत्येकाची योग्यता भिन्न भिन्न असते. त्यानुसार व त्यांचे पूर्वजन्म व गुणकर्मानुसार वर्णव्यवस्था केलेली आहे. ब्राह्मणाने सोवळ्याने देवळात जाऊन प्रत्यक्ष मूर्तीचे पूजन केल्याने जे पुण्य मिळते, तेच पुण्य शूद्राला कळसाचे दर्शन घेतल्याने मिळते. वर्णानुसार विहित कर्मांत भिन्नता असली तरी मिळणाऱ्या फळात तरतमपणा नसतो. म्हणून ज्या त्या वर्णाच्या लोकांनी त्यांना नेमून दिलेलीच कर्मे करावी. त्यात अदलाबदल करून चालणार नाही असा दंडक आहे. ब्राह्मण सत्त्वगुणी असला तरी त्यातही रज किंवा तमोगुणाचे मिश्रण असते. म्हणून सर्वांना मोक्ष मिळत नाही. शुद्ध सत्त्वगुणसंपन्न व्यक्तीच मोक्षाची अधिकारी होऊ शकते.

**न मां कर्माणि लिम्पन्ति न मे कर्मफले स्पृहा ।**
**इति मां योऽभिजानाति कर्मभिर्न स बध्यते ॥१४॥**

कर्मे मला बंधन करीत नाहीत. कर्मफलाबद्दल माझी आसक्ती नाही. (मी अकर्ता आत्मरूप आहे) असे मला जो जाणतो तो कर्मांपासून बंधन पावत नाही.

काही लोक ईश्वर हाच जगाचा कर्ता आहे असे मानतात. पण जीवासारखे त्याचे कर्तृत्व नसून त्याचे कर्तृत्व विलक्षण आहे. श्रुतिस्मृति, पुराण व इतिहासात ईश्वराने जग निर्माण केल्याचा प्रत्यक्ष उल्लेख

'द्यावापृथिवी जनयन्' या शब्दांनी केलेला आहे. त्याच्याशिवाय या अवाढव्य जगाचा कर्ता कोणी असूच शकणार नाही.

काही लोक ईश्वर फक्त चांगल्या गोष्टींचा कर्ता असल्याचे मानतात. पण राम सीताहरणानंतर तिच्यासाठी सामान्य पुरुषाप्रमाणे शोक करतो व श्रीकृष्ण चोरीही करतो. म्हणून वाईट गोष्टींचा कर्ताही ईश्वरच मानावा लागतो.

काही लोक ईश्वर हा प्रवर्तक असून तो काहीच करीत नाही असे मानतात. शरीरात जीवात्मा राहतो, तो अंतःकरणाला चालना देतो. अंतःकरण इंद्रियांना, इंद्रिये देहाला प्रेरणा देतात. अशा प्रकारे कर्मे होतात. ईश्वर काहीच करीत नाही, हेच मानणे योग्य वाटते. नाहीतर जीवाचा व इंद्रिये, मन, बुद्धि व प्राण यांचा संबंध कोणता ? त्यांत तादात्म्य आहे की समवायसंबंध आहे हे सांगता येत नाही. म्हणून तो मानीव किंवा कल्पित समजावा लागतो. ईश्वर अकर्ता हेच खरे. कारण अकर्ता आहे असे जाणले तर 'कर्मभिर्न स बध्यते' हे फळ आहे. कर्ता असे जाणल्याचे फळ नाही. म्हणून कर्तृत्व मिथ्या मानावे लागते.

चातुर्वण्य मी केले असे सांगून पुनः मी कर्ता नाही असे भगवंत सांगतात. कारण प्रत्येकाला मी कर्म केले असे वाटते. असे वाटणे हा अभिमान. त्या कर्माचे अमुक फळ मिळावे या इच्छेला फलेच्छा म्हणतात. पण भगवंत म्हणतात, मला कर्माचा अभिमान नाही किंवा फलेच्छा नाही. हे जाणणारा संसारातून मुक्त होतो.

**एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरपि मुमुक्षुभिः ।**
**कुरु कर्मैव तस्मात् त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतम् ॥ १५ ॥**

अशा प्रकारच्या मला जाणून पूर्वीच्या मुमुक्षूंनी कर्म केले. म्हणून पूर्वीच्यांनी ( जनकादिकांनी ) परंपरागत केलेले कर्मच तूही कर.

पूर्वीच्या जनक, मनू, इक्ष्वाकू इत्यादी राजर्षींनी भगवंत अकर्ता आहे हे जाणून कर्मे केली. त्यांचे अनुकरण अर्जुनाने करावे असे भगवंत सांगतात. प्रथम ब्रह्मदेवांनी सांगितले म्हणून व आता मी सांगतो म्हणून कर्म कर, असा भगवंताचा आग्रह आहे.

निष्काम कर्मयोगाचे प्रतिपादन करीत असता कर्ता अकर्ता यांची चर्चा करणे म्हणजे प्रसक्तचिंतन ( विषयांतर ) करणे होय. हे जाणून भगवंत पुढील श्लोकात पुन: कर्मयोगाविषयी सांगतात-

**किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः ।**
**तत्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥१६॥**

कर्म कोणते आणि अकर्म कोणते या संबंधाने शहाण्या पुरुषांनाही भ्रम पडतो. जे जाणल्याने तू अशुभ अशा संसारापासून मुक्त होशील, ते कर्म मी तुला सांगतो.

कर्म म्हणजे शास्त्राने सांगितलेले. उदा. स्नानसंध्या. विकर्म म्हणजे शास्त्राने करू नका म्हणून सांगितलेले, उदा. असत्य भाषण, हिंसा, चोरी इ. आणि अकर्म म्हणजे कांहींही न करता स्वस्थ बसणे. हे झाले कर्माचे स्वरूप. नुसते स्वरूप समजून भागत नाही. त्याचे तत्त्व समजले पाहिजे. लग्नापूर्वी वधूपिता मुलगा कसा आहे, चालतो कसा, बोलतो कसा हे पाहून म्हणजे वराचे स्वरूप पाहून आपली कन्या त्याच्या हवाली करतो. लग्नानंतर हा सामान्य पुरुष नसून ' कन्याराशिस्थितो नित्यं जामाता दशमो ग्रहः ' असा आहे. त्याच्या सहवासाने जावयाचे स्वरूप निराळे व तत्त्व निराळे, हे कळते.

पूर्वकाळी बालवयात तीसपर्यंत पाढे शिकवीत. पावकीपासून औटकीपर्यंत घोकून पाठ करून घेत. पण एकोणतीस सत्ते किती किंवा एकूणनव्वद पावणे किती हे जर चटकन् सांगता आले नाही तर त्या पाठांतराचा जसा काही उपयोग नाही, तसा नुसत्या ज्ञानाचा, ते जरी

चांगले असले तरी काही उपयोग नाही. ते कृतीत आले पाहिजे. आय्. ए. एस्. अधिकारी काय केवळ सही करण्यासाठी असतो का? सही कोणीही करू शकतो. पण सही करणे याचा अर्थ त्याने वर लिहिलेले सर्व समजून घेतले आहे असा असतो. सही करणे हे स्वरूप झाले, समजून सही करणे हे तत्त्व झाले. तसेच कर्मयोगाचे केवळ ज्ञान असणे हे स्वरूप जाणणे झाले. कर्मयोगाचे आचरण करणे हे खरे तत्त्व आहे.

**कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मणः ।**
**अकर्मणश्च बोद्धव्यं गहना कर्मणो गतिः ॥ १७ ॥**

कर्म म्हणजे काय हे जाणले पाहिजे, विकर्म म्हणजे काय हेही जाणले पाहिजे. त्याचप्रमाणे अकर्मही जाणले पाहिजे कारण कर्माची गती गहन आहे.

कर्म खरे असते कुठे व ते भासते कुठे हे जाणणे महत्त्वाचे आहे. थांबलेल्या आगगाडीत बसले असता शेजारच्या रुळावरील गाडी चालू झाली तर आपलीच गाडी चालू झाली असा भास होतो. नाव वेगात चालली की किनाऱ्यावरील झाडे पळत आहेत असे वाटते. किंवा अत्यंत दूर अंतरावर चालत असलेली व्यक्ती आपणास स्थिर भासते. म्हणजे क्रिया असते एकीकडे, पण तिचा भास मात्र दुसरीकडे होतो. त्याप्रमाणे कर्म अंतःकरण करीत असते, पण ते आत्म्यात भासते. त्यामुळे ब्रह्मघोटाळा होतो. तुम्हांला अगदी स्वस्थ बसायला सांगितले. चुटक्या वाजवायच्या नाहीत किंवा जमिनविर रेघोट्या काढायच्या नाहीत, त्याप्रमाणे तुम्ही निश्चल बसाल पण आंत इंद्रियांना रोधण्याची क्रिया चालूच असते. क्रिया मनात असते, पण भासते मात्र इंद्रियांवर.

**कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः ।**
**स बुद्धिमान्मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत् ॥१८॥**

कर्माच्या ठिकाणी जो अकर्म पाहतो आणि अकर्माच्या ठिकाणी कर्म पाहतो, तो मनुष्यांमध्ये बुद्धिमान्-योगी व सर्वकर्मकर्ता जाणावा.

मी हे कर्म केले असे मनुष्य म्हणतो, तेव्हां तो आत्माच कर्ता मानतो, पण खरे पाहता 'देहेंद्रियमनोबुद्धि' हेच कर्ते असतात. पण आत्मा कर्ता हा विपरीत अर्थ व्यवहारात रूढ आहे. फोटोग्राफर फोटो काढण्यापूर्वी हलू नका म्हणून सारखे सांगत असतो. वास्तविक फोटो-साठी आपणहून माणसे स्वस्थ बसतात, तरी निरोधाचे कार्य सतत चालू रहावे म्हणून त्याला सारखी आठवण द्यावी लागते. मनात दुसरा विचार आला किंवा निश्चय थोडा जरी कमी झाला की बाह्येंद्रिये आपोआप हलू लागतात.

अंतःकरणात कर्म चालू असता ते बाहेर भासत नाही किंवा दिसत नाही. हाही विपरीत अर्थ व्यवहारात रूढ आहे. आत्मा कर्ता असे दिसत असले तरी तो अकर्ता आहे हे जसे जाणले पाहिजे, तसेच बाह्येन्द्रिये स्वस्थ असली तरी अंतःकरणात कर्म चालू असते, हेही समजून घेतले पाहिजे. हे ज्ञान ज्याला होते तो बुद्धिमान. हे रहस्य केवळ जाणून काही उपयोग नाही. जो आचरणात आणतो तो योगी. नुसता योगी नव्हे तर कृत्स्नकर्मकृत् म्हणजे सर्व कर्म करणारा होय. अहंकार-रहित व फलेच्छा सोडून जो कर्मयोग आचरतो, त्याला सर्व कर्मांची फळे अनायासे मिळतात.

स्नातं तेन समस्ततीर्थसलिले दत्तापि सर्वाऽवनिः ।
यज्ञानां च कृतं सहस्रमखिलं देवाश्च संपूजिताः ॥
संसारात् समुध्दृताः स्वपितरो त्रैलोक्यपूज्यो ह्यसौ ।
यस्य ब्रह्मविचारणे क्षणमपि स्थैर्यं मनः प्राप्नुयात् ॥

ब्रह्मविचारामध्ये क्षणभर जरी चित्त स्थिर झाले तरी त्या पुरुषाला सर्व तीर्थांमध्ये स्नान केल्याचे, सर्व पृथ्वीचे दान केल्याचे, सहस्र यज्ञ

केल्याचे व सर्व देवांची पूजा केल्याचे पुण्य लाभते. त्याच्या पितरांचा उद्धार होतो व तो त्र्यैलोक्याला पूज्य होतो.

लोकसभेत खासदार मंडळी खुर्च्या फेकणे, पेपरवेट मारणे, आरडा-ओरडा करून गोंधळ घालणे असले उद्योग करतात. सभेचे काम गोंधळ न होता चालले पाहिजे ही अध्यक्षाची जबाबदारी असते. भीष्मद्रोणा-सारख्यांनी कौरवसभेस काबूत न ठेवल्यामुळे द्रौपदीची विटंबना झाली. या त्यांच्या अपराधाबद्दल महायुद्धात सर्वांना पराभव नव्हे, सर्वनाश पत्करावा लागला.

आपले शरीर हे सुद्धा पांच ज्ञानेंद्रिये, पांच कर्मेंद्रिये, पंचप्राण, मन आणि बुद्धी अशा सतरा जणांची एक संसदच आहे. या सभेचा जीव हा अध्यक्ष असतो, म्हणून त्याला करणाधिपः असे म्हणतात. जीवाने वरील सतरा जणांकडून त्यांची विहित कर्तव्ये करवून घेतली पाहिजेत. विहित कर्मे केली नाहीत तर विकर्म किंवा अकर्म घडते व त्याचे फळ जीवाला भोगावे लागते.

काम करणे सोपे असते, पण करवून घेणे अवघड असते. इंद्रियां-कडून शास्त्रीय–विहित कर्मे करून घेतली नाहीत तर इंद्रिये शिरजोर होतात व तीच तुमच्याकडून कामे करून घेतात. डोळ्यांना परमेश्वराच्या मूर्ती दाखविल्या नाहीत, तर डोळे तुम्हांला सिनेमाला जायला भाग पाडतील. घरातल्या नोकरांचे लाड केले व त्यांच्यावर लक्ष ठेवले नाही, तर तो कशावर तरी डल्ला मारून निघून जातो. इंद्रियांवरही लक्ष ठेवले नाही तर ती भलत्या मार्गाला लागतात. गादीवर पडल्यावर उद्या कुणाला बुडवायचे याचा विचार करण्यापेक्षा आपले मनच ईश्वरचिंतनात बुडविलेले काय वाईट ? ईश्वरचिंतन केलेत तर मनात वाईट विचार येणारच नाहीत. वाणीचा उपयोग शिव्या देण्यापेक्षा तिला हरिनामाची संवय लावा.

मन व प्राण हे अंतःकरणाचेच दोन भाग. मन हे ज्ञानशक्ति-प्रधान आहे तर प्राण हा क्रियाशक्तिप्रधान आहे. फुप्फुस, हृदय, पचनेंद्रिये यांचे द्वारा प्राणाचे काम रात्रंदिवस जन्मापासून मृत्यूपर्यंत अखंड चालू राहते. मनाला मात्र रोज पाच सहा तास विश्रांति घ्यावी लागते. गाढ झोपेच्यावेळी मन विश्रांति घेते. या इंद्रियांनी विकर्म किंवा अकर्म करू नये म्हणून त्यांना विहित कर्मात गुंतवून ठेवले पाहिजे.

**यस्य सर्वे समारंभाः कामसंकल्पवर्जिताः ॥**
**ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहुः पंडितं बुधाः ॥ १९ ॥**

ज्याची सर्व कर्मे भोगेच्छा व संकल्प यांनी विरहित असतात आणि ज्ञानरूपी अग्नीने ज्याची कर्मे दग्ध झालेली असतात, त्याला ज्ञाते लोक पंडित म्हणतात.

अहंकार व फलेच्छा सोडून विहित कर्मे करीत राहिल्यास अंतःकरणात ज्ञानरूपी वन्ही निर्माण होतो व तो सारी संचित कर्मे जाळून टाकतो. असा पुरुष पंडित म्हणजे आत्मज्ञानसंपन्न होतो. अशा साक्षात्कारी पुरुषाचा अधिकार येवढा असतो की, देवसुद्धा त्याचे वाकडे करू शकत नाहीत. त्याच्या अंगी सर्व जगाचा उद्धार करण्याचे–कृपा करण्याचे–सामर्थ्य येते.

व्यवहारातसुद्धा एखादी विद्या हस्तगत करावयाची झाल्यास अहंकार सोडून व फलेच्छा न धरता वागावे लागते. मोटार दुरुस्तीचे ज्ञान संपादन करायचे झाल्यास एखाद्या मेस्त्रीकडे पगाराची अपेक्षा न करता वाटेल ते काम करायचे. भररस्त्यावर मोटारखाली पडावे लागले तरी तक्रार करायची नाही, तरच ते ज्ञान मिळते.

व्यवहारात मनुष्य कपडे, दात, मुख, घर इत्यादींच्या शुद्धीसाठी सतत प्रयत्न करीत असतो, पण मनाच्या शुद्धीकरता मात्र काहीच करीत नाही. कर्तृत्वाभिमान सोडून व फलेच्छा न धरता कार्य करीत

राहिल्यास मन शुद्ध होत जाते. शुद्ध मन जगातील पदार्थांकडे न धावता ईश्वराकडेच धाव घेते. लग्नसमारंभ उरकून एक बाई घरी चालली होती. अर्थातच ती भरजरी शालू नेसलेली होती व अंगावर सर्व दागिने घातलेले होते. तिला वाटेत शेण पडलेले दिसले व घरी शेणाची अत्यंत जरूरी होती. पण सर्व साजशृंगार केला असल्यामुळे शेणासारखा पदार्थ उचलता येईना. सुंदर बनलेले मन विषयांना शेणाप्रमाणे डावलून परमेश्वराचा स्वीकार करते.

इंद्रियांकडून शास्त्रविहित कर्मे करून घेतली नाहीत तर त्याचे फळ जीवाला भोगावे लागते. इंद्रिये ऐनवेळी दगा देतात गांधारीला आपला नियोजित पती अंध आहे असे कळल्यापासून तिने आपल्या डोळ्यांवर घट्ट पट्टी बांधून टाकली व ते व्रत आमरण पाळले; म्हणून प्रत्यक्ष श्रीकृष्णाला शाप देण्याचे सामर्थ्य तिच्या अंगी आले. कुंतिभोजाला मूल नव्हते म्हणून त्याने आपल्या मित्राची मुलगी सांभाळली. त्या कुंतीने आपल्या मानलेल्या आईवडिलांची सेवा करून त्यांना प्रसन्न करून घेतले. मग आपणाला प्रत्यक्ष जन्मदात्या मातापित्यांना संतुष्ट कां करता येऊ नये? कुंतीच्या सेवेने दुर्वासासारखे कोपिष्ट ऋषी प्रसन्न झाले. त्यानी कुंतीला वर मागण्यास सांगितले. तेव्हा कुंती म्हणाली, "तुम्ही संतुष्ट झालात यातच मला सर्व काही मिळाले." तिने काही मागितले नाही, तरी दुर्वासानी असा वर दिला की त्यामुळे तिला पांडवा-सारखे सुपुत्र लाभले. शिवाय सवतीवर उपकार करण्याचे सामर्थ्य लाभले. फलेच्छा धरली की कर्म सांगोपांग झाले असेल तरच फळ मिळते. ईश्वर काय असर्वज्ञ आहे कां असमर्थ व अनुदार आहे? त्याच्याकडे मागणी करायची गरजच काय? एखादे तरी निष्काम कर्म करा. 'स्वल्प-मप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात्' या न्यायाने ते वाया जाणार नाही.

**त्यक्त्वा कर्मफलासंगं नित्यतृप्तो निराश्रयः ।**
**कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किंचित् करोति सः ॥२०॥**

कर्मफळाची आसक्ती सोडून नित्यतृप्त व निराश्रय झालेला मनुष्य लोकदृष्टीने कर्माच्या ठिकाणी प्रवृत्त झालेला दिसत असला, तरी वास्तविक तो काही करीत नाही.

कर्माचे फळ हे भोगावेच लागते. नळ, युधिष्ठिर हे प्रातःस्मरणीय पुरुष, पण त्यांनाही हालअपेष्टा सोसाव्या लागल्या. इंद्राला रावणपुत्र मेघनादाने युद्धात जिंकून कैद करून नेले, ब्रह्मदेवाने सोडवून आणले व इंद्राला सांगितले की साध्वी अहिल्येला फसविल्याचे हे फळ तुला मिळाले आहे. सारांश कोणतेही कर्म दडपून टाकले जात नाही. निष्काम व निरभिमानपणे कर्म केले तरी त्याचे फळ भोगावेच लागते. पण कर्मफळ हे देहेंद्रियाद्वारे भोगावे लागते व ज्ञानी तर नित्यतृप्त व निराश्रय असतो, म्हणजे तो देहेंद्रियांना आपले म्हणत नाही. देहेन्द्रियांनाच झटकून टाकल्यामुळे त्यांची दुःखे त्याला भोगावी लागत नाहीत, जसे गाढ झोपेत देहाचे तादात्म्य जीवाने सोडलेले असते, त्यामुळे कर्मे आत्म्यापर्यन्त पोहोचत नाहीत व दुःख होत नाही.

म्हणूनच असह्य वेदना होत असल्या की डॉक्टर झोपेच्या गोळ्या देतात. ती औषधे देह व आत्म्याचे तादात्म्य तोडतात, पण काही कालापुरतेच. कारण तोडणे डॉक्टरांच्या हातात असले तरी जोडणे त्यांच्या हातात नसते, म्हणून हा उपाय फार जपून केला जातो. बिऱ्हाडकरूने मालकाला विजेचे बिल दिले नाही तर मालक वीज बंद करू शकत नाही. केली तर तो गुन्हा होतो. पण मालकाने बिल भरले नाही तर वीजमंडळ वीजपुरवठा तोडून टाकते कारण मालकापेक्षा वीज-मंडळ ही प्रबळ संस्था आहे. तसेच यज्ञ, दान, तप, जप व उपासना-द्वारा देह व आत्म्याचे तादात्म्य तोडल्यास तो गुन्हा होईल. पण ज्ञान

झाल्यास तादात्म्य तोडता येते. कारण ज्ञान ही प्रबळ संस्था आहे.

तांदूळ, पाणी व अग्नी या तिन्ही गोष्टी असल्या तरी भात तयार होऊ शकत नाही. अग्नीचा स्वभाव पक्व करण्याचा असला तरी मध्ये पात्राची योजना लागते. देहेन्द्रियादिक कर्मे करतात व त्यांची दुःखरूपी आच मनःपात्रात असलेल्या जीवाला लागते व तो होरपळून निघतो. म्हणून ज्ञानी हे मनःपात्रच नाहीसे करतो.

ज्ञानी स्नानसंध्यादी कर्मे लोकसंग्रहार्थ करतो व भोजनादी लौकिक कर्मे फक्त निर्वाहासाठी करतो, म्हणून त्याचे फळ त्याला येत नाही. यज्ञयागासारखी मोठी कार्ये तो आपणहून करीत नाही व केली तरी त्यामागे कोणताही संकल्प नसतो.

**निराशीर्यतचित्तात्मा त्यक्तसर्वपरिग्रहः ।**
**शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥२१॥**

इच्छारहित, चित्त व शरीरेंद्रिय-संघात यांचे नियमन केलेला व सर्व परिग्रह सोडलेला केवळ शारीरिक कर्म करीत असताना देखील त्याला पाप लागत नाही.

ज्ञानी पुरुषास कोणतीही इच्छा नसते. जिव्हेचा उपयोग फक्त निर्वाहापुरते खाणे व अगदी आवश्यक असेल तरच बोलणे यासाठी करतो. शास्त्राने काही कर्मांत मौन पाळण्याची आज्ञा केलेली आहे. श्राद्धकर्मात बोलू नये हा नियम माहीत नसल्यामुळे यजमान बडबड करतो व ब्राह्मण त्याला साथ देतात. खाल्यानंतर त्या पदार्थाबद्दल चांगले किंवा वाईट काहीही बोलू नये हा नियम फक्त ज्ञानी पाळतो. म्हणून त्याला अजिव्ह म्हणतात.

ज्ञानी पुरुषास वैषयिक विकार नसतात. त्याचे दृष्टीने नवजात बालिका व षोडशवर्षीय युवती सारख्याच असतात. स्तुति व निंदा त्याला

ऐकू येत नाही. त्या बाबतीत तो बधिर असतो. तो स्तुतीला पात्र असतो पण ती ऐकून त्याचे चित्त उत्तेजित होत नाही. तो अशा बोलण्याकडे लक्षच देत नाही. तसेच चांगले वा वाईट कर्म पाहून तो आनंदित व क्रोधाविष्ट होत नाही. या दृष्टीने तो अंध असतो. तो पंगूही असतो, कारण पायांचा उपयोग शरीरधर्म पार पाडण्यासाठी व भिक्षेपुरताच करतो. लहान मुलांना गाभुळलेली चिंच दाखविली तर तीवर ती तुटून पडतील, म्हातारपणी तिकडे लक्षही जात नाही. ज्ञानी पुरुषाने इंद्रियां-सहित मनाचे चांचल्य नष्ट केलेले असते. म्हणून तो मुग्ध असतो. अजिव्ह, विकारहीन, अंध, बधिर, पंगु व मुग्ध ही सहा ज्ञानी पुरुषाची लक्षणे आहेत. त्याला स्वार्थाची वासना नसते. असा पुरुष दुर्मिळ असला तरी अशक्य नाही. शास्त्रात सांगितलेले बरोबर आहे की नाही याची प्रचीती पाहण्यासाठी सर्व आयुष्य खर्ची घालून आत्मज्ञान प्राप्त करून घेणारे येथे होऊन गेले आहेत.

कांही लोक स्वतः निरिच्छ असतात. पण त्यांचे मन परिवारात गुंतलेले असते. चकली खायची आवड नाही व तोंडात दातही नाहीत, अशा पुरुषापुढे चकली ठेवली तर तो आपण नाही तर घरी बायकामुले खातील म्हणून त्याचा स्वीकार करतो. पण खरा ज्ञानी शरीराबद्दलच प्रेम बाळगत नाही. मग शरीरासाठी येणाऱ्या बायकामुलांच्या परिग्रहाचा प्रश्नच येत नाही. वरील सहा लक्षणांनी युक्त असलेल्या पुरुषाला 'परिव्राट' म्हणतात. तो म्हणतो, चतुर्दश भुवनांचा त्याग करून केवळ ज्ञानासाठी मी प्रवृत्त झालो आहे.' अशा परिव्राटाला प्रत्यक्ष गुरु वंदन करून म्हणतात, "लोकांकरिता व माझ्याकरिता हे काषाय वस्त्र धारण कर."

**यदृच्छालाभसंतुष्टो द्वंद्वातीतो विमत्सरः ।**
**समःसिद्धावसिद्धौ च कृत्वाऽपि न निबध्यते ॥ २२ ॥**

यदृच्छेने जे मिळेल त्यावर संतुष्ट असणारा, आपपर–भावरहित, निर्मत्सर, कर्म सिद्धीस जावो अथवा न जावो, दोहोविषयी वृत्ती सारखीच असलेला पुरुष लौकिक दृष्ट्या कर्म करताना दिसतो, तरी तो त्या कर्माने बंध पावत नाही.

यतीने गावाबाहेर रहावे व धूम निवर्तल्यावर म्हणजे जेवणाची वेळ झाल्यावर भिक्षेसाठी गावात यावे. जी भिक्षा मिळेल त्यावर संतोष मानावा. असे केल्याने समाधान होते. संतोष हे धर्माचे एक अंग असल्याने पुण्य निर्माण होते. शीतोष्ण, सुखदुःख इत्यादी द्वन्द्वे सहन केली पाहिजेत. ज्ञानी समाधी लावतो, तेव्हां त्याला शरीराची कोणतीच दुःखे बाधत नाहीत. पण तो समाधी उतरल्यावरही सर्व द्वंद्वे विचारपूर्वक सहन करतो. ज्ञानी कोणाचा मत्सर करीत नाही, उलट दुसऱ्याचा उत्कर्ष पाहून त्याला दुःख न होता आनंदच होतो. एकाचा उत्कर्ष व आपली नेहमीची रडकथा याला ज्याचे त्याचे प्रारब्ध हेच कारण असते, असे जाणले की कोणाचाही मत्सर वाटत नाही.

समःसिद्धावसिद्धौ म्हणजे सिद्धि व असिद्धि याबद्दल मनात समानता बाळगणे, म्हणजे रागद्वेष–रहितत्व. साधने करू लागल्याबरोबर फळ मिळावे अशी अपेक्षा करणारा फळ मिळाले नाही की रागावतो-चिडतो. विद्यारण्य पूर्वाश्रमात दारिद्र्याने गांजून गेले होते. ‘ सर्वे गुणाः कांचन-माश्रयन्ते ’ हा अनुभव त्यानी घेतला होता. म्हणून दारिद्र्य–निवारणार्थ त्यानी गायत्री पुरश्चरण सुरू केले. सकाळी सुरू केले की रात्रीपर्यन्त चालू असावयाचे. मनात ‘ भगवति धनं देहि ’ अशी प्रार्थना चालू असायची. अशा प्रकारे एकदोन वर्षे नव्हे तर तीन तपे गायत्री देवीची आराधना केली. पण गरिबी काही हटली नाही. शेवटी कंटाळून त्यानी संन्यास घेतला. तेव्हा प्रत्यक्ष भगवती लक्ष्मीने त्याना दर्शन देऊन सांगितले की, तुझी प्रार्थना ऐकून मी निघाले, पण वाटेत तुझ्या पूर्वजन्मीच्या पापांचे

तीन डोंगर होते ते ओलांडावयास तीन तपे लागली. आता मी आले आहे, किती धन पाहिजे ते बोल.

विद्यारण्य म्हणाले, "देवी, संन्याशाला धन व मान देऊन कुठे मिरवायचे आहे. माझ्यामागे ना संसार ना परिवार. आता धन घेऊन काय करायचे?"

पण लक्ष्मी म्हणाली, "मी प्रसन्न झाल्यावर वैभव दिल्याशिवाय जाणार नाही." लक्ष्मीच्या प्रसादाने विद्यारण्य अत्यंत वैभवसंपन्न झाले. जेवायला चांदीचे ताट व बसायला सोन्याची पालखी असा त्यांचा थाट होता.

साधन करून फळ आले नाही म्हणून मधेच सोडून देणे इष्ट नाही. शास्त्राने सांगितलेले कोणतेही साधन चुकीचे नसते. मधे असलेले प्रतिबंध नष्ट झाल्याशिवाय फळ मिळत नाही. म्हणून साधकाने कधीही निराश होऊ नये. इंजिनियरिंगची पदवी घेऊन नोकरीसाठी अर्ज केला, पण नेमकी त्याच वेळी त्या खात्यात नोकरकपात चालू असते, असे एखाद्याचे बाबतीत घडते. त्याला नोकरी मिळायला काही काळ लागतो. पदवी घेताच नोकरी लागली नाही म्हणून नोकरीचे साधन असलेली पदवी कोणी सोडते का? आडवाटेस एस. टी. बंद पडली आहे. चार तास थांबावे लागणार आहे. जेवायची वेळ झाल्याने भूक कडकडून लागली आहे. खिशात भरपूर पैसेही आहेत. पण त्यांचा काही उपयोग होत नाही. पैसे काही खाता येत नाहीत. म्हणून काही कोणी ते फेकून देत नाही. अशा वेळी वाट पहात स्वस्थ बसणे यापलीकडे काहीच करता येत नाही. ज्ञानी पुरुष अशा वेळी ईश्वराची प्रार्थना करण्यात काळ घालवितो.

सिद्धांची वर जी लक्षणे सांगितली आहेत त्यांचा अभ्यास करून साधकांनी तसे बनण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

**गतसंगस्य मुक्तस्य ज्ञानावस्थितचेतसः ।**
**यज्ञायाचरतः कर्म समग्रं प्रविलीयते ॥२३॥**

ज्याची कर्मफळाविषयीची आसक्ती नष्ट झालेली आहे, जो मुक्त झाला आहे, ज्ञानाच्या ठिकाणी ज्याचे चित्त स्थिर झालेले आहे, जो ईश्वराकरता कर्माचरण करतो, त्याचे ते सर्व कर्म लय पावते.

ज्ञानीं कर्मफलाची आशा नसताही कर्मे करतात, ती यज्ञासाठी म्हणजेच ईश्वराच्या संतोषासाठी किंवा लोकसंग्रहासाठी. पूज्य टेंबे स्वामी ठिकठिकाणी स्वाहाकार करीत, ते स्वतःसाठी काही मिळवावयाचे या हेतूने नव्हे, तर केवळ लोकसंग्रहासाठी. प्रभू रामचंद्रानी वनवास पत्करला, तो स्वतःची हौस म्हणून नाही तर कैकयीच्या संतोषाकरता. रामाला काय तिची विनंती धुडकावून लावणे अशक्य होते. पण थोर पुरुष परहितासाठीच कार्य करीत असतात. रामाने १४ च वर्षे वनवास पत्करला, पण त्याची कीर्ति १४ हजार वर्षे झाली तरी अजून गायली जात आहे. व पुढेही अनंत काळ गायली जाणार यात शंका नाही. रामाने सापत्न मातेसाठी इतक्या हालअपेष्टा सोसल्या. तुम्ही सख्या मातेला तरी सुख देण्याचा प्रयत्न करा.

धनप्राप्तीसाठी एकाने सप्तशतीचा पाठ सुरू केला. एक वर्ष गेले तरी गुण आला नाही. पण वर्षभर लागलेल्या सवयीमुळे तो पाठ करीतच राहिला. मरेपर्यंत त्याने ते व्रत आचरले, कारण पुढे पुढे त्याला एक समाधान लाभू लागले व शेवटी तो निष्काम बनून गेला. वृद्ध मातेच्या संतोषार्थ तुम्ही पूजा करू लागला तर सवयीने मातेच्या पश्चातही पूजा चालू ठेवाल. पूर्व संस्कार चांगले नसतील तर देवपूजा ही कटकट वाटते. पशू योनीतून प्रथमच मानव योनीत आलेल्याला शास्त्रीय कर्मे करावीशी वाटत नाहीत. १०।१२ जन्म गेले म्हणजे मग काहीतरी करावे असे वाटू लागते. प्रल्हादाला पित्याने नारायणाचे नाव घ्यायचे नाही असे

बजावले. अतोनात छळ सोसला, पण नाम सोडले नाही. कारण गर्भावस्थेतच त्याने नारदाचा उपदेश ऐकला होता. कर्माचे संस्कार ज्ञानाने फळासह नष्ट होतात. कारण कर्माचे संस्कार अविद्येचे असून ज्ञानाचे विद्येचे म्हणजे सत्याचे असतात. ते कर्माच्या संस्कारावर मात करतात.

**ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम् ।**
**ब्रह्मैव तेन गंतव्यं ब्रह्मकर्मसमाधिना ॥ २४ ॥**

कर्मच ब्रह्म आहे अशी समानता झालेला पुरुष जे अर्पण करतो ते ब्रह्म, ज्याची आहुती देतो ते ब्रह्म, ज्या अग्नीत आहुती देतो तो अग्नी ब्रह्म, स्वतः आहुती देणाराही ब्रह्म व ज्याप्रत जाणार तेही ब्रह्म.

सर्वत्र ब्रह्म असे ज्ञान ज्याला झाले त्याला प्राप्त होणारे कर्म त्याच्या दृष्टीने बाधित असते. ज्ञान मिळाल्यानंतर तो केवळ आनंदात असतो. संसारात सुखाची शेकडो साधने असतात, पण सुख तेवढे नसते. म्हणून ज्ञानी त्या साधनांकडे पहात नाही. ज्ञानी कोणतेही साधन नसता सदैव आनंदात निमग्न असतो.

**दैवमेवापरे यज्ञं योगिनः पर्युपासते ।**
**ब्रह्माग्नावपरे यज्ञं यज्ञेनैवोपजुह्वति ॥३५॥**

दुसरे योगी दैवयज्ञाची उपासना करतात. कित्येक योगी ब्रह्मरूपी अग्नीच्या ठिकाणी यज्ञानेच यज्ञाची उपासना करतात.

मानवाच्या हिताची सर्व साधने यज्ञात आहेत. मानवाच्या हितासाठी बारा पदार्थ आहेत त्याला यज्ञ म्हणतात. दैव यज्ञात इंद्र, चंद्र, अग्नी आदी देवता असतात. काही योगी दैवयज्ञ करतात, तर काही आपला जीवात्मा परब्रह्मरूपी अग्नीमध्ये अर्पण करतात. असा परमात्म्यात जीवात्मा विलीन करणे हाच ज्ञानयज्ञ. ज्ञान म्हणजेच यज्ञ. म्हणून ज्ञान अत्यंत पूज्य आहे.

**श्रोत्रादीनींद्रियाण्यन्ये संयमाग्निषु जुह्वति ।**
**शब्दादीन्विषयानन्ये इंद्रियाग्निषु जुह्वति ॥२६॥**

दुसरे कोणी संयमरूपी अग्नीच्या ठिकाणी श्रोत्रादि इंद्रियांचे हवन करतात. कित्येक इंद्रियरूपी अग्नीच्या ठिकाणी शब्दादि विषयांची आहुती देतात.

श्रोत्रादि इंद्रिये म्हणजे ज्ञानेन्द्रिये. ती संयमरूपी अग्नीत हवन करायची म्हणजे संयम पाळावयाचा. यालाच प्रत्याहार म्हणतात. शब्दादि विषय म्हणजे ज्ञानेंद्रिये व कर्मेन्द्रियांचे सर्व विषय इंद्रियसंयमाग्नीत हवन करतात. शब्द बोलायचा झाला तर हरीचे नाव व ऐकायचे झाले तरी फक्त हरीचे कीर्तन. हवन करावयाचा पदार्थ अनिषिद्ध असला पाहिजे. तरच तो यज्ञ होतो. भोजन करणे हा देखील यज्ञच. 'उदरभरण नोहे जाणिजे यज्ञकर्म' असे आपण नेहमी म्हणतो, पण अन्न अनिषिद्ध असेल तरच यज्ञ होईल. प्रथम भगवंताला नैवेद्य अर्पण करून मग अन्न सेवन केले तर ते अन्न अनिषिद्ध होते. असे अन्न सेवन करणे हा यज्ञ, अन्यथा उदरभरण.

**सर्वाणींद्रियकर्माणि प्राणकर्माणि चापरे ।**
**आत्मसंयमयोगाग्नौ जुव्हति ज्ञानदीपिते ॥२७॥**

दुसरे कोणी इंद्रियांची सर्व कर्मे आणि प्राणांची सर्व कर्मे, ज्ञानरूपी अग्नीने प्रदीप्त झालेल्या आत्मसंयमरूपी योगाग्नीमध्ये हवन करतात.

पंच ज्ञानेंद्रिये, पंच कर्मेंद्रिये व पंचप्राण यांची सर्व कर्मे म्हणजे लिंग शरीराचे आत्मसंयमात हवन करणे म्हणजे सर्व इंद्रियांचे व प्राणांचे व्यापार संयमित किंवा बंद करून केवळ आत्म्याचे ठिकाणी रत होणे.

**द्रव्ययज्ञास्तपोयज्ञा योगयज्ञास्तथापरे ।**
**स्वाध्यायज्ञानयज्ञाश्च यतयः संशितव्रताः ॥२८॥**

त्याचप्रमाणे द्रव्ययज्ञ, तपोयज्ञ, योगयज्ञ, वाग्यज्ञ व ज्ञानयज्ञ असे पाच प्रकारचे यज्ञ आहेत. कठीण व्रताचरणी योगीच हे यज्ञ करतात.

तीर्थांचे ठिकाणी जाऊन सत्पात्री दान करणे हा द्रव्ययज्ञ किंवा लोकोपयोगी कार्यासाठी द्रव्य खर्चणे हाही द्रव्ययज्ञच. पंचाग्नीसाधन, कृच्छ्र, चांद्रायणादी तप करणे हा योगयज्ञ, यम, नियम, आसन, प्रत्याहार व प्राणायाम करणे हा योगयज्ञ, शास्त्रानुसार वेदाध्ययन म्हणजे वाग्यज्ञ, व वेदांचे परिशीलन करून परब्रह्माला जाणून घेणे हा ज्ञानयज्ञ. हे पाच यज्ञ आचरण्यास अत्यंत कठीण आहेत, पण ज्यांनी इंद्रियावर विजय मिळविलेला आहे असे यती हे यज्ञ सहज करू शकतात.

**अपाने जुह्वति प्राणं प्राणेऽपानं तथापरे ।**
**प्राणापानगती रुद्ध्वा प्राणायामपरायणाः ॥२९॥**

दुसरे कोणी अपान वायूच्या ठिकाणी प्राणवायूचे हवन करतात, कोणी प्राणवायूच्या ठिकाणी अपान वायूचे हवन करतात. प्राणायामाच्या ठिकाणी तत्पर असणारे प्राणवायू व अपान वायू यांच्या गतींना रोधतात.

थेथे प्राणायामाचा प्रकार सांगितला आहे. प्राणवायू आत घेणे याला पूरक म्हणतात. त्या वायूस आंत बंदिस्त ठेवणे म्हणजे कुंभक व कोंडून ठेवलेला वायू बाहेर सोडणे म्हणजे रेचक. या तिन्ही क्रिया मिळून प्राणायाम होतो. प्राणायाम अभ्यासाने साध्य करता येतो.

**अपरे नियताहाराः प्राणान् प्राणेषु जुह्वति ।**
**सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षपितकल्मषाः ॥३०॥**

दुसरे कोणी मिताहारी बनून प्राणांचे वायूच्या ठिकाणी हवन करतात. हे सर्व यज्ञवेत्ते या निरनिराळ्या यज्ञद्वारे पातकांचा नाश करतात.

आहार संयमित करून प्राणाची प्राणांत आहुती देणे म्हणजे प्राण-अपानादी वायूंना ताब्यात ठेवणे. याला वायुजय म्हणतात. हा बारावा यज्ञ होय. ह्या यज्ञांच्या अनुष्ठानाने पातकांचा नाश होतो. पातक ज्ञानाला प्रतिबंधक म्हणून ज्ञानेच्छूने वरीलपैकी एक तरी, जो जमेल तो, यज्ञ केला पाहिजे.

**यज्ञशिष्टाऽमृतभुजो यान्ति ब्रह्म सनातनम् ।**
**नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य कुतोऽन्यः कुरुसत्तम ॥ ३१ ॥**

या यज्ञांचे अवशिष्टरूपी फल सेवन करणारे शाश्वत पदाला जातात. हे कुरुश्रेष्ठा, यापैकी एकही यज्ञ न करणाराला इहलोकी सुख मिळत नाही. मग परलोकी मिळणे कसे शक्य आहे ?

भोजनापूर्वी वैश्वदेव करून अन्न सेवन केले तर ते अमृतप्राशन केल्यासारखे होते. बारा यज्ञांपैकी कोणता तरी यज्ञ करणे हे मानवाचे कर्तव्य आहे. हे कर्तव्य न करणाऱ्यास इहलोकी जर सुख लाभू शकत नाही, तर परलोकी सुख मिळण्याची आशा कशी करता येईल.

**एवं बहुविधा यज्ञा वितता ब्रह्मणो मुखे ।**
**कर्मजान्विद्धि तान्सर्वानेवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे ॥३२॥**

याप्रमाणे पुष्कळ यज्ञांचा वेदांतून विस्तार झालेला आहे. हे यज्ञ कर्मापासून झालेले आहेत हे जाण. हे जाणल्याने तू मुक्त होशील.

या यज्ञांना वेद प्रमाणभूत आहेत. साक्षात वेदाने कथन केलेल्या या क्रिया आहेत. वेदान्ताने सांगितलेल्या सर्व अर्थाला परमेश्वर जामीन आहे. तो फलदाता आहे. अचिंत्यशक्तिमान, सर्वज्ञ, सर्वसामर्थ्यशाली असा हा सर्वेश्वर पूजनाने प्रसन्न होतो. तो प्रसन्न असला की कोठलेही दुःख स्पर्श करीत नाही. हे सर्व यज्ञ कर्मज आहेत. हे जाणले की मोक्ष संपादन करता येतो.

**श्रेयान् द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परंतप ।**
**सर्वं कर्माऽखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते ॥३३॥**

हे शत्रूतापना, द्रव्यसाधनाने साध्य होणाऱ्या यज्ञापेक्षा ज्ञानयज्ञ श्रेष्ठ आहे. हे पार्था, सर्व प्रकारच्या सर्व कर्मांचे पर्यवसान ज्ञानात होते.

ज्ञानयज्ञ मोक्षदाता आहे. इतर यज्ञ आपला संसार चांगला व यशस्वी करण्यासाठी आहेत, म्हणून सर्वांपेक्षा ज्ञानयज्ञ श्रेष्ठ आहे. ज्ञानयज्ञाने सर्वांत सुंदरातील सुंदर फळ मिळते. ज्ञान प्राप्त झाल्यावर कोणताही मोह होणार नाही. सर्व कर्मांचे पर्यवसान ज्ञानात होते. म्हणजे कोणत्याही कर्माचे अंतिम साध्य ज्ञानच असते. तत्त्वज्ञान आत्मसात झाले की पराशांतीचा लाभ घडतो.

**तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ।**
**उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ॥३४॥**

आचार्यांकडे जाऊन त्यांना प्रणिपात करणे, प्रश्न करणे, सेवा करणे, या मार्गाने ते ज्ञान प्राप्त करून घे. ज्ञानसंपन्न व अनुभवी आचार्य त्या ज्ञानाचा तुला उपदेश करतील.

गुरूकडे जाऊन त्याना नमस्कार करावा, त्यामुळे पूज्यभाव व्यक्त होतो. मग प्रश्न विचारावे. पण काहीतरी समजले असेल तर अधिक प्रश्न विचारता येतील. याचा अर्थ शिष्यही तीव्र बुद्धीचा हवा. बंध कसा येतो? मोक्ष कसा मिळतो असे प्रश्न विचारावे. असे प्रश्न विचारावे की त्यातून शिष्याच्या बुद्धीची तयारी दिसून आली पाहिजे. असे प्रश्न विचारले तर गुरु प्रसन्न होतात, जर ते 'ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः' म्हणजे साक्षात्कारसंपन्न असतील तर. गुरु 'शाब्दे परे च निष्णातः' म्हणजे वेदशास्त्र व व्यवहार यांचे सुंदर ज्ञान असलेले असले तरच ते शिष्याचे समाधान करू शकतील. भगवान श्रीकृष्णानीही सांदीपनीकडे राहून सेवा

केली. रानावनात जाऊन लाकडे गोळा करून आणण्याचेही काम केले. सांदीपनींचा पुत्र कौशिक मृत झाला असता यमाच्या संयमिनी नगरीत जाऊन त्याचा जीव परत आणला. अशा प्रकारे गुरूला प्रसन्न केल्यानेच त्याना ज्ञान प्राप्त झाले. गुरु शिष्याकडून कशाचीही अपेक्षा करीत नाही. मात्र शिष्याने अर्जुनाप्रमाणे 'शिष्यस्तेहं शाधि मां त्वां प्रपन्नम्' अशी संपूर्ण शरणागती दिलेली असली पाहिजे.

अशा शरणागत शिष्याला सद्गुरु त्याचे सर्व मोह व शोक यांचा नाश करून आत्मज्ञान करून देतो. व्यवहारातील ज्ञान, शाळेत शिकलेली विद्या, जगातील वस्तूची माहिती हे ज्ञान अनात्म्यासंबंधी असल्याने वेळेवर उपयोगी पडतेच असे नाही. ते विसरले जाते. मात्र सद्गुरूनी करून दिलेले आत्मज्ञान कधीही नाश पावत नाही. प्रत्येकाला आत्मज्ञान असते, पण ते सामान्यरूपाने असते. ते कार्यक्षम बनविण्यासाठी साधना व उपासना केली पाहिजे.

**यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पाण्डव ।**
**येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि ॥३५॥**

हे पांडवा, हे ज्ञान झाल्यावर तुला याप्रमाणे पुनः मोह होणार नाही. आत्मस्वरूप असलेल्या माझ्या ठिकाणी सर्व भुते आहेत असे या ज्ञानाच्या योगाने तू पाहशील.

साक्षात्कारी पुरुषाला सर्व भूते स्वतःच्या व भगवंताच्या ठिकाणी दिसतात, कारण तोही परमेश्वरस्वरूप झालेला असतो. ईश्वराला चिंता, भय, दैन्य, यापैकी काही नसते. साक्षात्कारी पुरुषही अशाच कोटीत पोहोचलेला असतो. त्यामुळे त्याला पुनः मोह होत नाही.

**अपि चेदसि पापेभ्यः सर्वेभ्यः पापकृत्तमः ।**
**सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं संतरिष्यसि ॥३६॥**

सर्व पापी माणसात अत्यंत पाप करणारा जरी तू असलास, तरी ज्ञानरूपी नौकेने तू सर्व पापे तरून जाशील.

पातके प्रत्यक्ष दिसत नाहीत, पण त्यामुळे विस्मरण होते. कर्णाने आपण ब्राह्मण आहोत असे खोटे सांगून आपल्या गुरूला परशुरामांना फसविले. या पातकाच्या परिणामामुळे त्याला ऐन वेळी शिकलेल्या विद्येचे विस्मरण झाले. म्हणून पातके घालविण्यासाठी प्रयत्नशील असले पाहिजे. ज्ञानरूपी नौका ज्याने हस्तगत केली तो जरी पाप्यातला अग्रणी असला तरी तो पापसमुद्र तरून जातो. पापांचा संपूर्ण नाश करण्यासाठी, कर्म, उपासना, जप, तप अशा साधनांचा उपयोग होत नाही. त्यासाठी ज्ञानच हवे.

**यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मसात् कुरुतेऽर्जुन ।**
**ज्ञानाग्निः सर्व कर्माणि भस्मसात् कुरुते तथा ॥३७॥**

हे अर्जुना, प्रज्वलित केलेला अग्नी जसे काष्टांचे भस्म करतो, तसे ज्ञानरूपी अग्नी सर्व कर्मांना भस्म करून टाकतो.

संचित, प्रारब्ध आणि क्रियमाण असे कर्माचे तीन प्रकार आहेत. ज्ञान झाल्यावर संचित व क्रियमाणांचा नाश होतो, पण प्रारब्ध शिल्लक राहते. पण त्याचा जोर गेलेला असतो. त्यामुळे ज्ञानी पुरुषास प्रारब्धाची पीडा होत नाही. ज्ञान व कर्म यांचा विरोध नसून ज्ञान व अज्ञान यांचा विरोध आहे. म्हणून ज्ञान झाले की अज्ञान जाते. ' दुख–जन्म दोषप्रवृत्तिमिथ्याज्ञानानां उत्तरोत्तरापाये तदनंतरापायात् अपवर्गः ' या सूत्राप्रमाणे अज्ञान गेले की बाकी सर्व जाते. उतरंडीवरील एक एक भांडे काढत बसण्यापेक्षा तळातले भांडे काढले की त्यावरची सर्व ढासळतात. सर्व कर्मे अज्ञानावर रचलेली आहेत. अज्ञानच काढून टाकले की सर्व कर्मे नाहीशी होतात. कर्मे राहिली तरी त्यांचा बंध निर्माण होत नाही. अज्ञान गेल्यावर राहिलेली कर्मे

ही निर्बल असतात. सापाचे दात पाडले किंवा विंचवाची नांगी ठेचल्यावर ते जसे असून नसल्यासारखे असतात, तसे अज्ञान गेल्या-वरची कर्मे असतात. सुंभ जळल्यावर पीळ राहतो हे खरे, पण त्या सुंभाने कांही बाज विणता येत नाही. धान्य भाजून त्याची भाजणी खमंग होईल, पण ते पेरता येत नाही.

तुपाचे भांडे रिकामे असले तरी त्याचा ओशटपणा एकदा विसळून जात नाही. दोनचारदा सोडासाबण लावून स्वच्छ केल्याशिवाय ओशटपणा जात नाही. ओशटपणा म्हणजे तुपाचा अंशच. पण अंशाचा जेवताना वाढण्यासाठी उपयोग होत नाही. ज्ञानी पुरुषाचे प्रारब्ध असेच असते. त्याचा प्रत्यक्षात जोर नसतो. सीताहरणानंतर रामाने सामान्य माणसाप्रमाणे शोध केला, तो केवळ सामान्यांच्या समाधानासाठी. ज्ञानी पुरुषांना खरे दुःख होत नाही. कारण दुःखप्रसंगी ते आपले मन आत्म्याकडे वळवून आत्मानंदात रमबाण होतात.

**नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।**
**तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विंदति ॥३८॥**

ज्ञानासारखी पवित्र करणारी वस्तु या जगामध्ये कोणतीही नाही. योगाचरणाने स्वतः योग्यता प्राप्त झालेल्या मुमुक्षूला हे आत्मज्ञानविषयक ज्ञान यथाकाळी प्राप्त होते.

अश्वमेधासारखी कर्मे केल्यानेही पापे नष्ट होतात व ती मानवाला पवित्र करतात, पण ज्ञानाची सर त्यांना येणार नाही. यागाने पाप जाते. पण समूळ नष्ट होत नाही. पुनः पातके निर्माण होतात. पण एकदा ज्ञान झाले की पुनः कर्म करावे ही प्रवृत्ती नष्ट होत असल्याने पुनः पातक होण्याची शक्यता नसते. प्रायश्चित्त म्हणून एखादा याग केला तरी अविवेक राहतो. कितीही कर्मे केली तरी काम, क्रोध व

लोभ ही नरकाची द्वारे बंद होत नाहीत. ज्ञानाने मात्र त्यांचा पूर्ण बीमोड होतो.

जड भरताने समृद्ध राज्याचा त्याग करून गंडकी तीरावरील पुलहाश्रमात खडतर तपास प्रारंभ केला. तो स्नानाकरिता नदीवर ज्या वेळी आला, त्याच वेळी पाणी पिण्याकरता एक हरिणी पण आली. पाणी पीत असता वाघाची डरकाळी ऐकू आल्याने तिने उडी मारली. त्यामुळे तिचा गर्भपात झाला. नवजात शावकाला तेथेच सोडून ती हरिणी पसार झाली. जडभरताला त्या शावकाची दया आली. त्याने त्या पिलाला आश्रमात आणले. हिंस्र श्वापदापासून त्याचे रक्षण करावे एवढाच त्याचा प्रथम उद्देश होता. पण पुढे त्याला त्या पिल्लाचा इतका लळा लागला की, त्याच्या तपात खंड पडू लागला. अंतकाळी त्याचाच ध्यास लागल्याने तो हरिणाच्या जन्मास आला. म्हणजे नुसते तप व याग केले तरी पुनः जन्म घ्यावा लागतो. पण ज्ञान झाले की सर्वांतून मुक्ती मिळते. म्हणून ज्ञान हे परम पवित्र आहे.

ज्ञान इतके पवित्र व सुंदर असूनही मानवाची ते प्राप्त करून घेण्याची प्रवृत्ती दिसत नाहीं. व जे त्या मार्गाला लागतात, त्यांना लवकर लाभत नाही. असे कां व्हावे.

डॉक्टर होण्यासाठी प्रवेश हवा असेल तर एक तर परीक्षेत उत्तम गुण मिळविले पाहिजेत किंवा मागतील तितकी देणगी देण्याची तरी ताकद हवी. पण पैशाने प्रवेश मिळाला व अभ्यास चांगला नसेल तर पदवी प्राप्त करून घेता येईलच असे नाहीं. डॉक्टर होण्यासाठी जर अशी योग्यता लागते, तर आत्मज्ञान होण्यासाठी केवढी तयारी हवी याची कल्पनाच केलेली बरी. म्हणून मुमुक्षूने योगसंसिद्ध बनले पाहिजे. फलेच्छा व कर्तृत्वाभिमान सोडून आपल्या वाटयास आलेली कर्मे करीत राहिल्याने ज्ञानग्रहण–क्षमता अंगी येते. अशी योग्यता आली तरी ज्ञान

प्राप्ती होण्यास काहीं काळ जावा लागतोच. बी पेरताक्षणी धान्य तयार होत नाही. अत्यंत हुषार मुलगा असला तरी वयाला पंधरा वर्षे पूर्ण झाल्याखेरीज त्याला मॅट्रिकच्या परीक्षेस बसता येत नाही. एकदम कोणतीच गोष्ट होत नाही– ' कालेन परिपच्यंते कृषिगर्भादयो यथा '

**श्रद्धावाँल्लभते ज्ञानं तत्परः संयतेंद्रियः ।**
**ज्ञानं लब्ध्वा परां शान्तिमचिरेणाधिगच्छति ॥ ३९ ॥**

श्रद्धावान, तत्पर आणि जितेंद्रिय पुरुषाला ज्ञान प्राप्त होते. ज्ञान प्राप्त झाल्यावर अत्यंत श्रेष्ठ अशी शांती त्याला मिळते.

ज्ञानग्रहणाच्या योग्यतेबरोबरच श्रद्धा हवी. गुरु, संत व वेदांत हे सर्व मानवांच्या कल्याणासाठी प्रवृत्त झालेले असतात. या सर्वांची ' हे जीवा तूं ब्रह्म आहेस ' ही एकच शिकवण आहे. मी जर रोज दुःख भोगतो तर मीच ब्रह्म कसा असेन अशी शंका न घेता साधुसंतांच्या वचनांवर श्रद्धा ठेवून प्रयत्न केला पाहिजे. असा दृढ विश्वास ठेवूनही दुःख दूर झाले नाही, तरी तो साधूसंतांना नावे ठेवीत नाही. आपल्यातच काही दोष असला पाहिजे, म्हणून तो आत्मपरीक्षण करतो. त्याला आपले दोष कळू लागतात. ते दोष घालवण्यासाठी तो तत्पर होतो. तो वायफळ बोलत नाही. निषिद्ध क्रिया करीत नाही. ज्ञानप्राप्तीसाठी इंद्रियांवर ताबा असावा लागतो. अमुक अनुष्ठान किंवा ठराविक कर्मे केलीच पाहिजेत असा जो शास्त्रात निर्बंध आहे, त्याचा हेतु इंद्रियांना ताब्यात ठेवण्याची सवय व्हावी हाच आहे.

ज्ञानाने सर्व दुःखांची निवृत्ती व सर्व सुखांची प्राप्ती होते. यालाच शास्त्रकार फळ म्हणतात. बाकी सर्व साधने आहेत. मनुष्याचे दुःख गेले किंवा सुख झाले तरी तो पुनः धडपडत असतो. याचाच अर्थ दुःख पूर्ण गेलेले नसते व पूर्ण सूखही झालेले नसते. ज्ञान झाले की सुखाचा

लोभ ही नरकाची द्वारे बंद होत नाहीत. ज्ञानाने मात्र त्यांचा पूर्ण बीमोड होतो.

जड भरताने समृद्ध राज्याचा त्याग करून गंडकी तीरावरील पुलहाश्रमात खडतर तपास प्रारंभ केला. तो स्नानाकरिता नदीवर ज्या वेळी आला, त्याच वेळी पाणी पिण्याकरता एक हरिणी पण आली. पाणी पीत असता वाघाची डरकाळी ऐकू आल्याने तिने उडी मारली. त्यामुळे तिचा गर्भपात झाला. नवजात शावकाला तेथेच सोडून ती हरिणी पसार झाली. जडभरताला त्या शावकाची दया आली. त्याने त्या पिलाला आश्रमात आणले. हिंस्र श्वापदापासून त्याचे रक्षण करावे एवढाच त्याचा प्रथम उद्देश होता. पण पुढे त्याला त्या पिल्लाचा इतका लळा लागला की, त्याच्या तपात खंड पडू लागला. अंतकाळी त्याचाच ध्यास लागल्याने तो हरिणाच्या जन्मास आला. म्हणजे नुसते तप व याग केले तरी पुन: जन्म घ्यावा लागतो. पण ज्ञान झाले की सर्वांतून मुक्ती मिळते. म्हणून ज्ञान हे परम पवित्र आहे.

ज्ञान इतके पवित्र व सुंदर असूनही मानवाची ते प्राप्त करून घेण्याची प्रवृत्ती दिसत नाहीं. व जे त्या मार्गाला लागतात, त्यांना लवकर लाभत नाही. असे कां व्हावे.

डॉक्टर होण्यासाठी प्रवेश हवा असेल तर एक तर परीक्षेत उत्तम गुण मिळविले पाहिजेत किंवा मागतील तितकी देणगी देण्याची तरी ताकद हवी. पण पैशाने प्रवेश मिळाला व अभ्यास चांगला नसेल तर पदवी प्राप्त करून घेता येईलच असे नाहीं. डॉक्टर होण्यासाठी जर अशी योग्यता लागते, तर आत्मज्ञान होण्यासाठी केवढी तयारी हवी याची कल्पनाच केलेली बरी. म्हणून मुमुक्षूने योगसंसिद्ध बनले पाहिजे. फलेच्छा व कर्तृत्वाभिमान सोडून आपल्या वाट्यास आलेली कर्मे करीत राहिल्याने ज्ञानग्रहण–क्षमता अंगी येते. अशी योग्यता आली तरी ज्ञान

प्राप्ती होण्यास काहीं काळ जावा लागतोच. बी पेरताक्षणी धान्य तयार होत नाही. अत्यंत हुषार मुलगा असला तरी वयाला पंधरा वर्षे पूर्ण झाल्याखेरीज त्याला मॅट्रिकच्या परीक्षेस बसता येत नाही. एकदम कोणतीच गोष्ट होत नाही– ' कालेन परिपच्यंते कृषिगर्भादयो यथा '

**श्रद्धावाँल्लभते ज्ञानं तत्परः संयतेंद्रियः ।**
**ज्ञानं लब्ध्वा परां शान्तिमचिरेणाधिगच्छति ॥ ३९ ॥**

श्रद्धावान, तत्पर आणि जितेंद्रिय पुरुषाला ज्ञान प्राप्त होते. ज्ञान प्राप्त झाल्यावर अत्यंत श्रेष्ठ अशी शांती त्याला मिळते.

ज्ञानग्रहणाच्या योग्यतेबरोबरच श्रद्धा हवी. गुरु, संत व वेदांत हे सर्व मानवांच्या कल्याणासाठी प्रवृत्त झालेले असतात. या सर्वांची ' हे जीवा तूं ब्रह्म आहेस ' ही एकच शिकवण आहे. मी जर रोज दुःख भोगतो तर मीच ब्रह्म कसा असेन अशी शंका न घेता साधुसंतांच्या वचनांवर श्रद्धा ठेवून प्रयत्न केला पाहिजे. असा दृढ विश्वास ठेवूनही दुःख दूर झाले नाही, तरी तो साधूसंतांना नावे ठेवीत नाही. आपल्यातच काही दोष असला पाहिजे, म्हणून तो आत्मपरीक्षण करतो. त्याला आपले दोष कळू लागतात. ते दोष घालवण्यासाठी तो तत्पर होतो. तो वायफळ बोलत नाही. निषिद्ध क्रिया करीत नाही. ज्ञानप्राप्तीसाठी इंद्रियांवर ताबा असावा लागतो. अमुक अनुष्ठान किंवा ठराविक कर्मे केलीच पाहिजेत असा जो शास्त्रात निर्बंध आहे, त्याचा हेतु इंद्रियांना ताब्यात ठेवण्याची सवय व्हावी हाच आहे.

ज्ञानाने सर्व दुःखांची निवृत्ती व सर्व सुखांची प्राप्ती होते. यालाच शास्त्रकार फळ म्हणतात. बाकी सर्व साधने आहेत. मनुष्याचे दुःख गेले किंवा सुख झाले तरी तो पुनः धडपडत असतो. याचाच अर्थ दुःख पूर्ण गेलेले नसते व पूर्ण सूखही झालेले नसते. ज्ञान झाले की सुखाचा

ठेवाच हस्तगत होतो. म्हणून ज्ञानी पुरुषाला परा शांती—कधीही नाश न पावणारी शांती-मिळते.व्यवहारातील शांती किंचित काळ टिकणारी असते.

सुंदर रूप पाहून डोळे, सुवासाने नासिका, मऊ मुलायम स्पर्शाने त्वचा, सुस्वर गायनाने कान व रूचकर पदार्थाने जिव्हा शांत होते. पण सर्व इंद्रिये कायमची शांत होण्याचे साधन फक्त ज्ञानच आहे. ज्ञानामुळे इतके पावित्र्य येते की, ज्ञानी पुरुषाच्या पादुका—अस्थि हे सुद्धा पूजनीय ठरतात. ज्ञानी पुरुषाच्या दृष्टीत इतके तेज असते की, तो ज्याचेवर दृष्टी टाकेल तो पापमुक्त होतो.

**अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति ।**
**नायं लोकोस्ति न परो न सुखं संशयात्मनः ॥४०॥**

आत्मज्ञानहीन, श्रद्धाहीन व संशयी पुरुष नाश पावतो. संशयी मनुष्याला इहलोक साधत नाही, परलोक साधत नाही किंवा सुखही मिळत नाही.

अज्ञान, अश्रद्धा आणि संशय या तिघांमुळे माणूस पुरुषार्थापासून भ्रष्ट होतो. पण त्यांतूनही संशय फारच वाईट. अज्ञान साधनाने घालविता येते. भगवंतांचे गुणानुवाद ऐकवून अश्रद्धाला सश्रद्ध बनविता येते. पण संशय नाहीसा करणे अतिशय कठीण. ईश्वरानुग्रह असेल तरच संशय जाऊ शकेल. ईश्वरही भक्त अनन्यगती झाल्याशिवाय कृपा करीत नाही. द्रौपदीची सभेत विटंबना झाली. पाच पती, भीष्मद्रोणादि आचार्य काहीच हालचाल करीत नाहीत. असे पाहिल्यावर द्रौपदीने श्रीकृष्णाचा धावा केला, तेव्हा अनंत वस्त्रे पुरवून तिची लाज राखली. अज्ञान व अश्रद्धा असेल तर परलोक व परमार्थ साधता येत नाही, पण इहलोक मिळतो. पण संशयी माणसाला इहलोक, परलोक अगर सुख यापैकी कशाचाच लाभ होत नाही. म्हणून मनातून संशयाची हकालपट्टी केली पाहिजे.

दुसऱ्या अध्यायात भगवंतानी ज्ञानयोग व तिसऱ्या अध्यायात कर्मयोगाचे प्रतिपादन केले. या चवथ्या अध्यायात या दोन्ही योगांचा उपसंहार केला आहे. निष्काम व कर्तृत्वाभिमान सोडून कर्म करणे म्हणजे कर्मयोग. सर्व कर्मे भगवंतास अर्पण करणारास कर्मयोगाचे फल म्हणजे ज्ञान लाभते. ज्ञान झाले की सर्व संशय दूर होतात. संशयरहित व आत्मज्ञानसंपन्न पुरुषास कर्मे बंधन करीत नाहीत.

**योगसंन्यस्तकर्माणं ज्ञानसंछिन्नसंशयम् ।**
**आत्मवन्तं न कर्माणि निबध्नन्ति धनंजय ॥ ४१ ॥**

हे धनंजया, योगाने ज्याने कर्मे ईश्वरार्पण केली आहेत. आणि अद्वैत ज्ञानाने ज्याचा संशय गेला आहे, अशा आत्मवेत्त्या पुरुषाला कर्मे बाधत नाहीत.

मनुष्याला जन्मच्या जन्म अनात्म पदार्थच मिळतात. ययाति स्वानुभवाने सांगतो,

' पृथिव्यां यानि रत्नानि हिरण्यं पशवो गाश्च ।
नालं एकस्य पर्याप्तं इति मत्वा शमं व्रजेत ॥ '

जगांतले सर्व सुवर्ण, सर्व स्त्रिया, सर्व रत्ने, सर्व धान्य जरी मिळाले तरी समाधान होत नाही. पण एक आत्मज्ञान झाले की कायमचे समाधान—नित्यतृप्ती—लाभते.

आत्मज्ञानी पुरुषाची कर्मात प्रवृत्ती नसते. त्याने कर्मे केली तरी त्याला बंधनकारक होत नाहीत. सोळासहस्र नारींशी विवाह करूनही श्रीकृष्ण ब्रह्मचारीच म्हणवून घेत होता. दुर्वासांना एकदा यमुना पार करायची होती. यमुना दुथडी वहात होती. दुर्वास यमुनेला म्हणाले, ' जर मी आजन्म उपाशी असेन तर मला वाट दे ' यमुनेने तात्काळ वाट दिली. वास्तविक दुर्वासाना खंडीभर अन्न लागत असे, श्रीकृष्णाने

इतक्या बायका भोगल्या व दुर्वासानी इतके अन्न सेवन केले, तरी ते त्यांना बंधनकारक नव्हते. कारण ते आत्मज्ञानी होते. ज्ञानी असा करून अकर्ता असतो.

**तस्मादज्ञानसंभूतं हृत्स्थं ज्ञानासिनात्मनः ।**
**छित्वैनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत ॥ ४२ ॥**

अज्ञानापासून उत्पन्न झालेल्या व स्वतःच्या हृदयाच्या ठिकाणी असलेल्या संशयाचा ज्ञानरूपी खड्गाने छेद करून आपल्या क्षात्रधर्माला उचित अशा कर्मयोगाचा अवलंब कर. हे भरत–कुलोत्पन्ना युद्धाला उभा रहा.

अश्रद्ध माणसाची देवावर वा शास्त्रावर श्रद्धा नसली तरी त्याची कुठे तरी श्रद्धा असते. स्वतःच्या पत्नीवर तरी त्याची श्रद्धा असते. म्हणून सर्व पगार तिच्या हवाली करून तिच्या मनाप्रमाणे वागतो. प्रयत्न केला तर असा माणूसही साधूसंत-भगवंतावर विश्वास ठेवू लागेल. आपल्या मनांत जे संशय असतात, ते सर्व अज्ञानामुळे निर्माण झालेले असतात. ज्ञानरूपी खड्ग हाती घेऊन या संशयांचा नाश केला की, कर्तव्य करण्यास मनुष्य सिद्ध होतो.

इति श्रीमद् भगवद् गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे ज्ञानसंन्यासयोगो नाम चतुर्थोऽध्यायः

◊ ◊ ◊

# अध्याय ५ वा.

अर्जुन उवाच—

**संन्यासं कर्मणां कृष्ण पुनर्योगं च शंससि ।**
**यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितम् ।। १ ।।**

अर्जुन म्हणाला— हे कृष्णा, एकदा कर्माचा त्याग करावा आणि पुनः कर्माचे अनुष्ठान करावे असेही तू सांगतोस. या दोहोपैकी तुझ्या मते खरोखर श्रेयस्कर कोणते ते एक निश्चितपणे सांग.

आतापर्यन्त भगवन्तानी केलेल्या बोधामुळे अर्जुनाच्या मनात गोंधळ निर्माण झाला आहे. म्हणून निर्णयात्मक काही सांगण्याची तो विनंती करीत आहे. कर्मयोग श्रेष्ठ की कर्मसंन्यास श्रेष्ठ? जो विरक्त नाही त्याने कर्मयोग आचरावा व विरक्ताने कर्मसंन्यास करावा असे भगवंताचे सांगणे आहे का? कर्मयोगातही कर्मफलाची आसक्ती सोडावी लागते, म्हणजे विरक्ती आलीच. अविद्वानाने कर्मयोग व विद्वानाने कर्मसंन्यास आचरावा की काय? पण विद्वान म्हणजे साक्षात्कारसंपन्न पुरुषाची कर्मे पक्व फळाप्रमाणे आपोआप गळून पडतात, असे असता संन्यास घेऊन ती सोडण्याची काय आवश्यकता? का ही दोन्ही साधने एकानेच करावयाची आहेत? असा अर्जुनाच्या मनातील उडालेला गोंधळ लक्षात घेऊन भगवंत सांगतात—

भगवान उवाच—

**संन्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ ।**
**तयोस्तु कर्मसंन्यासात्कर्मयोगो विशिष्यते ।।२।।**

भगवान म्हणतात, कर्माचा त्याग आणि अनुष्ठान ही दोन्ही श्रेयस्कर (मोक्ष देणारी) आहेत. पण कर्मसंन्यासापेक्षा कर्मयोग विशेष श्रेष्ठ आहे.

कर्मयोग आणि कर्मसंन्यास हे दोन्हीही मार्ग मोक्ष देणारे आहेत. पण कर्मयोगाचा विशेष असा की, तो जाणत्यांना व नेणत्यांनाही आचरण्यास सुलभ आहे. 'संन्यस्य श्रवणं कुर्यात्' असा नियम आहे. पण श्रवण पराधीन आहे. सांगणारा चांगला असला पाहिजे. सांगणारा चांगला असला तरी ऐकणाऱ्याला सवड असेलच असे नाही. म्हणजे दोघांची वेळ जमली पाहिजे. शिवाय नुसते श्रवण करून भागत नाही. श्रवणानंतर मनन व विचारविनिमय करावा लागतो व त्यासाठी दुसऱ्यावर अवलंबून राहावे लागते. कर्मसंन्यासात सर्व कर्मांची जबाबदारी त्या व्यक्तीवर पडते. पण कर्मयोगी सर्व कर्मांची जबाबदारी ईश्वरावर टाकून मोकळा होतो. सर्व काही ईश्वरच करतो, ही भावना असल्याने त्याला कर्तृत्वाभिमान उरत नाही. कर्मयोग आचरणाऱ्याला 'साधोः संगमुपासतेहि सततम्' या न्यायाने सज्जनांच्या संगतीचा लाभ घडतो. तसे संन्यासात घडत नाही. कर्मयोग आचरण्याने आपल्याबरोबर इतरांचाही उद्धार होतो. तुम्ही सत्यनारायण करण्याचे ठरविले तर तुमच्याबरोबर घरातील इतर मंडळींनाही त्यांचा विश्वास नसला तरी पूजेसाठी मदत करावी लागते व त्याचे फळ त्यांना अनायासे मिळते. तुमच्याबरोबर परिवाराचेही हित होते. शास्त्रकारांनी सकाळपासून रात्रीपर्यंत कर्मे सांगितली आहेत. ती सर्व करून मग भोग घ्यायचे. कर्मयोगात कर्म प्रधान व भोग हे आनुषंगिक. पण आनुषंगिक असले तरी कर्मयोग्यास भोग घेता येतात. संन्याशी स्वतःच भिक्षा मागून निर्वाह करणार. तो इतरांना कसा उपयोगी पडेल? साधुसंगतीने मिष्टान्न--पान मिळते, तसा संन्यासात लाभ नाही. कर्मयोग असा कुणालाही आचरता येण्यासारखा असून शिवाय त्यात अनेक फायदे आहेत. म्हणून कर्मयोग विशेष श्रेयस्कर आहे.

**ज्ञेयः स नित्यसंन्यासी यो न द्वेष्टि न कांक्षति ।**
**निर्द्वन्द्वो हि महाबाहो सुखं बंधात्प्रमुच्यते ॥ ३ ॥**

हे महाबाहो, जो कोणाचा द्वेष करीत नाही व जो कशाची इच्छा करीत नाही, असा कर्मयोगी नित्यसंन्यासीच जाणावा. रागद्वेषादि द्वन्द्वांनी रहित असलेला तो बंधापासून अनायासे मुक्त होतो !

कर्मयोग आचरणारा नित्यसंन्यासी असल्याने त्याला कर्मयोग व संन्यास या दोहोंचे फल मिळते. पण कर्मयोगी कर्म करून फळ मागत नाही. फल नाहीतर कर्मतरी कशाला करायचे, असा तो त्रागा करीत नाही. व्यवहारात कोणतेही कार्य साध्य करून घ्यायचे झाल्यास द्वन्द्व-सहिष्णुता असावी लागते. परीक्षेत उत्तम गुण मिळवायाचे झाल्यास जाग्रण करून अभ्यास केला पाहिजे. झोप येऊ नये म्हणून कमी जेवले पाहिजे. पहाटेच्या गुलाबी थंडीतील साखरझोपेचा त्याग करावा लागतो. अशा रितीने निरपेक्षता, निर्द्वंद्वता व द्वेषरहितता अंगी बाणल्यामुळे तो संन्यासीच बनतो.

आईवडील मुलाचे पालन करतात ते कर्तव्य म्हणून. त्याला शिकवून मोठा करतात. त्याच्या शिक्षणासाठी घरे जमिनीही विकतात. खूप खर्च करून त्याचा विवाह करून देतात. वार्धक्यात तो मुलगा आपले पालनपोषण करीलच, अशी खात्री नसते. तरीही आई-वडील आपले कर्तव्य करतात. कर्मयोगीही शास्त्राने सांगितलेली सर्व विहित कर्मे कर्तव्य—भावनेने पार पाडतो. मी त्याचा परमेश्वराचा सेवक असून त्याचेसाठी सर्व कर्मे करतो, अशी त्याची भावना असल्याने त्याच्या अंतःकरणातील रजोगुण व तमोगुण कमी होऊन सत्त्वगुणाची वाढ होते. त्याचे मन उदार बनते. म्हणून कर्मयोग सर्व बंधनापासून सुटका करणारा आहे.

**सांख्ययोगौ पृथग्बालाः प्रवदन्ति न पण्डिताः ।**
**एकमप्यास्थितः सम्यगुभयोर्विन्दते फलम् ॥४॥**

सांख्ययोग व कर्मयोग भिन्न फळ देणारे आहेत असे अज्ञ बोलतात. ज्ञानी तसे म्हणत नाहीत. यापैकी एकाचे जरी योग्य प्रकारे अनुष्ठान केले तरी ते करणाराला दोहोंचे फल ( मोक्ष ) लाभते.

सांख्ययोग म्हणजे विचारणा, चर्चा करून ज्ञान संपादण्याचा मार्ग. विहित कर्मे निष्कामबुद्धीने करणे हा कर्मयोग हे दोन्ही योग एकच आहेत असे पंडित मानतात. मूर्ख लोक मात्र ते भिन्न आहेत असे म्हणतात. कर्मयोगाचे उत्कृष्टपणे आचरण करणारा व संन्यास घेऊन ज्ञान संपादन करणारा दोघेही सारखेच वंद्य मानले जातात. दोन्ही मार्ग सारखेच असता कर्मयोगाचाच आग्रह का? कारण कर्मयोगी कोणतेही काम स्वतःचे म्हणून करीत नाही, तर ते ईश्वराचे कार्य म्हणून करतो. त्यामुळे त्याला कर्माबद्दल चिंता अगर काळजी वाटत नाही. कर्म करूनही तो निश्चिंत असतो. यासाठी कर्मयोगाचा आग्रह.

**यत् सांख्यैः प्राप्यते स्थानं तद्योगैरपि गम्यते ।**
**एकं सांख्यं च योगं च यः पश्यति स पश्यति ॥ ५ ॥**

सांख्यमार्गाने जाणाऱ्यांना जे स्थान ( मोक्ष ) प्राप्त होते, तेच निष्काम कर्मयोगाचे अनुष्ठान करणाऱ्यास प्राप्त होते. सांख्ययोग एकच आहे हे जाणणारा खरा ज्ञानी होय.

कर्मयोगात फळाची अपेक्षा करायची नसते, म्हणजे कर्मयोगातही वैराग्य लागते. संन्यास तर वैराग्याशिवाय होतच नाही. मग संन्यास श्रेष्ठ का नाही?

संन्यासाला प्रखर वैराग्य लागते, अन्यथा तो सफळ होत नाही. अतिशय भूक लागली असता जेवणाशिवाय इतर काही सुचत नाही. तसेच ज्ञानाची तीव्र इच्छा प्रबळ झाली की, असा पुरुष संन्यास घेऊन मोकळा होतो. त्यासाठी तो दिवस अगर मुहूर्ताची वाट बघत नाही. पण वैराग्य जर तात्पुरते असेल व संन्यास घेतला तर तो संन्यासी

आरूढपतित होतो. म्हणजे अरत्र ना परत्र अशी त्याची अवस्था होते. संन्यासात ही भीति असल्याने कर्मयोग सुलभ व श्रेयस्कर.

कर्मयोग व सांख्ययोग या दोहोंचे उद्दिष्ट एकच आहे. ते म्हणजे ज्ञान मिळविणे—साक्षात्कारसंपन्न होणे. म्हणून ते दोन्ही योग एकच आहेत हे जो जाणतो, तोच खरा जाणणारा म्हणजे ज्ञानी होय.

**संन्यासस्तु महाबाहो दुःखमाप्तुमयोगतः ।**
**योगयुक्तो मुनिर्ब्रह्म न चिरेणाधिगच्छति ॥ ६ ॥**

हे महाबाहो, पण कर्मयोगावाचून कर्मसंन्यासाची प्राप्ती होणे दुष्कर आहे. कर्मयोगयुक्त मुनीला ब्रह्माची प्राप्ती लवकर होते.

कर्मयोग आचरताना निष्काम कर्म केले व इतर वेळी तो सकाम झाला तरी चालते. पण एकदा संन्यास घेतल्यावर पुनः विवाह करणे किंवा एखाद्या नोकरीसाठी अर्ज करणे योग्य ठरत नाही. कर्मयोगाला अल्प वैराग्य पुरते, तेही विवेकाने आलेले. काही लोक नियमाने संध्याकाळी प्रवचनाला जातात. त्यावेळी कितीही काम असले तरी ती सर्व बाजूला सारून वेदांत श्रवणासाठी थोडा वेळ देतात. हा अल्पसा त्यागच होय. कोणतीही विद्या शिकत असता थोडा ना थोडा त्याग हा करावाच लागतो. दिवसाचा सर्व काळ केवळ संसारासाठी खर्च करण्यापेक्षा थोडा तरी काळ देवधर्माकडे गेला, तर कर्मयोग आचरल्याचे श्रेय मिळेल.

**योगयुक्तो विशुद्धात्मा विजितात्मा जितेंद्रियः ।**
**सर्वभूतात्मभूतात्मा कुर्वन्नपि न लिप्यते ॥७॥**

निष्काम कर्मयोगरत असलेला, शुद्धचित्त, जितेन्द्रिय, व ज्याचा आत्मा सर्वांच्या ठिकाणी असलेल्या आत्म्याशी एकरूप झाला आहे, असा मनुष्य कर्म करीत असला तरी त्यापासून अलिप्त असतो.

कर्मयोग आचरल्याने शरीर, वाणी व मन सर्व शुद्ध होते व अशा पुरुषाला ज्ञानाशिवाय दुसरी कशाची अपेक्षा रहात नाही. मानवातील दोष नाहीसे झाले की साक्षात् ईश्वरच त्याला शोधत येतो. त्याची तयारी किती झाली आहे याची परीक्षा बघतो. कमी असल्यास आपल्या कृपेची भर घालतो व स्वतः किंवा कुणाच्या तरी द्वारा त्याला ज्ञान करून देतो. बुद्धिवान विद्यार्थी असेल तर शिक्षक आपणहून त्याला पुस्तके देतात, त्याच्या अडीअडचणी निवारण करतात. पण विद्यार्थी निर्बुद्ध असेल तर दुप्पट फी देऊ लागला, तरी शिक्षक त्याला टाळतात.

निष्काम कर्मयोगामुळे बुद्धी सुंदर होते. प्रथम आपल्यामध्ये दोष आहेत ही जाणीव हवी, नंतर ते दोष जावेत अशी इच्छा व्हायला पाहिजे व त्यानंतर ते घालविण्यासाठी प्रयत्न हवेत. जो कोणी आपल्यात दोषच नाहीत असे प्रतिपादन करीत असेल, तो मूर्तिमंत दोषांचा पुतळाच समजावा. काळ्या कांबळ्यावर काळ्या शाईची दौत उपडी झाली तरी डाग पडल्याचे दिसत नाही. डाग दिसत नाही म्हणून तो काढण्याचाही प्रयत्न केला जात नाही. परीटघडीच्या शुभ्र वस्त्रावर शाईचा बारीक शिंतोडा उडाला तरी उठून दिसतो. डाग दिसल्यामुळे तो काढून टाकण्याची खटपट केली जाते. म्हणून निर्दोष व शुद्ध पदार्थाची किंमत केव्हाही अधिक ठरते.

सोने आणि लोखंड, रॉकेल आणि पेट्रोल हे पदार्थ मातीतूनच काढले जातात. सोने आणि पेट्रोलमध्ये लोखंड व रॉकेलपेक्षा शुद्धता अधिक म्हणून त्यांचे मूल्यही अधिक. कर्मयोगाचरणाने जो कायावाचा-मनाने शुद्ध होते, त्याची किंमत इतकी वाढते की, त्याला ईश्वराशिवाय दुसरे कोणी घेऊच शकत नाही. जीवाचा व परमेश्वराचा असा संबंध जुळून आला की जीवाचा भ्रम नाहीसा होतो. आपणच परब्रह्म आहोत असे त्याला ज्ञान होते. सर्वांतरयामी असलेला सर्वभूतात्मा

म्हणजे मीच आहे असा त्याला प्रत्यक्ष अनुभव येतो. असे ज्ञान झाल्यावर कर्तृत्वाभिमानच उरत नाही व तो कर्मबंधातून मुक्त होतो.

नैव किंचित्करोमीति युक्तो मन्येत तत्त्ववित् ।
पश्यन्शृण्वन्स्पृशञ्जिघ्रन्नश्नन्गच्छन्स्वपञ्श्वसन् ॥८॥
प्रलपन्विसृजन्गृण्हन्नुन्मिषन्निमिषन्नपि ।
इंद्रियाणींद्रियार्थेषु वर्तंत इति धारयन् ॥९॥

पाहत असता, ऐकत असता, स्पर्श करीत असता, वास घेत असता, खात असता, चालत असता, झोप घेत असता, श्वास घेत असता, बोलत असता, देत असता, घेत असता, पापण्यांची उघडझाप करीत असता, इंद्रियांची विषयांचे ठिकाणी प्रवृत्ती असते, हे लक्षात घेऊन खरे स्वरूप जाणणाऱ्या कर्मयोग्याने मी काहीहि करीत नाही असे लक्षात ठेवावे.

पांच ज्ञानेंद्रिये, पांच कर्मेन्द्रिये, पंचप्राण व चित्तचतुष्टय या एकोणीसांची कर्मे शरीरात चालू असतात. कर्म मी केले असे मनुष्य म्हणतो. पण ते त्याचे बरोबर आहे का याचा त्याने विचार केला पाहिजे. मी चालतो, मी पाहतो असे आपण म्हणतो. पण प्रत्यक्ष चालण्याचे व पाहण्याचे काम पाय व डोळा करीत असतात. ज्ञानी पुरुषाची अशी धारणा असते की, सर्व कर्मे इंद्रिये करतात. फक्त माझ्या सान्निध्यात त्यांचे व्यापार चालू असतात. म्हणून आपण ज्याला 'मी' म्हणतो तो वास्तविक अकर्ता असतो. देव्हाऱ्यातील देवाला मोगऱ्याची फुले वाहिली तर देवाला सुगंध मिळतो आणि आजूबाजूच्या लोकांनाही सुवासाचे सुख अनुभवता येते. देव काहीच करत नाही. तसेच शरीररूपी देव्हाऱ्यातील जीवरूपी देवाच्या प्रेरणेने इंद्रिये आपोआप कर्मे करीत राहतात. प्रत्यक्ष जीव मात्र काहीच करीत नाही.

आंघोळीला बसल्यावर डोक्यावर पाणी पडले की काही लोक रामरक्षा म्हणायला सुरवात करतात. आंघोळ पूर्ण होते व कपडे करून बाहेर जाण्यासाठी तयार होईपर्यन्त स्तोत्रपठणही पूर्ण होते. या अवधीत त्याच्या मनात अनंत विचार चालू असतात. बाहेर जाऊन काय खरेदी करायचे, कुणाला कसे पत्र लिहायचे, ऑफिसमध्ये कोणते काम प्रथम करायचे, असे एक ना दोन शेकडो विचार डोक्यात चालू असतात. स्तोत्र-पठणाकडे त्याचे लक्ष नसते तरी ते बिनचूक होत असते. मग हे पठण कोण करते? मी पठण केले असे म्हणणे बरोबर नाही. तर वाणीवर जे संस्कार झाले असतात, त्यामुळे किल्ली दिल्याप्रमाणे वाणीच आपले काम करीत असते. जीवाला-मीला-वेगळा प्रयत्न करावा लागत नाही. म्हणून जीव अकर्ता असतो.

**ब्रह्मण्याधाय कर्माणि संगं त्यक्त्वा करोति यः।**
**लिप्यते न स पापेन पद्मपत्रमिवांभसा ॥ १० ॥**

जो ब्रह्माच्या ठिकाणी कर्मे अर्पण करून, फलासक्ती टाकून कर्मे करतो, कमलपत्र पाण्यात असूनही जसे पाण्यापासून अलिप्त असते, तसे कर्मे करूनही तो पापापासून मुक्त असतो.

ब्रह्म म्हणजे ईश्वर. ज्ञानी सर्व कर्मे ईश्वराला अर्पण करतो. म्हणजे ईश्वरासाठीच कर्मे करतो. पुरोहित यज्ञ, शांती, उपनयन, विवाह इत्यादी कर्मे करतो, पण ती यजमानासाठी—यजमानाचा प्रतिनिधी म्हणून. त्या कर्मांची फले पुरोहिताला भोगावी लागत नाहीत. तसेच कर्मयोगी ईश्वराचा प्रतिनिधी बनून कार्य करतो, त्यामुळे त्याला कर्मांचे दोष लागत नाहीत. कर्मात काही ना काही दोष राहतातच. कर्मांचे सांगोपांग ज्ञान नसणे, साधनांची कमतरता, शारीरिक दुर्बलता इत्यादी-मुळे चुका होतात. पण ईश्वरार्पण बुद्धीने कर्म केल्यास कर्मांच्या दोषांची जबाबदारी आपल्यावर येत नाही.

जुन्या काळची गोष्ट आहे. जेवणावळी होत व त्यात दक्षिणा दिली जाई. एक मुलगा दक्षिणेत झिजका पैसा आला की तो वडिलाना देई. असे त्याने चौसष्ट झिजके पैसे वडिलांना दिल्यावर त्यांचेकडे एक रुपया मागितला. झिजक्या पैशाबद्दल झिजका रुपया, असा विचार न करता वडिलांनी मुलाला खणखणीत रुपया दिला. तसेच ईश्वरार्पण केलेले कर्म सदोष असले तरी परमेश्वर त्याचा स्वीकार करतो. कर्मयोगी फळाचीही अपेक्षा करीत नाही. ईश्वर म्हणतो मला तरी याचे फळ घेऊन काय करायचे आहे! त्याचे फळ म्हणून कर्मयोग्यास ईश्वर ज्ञान देतो.

भक्ताच्या मनात मी ईश्वरासाठी कर्म करतो, असा अहंकार असतोच, तो दोष ईश्वराच्या दृष्टीक्षेपाने नाहीसा होतो. वाडीच्या कृष्णानंदानी मिरजेच्या मीरासाहेबांची भेट घेतली. दोघांच्या ब्रह्मानंदाच्या गोष्टी झाल्यावर मीरासाहेबांनी आपला प्रसाद म्हणून मांसाहारी अन्नाचे ताट कृष्णानंदाना अर्पण केले. कृष्णानंदानी त्या सामिष अन्नावर दृष्टी टाकताच त्याचे फळाहारात रूपांतर झाले. तसेच ईश्वराच्या दृष्टीक्षेपाने भक्ताची सदोष कर्मे निर्दोष बनतात.

**कायेन मनसा बुद्ध्या केवलैरिंद्रियैरपि ।**
**योगिनः कर्म कुर्वन्ति संगं त्यक्त्वाऽऽत्मशुद्धये ॥११॥**

कर्मयोगी केवळ शरीराने, मनाने, बुद्धीने व इंद्रियाने फलासक्ती टाकून कर्म करतात. म्हणून त्यांची चित्तशुद्धी असते (अहंकाररहित कर्म करतात म्हणून ते कर्म करीत असूनही शुद्ध असतात).

इंद्रियांनी श्रवण मनन, बुद्धीने तत्त्वनिश्चय, मनाने ध्यान व चिंतन अशी सर्व कर्मे ज्ञानी करतात. जांबुवंताने स्वतःकरिता पृथ्वीला एकवीस प्रदक्षिणा घातल्या, पण श्रेष्ठ पद हनुमंताला मिळाले. कारण हनुमंताने मोठेपणाची आशा न धरता जानकीकरता शंभर योजने उड्डाण केले. स्वार्थासाठी कर्म करण्यापेक्षा परार्थ केले तर श्रेष्ठता येते.

वेदान्ताच्या दृष्टीने पाप म्हणजे पाप व पुण्य म्हणजेही पापच ! पुण्यामुळे परमार्थ–सुखातही व्यत्यय येतो. पुण्यप्रकर्षाने स्वर्गप्राप्ती झाली तरी मरणाचे व गर्भवासाचे क्लेश सहन करावेच लागतात. म्हणून पापाबरोबर पुण्यही गेले पाहिजे. ममताही सोडली पाहिजे. तरच अवीट आनंदाचा लाभ होईल.

धृतराष्ट्राला ज्यावेळी संजयाने गीता सांगितली, त्यावेळी पुत्रस्नेहामुळे त्याचेवर काही परिणाम झाला नाही. पण कौरवांचा नाश झाल्यावर धृतराष्ट्राचे ममत्व गेले. गांधारीसह वानप्रस्थाश्रमात असता भगवंतानी केलेल्या उपदेशाचे चिंतन केल्यामुळे तो मुक्त झाला. गीतामृत वाया कसे जाईल ? शेवटी त्याचा उपयोग झाला.

ज्ञानेश्वर म्हणतात, " जेव्हां द्राक्षी दूध घातले । तेव्हा वाया गेले गमले । परी फळपाकी दुणावले । देखिजे जेवी ।। "

सत्कर्म प्रथम वाया गेले असे वाटले तरी ते दुप्पट लाभ करून दिल्याशिवाय रहात नाही.

**युक्तः कर्मफलं त्यक्त्वा शान्तिमाप्नोति नैष्ठिकीम् ।**
**अयुक्तः कामकारेण फले सक्तो निबध्यते ।।१२।।**

कर्मयोगी कर्मफलाचा त्याग करून अत्यंत श्रेष्ठ अशी शांती (मोक्ष) मिळवितो. कर्मयोगाच्या ठिकाणी अयुक्त व फळासाठी आसक्त असलेला पुरुष कामाच्या योगाने प्रेरित झाल्यामुळे बंधन पावतो.

कर्मयोगी कर्म ईश्वराला अर्पण करतो, म्हणून ते त्याला बंधनकारक होत नाही. कमळाच्या पानावरील पाणी जसे त्या पानाला चिकटत नाही, तसे ईश्वरार्पण केलेले कर्म योग्याला बंध निर्माण करीत नाही. ममत्व व अभिमान सोडून केलेल्या कर्मामुळे योग्याची चित्तशुद्धी होते. अशा कर्मयोगी पुरुषाला अखंड शांती लाभते. पण अभिलाषा बाळगून कर्म केल्यास त्या कर्माचे फल म्हणजेच बंध निर्माण होतो.

**सर्व कर्माणि मनसा संन्यस्यास्ते सुखं वशी ।**
**नवद्वारे पुरे देही नैव कुर्वन्न कारयन् ॥ १३ ॥**

सर्व कर्मांचा मनाने संन्यास करून जितेंद्रिय पुरुष या नवद्वारे असलेल्या देहरूपी नगरात काही न करता व न करविता आनंदाने राहतो.

ज्ञानाची साधने दोन. एक कर्मयोग व दुसरे कर्मसंन्यास. या दोहोंमध्ये कर्मयोग श्रेष्ठ, कारण योग्य प्रकारे कर्मयोगाचरण करणारा साक्षात् नसला तरी मनाने संन्यासीच असतो. अशा संन्यासानेही पूर्ण शांतीचा लाभ होतो. ज्यांचे चित्त पूर्ण शुद्ध झालेले नाही, अशांसाठी कर्मयोग आहे. पण जो शुद्धचेतस् असेल त्याला संन्यासच योग्य.

आपले शरीर म्हणजे मुख—नासिकादि नऊ द्वारे असलेले एक नगर आहे. याला ब्रह्मपूरही म्हणतात. या नगरात वास करणारा आत्मा देहात असला तरी त्यापासून स्वतंत्र असतो. तो स्वतः काही करीत नाही. दुसऱ्याकडूनही काही करवून घेत नाही. तर केवळ आत्मानंदात रंगून गेलेला असतो.

**न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभुः ।**
**न कर्मफलसंयोगं स्वभावस्तु प्रवर्तते ॥१४॥**

प्रभु देहस्वामी-जीवात्मा-देहादिकांचे कर्तृत्व निर्माण करीत नाही. तू हे कर्म कर अशा प्रेरणेने तो करविता होत नाही किंवा घटपटादि स्वतः निर्माण करीत नाही, म्हणजे कर्ताही होत नाही— कर्मफळाचा संबंधही उत्पन्न करीत नाही— अर्थात भोगयिताही होत नाही, तर कर्ता करविता कोण याचे उत्तर स्वभाव-माया-अविद्या-प्रकृतिरूप-होय.

लोक म्हणजे देहाचा स्वामी असलेला आत्मा ( जीवात्मा ) देहाकडून कार्य करवून घेत नाही व स्वतःही कशाचा कर्ता नसतो. तो फलही देत नाही. ज्ञानी पुरुष आत्मा अक्रिय आहे व सर्व क्रिया हा प्रकृतीचा खेळ आहे असे जाणतो.

नादत्ते कस्यचित्पापं न चैव सुकृतं विभुः ।
अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यंति जन्तवः ॥ १५ ॥

विभु—नवद्वारयुक्त देह नगरीचा स्वामी—जीवात्मा शरीर, वाणी व मन यांपैकी कोणाचेही कर्म ( पाप ) परमार्थतः घेत नाही. तसेच सुकृतही घेत नाही. अज्ञानाने आत्मस्वरूप आच्छादित होते. त्यामुळे मोह होतो व मी पुण्यकर्ता वा पापकर्ता असा व्यवहार होतो.

चांगली कर्मे करून ईश्वराला अर्पण करावी, म्हणजे तो आपली पापे नष्ट करतो. ईश्वर जगताची पापपुण्ये घेत नाही. अज्ञानाने ज्ञान झाकून टाकल्यामुळे प्राण्याला खरे खोटे कांही कळत नाहीसे होते व तो जीवच सर्व कर्ता आहे अशी समजूत करून घेतो.

ज्ञानेन तु तदज्ञानं येषां नाशितमात्मनः ।
तेषामादित्यवज्ज्ञानं प्रकाशयति तत्परम् ॥ १६ ॥

पण ज्यांचे ते अज्ञान परमात्म्याच्या ज्ञानाने नाश पावले आहे, त्यांना ते ज्ञान सूर्याप्रमाणे पर वस्तूला प्रकाशित करते.

अज्ञान नष्ट झाले की, परमेश्वराचे सत्यस्वरूप समजून येते. ज्ञान झाल्यावर सर्व जग परमेश्वरस्वरूप मुक्त आहे असे अगदी उन्हात स्पष्ट दिसावे तसे आढळून येते.

तद्बुद्धयस्तदात्मानस्तन्निष्ठास्तत्परायणाः ।
गच्छंत्यपुनरावृत्तिं ज्ञाननिर्धूतकल्मषाः ॥ १७ ॥

ज्याची बुद्धी परब्रह्माच्या ठिकाणी रंगली आहे, ते परब्रह्मच ज्यांचा आत्मा आहे, त्याच्याच ठिकाणी ज्यांचा अभिनिवेश आहे, ( तेच आपण आहोत असे समजणे ) आणि जे परब्रह्माचाच निदिध्यास करतात, अशा ज्ञानामुळे जे दोषरहित झाले आहेत, त्यांना पुनः संसारात यावे लागत नाही.

परब्रह्मच मला मिळवायचे आहे असा निश्चय करणे म्हणजे तत्परायण होणे. अशा निश्चयामुळे वैराग्य प्राप्त होते. तन्निष्ठा म्हणजे केवळ आत्म्याचेच श्रवण मनन करणे. वैराग्य अंगी बाणले की व्यवहारातील गोष्टीकडे लक्षच जात नाही व आत्मचिंतनात मन गुंतून राहून त्यातच गोडी उत्पन्न होते.

सूर्यबिंब बचके येवढे दिसते, पण सूर्य तेवढा लहान नसून पृथ्वीच्या कितीतरी पट मोठा आहे. म्हणजे प्रत्यक्ष दिसणे हे खरे प्रमाण नव्हे, ते फक्त एकदेशीयच असते. सूर्य पहावयाचा झाल्यास मारुतीप्रमाणे उड्डाण करायला हवे. तसेच आत्म्याच्या दर्शनासाठीही महान प्रयत्नांची पराकाष्ठा करावी लागते. ज्याप्रमाणे डोळ्याचा अधिकार काळा का गोरा हे सांगणे, नाकाचा सवास घेणे व खडीसाखर का तुरटी याचा निर्णय करण्याचा अधिकार जिभेला आहे. ते काम डोळा करू शकत नाही. त्याप्रमाणे आत्मज्ञानाचा बोध करून देण्याचा अधिकार फक्त वेदांताचाच आहे.

आपले मन नेहमी बाह्य विषयांकडे धांव घेत असते. पण आपणाला प्रेरणा करणारा आत कोणीतरी आहे. त्याला पाहण्यासाठी मन मागे वळत नाही. रस्त्यावरून जाताना मागून येणाऱ्या वाहनाचा हॉर्न ऐकू येतो. पण ते वाहन कोणते हे पहायचे झाल्यास मागे वळून पहावे लागते. जीवनमार्ग क्रमीत असता असाच आतला आवाज वेळोवेळी आपणाला इषारा देत असतो तो इषारा देणारा कोण हे ज्ञान--आत्मज्ञान--करून घ्यावयाचे झाल्यास मागे वळून--अंतर्मुख होऊन--पाहिले पाहिजे.

सगुण दृष्टीनेही याचा अर्थ लावता येतो. कांही लोकांना ईश्वर भेटावा असे वाटते आणि संसारात सुख असावे असेही वाटते. पण त्यांनी हे

लक्षात ठेवावे की सुख मिळणे ही आपल्या हातची गोष्ट नाही. परीक्षा देणे हे आपल्या हाती असते. पण उत्तीर्ण होणे किंवा नोकरी लागणे ही आपल्या अधिकारातील गोष्ट नाही. फल देणारा ईश्वर आहे. तो प्रसन्न असेल तर सर्व काही प्राप्त होते. म्हणून ईश्वरालाच प्राप्त करून घेईन अशी निष्ठा हवी. त्यासाठी साधने केली पाहिजेत. म्हणजे प्रयत्न हवा. ईश्वर प्रसन्न होणारच असा दृढविश्वास पाहिजे, सदैव त्याचे स्मरण हवे. असे वागल्यावर ईश्वराची भेट होऊन या संसारचक्रातून मुक्तता होते. पुन: जन्ममरणाच्या फेऱ्यात सापडावे लागत नाही.

**विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि ।**
**शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः ॥ १८ ॥**

विद्याविनयसंपन्न ब्राह्मण, गाय, हत्ती, कुत्रा व चांडाळ या सर्वांच्या ठिकाणी त्या ज्ञानी पुरुषाची दृष्टी सारखीच असते.

कितीही वैभवशाली मनुष्य असला तरी त्याला काहीना काही दु:ख असतेच. त्याच्या मृत्यूबरोबरच त्याच्या दु:खाचा शेवट होतो. पण ज्ञानी पुरुष जिवंतपणी दु:खमुक्त असतो. देहपातानंतर त्याला विदेह-कैवल्य लाभते. म्हणजे देह नसताही तो आनंदाचा उपभोग घेऊ शकतो. ज्ञानात समभाव आहे. ब्राह्मण-चांडाळ, वृद्ध-बाल, स्त्री-पुरुष असा भेदभाव ज्ञान करीत नाही. ज्ञान सर्वत्र सारखेच असते. कर्म व उपासनेत पुनरावृत्ती आहे, तशी ज्ञानात नाही. म्हणूनच ' यद् गत्वा न निवर्तन्ते तद् धाम परमं मम ' असे स्थान ज्ञान्यास मिळते. सामान्य माणसाला वाघ पाहिला की भीति वाटते व हरीण-शावक पाहून आनंद होतो. पण ज्ञानी समोर कोणीही आले तरी सर्वांतर्यामी असलेल्या परब्रह्मासच पाहतो. त्यामुळे त्याला भीति वा आनंद वाटत नाही. तो नामरुपाचा त्याग करून सार-भूत पदार्थ ग्रहण करतो. त्याची सर्वांबद्दल समदृष्टी असते.

**इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः ।**
**निर्दोषं हि समं ब्रह्म तस्माद् ब्रह्मणि ते स्थिताः ॥१९॥**

अशा समदृष्टीने ज्यांनी आपले मन स्थिर केले त्यांनी संसाराला जिंकले. ब्रह्म दोषरहित व सर्वभूतांच्या ठिकाणी सम आहे. ज्ञानी ब्रह्माच्या ठिकाणी स्थिर झालेले असतात.

'समासमाभ्यां विषमसमे पूजानः धनात् धर्मश्च हीयते' (अपूज्याचे पूजन व पूजार्हांचा अवमान करणारा धन व धर्मापासून भ्रष्ट होतो) असे गौतमानी म्हटले आहे. आज तर सर्वत्र हेच चालू आहे. मग पंडित व मूर्खास समान लेखून कसे चालेल? गौतमानी घालून दिलेला हा नियम सर्वसामान्यासाठी -अज्ञ जनासाठी आहे. वरील गौतम सूत्रानुसार मिळणारी फळे येथे लगेच मिळत नाहीत. ती जन्मांतरी मिळतात. इथेच फळ मिळाले असते, तर तसे वागण्यास कोणी धजला नसता. या नियमास ज्ञानी अपवाद आहे. ज्ञानी धन व धर्माची अपेक्षा करीत नाही. तो 'को विधिः को निषेधः निस्त्रैगुण्ये पथि विचरताम्' अशा उच्चतम भूमिकेवर गेलेला असतो. ज्ञान झालेले नसता समानता बाळगली तर काय होते हे गौतमानी सांगितले आहे.

**न प्रहृष्येत् प्रियं प्राप्य नोद्विजेत्प्राप्य चाप्रियम् ।**
**स्थिरबुद्धिरसंमूढो ब्रह्मविद् ब्रह्मणि स्थितः ॥ २० ॥**

प्रियवस्तू प्राप्त झाली म्हणून आनंद मानू नये व अप्रिय वस्तू घ्यावी लागली तरी उद्वेग पावू नये. अशा समदृष्टी असणाराच स्थिरबुद्धी, मोहरहित, व ब्रह्मज्ञ होय. तो ब्रह्माच्या ठिकाणी स्थिर असतो.

ज्ञानेश्वर माऊली म्हणते– 'ते सुख येणेंचि देहे । पाय पाखाळणीया लाहे । जो भूतवैषम्ये नोहे । विषमबुद्धी ॥'

भूतांच्या भिन्नपणामुळे ज्याची बुद्धी भिन्न होत नाही अशा समदृष्टी झालेल्या पुरुषाचा शोध घेत ब्रह्मसुख येते. मग बाकीच्या सुखांना कोण विचारतो? तीसुद्धा न मागता विपुल प्रमाणात मिळतात. ' नहि स्वभावो भावानां व्यावर्तेत औष्णवत् रवेः ' म्हणजे सूर्याचा उष्णता देणे स्वभाव आहे, त्यात कदापि बदल होत नाही. तसेच ' स्वभावो दुरतिक्रमः ' म्हणजे माणसाचा मूळ स्वभाव पालटू शकत नाही, हा सामान्य नियम झाला. पण ज्ञानाने स्वभावात फरक पडतो. अज्ञानी माणूस सुखांनी हुरळून जातो व दुःखाने होरपळून जातो. लाखाचे बक्षीस लागले की नाचायला लागतो व धन चोरीला गेले की दुःखाने वेडा होतो. दूध उघडे टाकून बाहेर गेल्यावर ते जर मांजराने पिऊन टाकले तर दोष कोणाचा? ते आपल्याच चुकीचे प्रायश्चित्त असते. सर्व दुःखे अशीच आपण निर्माण केलेली असतात. हे ज्ञान झाले तर सुख-दुःखांच्या आहारी न जाता मनुष्याला साम्यता राखता येते.

कांही लोक मनस्वी संतापी असतात. राग येण्याला त्यांना किरकोळ कारणही पुरते. त्यांच्या संतापाचा दुसऱ्यांना तर त्रास होतोच, पण त्यापेक्षा कितीतरी पटीने ते स्वतःला पीडा करून घेत असतात. म्हणून रागावणे म्हणजे दुसऱ्याच्या चुकीसाठी स्वतःला शिक्षा करून घेण्यासारखे आहे. रागद्वेष धरण्यात कांही फायदा नसतो. रागद्वेषातीत होण्यास चातुर्य लागते. व्यवहारातील चातुर्यापेक्षा हे चातुर्य वेगळे व श्रेष्ठ असते. आत्मज्ञानानेच असे चातुर्य येते. डोळे कितीही तीक्ष्ण असले तरी ते कांही आपले आपणास पाहू शकत नाहीत, त्यासाठी पुढे आरसा धरावा लागतो. दृष्टी प्रथम पुढे जाते व मागे वळून स्वतःचे दर्शन घेते. आत्मरूप पहायचे झाल्यास ज्ञानसाधनरूपी आरसा हाती घेतला पाहिजे.

बाजारच्या गोड फळापेक्षा स्वतः लावलेल्या झाडाची आंबट फळे चवदार लागतात. कारण त्या फळांबद्दल आत्मीयता असते. साखर इतर

पदार्थांत घातली तर ते पदार्थ गोड होतात. मग स्वतः साखर किती गोड असली पाहिजे, याची कल्पना करा. तसेच सर्व अनित्य वस्तु आत्म्याच्या केवळ संबंधामुळे सुखकर वाटतात. मग स्वतः आत्मा केवळ सुखरूपच असला पाहिजे, हे सिद्ध होते. अनात्म पदार्थ कायमचे सुख देत नाहीत. उसने आणलेले दागिने तेवढ्यापुरते सुखवितात. आत्मसुख तुमचे स्वतःचे आहे. ते कधी कोठे जात नाही.

आत्मा दृश्य नसून द्रष्टा आहे. त्याला कोणाची दृष्ट लागत नाही. आत्मसुख अवीट व अविनाशी असते.

नेहमी श्रवण करीत राहिले तर स्वभावात बदल होतो. एका वकिलांची अशी ठाम समजूत होती की, आपल्या व्यवसायात खोटे बोलल्याशिवाय तरणोपाय नाही. वेदांत श्रवणाने त्यांना आपली समजूत चुकीची आहे असे वाटू लागले. त्यानी ज्यात खोटे बोलावे लागेल असे कज्जे स्वीकारण्याचे बंद केले. तरीही त्यांची वकिली जोरात चालू राहिली. आज तूप खाल्ले की उद्या रूप येत नाही. काही काळ जावा लागतो व तुपाचे सेवन सतत चालू ठेवावे लागते. तसेच श्रवणाचेही. सतत व आदरपूर्वक श्रवण करीत राहिल्यास श्रवण हे त्याचे वैभव ठरून त्यास ब्रह्मविदू अशी पदवी मिळते. दुसरे वैभव मनन व तिसरे निदिध्यास. मनन व निदिध्यासाने असंभावना व विपरीत भावना नाहीशा होतात. जगात अनंत पदार्थ असता अखंड व एकच पदार्थ कसा असेल ही असंभावना व रोज दुःखे भोगत असता मी ब्रह्मरूपी कसा असेन ही विपरीत भावना. श्रवण, मनन व निदिध्यासन करीत राहिल्यावर साक्षात्काराचे चौथे वैभव प्राप्त होते. हे वैभव प्राप्त झालेला क्षुद्र विषयाकडे वळत नाही.

सिद्ध व स्थितप्रज्ञाचा स्वभाव कसा असतो याचे भगवंतानी दिग्दर्शन केले आहे. साधकांनी ते गुण संपादण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

**बाह्यस्पर्शेष्वसक्तात्मा विंदत्यात्मनि यत्सुखम् ।**
**स ब्रह्मयोगयुक्तात्मा सुखं अक्षय्यमश्नुते ॥२१॥**

बाह्य विषयांच्या ठिकाणी ज्याचे अंतःकरण आसक्त झालेले नाही, त्याला आत्म्याच्या ठिकाणी जे सुख आहे ते मिळते. तो ब्रह्माशी समरस झालेला योगी अक्षय सुखाचा अनुभव घेतो.

सामान्य मनुष्य सरकारी दुकानात मिळणारे कदान्न नाइलाज म्हणून घेतो, तसेच ज्ञानी गत्यंतर नसेल तेव्हा बाह्य विषयांचा स्वीकार करतो. पण त्या विषयांबद्दल तो अनासक्त असतो. शास्त्रकार यालाच वैराग्य म्हणतात. असे वैराग्य लाभणे हे महद्भाग्य समजले जाते. महर्षी व्यास म्हणतात,

" यच्च कामसुखं लोके यच्च दिव्यं महत्सुखम् ।
तृष्णाक्षयसुखस्यैते कलां नार्हंति षोडशीम् ॥ "

वासनाक्षयाने मिळणारे सुख इतके मोठे असते की, कामसुखच काय पण स्वर्गीय सुखही त्याच्या पासंगाला लागू शकत नाही. मनाची बाह्य धाव रोखून त्यास अंतर्मुख केल्यावर ' उपशमसुख ' मिळते व नंतर तिसरे साक्षात्काराचे सुख मिळते. या तीन सुखांच्या समुच्चयाने अक्षय-सुखाचा लाभ घडतो.

**ये हि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव ते ।**
**आद्यंतवंतः कौंतेय न तेषु रमते बुधः ॥२२॥**

विषय व इंद्रिये यांच्या संयोगाने उत्पन्न होणारे जे भोग ते दुःखालाच कारण होतात. कारण त्याला आदि व अंत आहेत, हे कौंतेया, ज्ञानी त्यांच्या ठिकाणी रममाण होत नाही.

विषय व इंद्रिये यांच्या संयोगाने होणारे सुख म्हणजे वैषयिक सुख किंचित काळ टिकते, शिवाय ते दुःखदायक असते. अशा क्षुद्र सुखाच्या

प्राप्तीसाठी मनुष्य अहर्निश धडपडत असतो. दरिद्री मनुष्य स्वप्नात राजा झाला तरी जाग येताच पुन: पहिलीच स्थिती प्राप्त होते. तसेच वैषयिक सुख हे स्वप्नवत् आहे. ' आदावन्ते च यन्नास्ति वर्तमानेऽपि तत्तथा ' असे गौडपादानी म्हटले आहे. जे पूर्वी नव्हते व पुढे नाहीसे होणारे आहे ते वर्तमान काळीही आहे. असे म्हणता येत नाही. कष्टाने लाभणारे व अल्पकाळ टिकणारे विषयसुख असून नसल्यासारखेच असते. म्हणून साधकाने अशा सुखांच्या मागे न लागता ब्रह्मसुख-प्राप्तीसाठी प्रयत्न केले पाहिजेत. एकदा ब्रह्मसुखाची अवीट गोडी चाखल्यावर विषयसुखाकडे दृष्टी जाणारच नाही. मात्र ज्यांना ब्रह्मसुखाची कल्पनाच नाही, ते विषयसुख म्हणजेच खरे सुख मानतात. ज्याच्या आईवडिलांनी कधीच साजूक तूप पाहिले नाही, त्यांची मुले डाल्डालाच तूप समजतात -

अविदितपरमानंद: वदति विषयमेव रमणीयम् ।
तिलतैलमेवमृष्टं येन न दृष्टं घृतं क्वापि ॥

**शक्नोतीहैव सोढुं प्राक् शरीरविमोक्षणात् ।**
**कामक्रोधोद्भवं वेगं स युक्तः स सुखी नरः ॥२३॥**

इहलोकी जो मनुष्य मरणापूर्वी काम व क्रोध यांचा वेग सहन करू शकतो, तोच योगी व तोच सुखी होय.

शेकडा ९९ लोक परमार्थाकडे वळतच नाहीत. एखादा वळतो, पण तो शेवटपर्यंत टिकून राहील असे नाही. काम क्रोध त्याची त्या मार्गातील प्रगती खुंटवितात. कामक्रोधावर विजय मिळविणारा विरळा. कामक्रोधाच्या तावडीत सापडलेल्यांची अधोगती ठरलेलीच असते. आयुष्यात कामक्रोधावर एकदा जय मिळवून भागत नाही. शरीर असेपर्यंत ते पीडा देत राहतात. कामक्रोधाचा वेग कमी करण्यासाठी दहा अंक मोजण्याची कला हस्तगत केली पाहिजे. शांत राहिले की

त्यांचा वेग कमी होतो. रामकृष्ण हरी सारख्या जपाने जितके पुण्य पदरात पडते, त्याच्या शतपट कामक्रोधांना आवर घालण्याने मिळते. कामक्रोधावर विजय मिळविणारा गळ्यात रुद्राक्ष न घालता किंवा अंगाला भस्म न फासताही योगी म्हणून ओळखला जातो. आहार, निद्रा, भय व मैथुन या क्रिया पशूही करतात. कामक्रोध न आवरता मनुष्य पशूप्रमाणे केवळ क्रिया करीत राहील, तर त्यास मानव तरी कां म्हणावे? तो पशूच म्हटला पाहिजे. कामक्रोधांना जो आवरतो, तोच खरे सुख मिळवितो.

**योन्तःसुखोऽतरारामस्तथांतर्ज्योतिरेव यः ।**
**स योगी ब्रह्म निर्वाणं ब्रह्मभूतोऽधिगच्छाति ॥२४॥**

जो अंतःसुखी ( आत्मस्वरूप बनल्यामुळे स्वतःच सुखरूप बनलेला ) आंतराराम ( आत्मरूप बनून तेथेच क्रीडा करणारा ) त्याचप्रमाणे आंतर्ज्योती ( ज्याच्या अंतःकरणात आत्मप्रकाश पडला आहे ) असा योगी ब्रह्मरूप होऊन इहलोकीच मुक्ति मिळवितो.

प्रत्येकाला बाह्यसुख मिळविण्याची हौस असते. त्यासाठी माणसे हजारो रुपये खर्चून सहली काढतात, पण अंतःसुखासाठी कोणी खटपट करीत नाही. 'ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति' याची सत्यता अनुभवावी असे कोणाला वाटत नाही. वास्तविक त्यासाठी द्रव्याची गरज नाही. फक्त दिवसाकाठी काही क्षण आत्म्यासंबंधी विचार करीत बसले तर वर्षाकाठी कितीतरी काळ आनंदात गेल्याचे आढळून येईल. असे करीत असता फळ मिळाले नाही तरी तो काळ फुकट जात नाही. शेवटचा घास घेतल्यावर ढेकर आली,याचा अर्थ त्याचे आधीचे सर्व घास वाया गेले असा नव्हे.ते सर्व तृप्तीसच कारण झालेले असतात. त्याचप्रमाणे निर्गुण प्राप्तीकरता केलेले ध्यानाचे सर्व प्रयत्न उपयोगातच आलेले असतात. ज्ञानी पुरुषा-जवळ हा ठेवा मोठा असतो. म्हणून तो विषयसुखच काय, पण

स्वर्गसुखसुद्धा तुच्छ मानतो. त्याला अंतर्दृष्टी प्राप्त झालेली असल्याने तो आत्म्याविषयी विचार करण्यात रंगून जातो. ज्ञानी आत्मसुखात रंगून गेला असता त्याला सुंदर रूप दिसले, केतकीचा सुगंध आला किंवा शीतल स्पर्श झाला तर अशा सुखद गोष्टीपासून त्याला आनंद होतो की नाही ?

ही सर्व सुखे ज्ञान्याला कळतात.तो त्यांचा अनुभवही घेतो. पण ती सुखे मिथ्या आहेत अशी त्याची बालंबाल खात्री असल्याने त्याकडे तो लक्ष देत नाही. तो आत्मसुखच घेत राहतो. असे आत्मसुख प्राप्त झालेल्या पुरुषांना कशाचीच अभिलाषा नसते. शिवाजी महाराजांनी दिलेले राज्य रामदासानी परत केले. पुराण काळी राजा चित्रकेतू व शर्यातीने आपले गुरु अंगिरस व च्यवन यांना आपली राज्ये देऊ केली. पण त्यांनीही ती स्वीकारली नाहीत. आत्मज्ञानी पुरुषांना बाह्यसुखे अनुभवताच येत नाहीत, असे नव्हे. विश्वामित्रानी राज्य करून मग त्याचा त्याग केला. यमधर्माला ज्ञान झालेले असले, तरी तो दक्षिण दिशेचा अधिपती म्हणून आपली सत्ता गाजवीत आहे.

प्रत्येक जीव ब्रह्मरूप आहे, हे ज्ञान सामान्य माणसास नसते. ज्ञानी ही गोष्ट जाणतो. जमीन, घर, धन मिळाले तर अप्राप्ताची प्राप्ती होय. 'संयोगाः वियोगांताः । उच्छ्रायाः पतनांताः' जितके संयोग तितके वियोग व वर गेलेला हा खाली येणारच, या न्यायाने घर, धन, जमीन यांचा संयोग असल्याने त्यांचा वियोगही क्रमप्राप्तच आहे. पण आत्म्याची प्राप्ती ही प्राप्ताची प्राप्ती आहे. तेथे वियोग संभवत नाही. नोटांच्या सरणावर लक्षाधीशाला जाळले तरी ते धन त्याचे बरोबर जात नाही. आत्मज्ञानाचा नाश कधीच होत नाही.

**लभंते ब्रह्मनिर्वाणमृषयः क्षीणकल्मषाः ।**
**छिन्नद्वैधा यतात्मानः सर्वभूतहिते रताः ॥ २५ ॥**

ज्यांचे दोष नष्ट झाले आहेत, ज्यांचे संशय तुटले आहेत, ज्यांनी मन ताब्यात ठेवले आणि प्राणिमात्रांच्या हिताविषयी जे रत आहेत, असे ऋषी मोक्ष मिळवितात.

सध्या महर्षी ही पदवी स्वस्त झालेली आहे. कुठल्याही क्षेत्रात थोडेसे काम केले की तो महर्षी होतो. पण पाणिनीच्या मताप्रमाणे ऋषी शब्दाचा अर्थ तत्त्ववेत्ता असा आहे. तत्त्ववेत्तेपद पातके कमी झालेल्यांनाच मिळते. पातके जाण्यासाठी संशयनिवृत्ती व्हावी लागते व कायावाचा-मनानेसुद्धा परपीडा करावयाची नाही. असे सर्वभूतहिते रत झाल्याशिवाय संशयनिवृत्ती होत नाही. इंद्रिये, मन व बुद्धी यांना नियंत्रित करून चिंतन व ध्यान करायचे व क्रोध व भय बाळगायचे नाही. ईश्वर हा निर्भय करणारा असल्याने व त्याच्याच प्राप्तीसाठी प्रयत्न करताना भय कशाला बाळगायचे? अशा रीतीने वागल्यास तत्त्ववेत्तेपद मिळविता येईल.

**कामक्रोधवियुक्तानां यतीनां यतचेतसाम् ।**
**अभितो ब्रह्मनिर्वाणं वर्तते विदितात्मनाम् ॥ २६ ॥**

काम, क्रोध याने विरहित, मन ताब्यात ठेवणारे आणि आत्मतत्त्व जाणणारे यती येथेच ( या देहातच ) ब्रह्म बनतात.

काम, क्रोध पूर्णपणे नष्ट होणे म्हणजे कर्मयोगाची पूर्णता—याकरिताच या अध्यायाच्या प्रारंभी ' ज्ञेयः स नित्यसंन्यासी यो न द्वेष्टि न कांक्षति ' अशी अट घातली आहे. कारण प्रायः कर्म करताना काम, क्रोध येतातच, पण निष्काम कर्म असेल तर काम, क्रोध येत नाहीत. ते पूर्णपणे घालविता आले नाहीत, तरी निदान त्यांचा वेग तरी आवरलाच पाहिजे. काम, क्रोध गेले तरच संन्यास घेता येतो व ज्ञानसाधने करून जीवनमुक्ती व विदेहकैवल्य म्हणजेच ब्रह्मनिर्वाण सुख मिळविता येते.

या श्लोकाने भगवंतानी कर्मयोगाची समाप्ती केली आहे. यापुढे ज्ञानयोगाची साधने सांगत आहेत.

**स्पर्शान् कृत्वा बहिर्बाह्यांश्चक्षुश्चैवांतरे भ्रुवोः ।**
**प्राणापानौ समौ कृत्वा नासाभ्यंतरचारिणौ ॥२७॥**
**यतेंद्रियमनोबुद्धिर्मुनिर्मोक्षपरायणः ।**
**विगतेच्छाभयक्रोधो यः सदा मुक्त एव सः ॥२८॥**

बाह्य विषयांना दूर करून, दोन भुवयामध्ये दृष्टी ठेवून, नासिके-मधील प्राण व अपान यांना समान करून, इंद्रिये मन व बुद्धी यांचे नियमन करून, जो मुनी मोक्ष हेच आपले ध्येय ठेवतो, व इच्छा, भय व क्रोध ही ज्याची नाश पावली आहेत, तो सदा मुक्तच समजावा.

मोक्ष-प्राप्तीच्या साधनात ध्यनयोग अत्यंत सुलभ खरा, पण सर्वांना साधत मात्र नाही. आत्मा व मन दोन्ही आत आहेत. मन बाहेर येऊन बाह्य पदार्थांचे आकार घेते, त्यांचे चिंतन करीत राहते. चुलीवर दूध ठेवून ध्यानाला बसून पहा. ध्यान होणार नाही. कारण मन दुधाकडे लागलेले असते. असे होऊ नये म्हणून ध्यान कसे करावे हे सांगितले आहे. दृष्टी भ्रूमध्यात असावी. दृष्टी अर्धोन्मीलित असावी. कारण डोळे पूर्ण उघडे ठेवल्यास बाह्य विषयाकडे लक्ष जाते व पूर्ण मिटल्यास झोप लागण्याची शक्यता असते. प्राण अपान कुंभित करावेत किंवा समान ठेवावेत. इंद्रिये, मन व बुद्धी नियमित करावी. इच्छा, भय व क्रोध सोडून आत्म्याचे चिंतन करावे म्हणजे ज्ञानप्राप्ती होते. आत्मज्ञानात रंगून गेल्यावर तो मुक्त होतो.

**भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरम् ।**
**सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शांतिमृच्छति ॥ २९ ॥**

यज्ञ व तप यांचा भोक्ता, सर्व लोकांचा महेश्वर व सर्व प्राणी-मात्रांचा मी मित्र आहे. अशा प्रकारे जो मला जाणतो, त्याला शांती प्राप्त होते.

अर्जुन श्रीकृष्णाला नित्य पहात होता, पण खरे दर्शन ध्यान करीत असता झाले पाहिजे. परमेश्वर यज्ञ व तपाने संतुष्ट होणारा आहे, हे ज्ञान असले पाहिजे. यज्ञाने इंद्रचंद्रादी देवताही प्रसन्न होतात. पण परमेश्वराचे वैशिष्ट्य असे की, तो इंद्रचंद्रांचाही नियामक म्हणजे सर्व लोकमहेश्वर आहे. तसेच तो सर्वांचा सुहृद म्हणजे मित्र आहे, अशी भावना बाळगल्यास त्याला प्रसन्न करून घेणे अवघड नाही. परमेश्वर प्रसन्न झाला म्हणजे शांतीचा लाभ होतो.

इति श्रीमद् भगवद् गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे योगगर्भो ( कर्मसंन्यास योगो ) नाम पंचमोऽध्यायः

◊ ◊ ◊

# अध्याय ६ वा.

श्री भगवान उवाच—

**अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्म करोति यः ।**
**स संन्यासी च योगी च न निरग्निर्न चाक्रियः ॥१॥**

श्री भगवान म्हणाले, ' कर्मफलाचा आश्रय न करता जो कर्तव्यरूप कर्म करतो, तोच खरा संन्यासी व तोच योगी होय. केवळ अग्निहोत्राचा त्याग करणारा निष्क्रिय मनुष्य संन्यासी अथवा योगी नव्हे.

योगाचे दोन प्रकार आहेत. पहिला यमनियमासनध्यानधारणासमाधियुक्त अष्टांग योग. या योगाचे आचरण बहुधा एखादी सिद्धी प्राप्त करून घेण्यासाठी केले जाते. एकदा सिद्धी प्राप्त झाली की यम—नियमादी साधने सुटतात. म्हणून या मार्गाने परमेश्वर—प्राप्ती करून घेणे अवघड आहे. दुसरा ध्यानयोग. तो मात्र अत्यंत सुलभ आहे. कारण ध्यान करणे हा मनुष्य स्वभावच आहे. प्रत्येकजण कशाचे ना कशाचे ध्यान करीत असतो. कोणी स्त्रीचे, कोणी पुत्राचे, तर कोणी धनाचे ध्यान करीत असतात. पण ही ध्याने परमार्थमार्गात उपयोगी पडत नाहीत. दारापुत्र—धनाऐवजी ईश्वराच्या आपल्या आवडीच्या सगुण मूर्तीचे किंवा निर्गुण परब्रह्माचे ध्यान परमार्थात अभिप्रेत आहे.

पण ध्यान वा संन्यासाचे मागे लागून कर्मांचा त्याग करणे हे योग्य नव्हे. कर्म हाच सर्वांचा पाया आहे. ज्याप्रमाणे पाया नसलेली इमारत उभी राहू शकत नाही, त्याप्रमाणे कर्मयोगाशिवाय ध्यान वा संन्यास जमणारच नाही. फलाची अपेक्षा न बाळगता कर्म केल्यास संन्यास व योग दोन्हीही साधतात. फलापेक्षा धरून कर्म केल्यास

फळाकडे लक्ष लागून कर्मात विक्षेप होतो. फलाची अपेक्षा नसली की कर्म व्यवस्थित पार पडते. म्हणून असे कर्म करणारा योगी होय व तो प्रत्यक्ष फळाचा त्याग करतो, म्हूनन संन्यासीही होय.

येथे अर्थवाद म्हणजे स्तुती केली आहे. योगवासिष्ठकार म्हणतात, शुभेच्छा निर्माण झाली तरी तो ज्ञानी समजला पाहिजे. वास्तविक शुभेच्छा, विचारणा, तनुमानसा व सत्त्वापत्ती या ज्ञानाच्या चार पायऱ्या आहेत. साधक चौथ्या पायरीवर पोहोचेल तेव्हा त्याला साक्षात्कार होतो, म्हणजेच खरा ज्ञानी होतो. पण पहिल्याच पायरीवरील माणसालाही ज्ञानी म्हणणे याचे तात्पर्य असे की, एकदा सदिच्छा निर्माण झाली की तो मुमुक्षू बनून पुढे पुढे जाणारच. तो मागे फिरणार नाही. तसेच निष्काम कर्म करणारा योगी कालान्तराने संन्यासी होणारच, म्हणून त्यास संन्यासी असे म्हटले आहे.

पूर्वी विवाह झाला की अग्निहोत्र पाळावे लागे. ते सोडले की त्यास संन्यासी म्हणत व कोणतीही क्रिया न करता डोळे मिटून स्वस्थ बसणाऱ्यास ध्यानयोगी म्हणत. आजकाल अग्निहोत्र तर कोणीच पाळीत नाही व स्वस्थ बसणारे हजारो लोक आहेत म्हणून कांही ते सर्व संन्यासी व योगी ठरत नाहीत. ती फक्त संन्यासी व योगी जनांची लक्षणे आहेत. निष्काम कर्मयोग आचरणारा खरा योगी व संन्यासी होय.

**यं संन्यासमिति प्राहुर्योगं तं विद्धि पांडव ।**
**न ह्यसंन्यस्तसंकल्पो योगी भवति कश्चन ॥२॥**

अर्जुना, ज्याला संन्यास असे म्हणतात तो योग आहे असे जाण. ज्याचा कर्मफलाविषयीचा संकल्प सुटला नाही, असा कोणीही योगी होत नाही.

संकल्प सोडणे म्हणजे संन्यास स्वीकारणे होय. संकल्प सोडण्याचे एकदम साधत नाही, म्हणून कर्मयोग आचरला पाहिजे. कर्मयोगामुळे

योग्यता वाढून ध्यान करणे सुलभ होते. शास्त्रकार गो, अश्व यांना पशू म्हणतात. म्हणजे इतर पशू नव्हेत असा अर्थ नाही, तर गाय व घोडा हे सर्वांत अधिक उपयुक्त पशू आहेत. तसेच साधने खूप असली तरी त्या सर्वांमध्ये कर्मयोगासह संन्यास हा सर्वांत श्रेष्ठ होय. कर्मे केली की परोपकार होतो. कर्मे करणारा दुसऱ्याला प्रिय होतो. पण स्वस्थ बसणारा आपली कामेही दुसऱ्यांनी करावी अशी अपेक्षा करतो, त्यामुळे तो अप्रिय होतो. म्हणून सतत कर्म केले पाहिजे.

**आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते ।**
**योगारूढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते ॥३॥**

योग प्राप्त व्हावा अशी इच्छा असणाऱ्या मुनीला कर्म हे साधन आहे असे सांगितले आहे. योगप्राप्ती झाल्यानंतर त्यालाच शम हे साधन आहे असे सांगितले आहे.

ध्यान करणे व भांडी घासणे ( कोणतेही व्यावहारिक काम ) या दोन्ही गोष्टी मनापुढे ठेवून मन कुणीकडे झुकते ते पहावे. मन जर आपोआप ध्यानाकडे वळत असेल तर त्याला जपतपादि साधने करण्याची आवश्यकता नाही. पण जोपर्यन्त ध्यानाची योग्यता येत नाही, तोवर साधने ही केलीच पाहिजेत. एकदा ध्यानधारणेची योग्यता आली की संन्यास घ्यावयासही हरकत नाही.

**यदा हि नेन्द्रियार्थेषु न कर्मस्वनुषज्जते ।**
**सर्वसंकल्पसंन्यासी योगारूढस्तदोच्यते ॥४॥**

योगी विषयांच्या ठिकाणी आणि कर्मांच्या ठिकाणी जेव्हा आसक्त होत नाही, आणि जेव्हा त्याचे सर्व संकल्प सुटलेले असतात, तेव्हा त्याला योगारूढ असे म्हणतात.

संकल्प म्हणजे इच्छा. इच्छा नाहीशा झाल्या तरी खरा साधक ध्यानधारणा सोडीत नाही. 'नास्था धर्मे न वसुनिचये नैव कामोपभोगे'

असे वचन आहे, म्हणजे अत्यंत धार्मिक असूनही खरा साधक धर्म नको, धन नको आणि स्वर्गीय अप्सराही नकोत असे म्हणतो. त्याची भगवंताजवळ येवढीच प्रार्थना असते की, जे प्रारब्धात असेल ते होऊ दे. पण हे भगवंता, तुझ्या पादकमळावरील निश्चळ भक्तीत कधीही व्यत्यय येऊ देऊ नकोस.

**उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत् ।**
**आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः ॥५॥**

आपण आपला उद्धार करावा. आपला घात करू नये. आपण स्वतःच स्वतःचे मित्र आहोत. स्वतःच स्वतःचे शत्रू आहोत.

जितकी पुण्यकर्मे कमी कमी होतात, तितका जीव अधिकाधिक स्थावर योनीत जातो. देवयोनीत उच्च स्थानात असलेला जीव कुत्र्याच्या देहात आल्यावर हीनत्व पावतो. म्हणून पुण्यकर्मे वाढली पाहिजेत, निदान कमी तरी होणार नाहीत, याबद्दल दक्षता घेतली पाहिजे. हे प्रयत्न ज्याचे त्यानेच करावयाचे असतात. दहा बंधू, शेकडो मित्र आणि हजारो अनुयायी असले तरी शेवटी आपणाबरोबर कोणी येऊ शकत नाही. फक्त त्याचे मन त्याची साथ करते. ते प्रत्येक योनीत त्याचबरोबर असते. म्हणूनच ‘ मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयोः ’ असे म्हटले आहे. व्यवहारात शत्रु व मित्र प्रत्यक्ष दिसतात. पण उत्कृष्ट ध्यानयोगाने प्रथम शत्रू असलेले मित्रस्थानात येतात. ध्रुव सवतीचा म्हणून त्याची सावत्र आई त्याचा द्वेष करीत होती. एवढेच नव्हे, तर ध्रुव जगातून कायमचा नाहीसा व्हावा असे तिला वाटत होते. पण ध्रुवाने ईश्वराच्या परमभक्तीने अढळपद प्राप्त करून घेतल्यावर द्वेषाचे रूपांतर प्रेमात झाले. कैकयीही शेवटी रामावर प्रेम करू लागली. तात्पर्य, आपणच आपले मित्र व शत्रु असतो.

**बंधुरात्माऽऽत्मनस्तस्य येनाऽत्मैवात्मना जितः ।**
**अनात्मनस्तु शत्रुत्वे वर्तेतात्मैव शत्रुवत् ।। ६ ।।**

ज्याने स्वतः स्वतःला जिंकले तो स्वतः स्वतःचा मित्र होय; पण ज्याचा स्वतःवर ताबा नाही, तो स्वतःच्या ठिकाणी शत्रूप्रमाणे शत्रुत्वाने वर्तन करतो.

आपला आपल्या मनावर ताबा नसेल तर आपले मनच आपले शत्रू बनते. जो आपल्यावर अपकार करतो त्याला आपण शत्रू मानतो, व उपकार करणाऱ्यास मित्र समजतो. उसने पैसे देणारा, सिनेमा दाखवणारा, हॉटेलात जेऊ घालणाऱ्यास आपण मित्र समजतो. आपण जर त्याच्या आहारी गेलो तर तो मित्रच आपला शत्रू बनतो. कारण तो नेमका महत्त्वाच्या कामाच्या वेळी येतो. त्याच्याबरोबर आपण फिरायला जातो. महत्त्वाचे काम राहून जाते आणि आपले प्रसंगी नुकसानही होते. म्हणून मित्र असला तरी तो जसा आपल्या ताब्यात हवा तसेच आपले मन आपल्या काबूत असले पाहिजे. जर ते काबूत नसेल तर ईश्वराच्या ध्यानासाठी आपण बसलो की, ते आपणाला बाजारात घेऊन जाते. पहाटे उठून ध्यान करण्याचा बेत करावा तर मग गुलाबी साखरझोपेत आपणाला बुडवून टाकते. गप्पा मारताना रात्रीचे बारा वाजून गेले तरी पत्ता लागू न देणारे मन पांच मिनिटे रामनाम घ्यायच्या वेळी आड येते व झोपेकडे घेऊन जाते. पत्ते खेळताना चार चार तास मांडी मोडत नाही. पण चार मिनिटे स्वस्थ बसून रामनाम घ्यावे म्हटले की मांडीला रग लागते. आपल्या ताब्यात नसलेले मन असे ईश्वरी मार्गात अडथळे आणीत असते.

सरकारी नोकरी स्वीकारली की, राजकारणात भाग घेणार नाही, बदली झाली तर न कुरकुरता कोठेही जाईन, रोज वेळेवर हजर राहीन,

रविवार वा सुट्टी असली तरी कामावर येईन, वरिष्ठाशी नम्रतेने वागेन, इत्यादी अनेक नियम व अटी पाळण्याचे बंधन असते. असे असूनही एका जागेसाठी हजारो अर्ज येतात. पण भगवंताच्या काही अटी नाहीत, नियम नाहीत. तरी त्याच्याकडे कोणी फिरकत नाही, हे एक आश्चर्य आहे. दिवसाकाठी केव्हाही काही मिनिटे माझी सेवा—माझे स्मरण-करा येवढीच माझी अट आहे, तरी माझेकडे कोणी येत नाही. अशी परमेश्वराची तक्रार आहे. नोकराच्या वयाला पंचावन्न वर्षे पूर्ण होताच सरकार त्याला काढून टाकते. ईश्वर त्याच्या सेवकाला कधीच सोडत नाही.

यावर काही लोक म्हणतील, सरकारची किंवा खाजगी कोणाचीही नोकरी केल्यास पैसा मिळतो. परमेश्वराच्या सेवेने काय मिळणार? भगवान त्यांना सांगतात की, " माझ्या सेवेने काय मिळत नाही ते सांगा. पैसाच नव्हे तर घर, दार, दारा, पुत्र, वैभव इ. तुम्हाला कोण देते? ध्रुवाला बाळपणीच अढळपद कोणी दिले? त्याचे वय होण्याचीही वाट पाहिली नाही. बिभीषणाला लंकेचे राज्य कोणी दिले? " रामाने लंकेचे राज्य विभीषणाला दिल्यावर लक्ष्मणाने लंकेच्या विपुल संपत्तीपैकी अर्धी घेऊन जाण्याची सूचना केली. पण रामाने ती मान्य केली नाही. राम म्हणाले, " लक्ष्मणा, तुला संपत्तीचा लोभ असेल तर आपण निर्माण करू. पण दिलेल्या दानातील परत घेण्याची कल्पनाही करू नको. "

एकनाथांचे गुरु जनार्दनस्वामी यवनाकडे नोकरीस होते. पण त्यानी नौकरी पत्करताना अट घातली होती की, सकाळी दत्ताची उपासना चालू असता खाविंदांचे बोलावणे आले तरी मी येणार नाही. बादशहाने त्यांची अट मान्य केली. ईश्वराची सेवा मनापासून कोणी करीत असेल, तर त्याला व्यवहारात पाहिजे त्या सवलती मिळू शकतात.

ईश्वराची सेवा मन ताब्यात असल्याशिवाय होऊच शकत नाही. ईश्वरी-सेवेत अडथळा करणारे मन आपले शत्रू म्हटले पाहिजे.

**जितात्मनः प्रशांतस्य परमात्मा समाहितः ।**
**शीतोष्णसुखदुःखेषु तथा मानापमानयोः ॥७॥**

ज्याने आपले मन जिंकले आहे व जो अत्यंत शांत आहे, त्याच्या ठिकाणी आत्मा हा आत्मभावाने राहतो ( तो अनुभवाने परमात्मरूप बनतो ). शीत वा उष्ण, सुख वा दुःख, मान अथवा अपमान ही प्राप्त झाली असता तो निश्चल राहतो.

एखाद्या सामान्य खेळांत रंगून गेलेल्या मनुष्याचेही सुख–दुःख, शीतोष्ण वा मानापमान याकडे बिलकूल लक्ष नसते. मग प्रत्यक्ष भगवंताच्या ध्यानात रंगून गेलेल्याला तरी ही द्वंद्वे कशी त्रास देतील ? या द्वंद्वांकडे पाठ फिरविल्यामुळे भक्ताचे मन शांत असते. अशा शांत मनात परमात्मा प्रगटतो. ऋषीमुनींना कोणी प्रश्न विचारल्यास ते डोळे झाकून दृष्टी अंतर्मुख करीत. त्यांच्या शांत मनांत परमात्मा आविर्भूत होऊन प्रश्नाचे अचूक उत्तर सांगत असे. ते बोलतील ते परमेश्वराचेच वचन असल्याने ऋषीमुनींची वाणी कधी असत्य ठरत नसे.

परमपूज्य वासुदेवानंद सरस्वतींनी गुरुचरित्र या ग्रंथाचे संस्कृतमध्ये रूपांतर केले. सात हजार मूळच्या ओव्यांचे दोन हजार संस्कृत श्लोकांत भाषांतर केले. ग्रंथ पूर्ण झाल्यावर त्यानी श्लोकसंख्या मोजली. तेव्हा दोन हजाराला सात आठ श्लोक कमी पडू लागले. तेवढे श्लोक लिहिण्याचे ते प्रयत्न करू लागले, पण शक्य होईना. लेखणीला शाईच लागेना. तीनदा दौत पालथी झाली. असे कां होत आहे हे पाहण्यासाठी त्यानी मन शांत केले व डोळे मिटून ध्यान लावले. तेव्हा मनात दत्तात्रेय उपस्थित झाले व सांगितले की, श्लोकसंख्या बरोबर आहे. मध्ये

'उवाच' आहेत ते मोज. तसे केल्यावर हिशोब बरोबर जमला. मन शांत केले की सर्व प्रश्नांची उत्तरे मिळतात.

गीतेतील भगवान उवाच, अर्जुन उवाच यांतही महत्त्व आहे, हे यावरून लक्षात घेतले पाहिजे.

**ज्ञानविज्ञानतृप्तात्मा कूटस्थो विजितेन्द्रियः ।**
**युक्त इत्युच्यते योगी समलोष्टाश्मकांचनः ॥८॥**

ज्ञान व विज्ञानाच्या अनुभवाने ज्याचे चित्त समाधान पावले आहे, जो निश्चल आहे, जितेंद्रिय आहे, मातीचे ढेकूळ, दगड वा सोने यांच्या ठिकाणी ज्यांची दृष्टी समान आहे, अशा गुणांनी युक्त असलेल्या पुरुषास योगी म्हणतात.

ध्यानयोग पूर्ण झाल्याची लक्षणे येथे सांगितली आहेत. व्यवहारातील पदार्थांचे नुसते ज्ञान असून भागत नाही, तर त्याचा साक्षात अनुभव यावा लागतो. गीतेतील एखाद्या श्लोकावरील प्रवचन ऐकून तृप्ती होत नाही. गीता समग्र ऐकावी अशी उत्सुकता निर्माण होते. अर्थात् ज्याने गीता कधी हातातच धरली नसेल त्याला हा प्रश्न उद्भवणार नाही. मनातील जिज्ञासा किंवा अतृप्ती नाहीशी होते, तेव्हा ध्यानयोग पूर्ण झाला असे समजावे. काही लोक 'वीस वर्षे गीता पाठ केला, जप केला पण काही जमत नाही' असे म्हणून चालू असलेली साधने बंद करून टाकतात. तृप्ती होण्यापूर्वीच ज्ञान—साधने बंद करणे योग्य नव्हे. योग्याला निराशा शिवता कामा नये. ध्यानयोग्याच्या अंगी खालील गुण असणे आवश्यक आहे.

**कूटस्थ :**— 'विषयसांनिधौ अपि निर्विकारत्वम् ।' ध्यान करताना कपबशांचा आवाज ऐकला की मन ईश्वराकडून चहाकडे धावते. पण योगी पुरुष म्हणतो, चहाच काय अमृत जरी पुढे आले तरी माझे तिकडे लक्ष जाणार नाही. कारण अमृताहून मधुर व आनंद देणारा असा ईश्वर मला लाभला असता, सामान्य विषयाकडे कशाला लक्ष जाईल?

**विजितेंद्रिय :—** ध्यानयोग्याने इंद्रियांवर विजय मिळविलेला असतो. समोर साप येवो अगर ऊर्वशी, त्याचे डोळे ते पदार्थ दाखविण्याचे काम करतात. ते ग्राह्य की त्याज्य, चांगले की वाईट याचा निर्णय ते घेत नाहीत.

**समलोष्टाश्मकांचन :—** मातीचा उपयोग काही नाही म्हणून आपण टाकून देतो. पण घर बांधायचे झाले तर माती विकत घ्यावी लागते. जमिनीवर आपण राहतो ती मातीच आहे व मातीतूनच धान्य निर्माण होते. अश्मन् म्हणजे दगड किंवा मौल्यवान रत्न. ही रत्नेही सर्वांना आकर्षण करून घेतात. सोन्याने तर जगाला वेडच लावले आहे. पण योगी हे सर्व पदार्थ सारखेच मानतो.

ब्रह्मदेवाने सर्व सृष्टी निर्माण केली. अनंत पदार्थांची उत्पत्ती केली. पण त्याला समाधान झाले नाही.

तैस्तैरतुष्टहृदयः पुरुषं विधाय ।
ब्रह्मावलोकधिषणं मुदमाप देवः ॥

म्हणून ब्रह्मदेवाने मनुष्य घडविला तेव्हा त्याला अतीव समाधान झाले. कारण त्याने मानवाच्या शरीरात परमेश्वराला प्राप्त करून घेण्याची सोय करून ठेवली. ब्रह्मदेवाने करून ठेवलेली सोय म्हणजेच ध्यानयोग.

**सुहृन्मित्रार्युदासीनमध्यस्थद्वेष्यबंधुषु ।**
**साधुष्वपि च पापेषु समबुद्धिर्विशिष्यते ॥ ९ ॥**

हितचिंतक, मित्र, शत्रू, उदासीन, मध्यस्थ, अप्रिय, नातलग, त्याचप्रमाणे सज्जन, पापी या सर्वांच्या ठिकाणी समबुद्धी असलेला योगी सर्वांमध्ये श्रेष्ठ होय.

ओळखदेख, स्नेह नसता उपकार करणारा तो सुहृद्. उपकाराची फेड उपकाराने करणारा तो मित्र, कारण नसता अपकार करणारा तो शत्रू.

भांडण चालू असता तटस्थ राहणारा तो उदासीन. व दोन्ही पक्षांचे हित साधणारा तो मध्यस्थ. उपकाराची फेड अपकाराने करणारा तो द्वेष्य. बंधू म्हणजे शरीरसंबंधी–एकाच मात्यापित्यापासून झालेले. तसेच साधू व पापी या सर्वांमध्ये एकच परब्रह्म भरलेले आहे असे जाणतो तो योगी. सर्वत्र समबुद्धी असल्याने तो परमेश्वरस्वरूपच बनतो. 'समोहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः' असे स्वतःबद्दल भगवंत सांगतात. तसाच योगीही असतो.

**योगी युंजीत सततमात्मानं रहसि स्थितः ।**
**एकाकी यतचित्तात्मा निराशीरपरिग्रहः ॥ १० ॥**

अंतःकरण व देह यांचे संयमन करून निरिच्छ बनून एकाकी व अपरिग्रह झालेला योगी एकान्तात नेहमी चित्तनिवृत्ति करीत असतो.

पतंजली सारख्या शास्त्रकारानी योगाची अनेक साधने सांगितली आहेत. येथे भगवान स्वमुखाने सांगत असल्याने या साधनांस अधिक महत्त्व आहे. योगाकरिता पहिली गोष्ट म्हणजे एकान्त पाहिजे. एकान्तात दहा पंधरा साधक एकत्र बसून ध्यान करू लागले तर तेही उपयोगी नाही. एक असला तर भिक्षु, दोघे असले तर मिथुन, तिघे असतील तर ग्राम व चौघे असतील तर नगर असे म्हणतात. दोघे संन्यासी एकत्र आले तरी तुला भिक्षा काय मिळाली व मला काय मिळाली यावर चर्चा सुरू होते. काही वेळा राजकारण रंगात येऊन ध्यान बाजूला राहते. अगदी स्वतःचे मूल जवळ असले तरी त्याकडे लक्ष जाऊन ध्यान बिघडते. म्हणून एकांतही हवा व साधक एकाकीही हवा. यतचित्तात्मा म्हणजे ज्याचे मन ईश्वराकडे लागलेले आहे. ईश्वरप्राप्तीखेरीज दुसरी कोणती इच्छा न बाळगणारा तो निराशी, व अपरिग्रह म्हणजे कसलाही संग्रह न करणे. ध्यान धारणेपूर्वी योग्याचे अंगी हे गुण अंगी बाणले पाहिजेत.

**शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः ।**
**नात्युच्छ्रितं नातिनीचं चैलाजिनकुशोत्तरम् ॥ ११ ॥**

शुद्ध स्थानी, अति उंच नाही, अती सखलही नाही असे दर्भावर मृगचर्म व त्यावर वस्त्र ठेवलेले असे आपले स्थिर आसन स्थापन करा.

पवित्र देशामध्ये त्याने आसन घालावे. ते फाटके असले तरी चालेल; पण स्वतःच्या मालकीचे असावे. दुसऱ्याचे आसन घेतले तर त्याबरोबर येणारे दुसऱ्याचे रजोगुण वा तमोगुण आपणास लागण्याची शक्यता असते. ते अतिशय ऊंच नसावे. उंच आसनावर बसून जर पेंग आली तर पडण्याची भीती असते. तसेच फार खालीही नसावे. जमिनिचा गारवा बाधू नये, म्हणून प्रथम कुशासन अंथरून त्यावर मृगाजिन पसरावे व त्यावर रेशमी कापडाची घडी घालून आसन तयार करावे.

**तत्रैकाग्रं मनः कृत्वा यतचित्तेंद्रियक्रियः ।**
**उपविश्यासने युञ्ज्याद्योगमात्मविशुद्धये ॥ १२ ॥**

त्या ठिकाणी मन एकाग्र करून आसनावर बसलेल्या आणि चित्त व इंद्रिये यांच्या क्रियांचे नियमन केलेल्या अशा योग्याने अंतःकरणाच्या शुद्धीसाठी योगाचा अभ्यास करावा.

ध्यानासाठी तासभर बसायचे असले तरी शरीर व मन कार्यक्षम हवे. तसेच मन, इंद्रिये व प्राण यांच्या क्रिया त्याला अनुकूल हव्यात. प्रत्येकजण दंतशुद्धी, वस्त्रशुद्धी, मुखशुद्धी, गृहशुद्धी इत्यादीसाठी प्रयत्न करीत असतो, पण मनाच्या शुद्धीकडे कुणाचेच लक्ष नसते. ध्यान हे मनाच्या शुद्धीचे साधन आहे. ध्यानाने शुद्ध बनलेले मन जीवाचा मित्र बनते. विषयचिंतन करणारे मन जीवाचा शत्रू होये.

**समं कायशिरोग्रीवं धारयन्नचलं स्थिरः ।**
**संप्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन् ॥१३॥**

शरीराचा मधला भाग, मान व मस्तक ही समान व अचल धारण करणारा, निश्चल, स्वतःच्या नाकाच्या अग्रभागाकडे दृष्टी लावलेला व दिशाकडे न पाहणारा.

शरीर, मान व डोके ही एकाच रेषेत सरळ व स्थिर असावीत. आपल्या नाकाच्या शेंड्याकडे दृष्टी असावी. पण हे एक उपलक्षण आहे. केवळ नाकाचा शेंडाच पहात राहिल्यास मनात परमेश्वर न येता नाकाचा शेंडा येत राहील. दृष्टी अर्धोन्मीलित असावी.

**प्रशांतात्मा विगतभीर्ब्रह्मचारिव्रते स्थितः ।**
**मनः संयम्य मच्चित्तो युक्त आसीत मत्परः ॥१४॥**

अंतःकरण शांत असलेला, भीतिरहित, ब्रह्मचर्य पालन करणारा, मत्परायण व मनाचे संयमन करून माझ्या ठिकाणी चित्त ठेवणारा असा ध्यानयोगी होऊन राहावे.

ध्यानयोग साधण्यासाठी मन शांत ठेवणे, निर्भयता बाळगणे व ब्रह्मचर्य पालन करणे आवश्यक आहे. परमेश्वर प्राप्ती करून घेण्याचा निश्चय असेल तरच ध्यान संभवते.

**युञ्जन्नेवं सदात्मानं योगी नियतमानसः ।**
**शांतिं निर्वाणपरमां मत्संस्थामधिगच्छति ॥१५॥**

मनाचे नियमन केलेला व याप्रमाणे मनाला युक्त करणारा योगी, जिचे पर्यवसान मोक्षामध्ये आहे अशी मत्स्वरूप शांती प्राप्त करून घेतो.

ध्यान करता करता निर्वाण म्हणजे सर्वोत्कृष्ट सुखाने मिळणारी शांती त्याला मिळते. ध्यान धरणे म्हणजे मनाला ईश्वराचा आकार देणे. सकाळी उठल्यापासून निजेपर्यंत मनाला अनेक आकार येत असतात. रेडिओ, सायकल, खुर्ची अशा वस्तूंचेही आकार येतात. मग परमेश्वराचा मनाला नुसता आकार आला म्हणून एकदम निर्वाण सुखासारखे परम

सौख्य कां मिळावे ? कारण ईश्वराचा आकार मनाला येणे ही सोपी गोष्ट नाही. मन नेहमी अनात्म पदार्थांचे ध्यान करीत असते. मन ईश्वराचे ध्यान कधी करीत नाही. केले तरी ते फार काळ टिकत नाही. कारण रजोगुण व तमोगुण कमी होऊन सत्वगुणाची वाढ झाल्याखेरीज ध्यान जमत नाही. राम-कृष्णाचे रूप इतके सुंदर आहे, त्यामुळे ते रूप उमटण्यासाठी मनही तसेच सुंदर असावे लागते.

भीष्म व अर्जुनाचे युद्ध चालू असता अर्जुनाची पडती बाजू पाहून श्रीकृष्णानी 'न धरी शस्त्र करी मी' ही आपली प्रतिज्ञा मोडली व ते शस्त्र घेऊन भीष्मावर चालून गेले. तेव्हा भीष्माचार्यांनी एवढीच प्रार्थना केली की 'भगवंता ही तुझी सुंदर मूर्ती अंतकाळी माझ्या मनात येवो' भगवंताचे रूप सुंदर, वर्तन दिव्य आणि चरित्र अद्भुत असते, म्हणून मानवांनी त्याचे ध्यान करावे.

**नात्यश्नतस्तु योगोऽस्ति न चैकांतमनश्नतः ।**
**न चातिस्वप्नशीलस्य जाग्रतो नैव चार्जुन ॥१६॥**

हे अर्जुना, अती खाणारा व अमदी न खाणारा, अती झोप घेणारा किंवा मुळीच झोप न घेणारा असा जो असेल, त्याला योग प्राप्त होणार नाही.

**युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु ।**
**युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ॥१७॥**

ज्याचे खाणे व हिंडणे परिमित आहे, जो सर्व कर्मे मापून करतो, ज्याची निद्रा व जागर परिमित आहेत, त्याला हा योग संसाररूपी दुःखाचा नाश करणारा होतो.

अनशन हे मोठे तप असले तरी येथे त्याचा उपयोग नाही. अन्नाच्या सात्त्विक अंशापासून मन बनते. अन्नच बंद केले तर सत्त्ववृद्धी

थांबते व तमोगुण वाढून ध्यानाचे वेळी निद्रा किंवा ग्लानी येते आणि अती खाण्यानेही पेंग येते, म्हणून मिताहार हवा. "द्वौभागौ अन्नेन, एकं जलेन पूरयेत्, वायोः संचरणार्थं तुरीयं अवशिष्यते" (दोन भाग अन्न, एक भाग पाणी व एक भाग वायूसाठी रिकामा ठेवावा). चार घास कमी खा असा वडील माणसे उपदेश करतात तो याचसाठी. विहार म्हणजे हिंडणे फिरणे. दोन चार मैलांहून अधिक फिरू नये. झोपही बेताची हवी. रात्रीचे चार भाग करावेत. पहिला व शेवटचा भाग सोडून मधल्या दोन भागात (१० ते २) निद्रा घ्यावी. खऱ्या योग्याला येवढी झोप पुरते. पण साधकाला एकदम इतकी झोप कमी करणे जमणार नाही. त्याने रात्री दहा ते पहाटे चारपर्यंत निद्रा घ्यावयास हरकत नाही. कर्मेही बेताची करावी. अती श्रमानंतर किंवा हट्टाने करू म्हटले तरी ध्यान जमत नाही.

माणसाच्या मागची कर्मे सुटत नाहीत. स्वयंपाकाचा कंटाळा आला तर एक दिवस भोजनालयात जाऊन भागविता येईल. दुसरे दिवशी तरी चूल पेटवावीच लागते. तीन वेळची झुणकाभाकरी एकदम बनवून ठेवली, तरी एकदा तरी कर्म करावेच लागते. कर्म म्हटले की दुःख आलेच. ध्यान हेही एक मानसिक कर्मच आहे. तेव्हां त्यातही दुःख हे असणारच, असा काहीजण आक्षेप घेतात. साधकावस्थेत ध्यानाचे दुःख जाणवले, तरी एकदा ध्यान जमले की मग आनंदच आनंद असतो.

साधकाने प्रथम ध्यान लावले-व त्याच वेळी जागृतीतले कर्म संपले, तर ध्यानातच साधकाला झोप लागते. कर्म-सामर्थ्याने तो जेव्हा जागा होतो, तेव्हा त्याची ध्यानाकार वृत्ती तशीच असते. अशी एक क्षण जरी समाधी लागली तरी दोन्ही बाजूस ध्यान असल्याने मधली झोपसुद्धा समाधीच गणली जाते. अशा पुरुषांची 'पुण्याची गणना कोण करी?' अशी स्थिती होते. त्यांचे पुण्य इतके साठते की ते दृष्टीतून, वाणीतून,

रोमरंध्रातून पाझरत असते. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, " माझिया सत्यवादाचे तप। वाचा केले बहुत कल्प। तया फळांचे हे महाद्वीप। पातळी प्रभु ॥ " अशा पुण्यवान पुरुषांचा एकही शब्द वाया जात नाही. आज रोज शेकडो पुस्तके निघतात, त्यातील काहींना पाच पाच हजाराची बक्षीसेही मिळतात आणि पाच दहा वर्षांनी त्या पुस्तकांचे नावही लोक विसरतात. सातशे वर्षांपूर्वी ज्ञानेश्वरीसारखा ग्रंथ लिहिला, तेव्हा कुणी त्याला बक्षीस दिले नव्हते. तरी आजही त्याची पारायणे होत आहेत व भविष्य कालांतही या ग्रंथाची योग्यता तिळमात्र कमी होणार नाही. ध्यानसंपन्न व पुण्यवान पुरुषांच्या हातूनच असे प्रासादिक ग्रंथ तयार होतात.

ध्यान करायचे म्हणजे मन स्थिर करायचे. हे काम प्रयत्नाशिवाय होत नाही. एकाद्या विषयात मन एकाग्र केल्याशिवाय त्या विषयात प्रावीण्य संपादन करता येत नाही. गणित, व्याकरणादि क्लिष्ट विषयांचा अभ्यास करताना जर मन एकाग्र करता येते, तर ध्यानासारख्या सुलभ आणि आनंददायक विषयात मन एकाग्र होणे अशक्य आहे का ?

**यदा विनियतं चित्तमात्मन्येवावतिष्ठते ।**
**निस्पृहः सर्वकामेभ्यो युक्त इत्युच्यते तदा ॥१८॥**

जेव्हां नियमन केलेले मन आत्म्याच्या ठायीच राहते व सर्व-प्रकारच्या कामनेविषयी निरिच्छ होतो, तेव्हा त्याला योग सिद्ध झाला असे म्हणतात.

**यथा दीपो निवातस्थो नेंगते सोपमा स्मृता ।**
**योगिनो यतचित्तस्य युंजतो योगमात्मनः ॥१९॥**

निवाऱ्याच्या जागी असलेला दिवा जसा हलत नाही, तीच उपमा चित्ताचे नियमन केलेल्या व आत्मयोगाचे अनुष्ठान करणाऱ्या योगी मनुष्यासंबंधी जाणावी.

निर्वात जागी दिव्याची ज्योत जशी स्थिर असते, तसेच योग्याचे मन निश्चल असते.

**यत्रोपरमते चित्तं निरुद्धं योगसेवया ।**
**यत्र चैवात्मनात्मानं पश्यन्नात्मनि तुष्यति ॥२०॥**

जेथे योगाभ्यासाने नियमन पावलेले चित्त विषयापासून परावृत्त होते, जेथे साधक आपण आपल्याला पाहून आत्मस्वरुपी सुख पावतो.

आत्म्याचे दर्शन झाल्याने मनाला आनंद होतो. व्यवहारात आत्मा व अनात्मा या दोहोंनी मिळून सुख होते. पण येथे केवळ आत्माच मनाला सुख देतो. दही, साखर व केशर या तीन पदार्थांनी बनलेल्या श्रीखंड सेवनाने होणारा आनंद एकच असतो. आनंदात प्रकार नाहीत. एकच सुख निर्माण करून तीन्ही पदार्थ मागे फिरतात. समोरचे सुंदर चित्र पाहून फक्त डोळे संतुष्ट होतात. पण आत्म्याच्या दर्शनाने होणारा आनंद मनाचा असतो. मन संतुष्ट झाले की आनंद दहाही इंद्रियात आपोआप पसरतो.

**सुखमात्यंतिकं यत्तद्बुद्धिग्राह्यमतींद्रियम् ।**
**वेत्ति यत्र न चैवायं स्थितश्चलति तत्त्वतः ॥२१॥**

जे सुख सर्वोत्कृष्ट आहे, जे केवळ बुद्धिगम्य आहे, जे इंद्रियांना अगोचर आहे व जे सुख भोगीत असता योगी आपल्या स्वरूपापासून चलित होत नाही. (असे सुख योगी अनुभवितो.)

आत्मसुख अविनाशी आहे. दृष्टी कितीही तीक्ष्ण झाली तरी डोळ्यांना वास घेता येत नाही. त्याप्रमाणे बुद्धी व इंद्रिये कितीही सुंदर असली तरी त्यांना आत्मसुख घेता येत नाही. कोणताही इष्ट पदार्थ दिसला की आत्म्यावरील अज्ञानाचे आवरण (सात्त्विक वृत्तीने) बाजूला जाते व आनंद होतो. असा आनंद फक्त एक दोन क्षणच राहतो. अतिशय पुण्यवान असेल तर तीन क्षण राहील, पण लगेच मावळतो.

सुख बाह्य पदार्थांपासून मिळत नसून आतच त्याचा अखंड झरा वहात असतो. फक्त सात्त्विक वृत्तीने तो व्यक्त होतो येवढेच.

**यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः ।**
**यस्मिन् स्थितो न दुःखेन गुरुणापि विचाल्यते ॥ २२ ॥**

आणि जे सुख मिळाले असता त्याहून अधिक दुसरा कोणता लाभ आहे असे मानीत नाही व ज्या सुखामध्ये योगी मोठ्या दुःखांनी देखील डगमत नाही.

आतापर्यंत जन्मोजन्मी मनाला आनंद झालेला आहे, पण तो दुसऱ्याच क्षणी मावळतो. चारी मुक्तीने होणारा किंवा वैकुंठीचे अफाट ऐश्वर्य पाहून ते न भोगताही होणारा आनंद कायम टिकत नाही. अणिमा सिद्धी म्हणजे अतीसूक्ष्म होणे. हनुमंताने लंकेत कडेकोट बंदोबस्त केला तो या सिद्धीमुळेच. काम्यसिद्धीने मूठभर तांदुळात हजारो लोकांना जेवण घालता येते व पुनः मूठभर तांदूळ शिल्लक राहतात. या सिद्धींचा उपयोग केल्यावरही आनंद होतो. पण हे सर्व आनंदाचे प्रकार आत्मानंदापुढे फिके पडतात. ( निष्पंदाः अणिमादयः )

धर्मराजाने राजसूय यज्ञ केला तेव्हा सार्वभौमपदाचा अभिषेक स्वतः भगवंतानी केला. असे भाग्य धर्मराजाशिवाय दुसरे कुणालाही लाभलेले नाही. धर्मराज स्वतः रूपवान, गुणवान, बुद्धिवान व दक्ष होता. त्याला द्रौपदीसारखी मनोवृत्तानुसारी पत्नी लाभली होती. ती अग्नीकुंडातून निर्माण झालेली म्हणजे अयोनिज होती. तिच्या अंगाचा सुवास दहा कोसपर्यन्त पसरत असे. दहा हजार यतींना ती एकटी वाढू शकत असे. दीन, अनाथ अतिथींचे भोजन झाल्याशिवाय ती जेवत नसे. प्रतिविंध्यासारखे पुत्र, श्रीकृष्ण, व्यास-विदुरासारखे सर्वज्ञ पुरुष सल्लागार व बळसागर भीम, शौर्यसागर अर्जुन, राजकार्यधुरंधर नकुल, सेवाकार्यकुशल सहदेव असे त्याला चार बंधु होते. चौघा भावांनी चार

दिशांस जाऊन दिग्विजय केला. पण राज्यात वाटणी मागितली नाही. इतके गुणवान असून त्यांनी धर्मासाठी वनवास पत्करला. धर्मराज अजातशत्रू होता. दुर्योधनसुद्धा म्हणत असे की, आमचे वैर त्याच्या बंधूंशी आहे. खांडववन दग्ध होऊन उजाड झालेल्या भूमीवर इंद्रप्रस्थ वसवून तेथे नंदनवन बनविले. अशा धर्मराजाचा आनंद सामान्य जनापेक्षा सहस्रपट मोठा. गंधर्वांचा आनंद धर्माच्या आनंदापेक्षा शंभरपट श्रेष्ठ, त्यानंतर कर्मदेव, अजानदेव, इंद्र, बृहस्पती व ब्रह्मदेव यांचा आनंद शंभराच्या पटीने वाढणारा. पण ब्रह्मानंदापुढे ब्रह्मदेवाचा आनंदही सिंधूतील बिंदूप्रमाणे ठरतो. थोडक्यात ब्रह्मानंदापुढे सर्व आनंद तुच्छ होत. या आनंदानंतर मनाची धाव थांबते.

कितीही सुख मिळाले तरी दुःख नाहीसे होत नाही. विमानप्रवासाचे सुख मिळाले तर कोसळण्याची भीति असल्याने दुःख आहे. प्रबळ योद्ध्यापुढे दुर्बळ माघार घेतो, त्याप्रमाणे दुःखापुढे सुख माघार घेते. दुःखाचा समूळ नाश फक्त आत्मसुखाच्या प्राप्तीनेच होऊ शकतो.

शरीरात पुरीतती नांवाची नाडी आहे. मन या नाडीतच शिरले की मनुष्याला झोप लागते. मन या नाडीच्या अग्रावर आले की स्वप्न व बाहेर पडले की जागृती. डॉक्टर ऑपरेशनच्या वेळी भूल देतात. म्हणून दुःख होत नाही. पण ती फसवणूक असते. भूल उतरली की दुःखाची जाणीव सुरू होते. पण आत्मसुखात अशी फसवणूक नसते. आत्मसुख झाल्यावर मरणाचेही दुःख रहात नाही. देहाचे कर्तन केले तरी मन विचलित होत नाही.

**तं विद्याद् दुःखसंयोगवियोगं योगसंज्ञितम् ।**
**स निश्चयेन योक्तव्यो योगोऽनिर्विण्णचेतसा ॥२३॥**

त्या दुःखसंयोगरहित सुखाला योग ही संज्ञा आहे असे जाणावे. निश्चयपूर्वक व उत्साही अंतःकरणाने युक्त होऊन या योगाचे अनुष्ठान करावे.

योग म्हणजे दुःख-संयोगाचा वियोग. मुलाला मूर्ख म्हणण्याऐवजी फार शहाणा आहेस असे म्हणण्यासारखा हा शब्दप्रयोग आहे. हजारात एखादा प्रयत्न करतो व प्रयत्न करणाऱ्यांपैकी क्वचित एखाद्यालाच ज्ञान होते. असे हे आत्मतत्त्वज्ञान दुर्लभ आहे. मग असे आत्मतत्त्वज्ञान लाभले तर ती अघटित घटना म्हणजे योग नव्हे का ? हा योग दुर्लभ असला तरी त्याचे प्राप्तीसाठी रोज पांच मिनिटे तरी दिली पाहिजेत. मानवाला यश केव्हा मिळेल हे सांगता येत नाही. म्हणून निराश न होता सतत प्रयत्न चालू ठेवले पाहिजेत. म्हणूनच 'अनिर्विण्णचेतसा' असा येथे शब्दप्रयोग केलेला आहे. अखंड प्रयत्न करीत राहणाऱ्यावर प्रसन्न होऊन दर्शन देणे हे परमेश्वर आपले कर्तव्य समजतो.

ध्यान करताना निराशही व्हायचे नाही व फळही मागायचे नाहीं. यात एक रहस्य आहे. भगवंत शत्रु–सैन्यासमोर अर्जुनाला गीता सांगत आहेत. अर्जुन निःशस्त्र बनला असता शत्रुसैन्य गप्प कसे बसले ? ईश्वराची इच्छा, याशिवाय दुसरे कारण देता येत नाही. सतत प्रयत्न करणारावर भगवंत असाच दृष्टीक्षेप टाकतो. त्यामुळे चंचल मन स्थिर होते. प्रभू रामचंद्रानी केवळ कृपादृष्टीने वानर सैन्यास युद्ध कार्यास जुंपले. वानरांना वेतन नव्हते की बढतीची आशा नव्हती. तरीही वानर रामाचा शब्द झेलण्यास उत्सुक होते. मग भगवंताला साधकाचे मन निश्चल करणे अशक्य आहे का ? ध्यान–धारणेची प्रबळ इच्छा आहे, पण योगाचे स्वरूप माहीत नाही. अशी परिस्थिती असेल तेव्हा भगवान साधु पुरुषाची योजना करतात.

ध्रुव भगवंताला प्रसन्न करून घेण्यासाठी वनात गेला. त्याचा निश्चय पक्का होता. पण त्या पांच वर्षांच्या बालकाला योगाची माहिती कुठून असणार ? भगवंतानी त्याचेकडे प्रथम नारदाला पाठविले. नारदानी ध्रुवाची समजूत घालण्याचा प्रयत्न केला. नारद म्हणाले,

" घरात वृद्धांचा सुद्धा अपमान होतो, मग लहानाचा अपमान झाला म्हणून वाईट वाटून घेण्याचे कारण नाही. तू घरी परत जा "

ध्रुव म्हणाला, " सापत्न मातेच्या कठोर वचनाने माझ्या हृदयाला घरे पडली आहेत. तुमचा उपदेश नव्हे तर प्रत्यक्ष अमृत दिलेत, तरी ते माझ्या हृदयात राहणार नाही. "

ध्रुवाचा दृढनिश्चय पाहून नारदांनी त्याला द्वादशाक्षरी मंत्र दिला. ध्रुवाने आपले मन भगवंताकडे लावले. त्याला क्षुधा-तृषेचीही आठवण राहिली नाही. दृढनिश्चय व सतत प्रयत्नामुळे भगवान प्रसन्न झाले.

**संकल्पप्रभवान् कामांस्त्यक्त्वा सर्वानशेषतः ।**
**मनसैवेन्द्रियग्रामं विनियम्य समन्ततः ॥ २४ ॥**
**शनैः शनैरुपरमेद् बुध्द्या धृतिगृहीतया ।**
**आत्मसंस्थं मनः कृत्वा न किंचिदपि चिंतयेत् ॥ २५ ॥**

संकल्पापासून उत्पन्न होणाऱ्या सर्व कामना निःशेष टाकून व सर्व इंद्रियांचे सर्व बाजूंनी मनाने नियमन करून धर्मयुक्त अशा बुद्धीने हळूहळू बाह्य प्रपंचापासून मनाचा उपरम करावा व मनाला आत्म्याच्याच ठिकाणी स्थिर करून दुसऱ्या कशाचेही चिंतन करू नये.

संकल्प म्हणजे इच्छा. मग त्या ऐहिक असोत अगर स्वर्ग वा ब्रह्म लोकाच्या असोत. त्या सर्व पूर्णपणे सोडल्या पाहिजेत.

ध्यानयोग या जन्मी तडीला गेला नाही, तरी तो जन्मांतरी फलद्रूप होतो. त्याकरता पुनर्जन्म मानणे भाग पडते. नाहीतर एक जीव श्रीमंत घरात व एक दरिद्री धरात जन्मास येतो, याची संगती त्याशिवाय लावता येत नाही. एखादा वैभवात जन्म घेतो. पण तो सुखी असतोच असे नाही. अमेरिका वैभवसंपन्न म्हणतात, पण तिथेही मनःशांती नाही. रोजची शांत झोपही तेथे दुर्लभ झाली आहे. लोकांना झोपेच्या गोळ्या

खाव्या लागतात. ईश्वराकडे पाठ फिरवली असेल तर वैभव मिळूनही मन:शांती मिळत नाही. कोणाला गरीब करायचे वा कोणाला सधन करावयाचे, हे मानवाच्या हाती थोडेच आहे ? जो तो पूर्वकर्मानुसार भोग भोगीत असतो.

सर्व ध्यानयोग दहा मिनिटात जमावा असे म्हटले तर ते शक्य होणार नाही. गाडीला दहा मिनिटे उशीर आहे, तेवढ्यात ध्यानधारणा करता येणार नाही. ध्यानासाठी मनाला शांतताच हवी. ध्यान एकदमही जमणार नाही. सतत प्रयत्न करीत राहिल्यास हळू हळू ध्यान जमू लागते. मनाच्या चार भूमिका आहेत. यापैकी वाग्भूमी-जय ही पहिली. रोज नियमाने ठराविक वेळ अर्धा तास का होईना ध्यानासाठी द्यायचाच असा निश्चय केला पाहिजे. प्रथम डोळे मिटून हालचाल न करता स्वस्थ बसावे. आजूबाजूला अनेक व्यवहार चालू असतात, अनेक आवाज कानावर आदळतात, पण तिकडे अजीबात लक्ष द्यायचे नाही. तिकडे लक्ष जाऊ लागले की आपण ध्यानास बसलो आहोत अशी मनाला आठवण करायची. खाणाखुणा करायच्या नाहीत, जागेचे हलायचे नाही किंवा बोलायचे नाही. वाणी रोधल्याने मन बाहेर जाऊ शकत नाही. पण ते आतल्या आत खूप दंगा करीत असते. नाही नाही ते विचार येतात. पण सवयीने भलते सलते विचार यायचे बंद होतात. विचार येत राहिल्यास अहंचा जप करावा. नंतर अस्तिचा जप करावा. हे साधल्यास महत्तत्त्वाचा जय होतो. शेवटी मन इतके स्थिर झाले पाहिजे की, त्यात आत्म्यासंबंधीसुद्धा विचार येऊ नयेत.

अनात्म्याचे चिंतन करू नका हे म्हणणे ठीक आहे. पण आत्म्याचे सुद्धा चिंतन नको हे कसे काय? समजा, एक डबा पिठाने गच्च भरलेला असेल तर त्यातील पीठ काढता येते. पण पोकळी काढून टाकता येत

नाही. कारण पोकळी पीठ असतानाही होतीच, तिची जाणीव होण्या-साठी पीठ बाजूला करावे लागते. त्याचप्रमाणे अनात्मपदार्थ बाजूला केले की, आत आत्मा असतोच, त्यासाठी वेगळे प्रयत्न करावे लागत नाहीत.

‘ उपरम ’ म्हणजे मन शांत—स्थिर करणे. पेटलेल्या अग्नीत इंधन टाकल्यास अग्नी अधिक भडकतो, एका विशिष्ट अवस्थेपर्यंत जाऊन नंतर तो कमी कमी होऊ लागतो, अग्नीच्या ज्वाला बंद झाल्या म्हणून त्यात हात घातला तर भाजून निघतो. मात्र अग्नी पूर्ण विझल्यावर त्यात हात घालता येतो किंवा त्यात ज्वालाग्राही पदार्थ टाकले तरी तो भडकत नाही. समोर विषय आल्यावरही जेव्हा मनाची चलबिचल होत नाही, तेव्हा मनाचा उपरम झाला असे म्हणतात.

इंधनाचे तीन प्रकार आहेत. ज्वालाग्राही, शुष्क व ओले पदार्थ. अग्नी थंड झाल्यावर यापैकी कसलेही इंधन त्याला भडकवू शकत नाहीं. शरीराच्या सुद्धा तीन अवस्था आहेत. बालपणी ते वाढत असते. तरुणपणी जोरात असते, तर वृद्धपणी त्याला उतरती कळा लागते. ‘ यंदा फार उकडते, गतवर्षीपेक्षा यंदा उन्हाळा फार आहे’ असे वृद्ध म्हणतात. वास्तविक उन्हाळा तेवढाच असतो. वृद्धांची शक्ती कमी झालेली असते. पण तो दोष उन्हाळ्यावर लादतो. मन हे अग्नीप्रमाणे जसजसे विषय पुरवावे, तसतसे भडकत जाते. शरीराप्रमाणे वार्धक्यात त्याचा जोर कमी होईल असे मात्र नाही. त्याचा जोर कमी करण्यासाठी विषयग्रहण बंद केले पाहिजे, प्रारब्धाने जेवढे विषय येतील तवढेच घ्यावे, पण ते मिळविण्यासाठी अट्टाहास करू नये; म्हणजे मनाला उपरम होतो.

**यतो यतो निश्चरति मनश्चञ्चलमस्थिरम् ।**
**ततस्ततो नियम्यैतदात्मन्येव वशं नयेत् ।।२६।।**

चंचलवृत्ती (अतएव) अस्थिर मन ( आत्म्याकडून निघून ) ज्याच्या ज्याच्यामुळे बाहेर जाते, त्या त्यापासून नियमन करून आत्म्याच्याच ताब्यात आणावे.

मन फार चंचल आहे. क्षणात स्वयंपाक घरातून ते अमेरिकेत जाते. जीवात्म्याचा मनावर दाब असतो तोपर्यन्त ठीक असते. तो दाब कमी झाला की मन भरकटते. मन बाहेर का जाते याचा शोध घेतला पाहिजे. स्त्री-पुत्र, धन-दौलत हे बाह्य विषय माणसास प्रिय असतात. ते सतत त्याच्या समोर असतात. मन त्यातच गुंतलेले असते, म्हणून त्यांचा वेगळा जप करण्याची आवश्यकता नाही. जप किंवा ध्यान करायचे ते फक्त ईश्वराचेच करावे. ईश्वर कोठे नसून हृदयातच असतो, म्हणून मन अंतर्मुख केल्याशिवाय तो दिसू शकत नाही.

मन बाह्य विषयाकडे धावते व ध्यानात व्यत्यय येतो, यालाच विक्षेप म्हणतात. वृद्धपणी दुपारचे जेवण झाल्यावर झोप येते. ही गोड वाटणारी झोप कटाक्षाने टाळावी, कारण त्यामुळे रात्री झोप येत नाही. झोप न आल्याने खोकला येतो व वृद्धाला व घरातील इतरांना त्रास होतो. तसेच ध्यान करताना आवडत्या विषयाकडे धावणारे मन ध्यानात विक्षेप आणते, म्हणून त्याची धाव बंद केली पाहिजे. ध्यान साधले नाही तर इतका सुंदर मानवी देह प्राप्त होऊनही आपण वाया घालविला असे ठरेल.

प्रवचन वा कीर्तनात जशी हटकून झोप येते, तशीच ध्यानास बसल्यावर शारीरिक श्रम जास्त झाले असतील तर ग्लानी येते. यास लय म्हणतात. तो टाळण्यासाठी रात्रीची भरपूर झोप झाल्यावर पहाटेच्या उत्साहवर्धक व शांत समयी ध्यानास बसावे.

**प्रशांतमनसं ह्येनं योगिनं सुखमुत्तमम् ।**
**उपैति शांतरजसं ब्रह्मभूतमकल्मषम् ॥ २७ ॥**

असा ध्यानाचा अभ्यास केल्याने ज्याच्या मनाला उत्तम शांती मिळाली आहे, ज्याचा रजोगुण नाश पावला आहे, जो पापपुण्यादिकाविरहित आहे. अशा योग्याला श्रेष्ठ सुख प्राप्त होते.

दिवा पूर्ण भरलेला असला तरी त्याची वात सारली नाही, किंवा पुन: तेल घातले नाही तर तो आपोआप शांत होतो. फुंकर घालण्याची किंवा जोराचा वारा येण्याची अपेक्षा नसते. तसेच ध्यान पूर्ण झाले की मन आपोआप शांत होते. कारण मनातलि रजोगुण व तमोगुण नाहीसा झालेला असतो. अशा योगी पुरुषास उत्कृष्ट सुख आपण होऊन माळ घालते. व्यवहारातील सुखे आपण ओढून ताणून आणलेली असतात. त्यामुळे ती टिकत नाहीत. पण आत्मसुख आपणहून आलेले असते, म्हणून ते परत जात नाही. येथे उपैति म्हणजे 'प्राप्त होते' असा शब्द-प्रयोग हेतुपुर:सर केलेला आहे. सर्वजण लक्ष्मीच्या मागे लागलेले असतात. ती हाती आल्यासारखी वाटते, पण लगेच निसटून जाते. पण जर लक्ष्मी आपणहून आली तर ती परत जात नाही. ब्रह्मसुख असेच आपण-हून येते म्हणून त्याचा नाश होत नाही. व्यवहारातील सुखे ही चौदा कॅरेट किंवा नकली सोन्यासारखी असतात. तेजाबात टाकण्यापूर्वीच ती काळी पडतात. ब्रह्मसुख शंभर नंबरी सोन्यासारखे आहे. ते तेजाबात टाका किंवा अग्नीत टाका, त्यात काही फरक होत नाही.

**युञ्जन्नेवं सदाऽऽत्मानं योगी विगतकल्मषः ।**
**सुखेन ब्रह्मसंस्पर्शमत्यंतं सुखमश्नुते ॥२८॥**

याप्रकारे मन सर्वदा आत्म्याच्या ठिकाणी स्थिर करणारा योगी पापविरहित होतो व अनायासे ब्रह्मरूप असे अत्यंतिक सुख भोगतो.

ध्यान फक्त एखाद्या वेळी फक्त पहाटेच करावे असे नाही. जेव्हां मन शांत असेल व सवड असेल अशा कोठल्याही वेळी ध्यान करावे. मन केव्हा आत्माकार होऊन अचूक बाण लागेल हे सांगता येत नाही.

ध्यान सकाम असले तरी ते पुण्य निर्माण करते. पण ध्यानही निष्काम असावे. निष्काम ध्यानाने पुण्य तर मिळतेच, शिवाय पुर्नजन्म टळतो. प्रतिबंध दूर होतात. एखाद्याचा अधिकारपदावरील हक्क डावलून तेथे दुसरा मनुष्य येऊन बसतो. कारण अधिकार देणारा व घेणारा यामध्ये पूर्वीचे काही प्रतिबंध असतात. ते दूर झाल्याशिवाय अधिकारपद मिळत नाही. निष्काम ध्यानाने सर्व प्रतिबंध दूर होऊन अमर्याद, अविनाशी अशा असीम सुखाचा लाभ घडतो.

आपले भाग्य आपणच घडवावयाचे असते. हे कार्य काचेची मूर्ती घडविण्यासारखे आहे. प्रत्येक ठोका अत्यंत सावधगिरीने मारावा लागतो. एखादी चूक अगर घाई सर्व कामाचा नाश करू शकते. म्हणून आपली प्रत्येक क्रिया आपण विचारपूर्वक व सावधगिरीने केली पाहिजे.

ध्यानयोगाने आत्यंतिक सुख मिळते असे प्रतिपादन केले. पण श्रुति स्मृति व पुराणे आत्यंतिक सुख वेदांताच्या परिशीलनाने मिळते असे म्हणतात. यातील खरे कोणते? महर्षी व्यास ' एतेन योगः प्रयुक्तः सांख्यनिराकरणेन ' असे म्हणतात. म्हणजे कपिल व पतंजली यांची मते वेदांतविरोधी आहेत म्हणून ती ग्राह्य नाहीत. ध्यानयोगाने आत्यंतिक सुख मिळते, हे म्हणणेही श्रुतीविरोधी म्हणून अग्राह्य ठरणार नाही का?

थोडा विचार केल्यास ही शंका नाहीशी होईल. ध्यानयोगाने ब्रह्मसुख सुलभतेने मिळते असे भगवंतानी प्रतिपादन केले आहे. ज्ञानयोगानेही ब्रह्मसुख मिळते, पण त्यात कष्ट फार आहेत. ज्ञानाकरिता गुरु करावा लागतो. गुरूला शरण जाऊन ' तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ' अशा पद्धतीने वागावे लागते. वाटेल ते प्रश्न विचारावयाचे नाहीत. दुसरा कोणी उत्तर देऊ शकणार नाही फक्त गुरूच उलगडून

दाखवू शकेल, असे गर्भित प्रश्न विचारावयाचे. त्याकरता तेवढे वाचन, अभ्यास, मनन करावे लागते, सूक्ष्मबुद्धी असावी लागते. सेवा करावी लागते. सेवा करणे हे कांही सोपे नाही. ' सेवाधर्मः परमगहनो योगिनामप्यगम्यः ' असे म्हटले आहे. गुरुसेवा करताना कडकडून भूक लागली तरी सांगता येत नाही. श्रीकृष्ण सांदीपनीकडे असता त्याला गुरुपत्नीने जंगलातून लाकडे आणावयास सांगितली. अत्यंत भूक लागली असताही श्रीकृष्णानी आज्ञा पाळली. आपण एका भुकेल्या मुलाला कामाला लावले हे गुरुपत्नीच्या लक्षात आले. म्हणून दोन मुठी चणे सुदामाकडे दिले. सुदाम्याने श्रीकृष्णाला हुडकण्याचा आळस केला आणि भगवंताना उपाशीच रहावे लागले. सुदाम्याला या गोष्टीचे परिणाम भोगावे लागले, ही गोष्ट वेगळी.

नुसती सेवा करूनही भागत नाही. अभ्यासही करावा लागतो. स्वतःची गाय राखणे, हे दुसऱ्याची गाय राखण्यापेक्षा सोपे असते. सेवा करताना सतत दुसऱ्याचे मन राखावे लागते. ज्ञानयोग साध्य करताना दुसऱ्याचे मन राखावे लागते, पण ध्यानयोगात फक्त आपले मन सांभाळावयाचे असते. युक्ताहार—विहाराला अनुमति असल्याने तहानभुकेचाही त्रास नसतो.

**सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि ।**
**ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः ॥२३॥**

ज्याचे मन योगयुक्त झाले आहे तो प्राणिमात्रांच्या ठिकाणी आत्म्यास पाहतो व आत्म्याच्या ठिकाणी प्राणिमात्र आहेत असे पाहतो. म्हणजे सर्व ठिकाणी समदृष्टी होतो.

योगामध्ये दोन प्रकार आहेत. १) युंजान म्हणजे साधक, व युक्त म्हणजे सिद्ध. साधकाला प्रश्न केल्यास तो सारासार विचार करून मग योग्य उत्तर देतो. सिद्ध तात्काळ उत्तर देतो. कारण त्याला

सर्व गोष्टी प्रत्यक्ष दिसत असतात. अशा ज्ञानाला योगज ज्ञान असे म्हणतात. व्यवहार करतांना ज्ञान असते, ते इंद्रिये व विषय यांच्या संन्निकर्षापासून होते. प्रत्येक इंद्रियावर स्वामित्व असलेल्या वेगवेगळ्या देवता आहेत. सूर्य ही डोळ्यांची देवता आहे. सूर्यदेवता प्रसन्न नसेल तर नवीन डोळा बसविला तरी दिसू शकणार नाही. या देवतांचे अस्तित्व प्रत्यक्ष दिसत नाही, लोक मान्य करीत नाहीत. पण मध्यवर्ती सरकारची आपल्यावर सत्ता आहे, ती तरी आपणास कुठे दिसते. म्हणून काही ती अमान्य करता येत नाही. त्या सत्तेस न जुमानता आयकर भरला नाही तर शिक्षा होते. ज्याप्रमाणे शासनाच्या विरुद्ध वागून चालत नाही, त्याचप्रमाणे या देवता अप्रसन्न होतील असे वर्तन केल्यास त्याचे परिणाम भोगावे लागतातच. योगज ज्ञान असल्याने योगी आपला आत्मा सर्व भूतात व सर्वभूते आपल्यात आहेत हे जाणतो. तो सर्वत्र समदर्शन असतो.

**यो मां पश्यति सर्वत्र सर्वंच मयि पश्यति ।**
**तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति ॥३०॥**

जो मला सर्वत्र पाहतो आणि माझ्या ठिकाणी सर्वास पहातो, मी कधीच त्याच्या दृष्टीआड होत नाही व तो मला कधी दृष्टीआड होत नाही.

ईश्वरात जग असून जगात तो सर्वत्र भरला आहे. हीच गोष्ट पुढे 'ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति' या वाक्याने भगवंतानी स्पष्ट केली आहे. यालाच तत् पदार्थाचे ज्ञान म्हणतात. हे ज्ञान ज्याला असेल त्याला माझे व मला त्याचे अदर्शन कधीच होत नाही. म्हणजेच आमचा कधीच वियोग होत नाही.

**सर्वभूतस्थितं यो मां भजत्येकत्वमास्थितः ।**
**सर्वथा वर्तमानोऽपि स योगी मयि वर्तते ॥ ३१ ॥**

माझे एकत्व जाणून राहणारा जो योगी सर्व भूतांच्या ठायी असलेल्या मला सेवितो, तो देह, नाम इत्यादी उपाधींनी युक्त असला तरी मत्स्वरूप झालेला असतो.

जीवाला अंत:करण व ईश्वराला माया ही उपाधी आहे. चंद्रावरील खाचखळगे साध्या डोळ्यांनी दिसत नाहीत. मोठ्या शक्तीशाली दुर्बिणी-तून पाहिले तर चंद्राचा पृष्ठभाग स्पष्ट दिसतो. कारण साधन प्रभावी असते. ईश्वराकडे माया हे सर्वोत्कर्षाचे साधन असल्याने तो सर्व जगाचे नियमन करतो. जीवाजवळ अंत:करण हे साधन असले तरी ते प्रभावी नाही. शिवाय त्यात सत्त्वगुणही त्या मानाने फार कमी असतो. योगी दोघांच्या दोन्ही उपाधी मनाने, ज्ञानाने व विचाराने दूर करतो. त्यामुळे त्याला एकत्वाचे ज्ञान होते. चतुर पुरुषाच्या चांगल्या क्रिया अधिक असतात. त्या मानाने वाईट क्रिया कमी असतात. मूर्खांचे चांगल्या-वाईट क्रियांचे हे प्रमाण उलट असते. पण ज्ञानी पुरुषाच्या सर्वच क्रिया शुभ असतात. सर्वात वाईट किंवा अशुभ म्हणजे मरण असे आपण समजतो. पण ज्ञान्याचे मरणसुद्धा मंगलच असते. म्हणून त्यास समाधी असे नाव आहे.

रावण एकदा सनत्कुमाराकडे गेला व त्यांना वंदन करून म्हणाला, 'मी कोणापुढेही आजवर नमलो नाही. पण तुमचे अलौकिक तेज पाहून मी नतमस्तक झालो आहे. हे तेज आपण कोणापासून मिळविले ?'

सनत्कुमार म्हणाले, "हे तेज नारायणाचे आहे. त्याचे ध्यान करणारे श्वेत द्वीपावर राहतात. हवे तर तेथे जाऊन पाहून ये."

रावण तेथे गेला. तेथील एका बाईने त्याला 'कोण रे तू? आणि इथे कशाला आला आहेस ?' असे विचारून त्याचा हात पकडून गरगर फिरवून दुसऱ्या बाईच्या हाती दिले. दुसरीने तिसरीकडे फेकले. असे त्याला खूप फिरविले व 'दहा तोंडाचा व वीस हाताचा एक किडा

आलेला आहे, किती ओंगळ दिसतो नाही,' असे म्हणून एका बाईने त्याला गरगर फिरवून समुद्रात फेकले. तिकडून नारदमुनी चालले होते ते म्हणाले, "काय हो दशमुख, श्वेतद्वीपातील पुरुषांशी लढायला गेला होता वाटते?" रावण बिचारा काही बोलला नाही. तो परत सनत्कुमाराकडे गेला व म्हणाला, "महाराज, मला नारायण ध्यानाचा महिमा कळला. पण त्याचे ध्यान करणे मला जमत नाही. कृपा करून त्याला प्राप्त करून घेण्याचा दुसरा एखादा मार्ग सांगा.

सनत्कुमार म्हणाले, "दुसरा उपाय म्हणजे नारायणाचे हातून मरण येईल असे काही कर. रामावतारात ही तुझी इच्छा पूर्ण होईल."

सनत्कुमार योगज्ञानी असल्याने त्यांना युगांतरीच्या गोष्टीही स्पष्ट समजत होत्या.

**आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन ।**
**सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः ॥३२॥**

हे अर्जुना, सर्व ठिकाणी जो आपल्यासारखे पाहतो, सुख व दुःख हेही जो आत्मबुद्धीने पाहतो, तो योगी अत्यंत श्रेष्ठ अवस्थेला पोहोचलेला आहे असे समज.

पर योगी व अपर योगी असे योग्यात दोन प्रकार आहेत. पर योगी हा आपल्याप्रमाणेच सर्व जग आहे असे समजतो. दुसऱ्याने आपणास सुख दिले तर आपणास आनंद होतो. आपण दुसऱ्याला सुख दिले तर त्यालाही आपल्याप्रमाणेच आनंद होईल, म्हणूनच तो सर्वांना सुख देतो. त्याचे देहावर ममत्व नसते. दुसऱ्यांनी पीडा दिल्यास आपल्यास दुःख होते, हे जाणून दुसऱ्यांनी पीडा दिली तरी तो त्यांना दुःख देत नाही. इतकेच नव्हे तर दुसऱ्यांच्या दुःख निरासाचा आटोकाट प्रयत्न करतो. त्याला कोणाबद्दल द्वेष वा शत्रुत्व नसते. स्वतः जीवन्मुक्त असल्याने

तो जगावर उपकारच करतो. प्रारब्धयोगाने त्याच्या वाटयास दुःख आले तरी ते त्याला भासत नाही.

अपर योग्यास तत्त्वज्ञान समजलेले असते. पण मनोनाश आणि वासनाक्षय झालेला नसल्याने प्रारब्धवशात् आलेल्या दुःखाचा परिहार तो करू शकत नाही. त्याला लोकावर उपकार करणेही जमत नाही. त्याला जीवन्मुक्ती मिळाली नाही तरी तो विदेह-कैवल्यभाक् होतो. आत्मा व्यापक असून तो सर्वत्र भरलेला आहे हे जाणणे, म्हणजे तत्त्वज्ञान होणे. सतत चालू असलेल्या मनाच्या वृत्ती कमी करणे म्हणजे मनोनाश होणे, म्हणून योगः चित्तवृत्तिनिरोधः । अशीच योगाची व्याख्या केली आहे.

लहान मूल सारखे खा खा करते. त्याच्या हितासाठी त्याला कोणत्याही उद्योगात गुंतवून त्याचे खाणे कमी करावे लागते. आपले मनही सारखे भरकटत असते. म्हणून त्याला काही काळ डांबून ठेवणे योग्य असते. त्या वेळी काही करायचे नाही, फक्त ज्या ज्या वृत्ती मनांत येतील त्या त्या सोडत जायच्या. हळू हळू हा डांबून ठेवण्याचा काळ वाढवत राहिले पाहिजे. मनामध्ये वासना, काम, क्रोध या वृत्ती अकस्मात उद्भवतात. याचे कारण पूर्व संस्कार. दुसऱ्याचे बोलणे पूर्णपणे ऐकून न घेतल्याने क्रोध उत्पन्न होतो. म्हणून दुसऱ्याचे बोलणे नीट ऐकून त्याचा पूर्वापार संबंध लक्षात घ्यावा. म्हणजे कामक्रोधाने मन मलीन होत नाही. स्वार्थपरायणता ही एक अत्यंत मलीन वासना आहे. स्वार्थाबरोबर पदार्थही पाहिल्यास मन शुद्ध बनत जाते.

एखादी उत्कृष्ट विद्या प्राप्त झाली असेल तर ती खूप पैसा मिळवून देते. त्या पैशाच्या सहाय्याने आणखी एखादी विद्या शिकता येते. पैसा व विद्या ही एकमेकांस पोषक आहेत. त्याचप्रमाणे तत्त्वज्ञान, मनोनाश व वासनाक्षय हे सुद्धा परस्परांना उपयोगी पडणार आहेत. जीवन्मुक्ताने या तीन्ही गोष्टी अटोकाट प्रयत्न करून आत्मसात केलेल्या असतात.

विद्यार्थ्याची गणित विषयांत शंभरपैकी शंभर गुण मिळविण्या इतकी तयारी झाली तरी उत्तीर्ण होण्यासाठी त्याला इतर विषयांचा आवश्यक तेवढे गुण मिळविण्या इतपत तरी अभ्यास करावाच लागतो. त्याच प्रमाणे नुसत्या तत्वज्ञानात पारंगत होऊन भागत नाही, त्याच बरोबर मनोनाश व वासनाक्षय यासाठी थोडातरी प्रयत्न हवा. जीवनमुक्ती हे जीवनाचे ध्येय असेल तरच हे जमते, गणपती तयार करायला गेल्यावर वानर बनला तर हरकत नाही. पण मुळातच वानर बनविण्याची इच्छा धरू नये, नेहमी ध्येय तरी उच्च हवे. जीवनमुक्ती हे ध्येय ठेवल्यास निदान विदेह कैवल्याची प्राप्ती होईल, प्रथमच विदेह कैवल्याचे ध्येय बाळगल्यास दोन्हीही मिळणे कठीण होते.

अर्जुन उवाच :–

> **योऽयं योगस्त्वया प्रोक्तः साम्येन मधुसूदन ।**
> **एतस्याहं न पश्यामि चंचलत्वात् स्थितिं स्थिराम् ॥३३॥**
>
> **चंचलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवद्दृढम् ।**
> **तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम् ॥३४॥**

अर्जुन म्हणाला, ' हे मधुसूदना, तू जो हा समदर्शनाचा योग सांगितलास तो मन चंचल असल्याने माझ्या ठिकाणी स्थिर राहील असे मला वाटत नाही. हे कृष्णा मन चंचल, क्षोभक,बलवान व वळविण्यास कठीण आहे. त्याचा निग्रह करणे म्हणजे वायूचा निग्रह करण्याप्रमाणेच अत्यंत कठीण आहे असे मला वाटते.

ध्यान करायचे म्हणजे मन साम्यात ठेवायचे. म्हणजेच त्याचा विक्षेप किंवा लय होऊ न देता मनाला ईश्वराचा आकार द्यावयाचा. एक दोन क्षणच असे करता येते पण सतत जमणे अतिशय अवघड आहे, कारण चांचल्य व अस्थिरपणा हा मनाचा स्वभाव असल्याने त्याला क्षणभर ईश्वराकडे लावले तर दुसऱ्या क्षणी ते गायी म्हशीवर

जाऊन बसते मनानेच मन आवरावे म्हटले तर स्वतःच्या चंचलपणामुळे मनाला तेही जमत नाही. देहेन्द्रियांनाही ते आवरत नाही. ते प्रमाथी असल्याने तेच देहेन्द्रियांना क्षोभ निर्माण करते. मनात क्रोध आला तर ओठ पुटपुटू लागतात, डोळे लाल होतात व सारे शरीर थरथर कापू लागते. मन इंद्रियांना वेसण घातल्याप्रमाणे वागवते, मग ती बिचारी मनाला कशी आवरणार? जीवात्म्याने त्याला वठणीवर आणावे तर मन इतके बलवान की ते अविकारी जीवाला विकारी भासवते. शिवाय मन दृढ म्हणजे हट्टी आहे. त्याला आवरणे म्हणजे मोठमोठे वृक्ष उन्मूळन टाकणाऱ्या सोसाटयाच्या वाऱ्याला हातरुमालाने आडवण्याचा प्रयत्न करण्यासारखे आहे. अर्जुनाने उपस्थित केलेल्या शंकेचे निवारण भगवंतानी पुढील श्लोकात केले आहे.

भगवान उवाच

**असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहं चलम् ।**
**अभ्यासेन तु कौंतेय वैराग्येण च गृह्यते ॥३५॥**

भगवान म्हणाले, ' हे महाबाहो, मन हे निःसंशय चंचल व निग्रह करण्यास कठीण आहे. परंतु कौंतेया, सतत अभ्यासाने व वैराग्याने त्याचा निग्रह करता येतो.

भगवंतानी प्रथम अर्जुनाचे म्हणणे निःसंशयपणे मान्य केले व लगेच त्यावरही उपाय सुचविला. येथे अर्जुनाला महाबाहो हे विशेषण लावण्यात भगवंताचा एक विशेष आहे. अर्जुनाने शंकराबरोबर युद्ध करून महाबाहू ही पदवी व पाशुपतास्त्र मिळविले, शंकराचे दर्शनसुद्धा दुर्लभ. अशा संहारशक्ती पूर्णतेला गेलेल्या महादेवाबरोबर अर्जुन युद्ध करून त्याला प्रसन्न करून घेऊ शकला. शंकरानी युद्धात अर्जुनाची सर्व आयुधे गिळून टाकली तरीही तो डगमगला नाही. कारण पूर्वी त्याने इंद्रकील पर्वतावर तीव्र तप करून व्यासाकडून ' प्रतिस्मृती ' विद्या मिळविली होती. तो

अभ्यास त्याच्या उपयोगी पडला. जेथे महादेवासारख्या सर्वश्रेष्ठाला प्रसन्न करून घेता येते, तेथे मनाला जिंकणे अवघड असले, तरी अशक्य नाही. मनाला जिंकण्याची अभ्यास व वैराग्य ही दोन आयुधे आहेत. ज्ञानेश्वर म्हणतात,

परंतु अभ्यासासी काही । सर्वथा दुष्कर नाही ।
यालागी माझ्या ठायी । अभ्यासे मीळे ॥

अभ्यास करीत राहिल्यास कितीही अवघड विषय असू दे. तो समजू लागतो. अभ्यासाने मनही निश्चल करता येते. जेवतांना एकदम दिवे गेले तरी घास तोंडातच जातो. कारण हाताला जन्मापासून तेच वळण आपण लावलेले असते. पेटीवाला, टाईप करणारा, यांचे हात डोळ्याच्या मदतीशिवाय आपले काम बिनचूक करतात. सतत अभ्यासाने हातांना संवय झालेली असते.

' असाध्य ते साध्य करिता सायास । कारण अभ्यास तुका म्हणे॥ '

तुकाराम महाराजाप्रमाणे सर्व साधुसंतांनी अशीच अभ्यासाची महती गाइलेली आहे. भगवंतानी मनाला जिंकण्याचा दुसरा उपाय सांगितला आहे तो म्हणजे वैराग्य. वैराग्य प्राप्त झाले की मनुष्य निर्भय बनतो. प्रत्येक वस्तूला कशा ना कशाचे तरी भय आहे. पण वैराग्य तेवढे निर्भय आहे. यासंबंधी एक संस्कृत सुभाषित आहे.

भोगे रोग भयं, कुले च्युतिभयं, वित्ते नृपालाद्भयं ।
मौने दैन्यभयं, बले रिपुभयं, रूपे जराया भयं ॥
शास्त्रे वादभयं, गुणे खलभयं, काले कृतान्ताद्भयं ।
सर्वं वस्तु भयान्वितं भुवि नृणां वैराग्यमेवाभयम् ॥

अशी निर्भयता प्राप्त झाल्यावर मनाची तरी भीती कशी राहील व ते ताळ्यावर का येणार नाही ?

**असंयतात्मना योगो दुष्प्राप इति मे मतिः ।**
**वश्यात्मना तु यतता शक्योऽवाप्तुमुपायतः ॥३६॥**

ज्याचे अंतःकरण स्वाधीन नाही त्याला योग प्राप्त होणे अत्यंत कठीण हे मला मान्य आहे पण ज्याचे अंतःकरण स्वाधीन आहे तो वरील प्रयत्नांनी योग प्राप्त करू शकतो.

एखादी गोष्ट प्राप्त करून घ्यावी अशी अंतःकरणापासून इच्छा नसेल त्याला ती गोष्ट दुष्प्राप्य वाटते. कारण ते मिळविण्यासाठी तो मनापासून प्रयत्न करीत नाही. जराशी अडचण निर्माण झाली की तो मार्ग सोडून देतो. पण योग प्राप्त व्हावा अशी अंतःकरणापासून धारणा आहे, त्याला योग सुलभ असतो.

अर्जुन उवाच—

**अयतिः श्रद्धयोपेतो योगाच्चलितमानसः ।**
**अप्राप्य योगसंसिद्धिं कां गतिं कृष्ण गच्छति ॥३७॥**
**कच्चिन्नोभयविभ्रष्टश्छिन्नाभ्रमिव नश्यति ।**
**अप्रतिष्ठो महाबाहो विमूढो ब्रह्मणः पथि ॥३८॥**
**एतन्मे संशयं कृष्ण च्छेत्तुमर्हस्यशेषतः ।**
**त्वदन्यः संशयस्यास्य च्छेत्ता नह्युपपद्यते ॥ ३९ ॥**

अर्जुन म्हणाला, हे कृष्णा, मनुष्य श्रद्धावान असला, पण मन योगापासून चलित झाल्याने प्रयत्न सुटला व योगसिद्धी झाली नाही तर तो कोणत्या गतीला जातो ? हे कृष्णा इंद्रियसुख व मोक्ष या दोहोपासून भ्रष्ट झालेला, ब्रह्म प्राप्तीच्या मार्गात आधारहीन, मतिहीन झालेला इतर ढगापासून वेगळ्या झालेल्या ढगाप्रमाणे नाश तर पावत नाही ? हे कृष्णा, ही माझी शंका पूर्णतेने नाहीशी करण्याला तू समर्थ आहेस. शंका निरसन करणारा तुझ्याखेरीज मला दुसरा कोणी समर्थ आढळत नाही.

योगाचा प्रयत्न करीत असता प्रयत्न अपुरे पडून ज्ञान होण्यापूर्वीच मृत्यु आला तर त्याला कोणती गती मिळते अशी अर्जुनाची शंका आहे. शरद ऋतूत आभाळात ढग येतात, त्यांचा एकमेकाशी संयोग झाला तर पाऊस पडतो, पण तसा संयोग न होता ते आकाशात विरून जातात, तसे केलेले प्रयत्न वाया जातात का? कारण कर्मयोग सोडला म्हणून कर्माचे फळ नाही व ज्ञानसाधने अपूर्ण राहिली म्हणून ज्ञानही नाही. आपले शंका निरसन फक्त भगवंतच करू शकतील. ते सामर्थ्य इतर कोणात नाही अशी अर्जुनाने भगवंतावरील आपली निष्ठा येथे प्रकट केली आहे. ज्याने योगाचा अभ्यास केला आहे तोच त्यातील बारकावे किंवा अडथळे या संबंधी बोलू शकेल. लग्न केव्हा होईल? नोकरी केव्हा लागेल? मुलगा होईल की मुलगी? अशा इहलोकीच्या गोष्टीबद्दलसुद्धा कोणी खात्रीपूर्वक सांगू शकत नाही, मग जन्मजन्मांतरीच्या अदृष्टाबद्दल सांगण्यास कोण समर्थ आहे? फक्त योगेश्वर कृष्णाचे तेवढे सामर्थ्य आहे.

भगवान उवाच—

**पार्थ नैवेह नामुत्र विनाशस्तस्य विद्यते ।**
**नहि कल्याणकृत्कश्चिद्दुर्गतिं तात गच्छति ॥४०॥**

भगवान म्हणाले--हे पार्था, इहलोकी वा परलोकी कोठेही त्याचा नाश होत नाही. अरे बाबा, शुभकर्म करणारा कोणीही दुर्गतीला जात नाही.

योग हा कल्याणकृत् असतो. भक्तिमार्ग, ज्ञानमार्ग, निष्कामकर्मयोग, अष्टांगयोग, ध्यानयोग हे सर्व ईश्वरप्राप्तीचेच मार्ग आहेत, म्हणूनच याला कल्याणकारी मार्ग म्हणतात. यांपैकी कोणत्याही मार्गाने गेल्यास कल्याणच होते यात संशय नाही. परमेश्वर उपकाराची फेड अपकाराने कशी करील? पुण्य कार्य करूनही ज्यांना त्रास सोसावा लागतो, ते परमेश्वराला कृतघ्न म्हणतील पण त्यांनी लक्षात ठेवावे की, त्यांचे

पुण्यकर्म व्यर्थ जात नाही. प्रथम पापाचे फळ भोगून अदृष्टाचा निरास झाला की पुण्याचे फळ मिळाल्याशिवाय राहात नाही. फळदाता ईश्वर आहे हा विश्वास हवा.

व्यावहारिक ज्ञान व्यर्थ जाते. शास्त्राची पदवी घेऊन एखाद्याने कापड दुकान काढले तर त्याच्या शिक्षणाचा तेथे काहीच उपयोग होत नाही. पण योगपूर्ण झाला नाही तरी केलेले कर्म वाया जात नाही.

आरुरुक्ष ध्यान व कर्म दोन्ही करीत असल्याने त्याला कर्माचे फळ मिळते. आरूढाला ज्ञान मिळते. पर योग्याला जीवनमुक्ती तर अपर योग्याला विदेहकैवल्य लाभते. एखाद्या साधकाला ध्यान करण्याची उत्कट इच्छा निर्माण होते व सर्व कर्मे सोडून तो संन्यास घेतो व केवळ ध्यानातच राहतो. याला विविदिषा संन्यास म्हणतात. विविदिषा संन्याशांचेही दोन प्रकार असतात एक भोगाशा व दुसरा भोगाशा नसलेला.

परमार्थासाठी केलेले कुठलेही कार्य फुकट जात नाही.

**प्राप्य पुण्यकृतांल्लोकानुषित्वा शाश्वतीः समाः ।**
**शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभि जायते ॥४१॥**

तो योगभ्रष्ट पुण्यकर्मे करणाऱ्यांच्या लोकी जाऊन पुष्कळ वर्षे वास केल्यानंतर शुद्धाचरणी व वैभवसंपन्न कुळात जन्मतो.

ज्या योग्याला भोगाशा असते तो मृत्युनंतर अश्वमेधासारखे यज्ञ करून मिळणाऱ्या पुण्यश्लोकी जातो.

पुण्यवान स्वर्गात जातात, पण तेथे चिरकाल राहता येत नाही. पुण्यक्षय झाला की तेथून हकालपट्टी होते. पण ध्यानयोगी स्वर्गात चिरकाल किंवा मनसोक्त राहतो. हे अर्थात् ध्यानाचे अवांतर फळ होय. तेथील भोग भोगून कंटाळा आला तर मृत्युलोकी तो शुद्ध श्रीमंताच्या घरी जन्म घेतो. शुद्धता विरहित श्रीमंती ही दारिद्र्याहूनही हीन होय.

श्रीमंतीबरोबर सदाचार असेल तरच भोग भोगता येतात. गाडीला एक तरणा व एक म्हातारा असे बैल जुंपले तर प्रवास सुखाचा होत नाही. श्रीमंती व अपवित्रता असेल तर सुखाची साधने असतील, पण उपभोगाचे सुख मिळणार नाही. पुण्यलोकात राहूनही थोडी भोगाशा बाकी राहतेच. म्हणून तो श्रीमंताकडे जन्म घेतो.

**अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम् ।**
**एतद्धि दुर्लभतरं लोके जन्म यदीदृशम् ॥ ४२ ॥**

अथवा बुद्धिमान अशा योगी लोकांच्याच कुळात तो जन्म घेतो. अशा तऱ्हेचा जन्म या जगामध्ये फार दुर्लभ आहे.

योगभ्रष्ट शुद्ध श्रीमंतांच्या किंवा बुद्धिमान योगी लोकांच्या कुळात जन्म घेतो. हे दोन्ही जन्म दुर्लभ आहेत. हे जन्म ज्ञानार्थ घेतलेले असतात. दारिद्र्य वाईट खरे, पण ते जर विदुरासारख्या योग्याचे कुळातील असेल तर तेथील ज्ञानाच्या तेजापुढे दारिद्र्य फिके पडते. ज्ञान किंवा पैसा यापैकी एक काही तरी पसंत करा असे सांगितल्यास, विचारी मनुष्य ज्ञान पसंत करील, कारण पैसा संपून जाण्याची शक्यता आहे. तसे ज्ञानाचे नाही. शिवाय ज्ञानामुळे यश, कीर्ती व प्रताप वाढतो. ज्ञान संपत तर नाहीच, उलट ते वाढत असते.

भगवंतांच्या या सांगण्यावर अर्जुनाच्या मनांत एक शंका निर्माण झाली. तो म्हणतो, " धनवैभव अशाश्वत आहे, ह्याचा पांडवांना चांगला अनुभव आलेला आहे. मृत्यु म्हणजे एक प्रदीर्घ निद्रा आहे. भोगाशा नसलेला योगी ब्रह्मज्ञानी योगी कुळात जन्मतो व पूर्वीचे संस्कार ताजे असल्याने तो बाळपणीच पूर्वीचा अभ्यास पुढे चालू करतो. पण वैभवकुळात जर त्याचा जन्म झाला तर विषयांचे संस्कार प्रबळ होतील, मग ध्यान जमणे कसे शक्य आहे. शुद्ध श्रीमंतीमुळे अनिष्ट टळले, तरी ध्येयप्राप्ती

होऊ शकणार नाही असे वाटते. माझेच उदाहरण पहा. माझ्या वयाला आज साठ वर्षे झाली तरी माझ्या मागचे युद्ध काही सुटत नाही. आतापर्यन्त मला ज्ञानेच्छा का निर्माण झाली नाही?''

अर्जुनाच्या मनातील आशंका ओळखून भगवंत सांगतात—

**तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम् ।**
**यतते च ततो भूयः संसिद्धौ कुरुनंदन ॥४३॥**

हे कुरुनंदना, त्या ठिकाणी पूर्वजन्मीच्या संस्काराने युक्त असलेल्या बुद्धीचा योग होतो. त्यापुढे तो पुनः पूर्ण योगसिद्धीसाठी प्रयत्न करतो.

योग्याचा पुर्नजन्म होतो तेव्हा त्याला जरी गुरु भेटला नाही, तरी पूर्वसंस्कारामुळे विशेष प्रयत्न न करता त्याला ध्यानभूमिका प्राप्त होते. जर ज्ञानाच्या मागे शुभेच्छा व विचारणा असेल, तर पूर्वी केलेले विसरले जात नाही. पुढे अधिक अभ्यास करून तो पूर्ण ज्ञानी होतो. अर्जुन हा कुरुकुलात म्हणजे वैभवसंपन्न व ज्ञानी कुळात जन्मला. त्याला ज्ञानाची इच्छा निर्माण झाली. ऐन युद्धप्रसंगी तो ज्ञानचर्चा करीत आहे. त्याने भगवंताला संपूर्ण शरणागती दिली व शिष्यत्व पत्करून परमेश्वराला उपदेश करायला भाग पाडले. यावरून अर्जुनसुद्धा पूर्वजन्मीचा योगभ्रष्टच असला पाहिजे. फक्त पूर्वसंस्कार थोडे उशीरा जागृत झाले, एवढेच.

**पूर्वाभ्यासेन तेनैव ह्रियते ह्यवशोपि सः ।**
**जिज्ञासुरपि योगस्य शब्दब्रह्मातिवर्तते ॥४४॥**

जरी तो परतंत्र असला तरी पूर्वजन्मीचा योगाभ्यास त्याला आपल्याकडे ओढतो. योगासंबंधी जिज्ञासु असूनही तो शब्दब्रह्माचे अतिक्रमण करतो.

पुनर्जन्मी जीवाची इच्छा नसली तरी पूर्वीचे ध्यानाचे संस्कार त्याला आकृष्ट करतात. योगी अरविंद घोष प्रथम राजकारणात कार्य

करीत होते. तेच कार्य ते करीत राहते, तर ते भारताचे सर्वश्रेष्ठ नेते झाले असते. त्यांना पैसा किंवा मानसन्मान यापैकी काही कमी नव्हते. पण त्यांचे मन त्यात न रमता त्या सर्वांचा परित्याग करून त्यानी अज्ञातवास पत्करला. पांदीचरीस राहून सतत ध्यानधारणा केली. वर्षातून फक्त एकदाच ते लोकांची भेट घेत. त्यांच्या जीवनात असा पालट होण्यास त्यांच्या पूर्वजन्मीचे संस्कारच कारण असले पाहिजेत. योगभ्रष्ट पुनः जन्म घेतात, तेव्हा त्यांचा ध्यानयोग तयार असतो. फक्त तो प्रगट होण्यासाठी काही तरी निमित्त घडावे लागते. गाडीत इंधन तयारच असते. पण जोपर्यन्त बटन दाबून ठिणगी पाडली जात नाही, तोपर्यन्त गाडी स्तब्ध असते. एकदा ठिणगी पडली की ती भरधाव पळू लागते. पूर्व संस्कार प्रगट होण्यासाठींही वेळ यावी लागते.

शब्द ब्रह्म म्हणजे वेद. विशेषतः वेदांतील कर्मकांड. अमुक करा व तमुक करू नका असे विधिनिषेध सांगणारा वेदाचा भाग. कर्मानुष्ठान अचूक व नेमाने केले तरी त्याच्या फळापेक्षा ब्रह्म-जिज्ञासेचे फळ अधिक आहे. म्हणून ब्रह्म–जिज्ञासा भागविणारी कीर्तने व प्रवचन यांचे श्रवण केले पाहिजे. वय झाले कांही कर्तव्य उरले नाही, त्यामुळे वेळ जात नाही म्हणून व प्रवचन ऐकायला पैसे पडत नाहीत अशा विचाराने जरी कोणी ब्रह्मज्ञानासंबंधी ऐकू लागला, तरी त्याला हळूहळू त्यात गोडी वाटू लागेल. असे श्रवण केल्याचे फळ हे कर्मकांडापेक्षा अधिक असते. मग साधकाने श्रद्धापूर्वक गुरुसान्निध्यात राहून साधना केल्यास त्याला ज्ञान प्राप्त झाल्याशिवाय कसे राहील? जिज्ञासा असली पाहिजे. ती वृद्धपणी निर्माण झाली तरी त्यामुळे जीवनाचे सार्थक होते.

**प्रयत्नाद्यतमानस्तु योगी संशुद्धकिल्बिषः ।**
**अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम् ॥ ४५ ॥**

आणि योगमार्गाचे प्रयत्नपूर्वक आचरण करणारा योगी पापमुक्त होऊन अनेक जन्मांनी योगसिद्धी मिळवितो व नंतर अत्यंत श्रेष्ठगतीला —मोक्षाला-जातो.

**कांही काळ योगसाधना करून नंतर साधना सुटलेल्या व्यक्तीस योगभ्रष्ट म्हणतात. अशा योगभ्रष्टालाही किती उत्तम फळ मिळते हे** पूर्वीच्या श्लोकांत सांगितले आहे. आता योगसिद्ध म्हणजे पूर्णता मिळविलेल्यांना कोणते फळ मिळते ते भगवान सांगत आहेत. अशा योगसिद्धाला परागती म्हणजे मोक्ष मिळतो. पण योगसिद्धी एकाच जन्मात होईल असे नाही. त्यासाठी अनेक जन्म घ्यावे लागतात व ध्यानयोग प्रयत्नपूर्वक चालू ठेवावा लागतो.

**तपस्विभ्योऽधिको योगी ज्ञानिभ्योऽपि मतोऽधिकः ।**
**कर्मिभ्यश्चाधिको योगी तस्माद्योगी भवार्जुन ।। ४६ ।।**

तपी, ज्ञानी वा कर्मी ह्यापेक्षा योगी श्रेष्ठ आहे असे माझे मत आहे. म्हणून हे अर्जुना तू योगी हो.

तपी म्हणजे कृच्छ्र, चांद्रायणादी तपे आचरणारा. अशी तपे करणारा सत्यवाक् होतो. 'नासाध्यंहि तपस्यतः' तप करणाराला असाध्य असे काही नाही. मौन पाळल्यास वाणीचा, उपोषणात खाण्याचा व प्राणायामात प्राणाचा संयम केलेला असतो. म्हणजे तपामध्ये फक्त इंद्रियनिग्रह असतो. मनोनिग्रह नसतो. योगी इंद्रियाप्रमाणेच मनाचाही निग्रह करतो. म्हणून तो तपस्व्यापेक्षा श्रेष्ठ. ज्ञान्याला तत्त्वज्ञान समजलेले असते, पण त्याचा वासनाक्षय वा मनोनाश झालेला नसतो. योग्याने हे दोन्ही प्राप्त करून घेतलेले असते. कर्मकांडापेक्षा योग श्रेष्ठ हे पूर्वी विवरण केले आहे. म्हणून या सर्वापेक्षा परमयोगी श्रेष्ठ. कारण तो जीवन्मुक्त असतो. अश्वमेधासारखी कर्मे करणारा पुण्यलोकी जातो, पण

पुण्याचा साठा संपला की त्याला परतावे लागते. पण योगी पुण्यलोकात मनसोक्त राहू शकतो, म्हणून अर्जुना, तू योगी हो.

गीता हे अध्यात्मशास्त्र आहे. एक ते सहा अध्यायअखेर कर्मयोग सांगितलेला आहे व हाच पाया आहे. यात त्वं पदाचे म्हणजे जीवाचे स्वरूप सांगितलेले आहे. ईश्वरापेक्षाही आपला जीव सर्वांच्या माहितीचा असणे स्वाभाविक, म्हणून त्याचे प्रथम प्रतिपादन केले. जीव आहे तोपर्यन्त कर्मे केली पाहिजेत. केलेले कर्म फुकट जात नाही. या जन्मी त्याचे फळ मिळाले नाही, तरी पुढल्या किंवा अनेक जन्मानंतर त्याचे फळ मिळाल्याशिवाय राहात नाही. खाणे, पिणे, निजणे. या झाल्या सामान्य क्रिया, यांना कर्मे म्हणत नाहीत. ज्याचे फळ प्रत्यक्ष दिसत नाही, पण जी केलीच पाहिजेत असे शास्त्र सांगते, त्यास कर्म म्हणावयाचे. स्नान, संध्या, देवपूजा यात वेळ गेलेला दिसतो, पण फळ काही दिसत नाही. नैवेद्य, वैश्वदेव यात अन्न फुकट गेलेले दिसते, पण ही विहित कर्मे प्रमाणसिद्ध व कल्याणकारी आहेत.

यापुढील सात ते बारा या अध्यायात उपासनायोगाचे विवरण आहे. यात तत् पदार्थाचे—शिवाचे—विवेचन केले आहे. जीवापेक्षा शिव अप्रसिद्ध म्हणून तो नंतर आला. गीतामंदिराचा हा मध्य आहे. अध्याय तेरा ते अठरा हे ज्ञानकांड होय. हे गीतामंदिराचे शिखर होय. जीव व शिव हे दोन भासले तरी ते एकच आहेत. हा अद्वैत सिद्धान्त शेवटी प्रतिपादन केलेला आहे.

**योगिनामपि सर्वेषां मद्गतेनान्तरात्मना ।**
**श्रद्धावान् भजते यो मां स मे युक्ततमो मतः ॥ ४७ ॥**

माझ्या ठिकाणी अंतःकरण जडवून म्हणजे मद्रूप होऊन जो श्रद्धेने माझी भक्ती करतो, तो सर्व प्रकारच्या योग्यांपेक्षा श्रेष्ठ प्रकारचा योगी होय, असे मला वाटते.

भक्तियोग आचरणारा सर्व योग्यात श्रेष्ठ असा या श्लोकाचा सकृत् दर्शनी अर्थ वाटतो. पण तसा अर्थ येथे अभिप्रेत नाही. आर्त, जिज्ञासू व अर्थार्थी हे 'उदाराः सर्व एवैते' असे सांगून पुढे 'ज्ञानी त्वात्मैव मे मतम्' असे भगवान सांगतात व 'भक्त्या मामभिजानाति' या श्लोकात भक्ती हे साधन व ज्ञान हेच साध्य हे विशद केले आहे. प्रस्तुत श्लोकातील योगी शब्द इंद्र, चंद्र, वसु, रूद्र वगैरे देवतांच्या भक्तांना उद्देशून योजलेला आहे. 'परिमितऐश्वर्ये सति उपकारशीलत्वम्' असे देवतांचे वर्णन आहे. तर परमेश्वर म्हणजे 'अपरिमितऐश्वर्ये सति निर्दोषत्वम्'. देवतांचे भजन केल्यास विशिष्ट ऐश्वर्य, भोग, अधिकार त्या देऊ शकतात; पण त्या निर्दोष मोक्ष देऊ शकत नाहीत. ईश्वराची भक्ती केल्यास भक्तही निर्दोष होऊन मुक्त होतो.

इतिहास, पुराण व श्रुती या तिन्हीत ईश्वराची सर्वश्रेष्ठत्व, परमकारुणिकत्व व शरणागत-परिपालकत्व ही तीन लक्षणे सांगितलेली आहेत. ईश्वर म्हणतो, भक्तांनी इतर देवतांची उपासना केल्यास मला मुळीच मत्सर वाटत नाही. इंद्रचंद्रादी देवता पूर्ण नाहीत. पूर्ण व्हावयाचे झाल्यास पूर्णस्वरूप ईश्वरालाच शरण गेले पाहिजे.

रावण शंकराच्या वराने उन्मत्त होऊन सर्व जगाला पीडा देत होता. लवणासुर ब्रह्मदेवाच्या वराचे जोरावर अगस्त्यादी ऋषींना छळत होता. इतर देवतांकडून वरदान मिळविलेले राक्षस बलशाली झाले होते. अशा राक्षसांचा परमेश्वराने अवतार घेऊन निःपात केला व जगाला संतोष दिला. हेच त्याचे श्रेष्ठत्व. अशा सर्वेश्वराला भजणारा योगी सर्वश्रेष्ठ होय.

इति श्रीमद् भगवद् गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे योगगर्भो ( कर्मसंन्यास योगो ) नाम षष्ठोऽध्यायः

◊ ◊ ◊

# अध्याय ७ वा.

श्रीभगवान उवाच

मय्यासक्तमनाः पार्थ योगं युञ्जन्मदाश्रयः ।
असंशयं समग्रं मां यथा ज्ञास्यसि तच्छृणु ॥ १ ॥
ज्ञानं तेऽहं सविज्ञानमिदं वक्ष्याम्यशेषतः ।
यज्ज्ञात्वा नेह भूयोऽन्यज्ज्ञातव्यमवशिष्यते ॥ २ ॥

श्रीभगवान म्हणाले, " हे पार्था तुझे मन मजवर आसक्त झाले आहे व माझ्या आश्रयाने जो योग तू आचरण करणार आहेस असा तू कोणत्या प्रकारे मला पूर्णत्वाने शंकारहित जाणशील तो प्रकार ऐक. अनुभवासह हे माझेबद्दलचे ज्ञान मी तुला पूर्णत्वाने सांगतो. हे ज्ञान झाल्यावर या लोकी पुनः दुसरे काही जाणणायोग्य असे शिल्लकच रहात नाही.

जीव व ईश्वराचा संबंध नियम्य व नियामक असा आहे. राजाला प्रसन्न राखण्यासाठी सेवकाला झटावे लागते. तरच सेवकाचे कल्याण होते. त्याचप्रमाणे जीवाने ईश्वराला प्रसन्न करून आपला उत्कर्ष साधला पाहिजे. आपले मन ईश्वराधीन करून भक्तिभावाने त्याचे नित्य स्मरण केल्यास ईश्वराचे ज्ञान निःसंशयपणे होते.

विज्ञान म्हणजे प्रत्यक्ष ज्ञान. ज्ञान आणि विज्ञान दोहोबद्दल भगवंत सांगत आहेत. जसे कितीही धन मिळाविले तरी तृप्ती होत नाही, तसेच ज्ञान कितीही प्राप्त करून घेतले तरी तृप्ती होत नाही. कारण एकाहून एक-वरचढ ज्ञानी असतातच. प्रत्यक्ष अनुभव नसल्याने ज्ञानात न्यूनता राहते. प्रत्यक्ष आत्मज्ञान झाले म्हणजे न्यूनता जाऊन सर्वज्ञता येते.

अशा ज्ञानी पुरुषाला कृतार्थता वाटते. सर्व आनंद त्याला मिळतो, पण हे ज्ञान फारच दुर्लभ आहे. सुंदर पदार्थ दुर्लभ असायचा, हा नियमच आहे. ज्ञानी किती दुर्लभ असतो याचे वर्णन भगवंत आता करीत आहेत.

**मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये ।**
**यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः ॥ ३ ॥**

सहस्रावधि मनुष्यांमध्ये एखादा ज्ञानाच्या सिद्धीसाठी प्रयत्न करतो. त्या यत्न करणाऱ्या सिद्ध मानवांत एखादाच खऱ्या अर्थाने मला जाणतो.

जगातील पशुपक्षी, कृमीकीटक या सर्व योनीतील प्राण्यांची संख्या पाहता मानवांची संख्या अत्यल्प आहे. जगाची लोकसंख्या फार वाढली असली तरीही मानवांची संख्या कमीच आहे. कारण मनुष्य जन्म मिळणे हेच मुळी परम भाग्याचे व अत्यंत अवघड आहे. असा हा मानव श्रेयापेक्षा प्रेयावर लुब्ध होतो. ज्या मातापित्यांनी त्याला लहानाचा मोठा करून जीवनात स्थिर केलेले असते, त्यांना संतोष देणे हे श्रेय; पण विवाह झाल्यावर प्रेम असलेली पत्नी हे त्याचे सर्वस्व होते. व आईवडिलांना सोडून तो निघून जातो. ' जीवो जीवस्य जीवनम् ' या न्यायाने साप बेडकाला, मुंगूस सापाला व मांजर उंदराला गट्ट करून हे प्राणी जगत असतात. ते फक्त आपला स्वार्थ पाहतात, आपला स्वार्थ लयाला गेला तरी हरकत नाही पण सर्वांना सुख होऊ दे, असे म्हणणारा एखादाच श्रेयवादी. अशा व्यक्तीलाच परमार्थी म्हणावयाचे.

या श्लोकांतील सहस्र हा शब्द अनंत या अर्थी आहे. कोटयावधी लोकात एखादाच आत्मज्ञानासाठी प्रयत्न करतो. अशा प्रयत्न करणाऱ्या शंभरदोनशे साधकात एखाद्यालाच साक्षात्कार होतो.

भगवंताची श्रेष्ठ व कनिष्ट अशी दोन रूपे आहेत. निर्गुण निराकार हे श्रेष्ठ रूप, तर सगुण साकार हे कनिष्ठ रूप होय. शास्त्रकार प्रथम

सर्वोत्कृष्ट साधन सांगतात. ते जमण्यासारखे नसणाऱ्यासाठी पर्यायी साधन सांगतात. उत्कृष्ट अधिकाऱ्याने उत्कृष्ट साधनच घेतले पाहिजे. निर्गुण-निराकाररूप हे सर्वश्रेष्ठ असून ते सत्-चित्-आनंदरूपी, अद्वय, अखंड व सर्वव्यापक आहे. त्याला प्राप्त करून घ्यावयाचे साधन देखील सर्वोत्कृष्ट आहे. पण ते अवघड असल्याने सर्वसामान्य लोक त्याकडे पाठ फिरवितात.

**भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च ।**
**अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥ ४ ॥**

ही माझी प्रकृती पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश, मन, बुद्धी आणि अहंकार अशा आठ प्रकारांनी विभागलेली आहे.

ईश्वराचे स्वरूप सर्वव्यापक असले तरी जगाचा विचार केल्या-शिवाय त्याचे प्रतिपादन करता येत नाही, म्हणून भगवान जगत् स्वरूपाबद्दल सांगत आहेत.

पाच महाभूते, मन, बुद्धी व अहंकार अशी आठ तत्त्वे मिळून प्रकृती होते. ही मायिक म्हणजे अशाश्वत आहे. कारण यांतील प्रत्येक तत्त्व नाश पावणारे आहे. आपला अहंकार आपल्यापेक्षा कनिष्ठ दिसला की वाढतो. तोच आपणाहून श्रेष्ठ दिसला की कमी होतो. बुद्धी ही स्थिर नाही. एका क्षणी दान देण्याची बुद्धी दुसऱ्याच क्षणी पालटते. मन तर त्याहून चंचल असते. आकाशापासून वायू, वायूपासून तेज, तेजापासून आप म्हणजे पाणी व पाणी आळून पृथ्वी बनते व तीही शेवटी नाश पावते, म्हणून अष्टधा प्रकृतीला मायिक म्हणतात. ही अपरा प्रकृती होय.

**अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम् ।**
**जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत् ॥ ५ ॥**

हे अर्जुना ही माझी प्रकृती अपरा होय. जिने हे सर्व जग धारण केले आहे अशी माझी ही दुसरी परा प्रकृती आहे, असे समज.

अपरा प्रकृतीचे नियमन जीव करतो. तो शरीरात असेपर्यंत केस व नखे यांची वाढ होत असते. जीवाने देह सोडला की देहाची वाढ खुंटते. तसेच वनस्पतीचे आहे. झाडांतील जीव गेला की, त्याची वाढ थांबते, पाने गळून पडतात व झाड वठले असे आपण म्हणतो. अशा वठलेल्या झाडास खतपाणी घातले तरी त्यास पालवी फुटत नाही. जीव पूर्वजन्मीच्या कर्मानुसार देहावर नियंत्रण ठेवीत असतो. प्राण्याप्रमाणे वनस्पतींनासुद्धा कर्मानुसार गती मिळते. एकाच झाडाचा एक आंबा विमानात बसून परदेशांत जातो, तर दुसरा झाडाखाली पडून कुजून जातो.

**एतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्युपधारय ।**

**अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा ॥ ६ ॥**

सर्व प्राणिमात्र या दोन प्रकृतींपासून निर्माण झाले आहेत, असे जाण, त्याचप्रमाणे सर्व जगाचा आदि व अंत मीच आहे.

परा आणि अपरा प्रकृती म्हणजेच जीव व शरीर, यांचा संबंध जोडणारा जो त्याला ईश्वर म्हणतात. ईश्वराला प्रत्यक्ष कृती करावी लागत नाही. त्याच्या केवळ संकल्पाने सर्व कार्ये होतात. तोडणे सोपे आहे, पण जोडणे कठीण, पण ईश्वराची इच्छा असेल, तर तुटलेले जोडले जाते. अश्वत्थाम्याने सोडलेल्या ब्रह्मास्त्रामुळे अर्जुनाचा रथ दग्ध झाला होता. पण भगवंताच्या अस्तित्वामुळे व त्याच्या इच्छेमुळे तो रथ जशाचा तसा होता. युद्ध संपल्यावर अर्जुन व भगवंत रथाखाली उतरताच वरचा कपिध्वज वरच्यावर उडून गेला व रथ पेटून नष्ट झाला.

**मत्तः परतरं नान्यत्किञ्चिदस्ति धनंजय ।**

**मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव ॥ ७ ॥**

हे धनंजया, माझ्याहून वेगळे असे दुसरे काही नाही. सोन्याच्या तारेत सोन्याचेच मणी ओवावेत, तसे सर्व जग माझ्यामध्ये गुंफलेले आहे.

जग कल्पित किंवा मायिक असले तरी ईश्वराशिवाय दुसरे श्रेष्ठ सत्य कोणतेही नाही. सर्व पदार्थ ईश्वरी सूत्रात गोवलेले आहेत, निर्गुण निराकार ब्रह्माचे श्रेष्ठ स्वरूप असे आहे.

पण हे स्वरूप समजण्यास फार कठीण आहे. वेदांताच्या अभ्यासाने ते समजू शकते. पण वेदांत समजून घ्यावयाचा झाल्यास योग्यता हवी. विद्वान व साधूला ओळखायचे झाल्यास आपलीही तयारी हवी. लोक म्हणतात, म्हणून आपणही मान डोलविली तर फसगत होते. कारण लोकांचे निर्णय नव्वद टक्के चुकीचे असतात. एक हसला म्हणून दुसरा हसतो व एकाने टाळी वाजविली की टाळ्यांचा कडकडाट होतो. कुठलीही गोष्ट स्वतः समजून घेऊन केली पाहिजे.

> विद्वानेव विजानाति विद्वज्जनपरिश्रमम् ।
> नहि वंध्या विजानाति गुर्वीं प्रसववेदनाम् ॥

वांझोटया स्त्रीस प्रसूतिवेदनांची कशी कल्पना येईल? कुठल्याही गोष्टीचा प्रत्यक्ष अनुभव हवा व त्यासाठी स्वतः अभ्यास केला पाहिजे. 'अथातो ब्रह्मजिज्ञासा' या व्यास–वचनाप्रमाणे अभ्यासाने योग्यता आली की ब्रह्मजिज्ञासा केली पाहिजे. 'जन्माद्यस्य यतः' म्हणजे जगाची उत्पत्ती, स्थिती व लय हे सर्व एका ब्रह्मापासून होते. अशा ब्रह्माची ओळख करून घेण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

ब्रह्म सत्य असून जग मिथ्या आहे. 'स्वराज्यांत प्रत्येक व्यक्तीचा उत्कर्ष होतो' असा सिद्धांत आहे. हा चूक आहे असे कोणी म्हणू शकणार नाही. पण प्रत्यक्ष अनुभव काय आहे हे ज्याचे त्याने तपासून पहावे. किंवा बायको, मुले व धन असेल तर संसार सुखाचा होतो असे म्हणतात. पण हे सर्व असलेलाही 'संसारतापे बहु पोळलो मी' अशी तक्रार करीत असतो. जग हे असे आहे. प्रत्यक्ष दिसते एक व

अनुभव वेगळाच येतो, म्हणून त्यास मिथ्या म्हणावयाचे. निर्गुण निराकार ब्रह्मात काही बदल होत नाही, म्हणून ते सत्य आहे.

ब्रह्माला जाणण्याचा हा मार्ग श्रेष्ठ लोकांसाठी भगवंतानी सांगितला. आता ते सर्व सामान्यांसाठी सोपा मार्ग सांगत आहेत.

**रसोऽहमप्सु कौन्तेय प्रभास्मि शशिसूर्ययोः ।**
**प्रणवः सर्ववेदेषु शब्दः खे पौरुषं नृषु ॥ ८ ॥**

हे कौंतेया, उदकातील रस, चंद्रसूर्यातील प्रभा, सर्व वेदांतील ओंकार, आकाशातील शब्द व पुरुषामधील पौरुष मी आहे.

तहान लागली असता पाणी प्याले की समाधान होते, सूर्याचे कोवळे किरण व पौर्णिमेचे चांदणे पाहून आपणास आनंद होतो. ही समाधान देणारी पाण्यांतील गोडी व आनंद देणारे तेज हे भगवंताचेच रूप आहे. तसेच वेदांतील ओंकार, आकाशातील शब्द व पुरुषातील पौरुष ही देखील भगवंताचीच रूपे आहेत.

**पुण्यो गन्धः पृथिव्यां च तेजश्चास्मि विभावसौ ।**
**जीवनं सर्वभूतेषु तपश्चास्मि तपस्विषु ॥ ९ ॥**

पृथ्वीतील शुद्ध गंध, अग्नीतील तेज मी आहे. सर्व प्राणिमात्रांचे जीवन आणि तपस्व्यांचे तप मी आहे.

पृथ्वीतील सुवास, अग्नीचे तेज आणि सर्व भूतांचे जीवन--आयुष्य हे परमेश्वराचे रूप आहे. आयुष्य संपले की भगवंताचे अस्तित्व उरत नाही. मग त्या देहाला जाळा, पुरा अथवा पशुपक्ष्यांना भक्ष्य म्हणून टाकून दिले तरी देहाला पर्वा नसते. आपले जीवन भगवंताचे स्वरूप असल्याने आपल्या हाती काहीच नसते. तपस्व्यांचे तप हे देखील ईश्वराचे स्वरूप आहे. तप म्हणजे शीतोष्ण, तहानभूक, सुखदुःख इत्यादी द्वन्द्वे सहन करणे. थंडी सोसत नाही, चालताना त्रास होतो, उठता-बसता कष्ट होतात, अशी प्रकृतीची तक्रार असताही माघ महिना गंगेचे

प्रात:स्नान-माघ स्नान करण्याचा एखाद्याने नियम केला व तो पार पडला तर ते सामर्थ्य त्या व्यक्तीचे नसून ईश्वरी सामर्थ्यामुळे त्या व्यक्तीला ते शक्य झाले असे समजावे.

**बीजं मां सर्वभूतानां विद्धि पार्थ सनातनम् ।**
**बुद्धिर्बुद्धिमतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ॥ १० ॥**
**बलं बलवतां चाहं कामरागविवर्जितम् ।**
**धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ ॥ ११ ॥**

हे पार्था, सर्व प्राण्यांचे शाश्वत असे आदिकारण मी आहे असे जाण. बुद्धिमंतांची बुद्धी, तेजस्व्यांचे तेज मी आहे. काम-राग-विरहित असलेले बलवानांचे बळ मी आहे. हे भरतश्रेष्ठा, भूतांच्या ठिकाणी धर्माला अनुसरून असणारा काम मी आहे.

सर्व भूतांचे मूळ म्हणजे अज्ञान--अव्याकृत, बुद्धिमंतांमधील बुद्धी, तेजस्वी लोकांचे तेज ही ईश्वराची स्वरूपे आहेत. अप्राप्ताची इच्छा करणे याला काम म्हणतात व प्राप्त झालेले आणखी वाढावे याला राग म्हणतात. या काम व रागामुळे मनुष्य सकाम कर्मे करतो. कठिण निग्रह पाळतो. मुलगा व्हावा म्हणून स्त्री-पुरुष किती अवघड नियम करतात. पण कोणतीही मागणी न करता निग्रह पाळणे अतिशय कठीण असते. असे कठीण कार्य करण्यास जे बळ लागते त्याला सात्त्विक बळ म्हणतात. व ते ईश्वराचे स्वरूप आहे. तसेच धर्माला अविरोधी असलेला काम पण देवाचेच स्वरूप आहे.

गृहस्थाश्रम पाळण्यासाठी पत्नी हवी. पत्नी ही स्त्री असते म्हणून कोणतीही स्त्री आपल्या धर्माची वा जातीची नसलेली—कोणताही धार्मिक विधी न करता घरी आणली तर तिला पत्नी म्हणता येत नाही, धर्मास विरोधी असल्याने ती फक्त उपभोग्य वस्तु ठरते. पत्नी म्हणजे ‘पत्युर्नो यज्ञसंयोगे’ किंवा ‘धर्मेषु पत्नी’ अशी असली पाहिजे. यज्ञ किंवा

धर्माचरण एकट्याला करता येत नाही. त्यासाठी पतिपत्नी दोघे लागतात. अशा कार्यात उपयोगी पडेल ती पत्नी. पत्नीने तोंड वेडेवाकडे केले तर एकटा पुरुष धर्मकृत्ये करू शकत नाही. म्हणून 'पत्नीं मनोरमां देहि मनोवृत्तानुसारिणीम्' अशी विवाहात प्रार्थना केली जाते. स्त्रीप्रमाणेच धनाशिवाय संसारात चालत नाही. 'संसारात वित्त व परमार्थात चित्त' अशी म्हण आहे. पण अन्यायाने लुबाडून आणलेले धन हे धर्मविरुद्ध आहे. उत्तम व्यवहार करून जोडलेले धन हे ईश्वरस्वरूप होय. पुत्राची इच्छा करावयाची तीसुद्धा धार्मिक कुळाचार व्यवस्थित पार पाडले जावे एवढ्याचसाठी. अशा धर्मानुसार केलेल्या इच्छा व क्रिया या ईश्वरी समजाव्या.

**ये चैव सात्त्विका भावा राजसास्तामसाश्च ये ।**
**मत्त एवेति तान्विद्धि न त्वहं तेषु ते मयि ॥ १२ ॥**

तसेच सात्त्विक, राजस व तामस पदार्थ ते सर्व माझ्यापासून उत्पन्न झालेले आहेत असे जाण. ते माझ्यामध्ये आहेत, पण मी त्यांच्या-मध्ये नाही.

हे सर्व जग त्रिगुणांनी युक्त आहे व हे त्रिगुण ईश्वराचेच स्वरूप आहे. म्हणजे जगातील यच्चयावत् पदार्थ ही परमेश्वराचीच रूपे आहेत. सात्त्विक गुण जसा ईश्वरी तसाच राजस व तामस हे गुणही ईश्वराचीच रूपे होत. सर्व पदार्थ ईश्वराच्या आधीन असतात. पण ईश्वर मात्र त्यात गुंतलेला नसतो.

**त्रिभिर्गुणमयैर्भावैरेभिः सर्वमिदं जगत् ।**
**मोहितं नाभिजानाति मामेभ्यः परमव्ययम् ॥ १३ ॥**

या त्रिगुणभावांनी मोह पावलेले हे सर्व जग या गुणांहून वेगळ्या व विकाररहित अशा मला जाणत नाहीत.

भगवंत सर्वत्र भरलेला असल्याने वास्तविक त्याची ओळख करून घेण्यासाठी विशेष सायास पडण्याचे कारण नाही. पण मोहामुळे मनुष्य

तसा प्रयत्नच करीत नाही. अभ्यास हा हितकारक असता लहानपणी अभ्यास म्हणजे संकट वाटते व मन रमविणारे पण परिणामी घातक असलेले खेळ प्रिय वाटतात. तसेच मोहामुळे मानवाला आपले हित कळत नाही.

**दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया ।**
**मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते ।। १४ ।।**

कारण ही माझी त्रिगुणात्मिका दैवी माया तरून जाण्यास दुस्तर आहे. जे मलाच शरण येतात ते ही माया तरून जातात.

जगातील प्रत्येक पदार्थ त्रिगुणांनी बनलेला असल्याने तो मोहांनी व्याप्त झालेला आहे. त्यामुळे त्याला ही माया तरून जाणे अतिशय कठीण जाते. पण त्यालाही एक अगदी सोपा उपायही भगवंत सांगत आहेत. तो अगदी प्रत्येकाला करता येण्यासारखा आहे. तो म्हणजे भगवंताला अनन्य भावाने शरण जाणे हा होय.

माया म्हणजे तरी काय आहे. ती एक ईश्वरी शक्ती आहे. पण ईश्वराच्या भक्तीपुढे या शक्तीचे काही चालत नाही. या मायेला दैवी म्हटले आहे. देव म्हणजे आत्मा. आत्म्यावर राहणारी व त्यालाच झाकून टाकणारी, जसे मेघमंडळ सूर्याला आच्छादून टाकते तशी ती आत्म्यास झाकून टाकते. सूर्यापुढे आलेले मेघ सूर्यप्रकाशामुळेच आपणाला जाणवतात. मायासुद्धा आत्म्यामुळेच आपणाला समजते. दैवी याचा अलौकिक असाही अर्थ करतात, पण तो येथे जमत नाही. कारण मी अज्ञानी आहे, हा प्रत्येकाला रोजचा अनुभव आहे, तो मायेमुळेच येतो. म्हणून माया अलौकिक नसून सर्वांना परीचित आहे. माया त्रिगुणात्मक असून ती तरून जाणे कठीण असले, तरी माझ्या भक्तांना तिचा त्रास होत नाही. आपल्या सौंदर्याने कुणालाही वश करून घेऊ असा आत्मविश्वास असलेली अप्सरा निर्भयपणे संचार करते.

दुर्वासासारख्या महर्षीसमोर जायला ती धजत नाही. त्यांच्या शापाने अस्तित्वच नष्ट होण्याची तिला भीती वाटते. माया देखील भक्तापुढे जाण्यास धजत नाही. माया तरून जाणे याचा अर्थ माया नष्ट होणे असा घेतला पाहिजे.

भगवंताची सगुण मूर्ती मनात आणून तिचे भजन करणे हा एक ईश्वराला अनन्यभावे शरण जाण्याचा मार्ग आहे. प्रसन्न मुखकमल, मेघाप्रमाणे सतेज सांवळी अंगकांती, कमलपुष्पाप्रमाणे प्रफुल्ल नेत्र व कारुण्यपूर्ण दृष्टी असलेली मूर्ती मनात आणून तिचे घ्यान करीत राहिल्यास परमेश्वर प्रसन्न होऊन भक्तास सद्‌बुद्धी देतो. सगुणभक्ती अंगी बाणण्यासाठी देवपूजा, जपजाप्य, स्तोत्रपठण, नैवेद्य इत्यादी नित्यकर्मे बिनचूक केली पाहिजेत. यासाठी फार वेळ द्यावा लागत नाही व खर्च तर अजीबात येत नाही. स्नान प्रत्येकजण करतोच. त्यानंतर फार नको फक्त पांच मिनिटे या कामासाठी द्यावीत. स्नानानंतर परमार्थासाठी थोडा समय दिल्यास आरोग्य चांगले राहते व मनही प्रसन्न राहते, असा दुहेरी फायदा होतो. जावई आल्यावर सत्यनारायण केला की दांपत्य बोलावल्याचे व जावयाची तैनात राखल्याचे जसे श्रेय मिळते, तसेच हे आहे. आंघोळ करताना नाट्यगीते वा सिनेसंगीत म्हणण्याऐवजी पुरुषसूक्त किंवा सौर स्तोत्र म्हणावे. भोजनापूर्वी देवाला नैवेद्य दाखवावा. देव त्यांतले खाईल ही भीती नको. शक्य तर सोवळ्याने नैवेद्य दाखवा. सोवळे या शब्दाने घाबरून जाण्याचे कारण नाही. सोवळे याचा अर्थ कशाला स्पर्श न करता अलिप्त राहणे. ही गोष्ट अवघड वाटली, तरी संवयीने त्यातच आनंद वाटू लागतो. कारण सात्त्विक गुणाचा अनुभव येऊ लागतो.

वडिलानी पूजा केली तर मुले करतील. वडीलच जर धूम्रपान करत असतील तर मुलेही तेच करणार. संध्याकाळी मातापित्यांना नमस्कार करावा व रामरक्षा, महिम्नसारखी स्तोत्रे म्हणावी, हा तर

अगदीच बिनखर्चाचा मार्ग आहे. पण लोकांना तेही जमत नाही. घरी आईवडिलांना दिवसाकाठी एकदा नमस्कार करायला लाजणारा मनुष्य ऑफिसात गेल्यावर साहेबाला येता जाता कंबर मोडेपर्यंत मुजरे करतो. कारण त्याला तशी संवयच जडलेली असते. मग आईवडिलांना नमस्कार करायची संवय लावून घेतली तर काय बिघडणार आहे? लहान मुलावर असे संस्कार होत राहिले तर त्याच्या मनात नास्तिक विचार कधीच येणार नाहीत.

नित्यकर्माची अशी फळे आहेत व अंतिम फळ मोक्ष हे आहे. लोक म्हणतील एवढ्यात मोक्ष घेऊन काय करायचा? मोक्ष म्हणजे त्यांना कपाळमोक्ष एवढाच लक्षात येतो. मोक्षाचा अर्थ समजायलाही अंगी योग्यता यावी लागते. तो अर्थ कळत नसल्यामुळे नित्यकर्मे केली तरी ती निष्काम सेवा होते.

**न मां दुष्कृतिनो मूढाः प्रपद्यन्ते नराधमाः ।**
**माययापहृतज्ञाना आसुरं भावमाश्रिताः ॥ १५ ॥**

दुष्कर्मी, मूर्ख व अधम असे लोक मायेने ज्ञानहीन बनल्याने आसुरी मार्गाचा अवलंब करतात आणि मला शरण येत नाहीत.

पापप्रतिबंधकत्वामुळे मानवाला ईश्वर-भजन करण्याची बुद्धीच होत नाही. मूर्खांचे जसे साधा व पढतमूर्ख असे दोन प्रकार आहेत. तसेच येथे पापीजनांचे चार प्रकार सांगितले आहेत.

१) ईश्वराचे ज्ञान नसल्याने भक्तीचे महत्त्व माहीत नसलेला तो मूढ.

२) ईश्वराचे ज्ञान असून त्याचेकडे मुद्दाम दुर्लक्ष करणारे नराधम होत. यांचे लक्ष फक्त पैशाकडे असते. ते जाती, गुण, शौर्य, कुळ (नात्यांतील लोक) यापैकी कुणाचीही पर्वा करीत नाहीत, मग त्यांना ईश्वराचे स्मरण तरी कसे व्हावे.

३) विवेकभ्रष्ट म्हणजे मायया ऽपहृत हा तिसऱ्या प्रकारचा पापी. विवेकच नसल्यावर ईश्वराचे भजन करण्याचा विवेक होणे शक्य नाही.

४) ईश्वराचे ज्ञान असून जे त्याचा द्वेष करतात ते आसुरीभावाचा आश्रय करणारे पापी होत. अशा लोकांना उपदेश करून काही परिणाम होत नाही. अशा लोकांचा भगवंत वध करतात. उदा. शिशुपालासारखे भगवंताच्या हातून मरण आल्याने मुक्त होतात.

**चतुर्विधा भजन्ते मां जनाः सुकृतिनोऽर्जुन ।**
**आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ ॥ १६ ॥**

हे अर्जुना, चार प्रकारचे पुण्यवान लोक माझी भक्ती करतात. हे भरतश्रेष्ठा दुःखाने ग्रस्त झालेला, जाणण्याची इच्छा करणारा, द्रव्याची इच्छा करणारा व ब्रह्मज्ञानी हे ते चार प्रकार होत.

**आर्त :–** असाध्य रोग झाला किंवा अत्यंत प्रबळ शत्रू निर्माण झाला असता त्यांतून सुटण्यासाठी ईश्वराचे अनन्य भावाने भजन करतो तो आर्त. उदा. गजेन्द्र किंवा भरसभेत जिच्यावर विटंबना होण्याचा प्रसंग आला होता ती द्रौपदी. अशा भक्तांनी शरणागत होऊन केलेला धावा ऐकून भगवंत मदत करतात.

**जिज्ञासु :–** ज्ञान प्राप्त व्हावे या तीव्र इच्छेने भजन करणारे, निष्काम कर्म करणारे. राजा बहुलाश्व, श्रुतदेव, मुचकुंद अशी असंख्य उदाहरणे देता येतील.

**अर्थार्थी–** देवाकडे कशाची तरी मागणी करणारे सर्व अर्थार्थी होत. बिभीषण-सुग्रीवानी राज्य मागितले, ध्रुवाची अढळपदाची मागणी होती तर सुदाम्याला द्रव्य हवे होते.

**ज्ञानी–** कशाचीही अपेक्षा न करता केवळ भजन करण्यातच आनंद मानतात, ते सनकसनंदनादि ज्ञानी होत.

असे हे चार प्रकारचे भक्त असतात. कोणत्याही हेतूने भक्ती केली तरी तो पुण्यवानच ठरतो.

**तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते ।**
**प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः ॥ १७ ॥**

या चौघांमध्ये नित्य व अनन्य होऊन भक्ती करणारा ज्ञानी श्रेष्ठ होय. ज्ञानी भक्ताला मी अत्यंत प्रिय असतो व तो माझा अत्यंत आवडता असतो.

ज्ञानी कशाचीही मागणी करीत नाही म्हणून तो श्रेष्ठ ठरतो. असा भक्त व देव यांची एकमेकांवर नितांत प्रीती असते.

**उदाराः सर्व एवैते ज्ञानी त्वात्मैव मे मतम् ।**
**आस्थितः स हि युक्तात्मा मामेवानुत्तमां गतिम् ॥ १८ ॥**

चारही प्रकारचे भक्त उत्कृष्टच. पण त्यापैकी ज्ञानी हा केवळ माझा असे मी समजतो. कारण माझ्या ठिकाणी स्थिर झालेला तो ज्ञानी अत्यंत श्रेष्ठ प्राप्तव्य जो मी त्या मलाच प्राप्त झालेला असतो.

कसलाही भक्त असला तरी उत्कृष्टच, पण ज्ञानी अधिक उत्कृष्ट. कारण इतर तिघांप्रमाणे त्याची भक्ती द्विधा नसते. आर्ताचे निम्मे लक्ष आपल्या पीडेकडे किंवा शत्रूकडे व निम्मे भगवंताकडे असते. जिज्ञासूचे लक्ष ज्ञान व ईश्वर यात विभागलेले असते. अर्थार्थी तर अर्थाकडे लक्ष ठेवून भगवंताला भजतो. म्हणजे या तिघांची एकभक्ती नसते. ज्ञानी मात्र सर्वस्वी ईश्वरावर लक्ष ठेवून असतो. पहिले तिघे आपले सर्व सांभाळून मग देवाला भजतात. देवही प्रथम आपले व्याप सांभाळून मग त्यांचेकडे लक्ष देतो. द्यावे तसे घ्यावे. ' ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहम् ' असा भगवंतानी नियमच सांगून टाकला आहे.

देह हा नेहमी आत्म्याचे रक्षण करीत असतो. ज्ञान्याचा देह म्हणजे ईश्वर व तो त्यांतील आत्मा असतो. म्हणून ईश्वर त्याचे रक्षण

करतो. ईश्वर त्याची क्षुधातृषा निवारतोच. पण त्याचा प्राणही सांभाळतो. संतश्रेष्ठ ज्ञानेश्वरानी जिवंत समाधी घेतली. त्यानंतर तीनशे वर्षांनी त्यानी संत एकनाथाना दृष्टांत दिला. ज्ञानेश्वरमाऊलीच्या गळ्याला अजान वृक्षाची मुळी पीडा देत होती. एकनाथानी प्रत्यक्ष समाधीस्थळी जाऊन ती दूर केली. तीनशे वर्षानन्तरही एकनाथाना ज्ञानेश्वरांचे दर्शन झाले. एवढा काळ लोटूनही त्यांचा देह जशाचा तसा होता. सर्वद्वारे बंद केलेली असता त्याना प्राणवायू कोणी पुरविला ? आत सिलेंडर थोडेच भरून ठेवले होते. जरी असले तरी ते कांहीं तासच पुरेल. पण भगवंत करीत असलेल्या प्राणवायूच्या पुरवठ्याला अंत नाही. त्याच्या मनांत आल्यावर अशक्य हा शब्दच रहात नाही. ज्ञानी पुरुषाने ज्ञान संपादनासाठी अपार कष्ट केलेले असतात. हे भगवंताला ज्ञात असते. म्हणून तो अशा भक्तांचा सांभाळ करतो.

ज्ञानीच सर्वांत श्रेष्ठ असे ' माझे ' मत आहे, असे भगवंत आग्रहाने प्रतिपादन करीत आहेत. ज्ञानी पुरुषाबद्दलचा हा अभिप्राय इतर कोणाचा नसून ते भगवंताचे मत आहे हे लक्षात ठेवले पाहिजे.

**बहूनां जन्मनामन्ते ज्ञानवान्मां प्रपद्यते ।**
**वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः ॥ १९ ॥**

साधन करीत अनेक जन्म घेतल्यानंतर ' सर्व विश्व वासुदेवच होय' असे जाणून ज्ञानी मला शरण येतो. पण असा महात्मा अती दुर्लभ.

निष्काम कर्म करीत राहिल्यास त्याचा व्यय न होता प्रत्येक जन्मी भर पडत जाते व शेवटी केवळ स्वतःच नव्हे तर हे सर्व चराचर विश्वच वासुदेव आहे अशी उत्कृष्ट बुद्धी त्याला लाभते. असा महाभाग मात्र अत्यंत दुर्लभ असतो.

**कामैस्तैस्तैर्हृतज्ञानाः प्रपद्यन्तेऽन्यदेवताः ।**
**तं तं नियममास्थाय प्रकृत्या नियताः स्वया ॥ २० ॥**

( जन्मान्तरीच्या संस्कारांमुळे ) स्वतःच्या स्वभावाने नियंत्रित झालेले, निरनिराळ्या विषयांच्या अभिलाषेमुळे ज्ञानहीन झालेले, निरनिराळ्या नियमांनुसार भजून अन्य देवतांना भजतात.

सर्वश्रेष्ठ ईश्वराची प्रार्थना करण्याऐवजी सामान्यजन इंद्रचंद्रादि देवतांना भजतात. मनांत अनेक विषयांच्या कामना असल्याने त्यांना विवेक रहात नाही. कांहीतरी मिळावे म्हणून एखाद्या देवतेला साकडे घालणे व ते मिळाल्यास त्याबद्दल मी अमुक करीन असे नवस करणे ही भक्ती नसून तो एक प्रकारचा व्यापार होय.

सामान्य देवता व परमेश्वराच्या सेवेत समान श्रम असतात, पण परमेश्वराच्या भक्तांना फलाचा लाभ अधिक होतो. एक क्रियेचे फळ मिळते व दुसरे त्यामागील बुद्धीचेही फळ मिळते. शिपाई व अधिकारी दोघेही ऑफिसात सारखा वेळ काम करतात. पण साहेब शिपायाच्या दसपट पगार घेतो. केवळ सांगकाम्या, पाट्या टाकणाऱ्या मजुरापेक्षा कुशल कारागिराला अधिक वेतन मिळते. कारण, साहेबाला व कारागिराला काम तर करावेच लागते, शिवाय आपल्या बुद्धीचाही वापर करावा लागतो. म्हणून त्याला अधिक मोबदला मिळतो. सामान्य देवतेचा भक्त व परमेश्वराचा भक्त यांच्यात असाच फरक आहे. परमेश्वराचा भक्त कुशल अधिकारी असतो.

**यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति ।**
**तस्य तस्याचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम् ॥ २१ ॥**

जो जो भक्त ज्या ज्या देवतेची श्रद्धेने भक्ती करण्याची इच्छा करतो, त्या त्या भक्ताची श्रद्धा त्या त्या देवतेच्या ठिकाणी मी स्थिर करतो.

परमेश्वर सर्वशक्तिसंपन्न असून अखिल कर्म—फलदाता तोच आहे. त्याला सर्वज्ञान असल्याने कोणत्याही रूपाने त्याची भक्ती केली तरी

चालते. पण हे ज्ञान नसेल तर मात्र सर्वोत्कृष्ट फळ मिळत नाही. इंद्राची भक्ती केली तर तो स्वर्ग देईल. पण स्वर्ग झाला तरी विनाशीच. ईश्वराच्या भक्तांना अविनाशी शांती मिळते.

**स तया श्रद्धया युक्तस्तस्याराधनमीहते ।**
**लभते च ततः कामान्मयैव विहितान्हि तान् ॥ २२ ॥**

तो भक्त त्या श्रद्धेने युक्त होऊन त्या देवतेचे आराधन करतो आणि मग मीच निर्माण केलेली इच्छित फळे त्याला मिळतात.

आकाशात् पतितं तोयं यथा गच्छति सागरं ।
सर्वदेवनमस्कारः केशवं प्रतिगच्छति ॥

पावसाचे पाणी जसे शेवटी समुद्राला जाऊन मिळते, तसे कोणत्याही देवतेची उपासना केली तरी ती अखेर भगवंताला पोहोचते, व तोच फळ देतो. हे जरी खरे असले तरी भगवद्भक्तीत एक विशेष असतो. उन्हाळ्यात विहीरीत वा नळाखाली स्नान केले तरी गार वाटते, पण गंगास्नान केल्यास तापही जातो व पापही नष्ट होते. तसेच परमेश्वराच्या भक्तीचे फळ अधिक असते.

**अन्तवत्तु फलं तेषां तद्भवत्यल्पमेधसाम् ।**
**देवान् देवयजो यान्ति मद्भक्ता यान्ति मामपि ॥२३॥**

पण अल्पबुद्धी मनुष्याला मिळालेले फळ विनाशी ठरते. देवतांची भक्ती करणारे देवतांप्रत जातात. माझी भक्ती करणारे मला येऊन मिळतात.

सूर्यफूल खूप मोठे असते. पण त्याला सुवास नाहीं. मोगरा, सोनचाफा ही फुले लहान, पण त्यांचे रूप व सुवास दोन्ही आकर्षक असतात. अन्य देवता या सूर्यफुलासारख्या आहेत. त्यांची भक्ती केल्यास त्या फक्त भुक्ती देतील. ईश्वर हा सुंदर सुवासिक पुष्पाप्रमाणे भुक्ती व मुक्ती दोन्ही देतो. ईश्वराकडे आनंदाचे वैभव आहे. त्याची त्याला स्वतःला गरज नाही. म्हणून शरण येणाऱ्या भक्ताला तो मुक्त

हस्ताने आनंद प्रदान करतो. ईश्वर इतका उदारधी असता त्याचेकडे अन्यदेवतारूपी संकुचित मार्गाने गेल्यास महत्फळ कसे मिळेल ? एखाद्या याचकाने आपले गाऱ्हाणे राजाच्या शिपायापुढे सांगितले, तर शिपाई फार तर चार आणे काढून देईल. पण याचकाने जर प्रत्यक्ष राजाची भेट घेतली तर त्याला केव्हाही अधिक फायदा होईल. केव्हांही पाय धरायचेच झाले तर ते कुणा समर्थाचे धरावे, असा व्यवहारातील नियम आहे. म्हणून सर्वेश्वरासच शरण जाणे योग्य असते.

**अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यंते मामबुद्धयः ।**
**परं भावमजानंतो ममाव्ययमनुत्तमम् ॥ २४ ॥**

**नाहं प्रकाशः सर्वस्य योगमायासमावृतः ।**
**मूढोऽयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम् ॥ २५ ॥**

माझे अविनाशी व अत्यंत श्रेष्ठ असे स्वरूप न जाणणारे अल्प-बुद्धी लोक अव्यक्त असलेल्या मला व्यक्त स्वरूपाने ओळखतात. सर्वांना माझे ज्ञान नाही. कारण योगमायेने मी आच्छादित झालो आहे. म्हणून हे मूढजन, जन्मरहित व नाशरहित अशा मला जाणत नाहीत.

श्रीकृष्ण हा देखील इतर सर्वसामान्य मानवाप्रमाणे पूर्वी नव्हता व सांप्रत तो वसुदेव-देवकीपासून जन्मलेला एक मानव असे जे समजतात, ते अज्ञानी होत. त्यांना काहीच ज्ञान नाही असे म्हटले पाहिजे. मत्स्य, कूर्म, वराहादी अवतारातही त्या सामान्य प्राण्यापेक्षा अवतारी प्राणी वेगळा असतो. कारण त्या देहाच्या आत अचिंत्य शक्तिसंपन्न ईश्वर वास करीत असतो. ईश्वराचे स्वरूप योगमायाच्छादित असल्याने मूढ व्यक्तींना तो अजन्मा व अविनाशी आहे हे कळत नाही.

**वेदाहं समतीतानि वर्तमानानि चार्जुन ।**
**भविष्याणि च भूतानि मां तु वेद न कश्चन ॥२६॥**

हे अर्जुना, पूर्वी झालेल्या, सध्या असलेल्या व पुढे होणाऱ्या प्राण्यांना मी जाणतो. पण मला कोणी जाणत नाही.

ईश्वराला भूतभविष्यासंबंधी संपूर्ण ज्ञान असते. त्यासाठी त्याला कोणतेही साधन लागत नाही. परमेश्वर सर्वांना ओळखतो, पण त्याला कोणीच ओळखत नाही. ब्रह्मदेव व इंद्र यांनी भूभार हलका करण्याकरता अवतार घेण्यासाठी ईश्वराची प्रार्थना केली. म्हणून त्याने गोकुळात अवतार घेतला. कृष्णाने केलेली गोपक्रीडा व त्यावर गोपींनी केलेले प्रेम पाहून ब्रह्मदेव-इंद्राना शंका आली व श्रीकृष्णाची परीक्षा पाहण्यासाठी ब्रह्मदेवाने गोपगोपी, गाईवासरे यांना पळवून नेऊन एक वर्षपर्यन्त दडवून ठेवले. जेथे इंद्र-ब्रह्मदेवादिकांना भगवंताच्या स्वरूपाबद्दल मोह पडला, तेथे इतरांची काय कथा?

योग म्हणजे संकल्प. अभक्तांना आपले स्वरूप कळू नये—दर्शन होऊ नये—असा परमेश्वरी संकल्प असतो. म्हणून अभक्ताला अगदी जवळ असलेल्या परमेश्वराचे ज्ञान होत नाही. कोल्हापूरचे सिद्धेश्वर महाराज ( गुरुमहाराज ) यांचा मुक्काम नरसिंगपूर येथे होता. त्यांच्या मातोश्री त्यांचा शोध घेत होत्या. महाराज देवळात आहेत असे कळले म्हणून त्या तेथे गेल्या. तेथे त्याना एक साधू बसलेला आहे असे दिसले. पण तोच आपला मुलगा आहे हे काही त्याना उमगले नाही. सात वेळा आईने भेटण्याचा प्रयत्न केला, पण मुलगा म्हणून दर्शन झाले नाही. पुढे आईची भेट झाल्यावर महाराज म्हणाले, ' मी तुला पाहिले पण तुला दर्शन देण्याची माझी इच्छा नव्हती, म्हणून मी तुला दिसलो नाही. ' सिद्ध पुरुषांच्या संकल्पाचा इतका जोर असतो, तर परमेश्वरी संकल्प किती जोरदार असेल याचा विचार करा.

**इच्छाद्वेषसमुत्थेन द्वन्द्वमोहेन भारत ।**
**सर्वभूतानि संमोहं सर्गे यान्ति परंतप ॥ २७ ॥**

हे शत्रुतापना, भरतश्रेष्ठा, इच्छा व द्वेष यापासून उत्पन्न झालेल्या सुखदु:खादी द्वंद्वरूपी मोहाच्या योगाने ( या सृष्टीमध्ये ) जन्माला आल्यापासून सर्व प्राणी मोह पावतात.

अनुकूल विषय मिळावेत व प्रतिकूल विषय जावेत अशी प्रत्येकाची इच्छा असते. सर्व प्राणिमात्रांची धडपड त्यासाठीच असते. रात्र आवडत नाही म्हणून खूप मोठे दिवे लावले तर अंधार जाईल. पण झोप आल्याशिवाय राहणार नाही. कायम दिवसच असावा असे म्हणण्यात जसा अर्थ नाही, तसेच कायम सुखच मिळावे, दु:खे येऊच नयेत, असे वाटत असले तरी तसे प्रत्यक्ष घडणे अशक्य आहे. सुख हवे व दु:ख नको हा मोह प्रत्येकाला होतो व त्यामुळे प्राणी पुन: पुन: जन्ममरणाच्या फेऱ्यात सांपडतो.

**येषां त्वन्तगतं पापं जनानां पुण्यकर्मणाम् ।**
**ते द्वन्द्वमोहनिर्मुक्ता भजन्ते मां दृढव्रताः ॥ २८ ॥**

परंतु ज्या पुण्यकर्म करणाऱ्या लोकांच्या पापाचा नाश झालेला असतो, ते सुखदु:खादी द्वंद्वरूपी मोहरहित होऊन निश्चयपूर्वक माझी भक्ती करतात.

सगळेच मोहवश झाले तर ईश्वराचे ज्ञान कोणाला होणार नाही. म्हणून काही अपवाद म्हणून मोह न पावणारे प्राणी असतात. त्यांना ईश्वरी ज्ञान झाल्याशिवाय रहात नाही. आषाढी वारीला पंढरपुरांत भयंकर गर्दी होते. पण पंढरपुरातील फारच थोडे दर्शनासाठी जातात. शिवाय यात्रेतील सर्वच काही दर्शनासाठी आलेले नसतात. स्त्रीदर्शन, चोरी, व्यापार, मित्रभेट किंवा करमणूक असे विविध हेतु बाळगून आलेल्यांचीच संख्या जास्त असते. केवळ दर्शनासाठी आलेला चुकून एखादा सापडायचा. असा दुर्मिळ भक्त संकटांना न जुमानता ईश्वराच्या भजनात रंगून जातो. अशा भक्तास दृढव्रती म्हणतात.

**जरामरणमोक्षाय मामाश्रित्य यतन्ति ये ।**
**ते ब्रह्म तद्विदुः कृत्स्नमध्यात्मं कर्म चाखिलम् ॥ २९ ॥**
**साधिभूताधिदैवं मां साधियज्ञं च ये विदुः ।**
**प्रयाणकालेऽपि च मां ते विदुर्युक्तचेतसः ॥३०॥**

जे जरा व मरण यापासून मुक्त होण्याकारिता माझा आश्रय करून यत्न करतात, ते त्या ब्रह्माला संपूर्ण अध्यात्माला व संपूर्ण कर्माला जाणतात. जे अधिभूत, अधिदैव व अधियज्ञ यासह मला जाणतात, ते स्वस्थ चित्ताने युक्त असलेले पुरुष प्रयाणकाळीही मला जाणतात.

दुःख कमी होण्यासाठी इतर उपाय करण्यापेक्षा परमेश्वराची भक्ती करणे हा मार्ग सर्वश्रेष्ठ आहे. आपल्याच पूर्व कर्मामुळे आपल्या वाट्याला दुःख येत असते. जरा व मरण ही सर्वांत दोन मोठी दुःखे. तरुणपणी दुःख सहन करण्याची शक्ती असते. वार्धक्यात शक्ती कमी झाल्याने रोग बळावतात. एक वेळ रोग औषधाने कमी होतील, पण म्हातारपणी पदोपदी अपमान वा कुचेष्टा होते. ते दुःख नको असेल तर सर्व सोडून अरण्यात गेले पाहिजे. पण ते जमत नाही. तसेच मरणसमयी एका वेळी शंभर विंचू डसावेत असे तीव्र दुःख होते. एका वेळी सतरा मर्मस्थाने तुटतात. अशी ही दोन भयानक दुःखे प्रत्येक प्राणिमात्राच्या मागे लागलेली असतात.

या दुःखांचा नाश करायचा झाल्यास ईश्वरभक्तीशिवाय दुसरा उपाय नाही. भजनामुळे भक्त तल्लीन होतो व अंतकाळी तीव्र व्यग्रता असताही त्याला ब्रह्म, सर्व अध्यात्म, कर्माचे साधिभूत, साधियज्ञ, अधिदैव यासह ईश्वराचे संपूर्ण ज्ञान होते. ब्रह्म, वगैरेचे विवरण भगवंतानी पुढील अध्यायात विस्ताराने केले आहे.

इति श्रीमद् भगवद् गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे विज्ञानयोगो नाम सप्तदशोध्यायः

◊ ◊ ◊

# अध्याय ८ वा.

अर्जुन उवाच—

**किं तद्ब्रह्म किमध्यात्मं किं कर्म पुरुषोत्तम ।**
**अधिभूतं च किं प्रोक्तमधिदैवं किमुच्यते ॥ १ ॥**
**अधियज्ञः कथं कोऽत्र देहेऽस्मिन्मधुसूदन ।**
**प्रयाणकाले च कथं ज्ञेयोसि नियतात्मभिः ॥ २ ॥**

अर्जुन म्हणाला—हे पुरुषोत्तमा, ब्रह्म, अध्यात्म, कर्म म्हणजे काय? अधिभूत आणि अधिदैव कशाला म्हणतात. हे मधुसूदना, या देहात अधियज्ञ कोणता व कसा? अंत:करण-निग्रह केलेले योगी प्रयाणकाली तुला कसे जाणतात?

सातव्या अध्यायातील शेवटचा श्लोक ऐकल्यावर अर्जुन त्याचा खुलासा करण्याची विनंती करीत आहे.

ब्रह्म कोणते? सविशेष की निर्विशेष? साकार की निराकार? सगुण की निर्गुण? अध्यात्मात देह, इंद्रिये, मन, प्राण, बुद्धी व जीव यापैकी कोण कोण अभिप्रेत आहेत? तसेच कर्म शास्त्रीय की लौकिक? आणि मृत्युसमयी सर्व इंद्रिये, मन व बुद्धी व्याकुळ झाली असता योग्याला ईश्वराचे स्मरण कसे राहते, अशी अर्जुनाची शंका आहे.

**अक्षरं ब्रह्म परमं स्वभावोऽध्यात्ममुच्यते ।**
**भूतभावोद्भवकरो विसर्गः कर्मसंज्ञितः ॥ ३ ॥**

श्रीभगवान म्हणाले— जे परम अविनाशी आहे ते ब्रह्म. देहाला अधिकृत करून जे ब्रह्माचे स्वरूप राहते त्याला अध्यात्म म्हणतात. अक्षर ब्रह्मापासून भूतमात्रादी चराचर पदार्थांची उत्पत्ती करणारा जो याग, होम, दानरूप त्याग त्याचे नाव कर्म होय.

परं ब्रह्म ही अत्यंत महत्त्वाची वस्तु आहे. अत्यंत प्रिय असणारी वस्तु. कोणाला आपली पत्नीच प्रिय असते. त्या दृष्टीने त्याला त्याची बायको हेच परब्रह्म असते. पण खरे परब्रह्म ' अक्षर ' असते. नाश न पावणारे म्हणजे अविनाशी. ' अश्नोति इति अक्षरं ' म्हणजे सर्वव्यापक. प्रत्येक शब्दाचे दोन अर्थ असतात. एक व्युत्पत्तीवरून होणारा व दुसरा व्यवहारात रूढ असलेला. उदाहरणार्थ, राम शब्दाचा व्युत्पत्ती-प्रमाणे ' रमंते योगिनः यत्र ' असा अर्थ होतो. पण व्यवहारात राम म्हटले की कोदंडधारी—दाशरथी राम—हाच अर्थ घ्यावयाचा. मानव म्हणजे मनूपासून झालेला असा अर्थ होतो. पण व्यवहारात सामान्य मानव हाच अर्थ आपण घेतो. ' गौ ' म्हणजे पाणिनीच्या सूत्राप्रमाणे ' जिला गती आहे ती '. पण गौ म्हणजे फक्त गाय एवढाच अर्थ घेतला जातो.

त्याचप्रमाणे ' अक्षर ' याचा मूळ अर्थ प्रणव ( ओंकार ) असा असला तरी अविनाशी हाच अर्थ इथे अभिप्रेत आहे. परमं हे विशेषण असल्याने शुद्ध ब्रह्म असा अर्थ होतो. या शुद्ध ब्रह्माचा अध्यात्म हा स्वभाव आहे, म्हणजेच त्याचे रूप आहे. हे ब्रह्माचे स्वरूप म्हणजे अध्यात्म या देहात असते व ते सच्चिदानंदरूपी असते. त्याचे प्रतिबिंब व अंतःकरण मिळून जीव होतो. म्हणून जीव हाही आनंदरूपी आहे हे ओळखले पाहिजे. या गोष्टीचा अनुभव घेतला पाहिजे. कर्म म्हणजे शेती, व्यापार अथवा नोकरी हे व्यवहारातील अर्थ न घेता कर्म म्हणजे यज्ञ, दान, तप इ. शास्त्रीय कर्मे असे जाणावे.

**अधिभूतं क्षरो भावः पुरुषश्चाधिदैवतम् ।**
**अधियज्ञोऽहमेवात्र देहे देहभृतां वर ।। ४ ।।**

हे नरश्रेष्ठा, अधिभूत म्हणून नश्वर पदार्थ व हिरण्यगर्भ हाच अधिदैवत आणि या देहात अंतर्यामी रूपाने राहणारा मीच अधियज्ञ आहे.

अधिभूत म्हणजे पंचमहाभूतापासून निर्माण झालेले देहादी पदार्थ. या पदार्थांचा नाश पावणे हा धर्म आहे. अधिदैवत म्हणजे हिरण्यगर्भ किंवा जीव. हा प्रथम निर्माण होतो. नंतर इंद्रचंद्रादी देवता निर्माण करून त्यांची एकएका इंद्रियावर नेमणूक केली जाते. जीव त्या देवताकडून काम करून घेतो. या देहात वास करणारा अंतर्यामी म्हणजेच परमेश्वर. यालाच अधियज्ञ म्हणतात.

प्रत्येकाला वाटते, कोणतेही कार्य करायचे किंवा नाही हे आपल्या हाती आहे. हे म्हणणेच चूक आहे. करणे न करणे हे मानवाच्या हाती नसून जे घडते ते अंतर्यामीच्या इच्छेप्रमाणे घडत असते. साधा रोज एखाद्या मंदिरात जायचा नियम केला तरी तडीस नेणे आपल्या हाती नसते. अचानक पाहुणे येतात किंवा प्रकृती बिघडते, व नियम मोडतो. उत्तम बी पेरणे, खत देणे, मशागत करणे हे मानवाच्या हाती आहे. पण बीज अंकुरित करणे हे मात्र मानवाच्या हाती नसून ते अंतर्यामी परमेश्वराधीन आहे.

**अन्तकाले च मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम् ।**
**यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः ॥ ५ ॥**

अंतकाळी जो केवळ माझेच स्मरण करीत शरीरत्याग करतो, तो निःसंशय मत्स्वरूप पावतो.

सदोदित परमेश्वराचे स्मरण करीत राहिल्यास मनावर चांगले संस्कार होतात. चांगल्या संस्कारांमुळे चांगली बुद्धी प्राप्त होते व अंतकाळीही त्याला परमेश्वराचे स्मरण राहते. येथे अंतकाले च मधील चकाराला महत्त्व आहे. जो जन्मभर परमेश्वराची सेवा करतो त्याला परमेश्वर अंतकाळी अंतर देत नाही. प्रत्येकाची सर्व खटपट ‘शेवटचा दिस गोड व्हावा’ यासाठी असते. पण शेवटच्या क्षणी संसारातील व्यक्ती वा साधने यांचा बिलकुल उपयोग होत नाही. अंतकाळी सर्व

इंद्रिये, मन व बुद्धी व्याकुळ झाली असली तरी भक्ताला आपले स्मरण करण्याची प्रेरणा परमेश्वरच देतो.

**यं यं वापि स्मरन्भावं त्यजत्यन्ते कलेवरम् ।**
**तं तमेवैति कौन्तेय सदा तद्भावभावितः ॥ ६ ॥**

अथवा हे कुन्तीपुत्रा, ज्या ज्या वस्तूचे स्मरण करीत मनुष्य अंतकाळी देहाचा त्याग करतो, त्या त्या वस्तूप्रत तो सर्वदा ( तिच्या स्मरणाने ) तिच्या ठिकाणी एकाग्र झालेला असल्यामुळे जातो.

मरणसमयी ज्याचे स्मरण होते, तो देह पुढील जन्मी येतो. भरताने राज्य केले, राज्य-त्याग केला, खूप तप केले, पण मरणसमयी पाळलेल्या हरणाचे स्मरण झाल्याने तो मृग योनीत जन्मला. मग भगवंताचे स्मरण झाल्यास भगवंतासारखा सुंदर देह व रूप कां मिळणार नाही ? जो उपासना मार्गाने जातो; त्याला प्रथम ईश्वराचा आकार मिळतो व नंतर तो ब्रह्मलोकात जातो. तेथे ब्रह्मदेव तत्त्वबोध करतो. त्यानंतर तो ईश्वरस्वरूप होतो. म्हणून ईश्वराचे सतत स्मरण ठेवणे आवश्यक आहे. कोणत्याही पदार्थांचे दीर्घकाळ स्मरण करीत राहिल्यास अंतकाळी साहजीकच तीच बुद्धी होते. अंतकाळी परमेश्वराचे मुखी नाम यावे असे वाटत असेल तर पहिल्यापासून सवय हवी.

**तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर युध्य च ।**
**मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशयम् ॥ ७ ॥**

म्हणून सर्वकाळी माझे स्मरण ठेव व युद्ध कर. मन व बुद्धी मला अर्पण करून राहिलास म्हणजे निःसंशय मजप्रतच येशील.

येथे नुसते स्मर न म्हणता अनुस्मर असे म्हटले आहे. म्हणजे नुसते स्मरण नव्हे तर सातत्याने स्मरण करणे. अनुस्मरचा दुसरा अर्थ- शास्त्राने ईश्वराचे जसे स्वरूप सांगितले आहे ते लक्षात घेऊन त्याचे स्मरण करणे--चिंतन करणे. नुसते चिंतनही उपयोगाचे नाही. चिंतनाबरोबर

कर्तव्यही केले पाहिजे. म्हणून ' युध्य च ' असा शब्दप्रयोग केलेला आहे. युद्ध हे अर्जुनाचे कर्तव्य आहे व ते त्याला टाळता येणार नाही, असे भगवंतानी बजावले आहे. कर्तव्य करताना भगवंताचे स्मरण असले पाहिजे. स्मरण म्हणजे उपासना व युद्ध हे विहित कर्म म्हणजेच कर्मयोग. उपासनेने मानसिक स्वास्थ्य लाभते तर कर्मयोगाने भोग--समृद्धी मिळते--उत्कर्ष होतो. म्हणून दोन्हींची गरज आहे. मन ईश्वरार्पण करायचे म्हणजे ईश्वराने घालून दिलेले नियम पाळायचे. प्रत्येकाने त्याच्या वाट्याला आलेली कर्मे केलीच पाहिजेत असा ईश्वरी संकेत आहे, तो पाळलाच पाहिजे. श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात,

अगा जया जे विहित । ते ईश्वराचे मनोगत ।
म्हणोनि केलिया निभ्रांत । सांपडेची तो ॥

ईश्वराला बुद्धी अर्पण करायची म्हणजे त्याच्या प्राप्तीचा निश्चय करायचा. अशा रीतीने मन व बुद्धी ईश्वराच्या ठिकाणी ठेवून कर्तव्यकर्म करीत राहणारा निःसंशय परमेश्वरस्वरूप बनतो.

**अभ्यासयोगयुक्तेन चेतसा नान्यगामिना ।**
**परमं पुरुषं दिव्यं याति पार्थानुचिन्तयन् ॥ ८ ॥**

हे पार्था, अभ्यासयोगामुळे स्थिर झालेल्या व अन्यत्र न जाणाऱ्या चित्ताने परमपुरुषाचे सतत स्मरण करणारा तेजस्वी परमपुरुषाप्रत जातो.

मागील श्लोकात परमेश्वरप्राप्तीचे चिंतन व उपासना हे दोन मार्ग सांगितले आहेत. येथे अभ्यास हाही एक उपाय असल्याचे भगवंत सांगत आहेत. नित्यनैमित्तिक कर्मे कराच. पण ती करून फावल्या वेळात ईश्वराचे ध्यानही करा. यालाच अभ्यास म्हणायचे. वेळ नाही अशी लोक तक्रार करतात. पण आपल्या दैनिक कार्यक्रमाकडे जरा निरखून पाहिल्यास आपणास आढळून येईल की, अनावश्यक गोष्टीत आपण कितीतरी वेळ वाया घालवत असतो. योग म्हणजे आपले कर्तव्यकर्म.

ते करून उरलेल्या वेळात दुसऱ्याचे बरेवाईट चिंतित बसण्यापेक्षा, किंवा गप्पा मारण्यापेक्षा तोच वेळ ईश्वराच्या ध्यानात घालविता येईल. ईश्वरासारखा धन्य करणारा व हितकारी अन्य कोणीही नाही. म्हणून त्या दिव्य पुरुषाचे सतत चिंतन करीत रहायचे व इतर विषयांना मनात थारा द्यावयाचा नाही, यालाच अभ्यासयोग म्हणतात. अभ्यासयोग साधला तर ईश्वरस्वरूप प्राप्त होते.

आता भगवंत त्या दिव्य पुरुषाचे स्वरूप सांगत आहेत.

**कविं पुराणमनुशासितारमणोरणीयांसमनुस्मरेद्यः ।**
**सर्वस्य धातारमचिन्त्यरूपमादित्यवर्णं तमसः परस्तात् ॥९॥**

सर्वज्ञ, सर्वदा असणारा, विश्वाचा नियंता, अणूहून लहान, सर्व स्थूलसूक्ष्म जगाचा आश्रय, ज्याचे स्वरूप कल्पनेला अगोचर आहे असा, सूर्याप्रमाणे प्रकाशरूप व अज्ञानरूप अंधकाराच्या पलीकडे असलेल्या परमपुरुषाचे जो सतत स्मरण करतो.

या श्लोकात परमेश्वराला अनेक विशेषणे लावली आहेत, ती केवळ भाषेला डौल यावा म्हणून केलेली खटपट नव्हे. तर प्रत्येक विशेषण अन्वर्थक आहे. 'कविम्' चा अर्थ क्रांतदर्शी असा आहे. मानवाच्या अहोरात्र चालू असलेल्या सर्व क्रिया समजणारा. चांगल्या अथवा वाईट क्रिया, प्रगट किंवा अप्रगट समजणारा. ज्याचेपासून कांही लपवून ठेवता येत नाही तो खरा कवि. **पुराण** म्हणजे जीर्ण असा अर्थ नसून 'पुरा अपि नव इव'. म्हणजे फक्त चालू कालाचे ज्ञान असणारा नव्हे तर वर्तमानाप्रमाणेच भूत व भविष्य स्पष्ट जाणणारा ईश्वराशिवाय दुसरा कोण आहे? हा परम पुरुष अनुशासितारम् म्हणजे विश्वाचे नियमन करणारा आहे, मनाला येईल तसे तो शासन चालवीत नसून ईश्वरी नियमानुसारच–शास्त्राप्रमाणे सर्व घटना तो घडवितो. अशी प्रचंड कामगिरी करीत असून तो 'अणोरणीयान्' म्हणजे अती सूक्ष्म असल्याने तो दुर्विज्ञेय आहे.

परमपुरुष सर्वस्य धातारम् म्हणजे सर्व--कर्म--फलाध्यक्ष आहे. प्रत्येकजण फळ देऊ शकतो. पण विशिष्ट क्षेत्रामध्ये त्याला अधिकार असतो. पण भगवंत सर्वांना कृमीकीटकापासून गंधर्व देवगणापर्यंत सर्वांना फल देतो, म्हणजे सर्व चराचर जगाचा शास्ता आहे. तो अचिंत्यरूप म्हणजे आपल्याला कल्पनाही करता येणार नाही असा शक्तिशाली आहे. समर्थांनी एक प्रचंड शिला फोडून आत पाणी व बेडूक असलेला दाखवून दिला. तिथे पाणी कोठून गेले व बेडूक कसा निर्माण झाला याची कल्पना सामान्य माणूस करूच शकणार नाही. अशा कितीतरी गोष्टी या विश्वात घडत असतात. तो आदित्यवर्णम् म्हणजे सूर्याप्रमाणे तेजस्वी आहे. पण सूर्याहूनही श्रेष्ठ, कारण त्याचे कार्य अंधारातही चालू असते. कोणी कितीही सामर्थ्यशाली असला तरी तो मूर्त वस्तूचा नाश करू शकतो. पण परम पुरुष ' तमसः परस्तात् ' म्हणजे अमूर्त असलेल्या अज्ञानाचा नाश करणारा आहे.

अशा दिव्य परम पुरुषाचे नित्यस्मरण करून त्याचे स्वरूप प्राप्त करून घेणे हे मानवाचे अंतिम ध्येय असले पाहिजे.

**प्रयाणकाले मनसाचलेन भक्त्या युक्तो योगबलेन चैव ।**
**भ्रुवोर्मध्ये प्राणमावेश्य सम्यक् स तं परं पुरुषमुपैति दिव्यम् । १०॥**

जो मरणसमयी एकाग्र मनाने, भक्तीने व योगबलाने युक्त होऊन दोन्ही भुवयांमध्ये प्राणवायूची योग्य प्रकारे स्थापना करून ( त्या दिव्य पुरुषाचे ) जो स्मरण करतो, तो त्या तेजस्वी परम पुरुषाप्रत जातो.

मरणसमयी परमपुरुषाचे चिंतन करायचे व मन निश्चल ठेवायचे. चिंतनाचे बल म्हणजेच योगबल, योगबलामुळे प्राण भ्रूमध्यामध्ये आणता येतो. तेथून तो ब्रह्मरंध्र फोडून देवयान मार्गाने सरळ ब्रह्मलोकांत जाऊन पोहोचतो. मृत्युसमयी दिव्यस्वरूप व त्याचे सर्वगुणांचे स्मरण राहणे ही

अर्थातच अत्यंत अवघड गोष्ट आहे. म्हणून भगवान दुसरा एक मार्ग दाखवीत आहेत. त्यास ॐकाराची किंवा प्रणवाची उपासना म्हणतात.

**यदक्षरं वेदविदो वदन्ति विशन्ति यद्यतयो वीतरागाः ।**
**यदिच्छन्तो ब्रह्मचर्यं चरन्ति तत्ते पदं संग्रहेण प्रवक्ष्ये ।।११।।**

जे अविनाशी आहे असे वेदवेत्ते सांगतात, (संसाराच्या) इच्छेपासून पराङ्मुख झालेले विरक्त ज्यामध्ये प्रवेश करतात व जे जाणण्याची इच्छा करणारे ब्रह्मचर्य आचरण करतात, ते ब्रह्मनामक पद मी तुला संक्षेपाने सांगतो.

वेद जाणणारे, निरिच्छ, ज्ञानी व ब्रह्मचर्यव्रत पालन करणारे ज्या ओंकाराची उपासना-प्रणवोपासना करतात, त्या उपासनेचे स्वरूप भगवान संक्षेपाने पण स्पष्टपणे सांगत आहेत.

**सर्वद्वाराणि संयम्य मनो हृदि निरुध्य च ।**
**मूर्ध्न्याधायात्मनः प्राणमास्थितो योगधारणाम् ।। १२ ।।**
**ओमित्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन् ।**
**यः प्रयाति त्यजन्देहं स याति परमां गतिम् ।। १३ ।।**

सर्व इंद्रियांचे नियमन करून, हृदयाच्या ठिकाणी मनाचा निरोध करून व प्राणवायु मस्तकात ठेवून, योगाचरणात स्थित होऊन, ॐ या एकाक्षरी ब्रह्माचा उच्चार करीत व माझे स्मरण करीत असता जो देहत्याग करतो, तो अत्यंत श्रेष्ठ गती पावतो.

मरणकाळी सर्व इंद्रिये विषयापासून परावृत्त करावयाची, मनातील सर्व वृत्ती नाहीशा करायाच्या, हृदयातील प्राण सुषुम्नेतून ब्रह्मरंध्रात न्यायचा व ओंकाराचा स्पष्ट उच्चार करायचा व ॐ म्हणजेच सच्चिदानंद स्वरूपी परमेश्वर होय, असे चिंतन करीत असता ब्रह्मरंध्रांतून प्राण बाहेर सोडला की ब्रह्मलोकात पोहोचून क्रममुक्ती मिळते.

हा मार्गही तितकाच कठीण आहे. सामान्य माणसास तो जमण्यासारखा नाही. एखादा योगसिद्ध पुरुषच अशा मार्गाने मृत्यूला सामोरा जाईल. मरणकाळी अत्यंत व्याकुळता निर्माण झालेली असल्याने प्राण आपल्या स्वाधीन रहात नाही. ही अडचण लक्षात घेऊन भगवान सामान्य जनांसाठी एक सुलभ मार्ग दाखवितात.

**अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः ।**
**तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः ॥ १४ ॥**

हे पार्था, जो अनन्य चित्ताने माझे नित्य स्मरण करतो, अशा माझ्याशी एकरूप झालेल्या योग्याला मी सुलभ आहे.

सतत परमेश्वराचे स्मरण करायचे. अनन्याचित्त म्हणजे परमेश्वराखेरीज इतर दुसऱ्या कोणत्याही विषयाला मनात थारा न देणे. असा पुरुष परमेश्वराशी युक्त झालेला असल्याने त्याला योगी असेच म्हणावे लागते. अशा व्यक्तींला मृत्युसमयीही परमेश्वराचे स्मरण राहते व तो परमपदाप्रत जातो. हा साधा मार्ग असून सामान्य माणसास सुलभ आहे. व्यवहार करताना शेकडो विषयाशी संबंध येत असल्याने सदैव भगवंताचे स्मरण राहणे कसे शक्य आहे, अशी अडचण वाटली तरी ती खरी नाही. परमेश्वराशी अनन्यचित्त झालेल्या भक्ताच्या चित्तात इतर विषय आले तरी त्यांचा दोष लागत नाही. उदाहरणार्थ, लहान मुलास पूजा कर व नंतर नैवेद्याचा लाडू खा असे सांगितले तर तो मुलगा पूजा करतो. म्हणजे देव धुतो, गंध लावतो, फुले वाहतो, पण सर्व लक्ष लाडवावर असल्याने आपण पूजा करत आहोत हे तो विसरून जातो. म्हणून येताजाता उठतबसता परमेश्वर चित्तात असेल तर इतर व्यवहार करीत असूनही तो अनन्यचित्तच असतो.

**मामुपेत्य पुनर्जन्म दुःखालयमशाश्वतम् ।**
**नाप्नुवन्ति महात्मानः संसिद्धिं परमां गताः ॥ १५ ॥**

ही श्रेष्ठ स्थिती लाभलेल्या महात्म्यांना मजप्रत आल्यानंतर दुःखाचे आगर व नश्वर असा पुनर्जन्म प्राप्त होत नाही.

मानव जन्मला की त्याच्यामागे विविध दुःखे लागतात. तीन प्रकारची दुःखे आधिभौतिक, आध्यात्मिक व आधिदैविक असा त्रिविध ताप सतत चालू असतो. आपल्या शरीर उपाधीमुळे नाना रोग होतात, दुसऱ्याकडून आपल्याला पीडा होते व दैवी कोप होतो. यापैकी काहींना काही किंवा तिन्हीही पीडा होत असतात. शिवाय जन्म म्हटला की मृत्यु आलाच व तो केव्हा येईल हेही कोणी सांगू शकत नाही. म्हणून जीवन अत्यंत अशाश्वत ठरलेले आहे. मिळकतीचे स्थावर व जंगम असे दोन प्रकार मानतात. घर जमनि ह्या स्थिर वस्तू म्हणून स्थावर, पैसा अलंकार, वाहन अशा नेता येण्यासारख्या वस्तू म्हणजे जंगम मालमत्ता. पण आज घर वा जमिनीवरची आपली सत्ता केव्हा काढून घेण्यात येईल याची शाश्वती नसल्याने सर्वच मालमत्ता जंगम झाली आहे. थोडक्यात जीवन दुःखमय आहे. परमेश्वराच्या भक्तांना हा जन्मच घ्यावा लागत नसल्याने तो सर्व दुःखापासून मुक्त होतो. संसिद्धी म्हणजे ज्ञान व परम पुरुषार्थ. अनन्यचित्ताने भगवत्स्मरण करणारास ज्ञान व परमपुरुषार्थ या दोन्हींचा लाभ होतो.

**आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन ।**
**मामुपेत्य तु कौन्तेय पुनर्जन्म न विद्यते ॥ १६ ॥**

अर्जुना, ब्रह्मलोकासह सर्व लोकींचे प्राणी पुनर्जन्म पावणारे आहेत. पण कुंतीपुत्रा, मजप्रत आलेल्याला पुनर्जन्म नाही.

मृत्युलोकीचे किंवा स्वर्गातील ऐश्वर्यापेक्षा ब्रह्मलोकीचे ऐश्वर्य श्रेष्ठ प्रकारचे आहे. कारण मृत्युलोकी भोग घेतल्यास वासना वाढत जातात. तर ब्रह्मलोकातील भोग घेण्याने वासना क्षीण होऊन वैराग्य प्राप्त होते. पण असा ब्रह्मलोक मिळविलेल्यांनाही पुनर्जन्म घ्यावा लागतो. पुनर्जन्म

म्हणजेच या जन्ममरणाच्या फेऱ्यातून सुटका करून घ्यायची असेल, तर प्रत्यक्ष परमेश्वराची प्राप्ती करून घेणे हाच उत्तम मार्ग होय.

**सहस्रयुगपर्यन्तमहर्यद्ब्रह्मणो विदुः ।**
**रात्रिं युगसहस्रान्तां तेऽहोरात्रविदो जनाः ॥ १७ ॥**

एक सहस्रयुगे म्हणजे ब्रह्मदेवाचा एक दिवस, अर्थात् त्याची रात्रही तेवढीच दीर्घ असते, असे अहोरात्र–ज्ञाते म्हणतात.

कृत, त्रेत, द्वापार व कली अशा चार युगांच्या सहस्र चौकड्या म्हणजे ब्रह्मदेवाचा एक दिवस व तेवढीच रात्रही मोठी. अशा हिशेबाने ब्रह्मदेवाचे एक वर्ष होते. अशी शंभर वर्षे ब्रह्मदेवाचे आयुष्य आहे, म्हणजे मानवाची दोन परार्ध वर्षे. सध्या ब्रह्मदेवाला अकरावे वर्ष लागलेले आहे. ही काळगणना करणाऱ्यांना अहोरात्र वेत्ते म्हणतात. ब्रह्मलोकीची काळ-गणना अतीशय प्रदीर्घ असेल, पण त्यालाही शेवट आहे. म्हणून ब्रह्म लोकाच्या नाशाबरोबर तेथे गेलेल्यांना परतावे लागते. पण भगवंताचे आयुष्य मोजताच येत नाही, जन्म नसल्याने मोजावयाचे कोठून व मृत्यु नसल्याने थांबणार तरी कोठे? अशा भगवंताची प्राप्ती केल्यावर परतण्याचा प्रश्न येत नाही.

**अव्यक्ताद्व्यक्तयः सर्वाः प्रभवन्त्यहरागमे ।**
**रात्र्यागमे प्रलीयन्ते तत्रैवाव्यक्तसंज्ञके ॥ १८ ॥**

ब्रह्मदेवाच्या दिवसाला प्रारंभ झाला की अव्यक्तापासून सर्व व्यक्त वस्तु निर्माण होतात. व रात्र सुरू झाली की अव्यक्तनामक वस्तूत त्या विलीन होतात.

अव्यक्त म्हणजे ब्रह्मदेवाची सुप्तावस्था, तो निद्रित झाला की सर्व जग लयाला जाते, तो जागा झाला की जग पुनः निर्माण होते.

ब्रह्मदेवाच्या रात्रीबरोबर जर अनायासे अव्यक्तात लीन होता येते, तर मुक्तीसाठी वेगळे प्रयत्न करण्याची काय आवश्यकता? या शंकेचे निरसन भगवंत पुढील श्लोकात करीत आहेत.

भूतग्रामः स एवायं भूत्वा भूत्वा प्रलीयते ।
रात्र्यागमेऽवशः पार्थ प्रभवत्यहरागमे ॥ १९ ॥

अर्जुना, भूतांचा तोच समुदाय पुनः पुनः जन्मून पराधीन होऊन रात्र सुरू झाली की लय पावतो आणि दिवस सुरू झाला की पुनः जन्मतो.

अव्यक्तात वस्तु लीन झाल्या तरी पुनः त्या प्रगट होतात. घोटभर पाणी प्यायचे झाले तरी हातपाय हलवावे लागतात. मग अनायासे मुक्ती कशी मिळेल? प्रयत्न केले नाहीत तर जन्म व मरण हे चक्र चालूच राहते. मनुष्य गाढ झोपेत गेला की सर्व दुःखातून मुक्त होतो, पण जागा होताच ती दुःखे स्वीकारावी लागतात. मानवाने प्रयत्न केले नाहीत, तर पुनः पुनः उत्पत्ती आणि विनाश यातून त्याची सुटका होत नाही.

परस्तस्मात्तु भावोऽन्योऽव्यक्तोऽव्यक्तात्सनातनः ।
यः स सर्वेषु भूतेषु नश्यत्सु न विनश्यति ॥ २० ॥

पण यावर सांगितलेल्या अव्यक्तापलीकडचे दुसरे जे सनातन तत्त्व आहे, ते सर्वभूते नाहीशी झाली तरीही नाहीसे होत नाहीं.

ब्रह्मदेवापेक्षाही श्रेष्ठ, त्यालाही सत्ता देणारा ज्ञानदान करणारा चिरंतन असा एक पदार्थ आहे. त्यालाच श्रुती परमगती म्हणतात. हे सनातन अव्यक्त तत्त्व आहे. ते सर्व भूतात आहे. पण सर्वभूते लयाला गेली तरीही ते नाहीसे होत नाही. म्हणून त्यास अक्षर म्हणतात.

अव्यक्तोऽक्षर इत्युक्तस्तमाहुः परमां गतिम् ।
यं प्राप्य न निवर्तन्ते तद्धाम परमं मम ॥ २१ ॥

ज्यास अव्यक्त, ‘ अक्षर ’ असे म्हणतात. जेथे गेल्यावर प्राणी परत येत नाही, ते माझे अत्यंत श्रेष्ठ असे स्वरूप आहे.

अव्यक्त—अक्षर अशी अत्यंत श्रेष्ठ गती एकदा मिळाली की पुनरावृत्ती नाही. कारण तेच माझे सर्वश्रेष्ठ स्वरूप होय. तेथे अखंड सुखाचा

लाभ घडतो. जगातील कोणताही पदार्थ नाश पावत नाही असे नाही. फक्त परमेश्वर प्राप्तीनंतर मिळणारे सुख कधीही खंडित होत नाही.

**पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया ।**
**यस्यान्तःस्थानि भूतानि येन सर्वमिदं ततम् ॥ २२ ॥**

हे पार्था, ज्याच्यामध्ये ही सर्व भूते आहेत व ज्याने हे सर्व विश्व व्यापलेले आहे, तो श्रेष्ठ पुरुष अनन्य भक्तीनेच प्राप्त होणारा आहे.

हा मार्ग पूर्वीच सांगितला आहे. तोच पुनः भगवान सांगत आहेत. भगवंताशिवाय चित्ताला अन्यत्र जाऊ न देता अत्यंत प्रेमाने किंवा ज्ञानाने अनन्य भक्ती केल्यास परमश्रेष्ठ अशा भगवंताची प्राप्ती होते. याहून दुसरा सोपा मार्ग नाही.

**यत्र काले त्वनावृत्तिमावृत्तिं चैव योगिनः ।**
**प्रयाता यान्ति तं कालं वक्ष्यामि भरतर्षभ ॥ २३ ॥**

हे भरतश्रेष्ठा, तथापि कोणत्या काळी देहावसान झाले असता योगी जन्ममरणापासून मुक्त होतात व केव्हा पुनर्जन्माप्रत (आवृत्तिप्रत) जातात तो काळ सांगतो.

येथे काळ शब्दाचा लक्षणेने देवता असा अर्थ घेतला पाहिजे. कारण पुढे देवतांचा उल्लेख आहे. पुढे " नैते सृती पार्थ जानन् " या श्लोकात मार्गवाचक शब्द आहे. म्हणून मार्ग असाही अर्थ घेता येईल. मागील श्लोकात उपासना हा उत्कृष्ट मार्ग दाखवून दिला आहे. त्याच्या जोडीला दुसरा मार्ग सांगितल्याशिवाय त्याचा उत्कृष्टपणा स्पष्ट होणार नाही. हा दुसरा मार्ग आहे कर्माचा.

**अग्निर्ज्योतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणम् ।**
**तत्र प्रयाता गच्छन्ति ब्रह्म ब्रह्मविदो जनाः ॥ २४ ॥**

अग्नी, प्रकाश, दिवस, शुक्लपक्ष आणि उत्तरायण या देवतांनी युक्त असलेल्या मार्गाने ते ब्रह्मवेत्ते ब्रह्माप्रत जातात.

निष्काम उपासकाचा प्राण देहाबाहेर पडताच अग्नी, प्रकाश, दिवस, पक्ष, उत्तरायण, सूर्य, चंद्र व विद्युल्लता या आठ देवता त्या प्राणाला ब्रह्मलोकी घेऊन जातात. त्याची उपासना सकाम की निष्काम याची तेथे परीक्षा केली जाते. उपासना ज्ञानार्थ असेल, तर आधी त्याला भोग दिले जातात व नंतर वैराग्य आणले जाते. मग ब्रह्मदेव स्वत: ज्ञानोपदेश करून त्याला मुक्ती दिली जाते. उपासना केवळ ब्रह्मप्राप्तीसाठी असेल तर ब्रह्मलोकात सगुण ब्रह्माची प्राप्ती करून दिली जाते. या मार्गात उपासकावर कसलीच जबाबदारी नसते. तीव्र उपासना केलेली असेल तर उपासकाला मरण केव्हा आले, दिवसा की रात्री याचे भय बाळगण्याचे कारण नसते. या मार्गातील देवता त्याला योग्य स्थळी पोहोचविण्याचे कार्य करतात. या मार्गाला देवयान, आर्चिरादी, उपासना, शुक्ल, उत्तरायण अशी वेगवेगळी नांवे आहेत. या मार्गात येणाऱ्या अनेक देवता शुभ्र वर्णाच्या आहेत.

रामाची श्रेष्ठता समजण्यासाठी रावणाचे वर्णन करावे लागते. तसे या सुंदर मार्गाच्या विरुद्ध जो दुसरा मार्ग आहे त्याचे वर्णन पुढील श्लोकात आहे.

**धूमो रात्रिस्तथा कृष्णः षण्मासा दक्षिणायनम् ।**
**तत्र चान्द्रमसं ज्योतिर्योगी प्राप्य निवर्तते ॥ २५ ॥**

धूम, रात्र, कृष्णपक्ष, दक्षिणायन या देवतांनी युक्त असलेल्या मार्गाने योगी चंद्रलोकापर्यंत जाऊन परत येतो.

यज्ञ यागातील सकाम-इष्टापूर्त कर्मे करणारा कर्मयोगी मृत झाला की त्याच्या प्राणास धूम, रात्र, कृष्णपक्ष, दक्षिणायनादी देवता पितृ-लोकात व तेथून चंद्रलोकात पोहोचवितात. तेथून चंद्रकिरणांनी प्रकाशित होणाऱ्या स्वर्गात तो प्राण जातो. पुण्यसंचय असेपर्यंत त्याला तेथे राहता येते. पुण्य संपताच तो खाली येऊ लागतो. आकाशात

आल्यावर तो मेघात प्रवेश करतो. मग पर्जन्यद्वारे अन्नात, अन्नातून पुरुषाचे शरीरात, तेथून मातेच्या गर्भात प्रवेश करून पुनः जन्म घेतो. असा धूम्रमार्ग जीवाला खाली खाली आणणारा आहे. यास पितृयान मार्गही म्हणतात.

**शुक्लकृष्णे गती ह्येते जगतः शाश्वते मते ।**
**एकया यात्यनावृत्तिमन्ययावर्तते पुनः ॥ २६ ॥**

जगाचे प्रकाशरूप व अंधकाररूप असे हे दोन मार्ग नित्य आहेत. पहिल्याने पुनः जन्म नाही, दुसऱ्याने पुनर्जन्म येतो.

आठव्या अध्यायात भगवंतानी भजनाचे प्रतिपादन केले आहे. ब्रह्मलोकात नेणारा आर्चिरादी मार्ग व पुनरावृत्तीचा धूम्र मार्ग असे भगवंतानी दोन मार्ग दाखवून दिले आहेत व दोन्हींपैकी देवयान मार्ग श्रेयस्कर हे तत्त्व या श्लोकात स्पष्ट केले आहे. जग हे गतिमान आहे व ही गती अनादि व शाश्वत आहे. या गतीचे शुक्ल म्हणजे शुद्ध व कृष्ण म्हणजे अशुद्ध असे दोन प्रकार आहेत. कृष्ण मार्गाने गेल्यास पुनः खाली यावे लागते, तर शुक्ल मार्गाने गेल्यास शाश्वत पदाची प्राप्ती होते.

**नैते सृती पार्थ जानन्योगी मुह्यति कश्चन ।**
**तस्मात्सर्वेषु कालेषु योगयुक्तो भवार्जुन ॥ २७ ॥**

हे पार्था, हे दोन मार्ग जाणणारा कोणताही योगी मोह पावत नाही. म्हणून अर्जुना, तू सर्वकाळी योगयुक्त हो.

मनुष्याला या जीवनात अत्यंत मोह निर्माण होतो. कर्म, उपासना व स्वैराचार हे तीन प्रकार त्याचे पुढे असतात. पैकी स्वैराचारासाठी वेगळा प्रयत्न करावा लागत नाही. तो आपोआप घडत असतो. मोह निर्माण होणे हा मनुष्यस्वभावच आहे. आपल्या जन्माचे सार्थक कसे करावे हे मात्र त्याला कळत नाही. कर्म करीत राहावे की उपासना

करावी या संभ्रमात तो असतो. त्याचा भ्रम नाहीसा करण्यासाठी भगवंतानी मागील श्लोकात दोन मार्ग दाखवून दिले; व पैकी उपासना हाच मार्ग श्रेयस्कर आहे हे पटवून दिले. या दोन्ही मार्गांचे ज्ञान झाल्यावर मानवाला मोह राहात नाही. भगवंताचे भजन करावे हे त्याला पटते. अर्जुनाने सतत भजन करावे म्हणजेच योगी व्हावे असे श्रीकृष्णानी सुचविले आहे.

**वेदेषु यज्ञेषु तपःसु चैव दानेषु यत्पुण्यफलं प्रदिष्टम् ।**
**अत्येति तत्सर्वमिदं विदित्वा योगी परं स्थानमुपैति चाद्यम् ॥२८॥**

वेदाध्ययन, यज्ञ, तपश्चर्या अथवा दान यामध्ये जे जे पुण्यकारक फळ सांगितलेले आहे, त्या सर्व फळांहून अधिक हे फळ आहे हे जाणून योगी त्यास मागे टाकून अत्यंत श्रेष्ठ अशा स्थानाप्रत जातो.

आठव्या अध्यायाचे फळ या श्लोकात सांगितले आहे. मानवाच्या उत्कर्षाची चार साधने आहेत. वेदांचा अभ्यास, यज्ञयागादी कर्मे, तप व दान ही ती चार साधने होत. वेदाध्ययन हे प्रथम साधन. ते अर्थ समजून केल्यास उत्तमच, पण अर्थ न समजता केले तरी ईश्वराने दिलेल्या वाणीचा सदुपयोग केल्याचे फळ मिळते. यज्ञयाग म्हणजे इंद्रचंद्रादी देवतांना संतुष्ट करण्यासाठी तीळ, तूप, तांदुळादी द्रव्ये अग्नीत हवन करणे. यासाठी द्रव्य व सहकाऱ्यांचे भरपूर साहाय्य असावे लागते. पण ते सर्वांना जमण्यासारखे नाही. म्हणून तपाचा मार्ग दाखविला आहे. तप म्हणजे शास्त्रीय पद्धतीने शरीराला क्लेश देणे. तारुण्यात शरीर व इंद्रिये बलवान असतात, तेव्हांच तप करता येते. वार्धक्यात करू म्हटले तर जमत नाही. म्हणून केव्हाही जमण्यासारखे साधन म्हणून दान सांगितले आहे. दान म्हणजे एखाद्या वस्तुवरचे आपले स्वामित्व सोडून दुसऱ्याचे स्वामित्व मान्य करणे. मानवासाठी दानाचा नियम पुढीलप्रमाणे सांगितला आहे.

धर्माय यशसेऽर्थाय कामाय स्वजनाय च ।
पंचधा विभजन्वित्तं इहामुत्र च मोदते ॥

सर्वस्वाचे दान प्रत्येकजण करू शकणार नाही. निदान आपल्या वित्ताचे पाच भाग करून त्यापैकी फक्त एक भाग तरी दान करा. पण मनुष्य संचय करीत राहतो व तीच संवय त्याला जडते. दान करायला त्याचा हात धजतच नाही.

ही कर्मे केल्याने जे फळ मिळते त्याहून अधिक या अध्यायाचा अर्थ समजल्याने मिळते. अनन्यभावाने भगवंताचे भजन करा हाच या अध्यायाचा संदेश आहे. असा भजनयोगी सगुण ब्रह्मप्रत जातो. ब्रह्म-लोकात त्याला ज्ञानप्राप्ती होते व ज्ञानयोग्यास परब्रह्माची सर्वश्रेष्ठ पदाची प्राप्ती होते.

इति श्रीमद् भगवद् गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे ब्रह्माक्षरनिर्देशो नाम अष्टमोऽध्यायः ॥

# अध्याय ९ वा.

श्रीभगवानुवाच–

**इदं तु ते गुह्यतमं प्रवक्ष्याम्यनसूयवे ।**
**ज्ञानं विज्ञानसहितं यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥ १ ॥**

श्रीभगवान म्हणाले, आता अत्यंत गुह्य असे हे (ब्रह्माचे) ज्ञान, अनुभवासह, असूयारहित अशा तुला सांगतो. हे जाणल्याने तू अशुभ संसारापासून मुक्त होशील.

यज्ञ, दान, तप व वेदाध्ययनापेक्षाही भजनाचे फल श्रेष्ठ आहे, हे आठव्या अध्यायाचे शेवटी भगवंतांनी विशद करून सांगितले. भगवंत म्हणतात, 'अर्जुना, तू असूयारहित, ज्ञानप्राप्तीची इच्छा करणारा, संयमी, विनयशील आहेस. म्हणून तू प्रार्थना न करता तुला मी उपासनेपेक्षाही श्रेष्ठ असलेल्या ज्ञानाबद्दल सांगतो. ज्ञानाचे महत्त्व पूर्वी दुसऱ्या अध्यायात तुला एकदा सांगितले आहे. आता प्रकृष्टपणे (प्रवक्ष्यामि) सांगतो. तू उत्तम शिष्य आहेस, म्हणून तूच हे ज्ञान ग्रहण करण्यास योग्य आहेस.

धर्मापेक्षा उपासना व उपासनेपेक्षा ज्ञान प्राप्त होणे कठीण. म्हणून त्यास गुह्यतम असे म्हटले आहे. ज्ञानाची विज्ञानासह महती सांगतो. विज्ञान म्हणजे ज्ञानाचा प्रत्यक्ष अनुभव येणे. धर्माचे व उपासनेचे फळ प्रत्यक्ष मिळत नाही. ते क्रमाने मिळते. धार्मिक कर्मामुळे उपासना व उपासनेमुळे ज्ञान होते, ज्ञानानंतर फल मिळणार. मग ज्ञानच प्राप्त झाल्यास लगेच फळ मिळणार नाही का?

मी जीव आहे. मला सुखदुःखे आहेत याचे ज्ञान प्रत्येकाला आहे. यालाच साक्षी म्हणतात. ज्ञान झाल्यास मी जीव नसून सच्चिदानंद-स्वरूपी परब्रह्म आहे, हे इथेच कळते. ज्ञानाने सर्व अशुभांचा नाश

होतो. ज्ञानी पुरुषाचा देह अस्थी, वाणी, कृती सर्व काही पवित्र बनलेले असते. त्याचे मरणसुद्धा मंगलच असते, म्हणून त्याला समाधिसोहळा म्हणतात.

अर्जुन–' दान इतके पवित्र आणि सुंदर असता प्रथमच का नाही सांगितले.'

भगवान म्हणाले, ' लक्षाधीश आपल्या पाच वर्षाच्या मुलाला वैभवाबद्दल किंवा मालमत्तेबद्दल सांगत नाही. तो वयात आल्यानंतर त्याला सर्व सविस्तर माहिती देतो. त्याचप्रमाणे भक्तांना योग्यता प्राप्त झाल्याखेरीज ज्ञानाबद्दल सांगून काय उपयोग? आता तुला योग्यता आली आहे. म्हणून हे गुह्यतम ज्ञान तुला सांगत आहे.

**राजविद्या राजगुह्यं पवित्रमिदमुत्तमम् ।**
**प्रत्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम् ॥ २ ॥**

हे ज्ञान सर्व विद्यांचा राजा, सर्व गुह्यांचा स्वामी, पवित्र, उत्कृष्ट, प्रत्यक्ष अनुभवास येणारे, धर्मास अनुसरून असलेले, अनायासे मिळविता येणारे आणि क्षयरहित आहे.

जगातील सर्व भोग्य पदार्थ व विद्या यापैकी एक घ्या असे सांगितल्यास सूज्ञ विद्याच पसंत करील. सर्व भोग्यपदार्थ पैशाने मिळतात. नुसता पैसा असेल व विद्या नसेल तर पैशाचे रक्षण करता येत नाही. इतकेच नव्हे तर पैशामुळे त्याचा प्राणही जाण्याची शक्यता असते. विद्येच्या जोरावर धन मिळविता येते. पैसा वाढला तर सरकारी कर हिरावून घेतात. विद्या वाढली तर ती कोणी हिरावून घेऊ शकत नाही. उलट विद्यासंपन्न माणसाचा सरकार गौरव करते. विद्या चोरांना पळविता येत नाही. भाऊबंद त्यात वाटणी मागू शकत नाहीत. सरकार लुबाडीत नाही. विद्येचे ओझे होत नाही. ज्ञान दुसऱ्यास दिल्यास कमी न होता वाढते. अशा विद्येमध्येही अध्यात्म-विद्या ही सर्वांत श्रेष्ठ आहे.

अध्यात्म ज्ञान म्हणजे सर्व विद्यांचा, सर्व गुह्यांचा राजा होय. सर्व विद्येमध्ये श्रेष्ठ. भजनापेक्षाही उत्तम व पवित्र आहे. गंगाजलाने मानवाची पातके नष्ट होतात. श्रेष्ठ पुरुषाच्या दर्शनाने निंद्य वासना नाहीशा होतात; शत्रूचा निःपात केल्याने होणाऱ्या हिंसेचा परिहार अश्वमेधाने होतो. शास्त्रात प्रत्येक पालकास असे प्रायश्चित्त कर्म सांगितले आहे. प्रायचित्ताने फक्त विशिष्ट पातक जाते.पण तेही समूळ जात नाही. कर्माचे मूळ जे अज्ञान ते तसेच शिल्लक राहते. पण ज्ञानाने पाप तर जातेच, शिवाय त्याचे सर्व संस्कार व मूळ जे अज्ञान तेही नाहीसे होते. म्हणून ते परमपवित्र आहे.

'प्रत्यक्षावगमम्' हा ज्ञानाचा तिसरा विशेष. अवगमचे दोन अर्थ होतात. एक प्रमाण व दुसरा फळ. तत्त्वज्ञानाने आत्म्याचे प्रत्यक्ष ज्ञान होते व आत्म्यास दुसऱ्या कोणत्याही प्रमाणाची गरज नसते. ज्ञान झाल्यावर अज्ञान जाते, हे फळ अनुभवता येते.

ज्ञान हे 'धर्म्य' आहे. म्हणजे यात सर्व धर्मांचा समावेश आहे. इतके असून ते 'कर्तुं सुसुखम्' म्हणजे सुखाने मिळविता येते. फक्त सद्गुरूचा लाभ झाला की ज्ञान सहज प्राप्त होते. काही गोष्टी प्रथम सुलभ व नंतर अवघड असतात. उदा. ध्यानाची पूर्व तयारी करणे, शांत जागा शोधणे, उत्तम आसन घालणे हे सोपे आहे. पण प्रत्यक्ष ध्यान करणे जमेलच असे नाही. याउलट स्वयंपाक करणे सोपे असते. पण आधीची जमवाजमव व तयारी करणे कठीण असते. ज्ञानाचे तसेच आहे. त्याची तयारी करणे, म्हणजे योग्यता येणे अवघड. पण प्रत्यक्ष ज्ञान सुलभ. उत्तम तयारी व उत्कृष्ट गुरु भेटला की लगेच ज्ञान होते. असे हे ज्ञान 'अव्ययम्' आहे. म्हणजे ज्ञानाने मिळणाऱ्या मोक्षाचा नाश कधीच होत नाही.

**अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्यास्य परंतप ।**
**अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि ॥ ३ ॥**

श्रद्धा न ठेवणारे पुरुष माझी प्राप्ती न होता, मृत्युरूप संसाराच्या मार्गावर परत येतात.

ज्ञान हे कर्मउपासनेपेक्षा श्रेष्ठ, सहज प्राप्त होणारे व अव्यय फल देणारे असूनही लोक त्याकडे वळतसुद्धा नाहीत. कारण लोकांची जेवढी संसारावर श्रद्धा आहे तेवढी ज्ञानावर नाही. ज्ञानावर विश्वास नसल्याने ते प्रयत्नच करीत नाहीत. प्रयत्न केल्याशिवाय ज्ञानाचा मार्ग तरी कसा सापडणार? असे लोक जन्ममृत्यूच्या फेऱ्यात पुनः पुनः अडकत असतात. पुनः पुनः पापकर्मे करतात. चुकीमुळे पाप घडते व अज्ञानामुळे चुका होतात. ज्ञान हे अज्ञानाचा नाश करून संसारातून सुटका करून देणारे आहे.

**मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना ।**
**मत्स्थानि सर्वभूतानि न चाहं तेष्ववस्थितः ॥ ४ ॥**

अव्यक्तरूपाने मी हे जग व्यापले आहे. सर्व भूते माझ्या ठिकाणी आहेत. पण मी त्यांच्या ठिकाणी नाही.

ज्ञान हे अत्यंत गूढ व सूक्ष्म आहे व ज्ञान ग्रहण करण्याची तयारी असल्यावर ज्ञान सुलभ आहे. अर्जुन सत् शिष्य असल्याने त्यास भगवान ज्ञानाचे स्वरूप सांगत आहेत, जगात सर्वत्र द्वैत असता ते नाही, अद्वैतच आहे, यावर एकदम विश्वास बसत नाही. पण अर्जुना, मी तुझ्या-पुढे मानवी रूपाने बसलो असलो, तरी अव्यक्त अशा निर्गुण रूपाने मी चराचर व्यापलेले आहे. म्हणजे प्रत्येक वस्तूला जी सत्ता आहे, जे स्फुरण आहे, ते माझे आहे. घरात शेंकडो वस्तू असतात. पण घरात मनुष्य नसेल तर त्या पदार्थांचा उपयोग काय? म्हणजे घरातील जड पदार्थांना मनुष्यामुळे सत्ता आहे. माणसाची सत्ता इंद्रियगम्य नसली तरी

ती नाकारता येत नाही. ती सत्ता कोठून आली? मानवाच्या जन्माबरोबर आली म्हणावे तर मृत्यूबरोबर नष्ट व्हायला हवी. पण ती जात नाही. म्हणजेच ती अनादी, अनंत आहे. म्हणूनच परमेश्वराची आहे. परमात्म्याच्या सत् चित् आनंद स्वरूपाने जगत् भासते, हेच माझे स्वरूप. ही सर्व चराचर भूते माझ्या ठिकाणी राहणारी आहेत. पण मी मात्र त्या भूतांमध्ये नाही; म्हणजे भूते माझ्या आधीन आहेत. पण मी त्यांच्या आधीन नाही. स्वप्नामध्ये हजारो माणसे दिसली तरी ती भासविणारा मी एकटाच आहे. सर्वत्र फक्त एक परमेश्वरच आहे, हेच अद्वैत तत्त्वज्ञान होय.

**न च मत्स्थानि भूतानि पश्य मे योगमैश्वरम् ।**
**भूतभृन्न च भूतस्थो ममात्मा भूतभावनः ॥ ५ ॥**

सर्व भूते माझ्या ठिकाणी नाहीत. वस्तुतः माझे खरे ईश्वररूप म्हणजे केवळ आनंदरूप ते तू पहा. तसेच भूतांना धारण करणारे तथापि अलिप्त असल्याने भूतांच्या ठिकाणी स्थित नसलेले आणि ज्याच्या ठिकाणी भूतांची कल्पना केली जाते; अशा प्रकारचे माझे स्वरूप आहे.

अर्जुन— भगवन्, एक काय ते सांगा. परस्पर विरोधी विधाने करून मला गोंधळात टाकू नका. भाव आणि अभाव एकाच ठिकाणी कसा असू शकेल?

भगवानः— सर्व भूते माझ्या ठिकाणी आहेत आणि नाहीतही. या दोन्ही गोष्टी एकाच वेळी खऱ्या आहेत. आकाशाला रंगरूप कांही नाही. पण आकाश निळे दिसते. सकाळी, संध्याकाळी त्याचा रंग तांबडा दिसतो. ढग आले की ते पांढरे दिसते. पण आकाशाला खरा रंग असा मुळीच नाही. म्हणजे आकाश व रंगाच्या बाबतीत जसे दोन्ही खरे; तसे भूते माझ्यामध्ये आहेत व नाहीत हेही दोन्ही खरे. अर्जुना, यालाच माझे ऐश्वर्य म्हणतात. यालाच योग म्हणजे माया

म्हणतात. सर्व जग माझ्या मायेने निर्माण होते. पण वस्तुतः तेथे कांहींच नसते. असतो केवळ भास. म्हणून जग हे मायिक आहे. असे मायिक पदार्थ अद्वैताला बाध आणीत नाहीत. सर्व भूतांना धारण करणारे तथापि भूतांच्या ठिकाणी स्थित नसलेले, जेथे केवळ भूतांची कल्पना केली जाते असे माझे स्वरूप आहे. माझा आत्मा सर्व भूतांना निर्माण करतो. त्यांचे पोषण करतो. पण भूतांचा व त्यांचा संबंध नाही. माझ्या या नित्य, शुद्ध, बुद्ध, सत्, चित्, आनंदमय स्वरूपाला समजून घेणे म्हणजेच अध्यात्म होय.

**यथाकाशस्थितो नित्यं वायुः सर्वत्रगो महान् ।**
**तथा सर्वाणि भूतानि मत्स्थानीत्युपधारय ॥ ६ ॥**

सर्वत्र संचार करणारा महान वायू आकाशाच्या ठिकाणी जसा स्थित आहे, त्याप्रमाणे सर्व भूते माझ्या ठिकाणी स्थित आहेत असे जाण.

आकाशात वायू असतो पण तो व आकाश यांचे मिश्रण होत नाही. कोठलेच भूत आकाशात मिश्रित होत नाही. म्हणून त्यास असंग म्हणतात. पाणी ऊन होते. म्हणजे आप व तेज यांचे मिश्रण होते. माती पाण्यात मिसळते. पाण्यात वायू मिसळतो. आकाश सोडून चारी भूते परस्परात मिसळतात. आकाशात इतके मेघ असतात. आज अनादि-कालापासून आकाशात पाऊस पडतो आहे, पण आकाश भिजलेले नाही. इतकी महायुद्धे झाली, इतक्या तोफांचे गोळे आकाशात उडाले, पण आकाशाचा एकही टपका उडालेला नाही. आकाशाप्रमाणे मी असंग आहे. भूताचा आणि माझा संबंध फक्त मायिक आहे.

एक दिवस माणसाला ताप येतो आणि त्याची शक्ती जाते, आणि बरा झाला की परत येते. ही शक्ती कोठे जाते? खरे म्हणावे तर जाते का? व खोटे म्हणावे तर येते कशी? अशाच पदार्थाला अनिर्वचनीय-

मिथ्या-असे म्हणतात. जग असेच खरेही नाही व खोटेही नाही, म्हणूनच ते मिथ्या आहे. हे मानवाने समजून घेतले पाहिजे. सामान्य मनुष्य ही सारी धडपड या देहासाठी करतो. पण आत्मा अकस्मात देहाचा त्याग करतो. देहाने इतके केले आहे म्हणून त्याला थोडीसुद्धा पूर्व सूचना द्यावी. पण तसे न करता तो अकस्मात निघून जातो. मग केवळ काळाच्या तोंडात टाकण्यासाठी देहाला पुष्ट करायचे काय? देह हे केवळ साधन असून त्याचे सहाय्याने परमतत्त्वाची ओळख करून घेणे, म्हणजेच जीवनाचे सार्थक करणे, हेच मानवाचे ध्येय असले पाहिजे.

**सर्वभूतानि कौन्तेय प्रकृतिं यान्ति मामिकाम् ।**
**कल्पक्षये पुनस्तानि कल्पादौ विसृजाम्यहम् ॥ ७ ॥**

**प्रकृतिं स्वामवष्टभ्य विसृजामि पुनः पुनः ।**
**भूतग्राममिमं कृत्स्नमवशं प्रकृतेर्वशात् ॥ ८ ॥**

हे कौन्तेया, या कल्पांती सर्वभूते माझ्या मायेप्रत जातात. त्यांना पुनः दुसऱ्या कल्पाच्या आरंभी मी निर्माण करतो. आपल्या प्रकृतीचे अवलंबन करून प्रकृतीला वश असलेले हे सर्व पराधीन भूतसमुदाय मी पुनः पुनः निर्माण करतो.

सर्व भूते प्रलय कालात नष्ट होतात व पुनः दुसऱ्या कल्पाच्या प्रारंभी मी त्यांना निर्माण करतो. मायेचा आश्रय करून सर्व भूते मी पुनः पुनः निर्माण करतो. कर्मामुळे ती सर्व भूते परतंत्र आहेत. खरा ब्रह्म पदार्थ एकच. पण त्यावर हे जग अज्ञानामुळे भासते.

नियोजित इमारतीचा नकाशा प्रथम आपल्या कल्पनेप्रमाणे वास्तुकला तंत्रज्ञाकडून तयार करावयाचा. तो नगरपालिकेकडून मंजूर करून घ्यावयाचा. व मग घर बांधायचे. आधी घर बांधून त्याप्रमाणे नकाशा करून त्यास मंजुरी घेता येत नाही. अंदाज पत्रकातील जमाखर्चाचे आकडेही काल्पनिक असतात. रुपयाचे शंभर पैसे ही

देखील कल्पनाच. कारण एका रुपयाच्या नोटेचे शंभर तुकडे केल्यास एका तुकड्याची किंमत एक पैसा होत नाही. नोटेची किंमत कल्पित असते. म्हणून एका देशांतील नोट दुसऱ्या देशांत चालत नाही. सोने खरे असते, म्हणून ते कोठेही चालते, स्वप्न, भ्रम, मनोरथ या सर्वांतही कल्पनेचे व्यवहार होत असतात. खरे पाहता तत्त्व एकच आहे. पण अनेकतेशिवाय व्यवहार होऊ शकत नाही. म्हणून काल्पनिक पदार्थ घ्यावे लागतात.

**न च मां तानि कर्माणि निबध्नन्ति धनंजय ।**
**उदासीनवदासीनमसक्तं तेषु कर्मसु ॥ ९ ॥**

आणि हे धनंजया, या ( उत्पत्तिसंहारात्मक ) कर्मांच्या ठिकाणी अनासक्त व उदासीनाप्रमाणे असलेल्या मला ही कर्मे बंधन करू शकत नाहीत.

अर्जुन :– भगवन्, ' तुम्ही स्वतःला असंगही म्हणता व कर्ताही म्हणता. हे दोन्ही खरे कसे होईल ?

भगवान - शुभ्र स्फटिकाशेजारी तांबडे फूल ठेवल्यास तो स्फटिक तांबडा दिसतो. स्फटिकाचा मूळचा रंग तांबडा नव्हता. किंवा प्रत्यक्ष स्फटिकासही तांबडा रंग दिलेला नाही. तरी तांबड्या पुष्पाच्या उपाधीने तो तांबडा भासतो. त्या स्फटिकाप्रमाणे मी असंग असून मायेच्या उपाधीमुळे मी कर्ता भासतो. दुधाचे दही आपोआप होत नाही. दूध तापवून त्यास विरजण लावावे लागते. म्हणजे दही बनण्यास मागे चेतन लागते. तसेच माया जग निर्माण करते; पण मागे मी असेन तेव्हाच निर्मिती होते. म्हणून नुसत्या मायेला जगत्कर्तृत्व नाही. नुसत्या शून्याला किंमत नसते. एका शून्यापुढे दहा शून्ये चढली तरी त्याची किंमत शून्यच. पण शून्यामागे आकडा घातला की त्या शून्याला किंमत येते.

आकड्यापुढील प्रत्येक शून्याची किंमत वाढत जाते. अर्जुना, माया शून्या-सारखी असून मी आकड्यासारखा आहे. ज्याप्रमाणे शून्याने आकड्याची किंमत अनंतपट वाढते, त्याप्रमाणेच मी मागे असतो, म्हणून माया अनंत प्रकारचे जग निर्माण करते.

अर्जुन— जगात असा नियम आहे की 'शुभात् संजायते शुभं । अशुभात् अशुभम्' तुम्ही निर्मिलेल्या जगतात अनेक वाईट गोष्टी आहेत. त्याचे तुम्हाला दुःख व्हायला पाहिजे. चांगल्याचे फळ म्हणून जन्म यावयास पाहिजे. त्याचप्रमाणे या जगात असंख्य लोक दुःखाने होरपळत आहेत. त्यांचे दुःख तुम्ही दूर करीत नाही. तुम्हाला दया कशी येत नाही ? म्हणून वैषम्य व निर्दयता हे दोन्ही दोष तुम्हाला लागतात.

भगवान—एखादा मध्यस्थ दोघांचे भांडण पहात असतो.. तो कोणाचीच बाजू घेत नाही. त्यामुळे त्याला विकार होत नाहीत. खटल्यातील जयापजयाचे वकिलाला सुखदुःख नसते. तो त्याबद्दल उदासीन असतो. अर्जुना, मी देखील अनासक्त व उदासीन असल्यामुळे मला कर्मे बंधनकारक होत नाहीत. लोकांनीही असेच वर्तन केले तर तेही कर्मबंधनातून मुक्त होतील.

संन्याशाला स्वप्न पडते. त्यात त्याचा विवाह होऊन त्याला बरीच मुले होतात व या प्रजेचा कसा सांभाळ करावा या चिंतेने तो व्याकूळ होतो. जागा झाल्यावर स्वप्नातील व्यवहाराबद्दल संन्यासी प्रायश्चित्त घेत नाही. कारण वस्तुतः संन्याशाने कांहीच केलेले नसते. त्याचप्रमाणे जग मायिक म्हणजे स्वप्नाप्रमाणे असल्यामुळे त्याचे कर्तृत्व मजकडे येत नाही.

**मयाध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम् ।**
**हेतुनानेन कौन्तेय जगद्विपरिवर्तते ।। १० ।।**

हे कुंतीपुत्रा, माझ्या आश्रयाने माया चराचर जगत निर्माण करते, या कारणामुळे जगाची घडामोड होते.

**अवजानन्ति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम् ।**
**परं भावमजानन्तो मम भूतमहेश्वरम् ॥ ११ ॥**

माझे स्वरूप न जाणणारे मूर्ख ( सर्व ) भूतांचा ईश्वर असलेल्या ( पण सांप्रत ) मानव देह धारण करणाऱ्या ( मला मनुष्य समजून ) माझी अवहेलना करतात.

मी वसुदेव देवकीपासून जन्मलो असलो तरी, वणवा प्राशन केला. अधासुरासारख्यांना लीलेने मारले. करंगळीवर गोवर्धन धरला. मला विषारी दूध पाजावयास आलेली पूतना स्वतःच गतप्राण झाली. या एक, एक अमानुष कर्मावरून तरी मी सामान्य मानव नसून ईश्वर आहे, असे लोकांनी जाणावयास नको होते काय? कंसासारख्या दुष्टांना मारण्यासाठी अवतार घेण्याचे मला कांहींच कारण नव्हते. अवतार न घेताही त्याच्या शरिराचा नाश काय मला करता आला नसता? समोवार नातेवाईक व वैद्यांचा गराडा पडला असता त्यांना न कळत यम त्या रुग्णाचा प्राण आकर्षण करून घेत नाही काय? यमराज कोणाला कधी दिसतात का? द्रौपदीची लज्जा राखण्याकरता गुप्त रूपाने मी तिला अनंत वस्त्रे पुरविली नाहीत का? म्हणजे गुप्तरूपाने जगाची सर्व सूत्रे मी चालवू शकतो. असे असताही मी मुद्दाम सगुण रूप घेऊन, शंख, चक्र, गदा, पद्म धारण करून व वैजयंती माळा गळ्यात घालून प्रगट होतो, ते केवळ लोकांनी ईश्वराला सगुण रूपात तरी ओळखावे येवढ्याच हेतूने. पण सामान्य लोक ते स्वरूप न ओळखता त्याला मानव समजून त्याची अवज्ञा करतात.

काही लोकांना माझ्या स्वरुपाचे अज्ञान असते, तर काही समजून उमजून माझा अनादर करतात. आणि काही लोक नुसता अनादर करून थांबत नाहीत, तर माझी निंदाही करतात. माझी अवज्ञा करणाऱ्यांचे असे हे तीन प्रकार आहेत.

**मोघाशा मोघकर्माणो मोघज्ञाना विचेतसः ।**
**राक्षसीमासुरीं चैव प्रकृतिं मोहिनीं श्रिताः ।। १२ ।।**

त्यांच्या, अवज्ञा करणाऱ्यांच्या, इच्छा निष्फळ होतात. त्यांची कर्मे निष्फळ होतात. त्यांचे ज्ञान निष्फळ होते. इतकेच नव्हे तर ते विवेक-शून्य लोक राक्षसी आणि आसुरी अशा मोहमय प्रकृतीला प्राप्त होतात.

मनुष्य पशूपेक्षा श्रेष्ठ आहे. कारण त्याचेजवळ विवेक आहे. मला न जाणणाऱ्यांचा विवेक नष्ट झालेला असतो. जन्माला आल्याबरोबर आपणास सदासर्वदा सुख असावे व दुःख केव्हाही नसावे, अशी प्रबळ इच्छा असते. पण ईश्वराची अवज्ञा केल्यामुळे ती कधीही सफल होत नाही. अनेक सुकृते केलेली असतात. पण माझी अवज्ञा केली असेल तर त्या सुकृताचे फळ मी अडवून ठेवतो. कारण मीच सर्व कर्मांचा फलदाता आहे. शिपाई जर वरिष्ठांच्या मर्जीप्रमाणे वागत नसेल, त्यांची अवज्ञा करत असेल तर वरिष्ठ त्याला बढती देत नाहीत. हे जसे व्यवहारात असते तसेच येथे आहे.

राजा दिलीप स्वर्गात गेला होता. तिकडून परत येत असता वाटेत कामधेनू होती. पण राजा दिलीपाचे दुर्लक्ष झाले. त्याने कामधेनूस नमस्कार केला नाही. त्यामुळे राजा दिलीपाची संतती खुंटली. वरिष्ठांनी ही गोष्ट जाणून राजाला नंदिनीची सेवा करावयास सांगितले. त्या सेवेने प्रसन्न होऊन नंदिनीने वर दिल्यावर रघूचा जन्म झाला. महानुभावांची अवज्ञा मग ती चुकून झाली असली तरी तो दोष ठरतो. मग सर्वज्ञ सर्व शक्तिमान ' कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम् ' अशा ईश्वराची अवज्ञा केल्यास, सुंदर कृती प्रतिबद्ध झाल्याशिवाय कशा राहतील? ते पुरुषार्थापासून भ्रष्ट होतात. महारथी कर्णाचे असेच झाले. पृथ्वीने रथचक्र गिळले होते. आणि अर्जुनाने तर बाणांचा वर्षाव सुरू केला होता. पण प्रतिकार करण्यासाठी कर्णाला एकही अस्त्र स्फुरेना. कारण त्याने ईश्वराची अवज्ञा केली होती. शेवटी कर्णाचा अंत झाला.

" संग्रहः खलु कर्तव्यः कः कालो फलदायकः " या न्यायाने शास्त्रार्थ नेहमी ऐकून मनात त्याचा संग्रह करून ठेवावा. एक ब्राह्मण मिळेल त्या वस्तूचा संग्रह करीत असे. एकदा त्याला एक मेलेला साप मिळाला. तो आणून त्याने घराच्या छपरावर ठेवला. त्याच वेळी एक घार राणीचा हार घेऊन चालली होती. तिने तो मृत सर्प पाहिला; आणि तिथे हार टाकून ती तो सर्प घेऊन गेली. ब्राह्मणाला मोठा लाभ झाला. वस्तूप्रमाणे शास्त्रार्थही संग्राहित करीत राहिले पाहिजे. पण ईश्वराची अवज्ञा करणारे शास्त्रार्थाकडे कधीच वळत नाहीत. शास्त्रार्थ सांगणे चालू असलेल्या ठिकाणी जुलमाने आणून बसविल्यास शिव्या देत निघून जातील. लोकांच्या खाजगी गोष्टी अगदी हलक्या आवाजात चालू असल्या तरी लोकांना चटकन समजतात. पण शास्त्रार्थ मात्र खुलवून, रंगवून सांगितला तरी ईश्वराची अवज्ञा करणाऱ्यांना समजत नाही.

अर्जुना, ही या जन्मातली फळे सांगितली. पुढच्या जन्मी मिळणारी फळे सांगतो ती ऐक. नुसती अवज्ञा करणारे राक्षस होतात. हे द्वेषप्रधान असल्याने त्यांचा तमोगुण कधीच नष्ट होत नाही. आपले नाक कापून दुसऱ्यास अवलक्षण करण्याची त्यांची वृत्ती असते. अनादर करणारे असुर होतात. हे भोगप्रधान असतात. त्यांचा रजोगुण देह असेपर्यंत कमी होत नाही. निंदा करणाऱ्यांची मोहिनी प्रकृती होते. म्हणजे वेडे, बालग्रहपीडित, भूतबाधा झालेले असे ते निपजतात.

जगातले सर्व लोक या तीनपैकी कोणत्या तरी प्रकारात बसणारच. मग मोक्षाचे अधिकारी तरी कोण? याचे उत्तर भगवान पुढील श्लोकात सांगतात.

**महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिताः ।**
**भजन्त्यनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम् ॥ १३ ॥**

हे पार्था, पण दैवी प्रकृतीचा आश्रय करणारे महात्मे, भूतांचे आदिकारण व क्षयरहित अशा मला जाणून अनन्य होऊन माझी भक्ती करतात.

संस्कृतमध्ये एकवचन, द्विवचन व बहुवचन अशी तीन आहेत. त्यापैकी जेव्हां बहुवचन येते तेव्हां तीन असाच अर्थ घ्यावयाचा, असा मीमांसकांचा नियम आहे. तीनपेक्षा अधिक सांगावयाचे असल्यास क्रियापदाआधी आकडा घालावयाचा असतो. या श्लोकात 'भजन्ति' हे बहुवचनी क्रियापद आहे व त्यामागे आकडा नाही. म्हणून महात्म्यांचे तीन प्रकार घ्यावयाचे.

१) 'भूतादिमव्ययम् ज्ञात्वा' श्रीकृष्ण परमात्मा आहे, तो सर्वांच्या आदि व अविनाशी आहे, असे जाणून त्याला महत्त्व देतात ते महात्मे होतात. मात्र मनाचा निश्चय पक्का हवा. असे महात्मे दुर्लभ असतात. महात्मा म्हणजे नऊ फूट उंच व गलेलठ्ठ असलेला असा अर्थ घ्यावयाचा नाही. अनेक जन्मींच्या सुकृतामुळे ज्यांचे अंतःकरण उदार व पवित्र झाले आहे, व ईश्वरानुग्रहाची पात्रता ज्यांना आली आहे ते खरे महात्मे होत.

२) 'ज्ञात्वा भजन्ति ते दुर्लभतराः': मनुष्य जन्माला आल्यापासून पशुपक्षी, बायकामुले, धनिक यापैकी कोणा ना कोणाची सेवा म्हणजे भजन करीत असतो. पण ईश्वराला जाणून त्याची सेवा करणारे दुर्लभ तर असतात.

३) अनन्यमनसा भजन्ति ते दुर्लभतमाः— जे भक्त केवळ भजन करून थांबत नाहीत. तर सतत भगवंताचे चिंतन करून अनन्य होतात, असे महात्मे फारच क्वचित सांपडतात. भगवंतांनी एकदा गोपींची परीक्षा घेण्याचे ठरविले. यमुनेला महापूर आलेला होता. परतीरावर दुर्वास होते. गोपींना त्यांची पूजा करावयाची होती. पण पलीकडे जायचे कसे असा त्यांना पेच पडला. त्यांनी कृष्णाची प्रार्थना

केली. कृष्ण त्यांना म्हणाला, " यमुनेला सांगा, कृष्ण जर आजन्म ब्रह्मचारी असेल तर मार्ग दे." सोळा हजार एकशेहे आठ स्त्रिया असलेला श्रीकृष्ण ब्रह्मचारी कसा असेल, अशी त्यांनी शंका घेतली नाही. कृष्णावर त्यांचा पूर्ण भरंवसा होता. म्हणून त्याने सांगितल्या-प्रमाणे यमुनेची प्रार्थना केली आणि यमुनेने वाट दिली. म्हणून गोपींची कृष्णभक्ती अस्सल ठरून त्या महात्म्यांच्या कोटीत आल्या.

आपले मन अत्यंत सुंदर आहे. पण त्याचेवर डाग पडलेले असतात. सुकृते केल्याने ते डाग पुसले जातात; आणि मनोमणी शुद्ध होतो. ऋषिमुनींनी घालून दिलेले नियम पाळत जा. व्रते, उपवास, पूजाअर्चा इ. करीत जा. प्रत्येक सुकृताबरोबर तुमची किंमत वाढत जाते, हे लक्षात ठेवा. अनेक सुकृतांचा संग्रह झाला की महात्मा ही पदवी प्राप्त होईल.

**सततं कीर्तयन्तो मां यतन्तश्च दृढव्रताः ।**
**नमस्यन्तश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते ॥ १४ ॥**

सदा माझे नामस्मरण करणारे, ( माझ्या प्राप्तीसाठी अष्टांग योग-मार्गाने) निश्चयपूर्वक प्रयत्न करणारे व मला भक्तिपूर्वक नमस्कार करणारे, माझ्या ठिकाणी नित्य चित्त लावणारे माझी उपासना करतात.

कांही लोकांना माझे अज्ञान असते. कांही अनादर करतात. त्याही पुढे गेलेले लोक निंदा करतात. पण जे सात्त्विक वृत्तीचे लोक असतात, त्यांना ईश्वरावतार समजतो. ईश्वर भूतादी व अव्यय आहे हेही ते जाणतात व त्याला मान देतात. हे पहिल्या प्रतीचे महात्मे. दुसरे महात्मे ईश्वरस्वरूप जाणूनच स्वस्थ न बसता त्याचे भजन करतात. शारीरिक, वाचिक व मानसिक असे तीन प्रकारचे भजन असते, पशूला वाणी असते, पण तिच्यामुळे फक्त त्याच्या मुलांनाच 'ये' 'जा" खा" पा'

वगैरे समजते, इतरांना त्याचा अभिप्राय मुळीच समजत नाही, म्हणून पशूंना भगवंताचे वाचिक भजन करता येत नाही. पशूला मन असते. पण त्याचे मन आहार कसा मिळवावा व मिळालेला कसा टिकवावा, येयढेच काम करू शकते. पशूचा देह पाहूनच त्याची खरेदी विक्री होते, त्याचे मन कोणी पहात नाही. पण मनुष्य मात्र त्रिविध भजन करू शकतो.

त्रिविध भजनापैकी मानसिक भजन सर्वोत्कृष्ट. पण त्यात दोष येवढाच की मन लवकर दमते. क्षुद्र विषयांचे चिंतन चोवीस तास केले तरी दमत नाही. पण शास्त्रार्थाचा अभ्यास, श्रवण, मनन यांनी मन लवकर दमते, त्याहीपेक्षा ध्यानाने मन लवकर दमते. ही तीन्ही भजने महात्मे भक्तीने म्हणजे प्रेमाने करतात.

अर्जुना– महात्मे काय तुमचे आप्त आहेत? का त्यांचे तुमचे रक्ताचे संबंध आहेत? मग प्रेमाने भजन करतात, असे कसे म्हणता?

भगवान:– 'ममैवांशो जीवलोके जीवभूत: सनातन:' किंवा 'पिताहमस्य जगत: माता धाता पितामह:' या वचनाप्रमाणे मी त्यांचा माता पिता असल्याने आप्त आहे. शिवाय गुण, सौन्दर्य, कला, ज्ञान, ऐश्वर्य यामुळेही प्रेम निर्माण होते. ग्रंथिभेध झालेले अत्यंत विरक्त असे शुकासारखे पुरुषश्रेष्ठही माझे भजन करतात. त्यांना निर्गुण साक्षात्कार झाला असतानाही सगुणाच्या गुणकथनात, रासक्रीडेच्या कीर्तनात ते तन्मय होऊन जातात. शुकमहर्षी म्हणतात, 'हरीचे गुणच असे मनमोहक व विलक्षण आहेत. सर्वांगसुंदर, सर्वांगरमणीय लक्ष्मीसारखी स्त्री ज्याचेवर मोहित होते. मग सामान्यांची काय कथा? शिवाय तो अनादिकाला-पासून ज्ञानी आहे. मग त्याचेवर प्रेम ठेवायला काय हरकत आहे? देवांनासुद्धा दिपविणारे, मोह पाडणारे त्याचे ऐश्वर्य आहे, या सर्व गुणांमुळे भक्तांचे प्रेम त्याच्यावर जडते व ते भक्ती करतात.'

काही गोष्टी पुनः पुनः करीत गेल्यास त्याबद्दल प्रेम निर्माण होते. विषयाबद्दल हाच नियम आहे. ' ध्यायतो विषयान् पुंसः संगस्तेषूपजायते ' असे भगवंताचे वचन आहे. एक कादंबरी वाचली की दुसरी वाचावीसी वाटते. मग तिसरी असा नाद लागतो. त्यातील उत्तान शृंगार अधिकाधिक आवडू लागतो. विद्यार्थ्यांचा अभ्यास बाजूला राहून अभ्यासाचे पुस्तकात कादंबऱ्या ठेवून ते वाचतात. परिणामी ते नापास होतात. वकिलांनी वकिली बंद केली तरी त्यांना कोर्टात जाऊन आल्याशिवाय चैन पडत नाही. एकच गोष्ट सतत करीत राहिल्यास, त्याबद्दल प्रेम वाटते. तसे माझे भजन सतत करीत राहिल्यास मजबद्दल प्रेम निर्माण होते. सामान्य लोकही मला नमस्कार करतात व भक्तही नमस्कार करतात. पण त्यात फरक असतो. सामान्य लोक जेवतात आणि राजाही जेवतो. पण दोघांचे जेवण जसे सारखे नसते, तसे भक्ताच्या व सामान्याच्या नमस्कारात फरक असतो.

**ज्ञानयज्ञेन चाप्यन्ये यजन्तो मामुपासते ।**
**एकत्वेन पृथक्त्वेन बहुधा विश्वतोमुखम् ।। १५ ।।**

तसेच दुसरे कित्येक सर्वतोमुख जो मी त्या माझे ज्ञानयज्ञाने, एकत्वाने, वेगवेगळेपणाने व निरनिराळ्या प्रकाराने यजन करून माझी उपासना करतात.

पूर्वी भगवंतानी बारा यज्ञ सांगितले. ( अध्याय ४ था ) त्या सर्वांत ज्ञान यज्ञच श्रेष्ठ आहे, असे ' श्रेयान् द्रव्यमयात् यज्ञात् ज्ञानयज्ञः परंतप ' या वचनाने सिद्ध केले.

भगवंत म्हणतात– एखाद्या राजाने चौसष्ट उपचारांनी माझे पूजन केल्यावर मला जसा आनंद होतो, तसाच एखाद्या महात्म्याने ज्ञानाने माझे पूजन केल्यांसही आनंद होतो. गंध, धूप, दीप, नैवेद्य, दक्षिणा वगैरे मला अर्पण करावे, व मग मी संतोष निर्माण करावा इतका का

मी अपूर्ण आहे ? अभिमन्यु धनुर्विद्येत प्रवीण झाला तर तुला का आनंद होतो ? त्याने राज्य मिळवून द्यावे अशी काही तुझी अपेक्षा नाही. कारण तू चक्रवर्ती राजा आहेसच. सध्याचा बाप मुलाला लट्ठ पगार मिळू दे अशी इच्छा करतो. मुलाला खूप पैसा मिळाला म्हणजे तो थोडा तरी आपणाला देईल अशी त्याची अपेक्षा असते. पण पूर्वीचे बाप ' पुत्रादिच्छेत् पराजयम् ' असे इच्छित असत. आपल्याहून अधिक पराक्रम करून मुलाने बापाच्या गळ्यात हार घातला की बाप आपले सर्वश्रेष्ठ पूजन झाले असे समजे. मी सर्व जगाचा पिता म्हणून जग हे माझे अपत्य आहे. ते जर आत्मज्ञानी झाले तर मला साहजीकच आनंद होतो.

ब्रह्मदेवाने अनंत सृष्टी, नाना तऱ्हेचे पशू, पक्षी, सरपटणारे प्राणी, जलचर, वनस्पती निर्माण केले. पण त्याला समाधान वाटेना, जेव्हा त्याचे हातून मनुष्य तयार झाला, तेव्हा तो आपल्या कलाकृतीवर खूष झाला. कारण मानवाची त्याने अशी रचना केली की हाच एक प्राणी ब्रह्मज्ञान मिळवू शकेल. म्हणून तो संतुष्ट झाला.

मला ज्ञान अत्यंत प्रिय आहे. अशा ज्ञानयज्ञाचे तीन प्रकार आहेत. १) सर्व जग व मी वासुदेव स्वरूप आहोत. २) एकच परमेश्वर इंद्र-चंद्रादि दैवताद्वारा नटला आहे. ते देव व परमेश्वर एकच आहेत. ३) जगातील यच्चयावत् वस्तू परमात्मस्वरूपच आहेत. असे समजून उपासना करणे.

अर्जुन:— मातीपासून घट निर्माण होतो म्हणून घट मातीपासून निराळा नाही. सोन्याची आंगठी सोन्याहून वेगळी नाही. त्याचप्रमाणे जीव ब्रह्मापासून झाला असल्याने ब्रह्माहून तो निराळा नाही. म्हणून पहिला प्रकार मान्य करता येतो. तसेच इंद्र पाऊस पाडून सर्वांना संतुष्ट करतो, सूर्य प्रकाश आणि उष्णता देऊन जमीन तापवितो. रोगराई नष्ट करतो, अशी या दैवतांची प्रचंड शक्ती अनुभवास येते. म्हणून त्या

देवतांची उपासना करावयास हरकत नाही. पण तिसरा ज्ञानयज्ञाचा प्रकार मला खटकतो. सामान्य लोक इतके दुबळे असतात, की जरा धक्का दिला तरी ते कोलमडून पडतात. मग त्यांच्यातही ईश्वर आहे हे कसे मानावयाचे ? ' यावर भगवान म्हणाले, ' माझे सर्वात्मकत्व सांगतो ते ऐक.

**अहं क्रतुरहं यज्ञः स्वधाहमहमौषधम् ।**
**मन्त्रोऽहमहमेवाज्यमहमग्निरहं हुतम् ॥ १६ ॥**

क्रतु, यज्ञ, स्वधा, औषधी, मंत्र, तूप, अग्नी आणि आहुती मीच आहे.

क्रतू म्हणजे श्रुतीने सांगितलेला व यज्ञ म्हणजे स्मृतीने ( वैश्वदेव वगैरे ) सांगितलेला प्रकार मीच. स्वधा म्हणजे पितरांना दिलेले अन्न मीच. श्राद्धात आई, आजी, पणजी, बाप, आजा, पणजा या त्रयींचा उल्लेख असतो. त्यांना ' वसुरुद्रादित्य स्वरुपाणां ' असे म्हटले जाते. कारण पितर त्या स्वरुपाचे बनलेले असतात. म्हणून त्यांच्याद्वारे ते अन्न पितरांना मिळते. औषधे-मंत्र मीच. विशिष्ट शक्तिसंपन्न अक्षरे म्हणजे मंत्र. मंत्राने देवता प्रत्यक्ष उपस्थित होतात. देवता या मंत्राने बांधलेल्या असतात. म्हणून माणसाप्रमाणे त्या देवतांना केव्हाही सुटी घेता येत नाही. आज्य ( तूप ) व अग्नी दोन्ही मीच. तसेच हुतम् म्हणजे हवन मीच. हे पदार्थ शास्त्रीय पद्धतीने अग्नीत टाकल्यास ते जाळणे न ठरता पेरणे ठरते. एकच फूल गजेंद्राने ' अर्चामीति धिया ' असे म्हणून व मदनाने ' विध्यामीति धिया ' असे म्हणून फेकले. फूल टाकण्यामागील बुद्धीमुळे केवढा फरक पडला पहा. गजेन्द्र उद्धरून गेला तर मदन जळून खाक झाला. यज्ञात हवन द्रव्ये टाकणाऱ्याची बुद्धी सुंदर असते. म्हणून ईश्वर संतुष्ट होतो.

**पिताहमस्य जगतो माता धाता पितामहः ।**
**वेद्यं पवित्रमोंकार ऋक्साम यजुरेव च ॥ १७ ॥**

मी या जगाचा पिता, माता, पितामह व पालनकर्ता आहे. ज्ञेय, पवित्र, ओंकार, ऋग्वेद, सामवेद, यजुर्वेद हे सर्व मीच आहे.

या जगाचा पिता म्हणजे ब्रह्मदेव तो मीच. जन्मतःच त्याला चारी वेदांचे संपूर्ण ज्ञान असते, व तो चारी मुखांनी वेद म्हणत असतो. या अचिंत्य सृष्टीची निर्मिती तो पुनःपुनः करीत असतो. अष्टधा प्रकृती जिला माया म्हणतात ती जगाची माता आहे. तीही मीच आहे. धाता म्हणजे जगाचे पोषण करणारा मीच. आणि ब्रह्मदेवाचाही जनक म्हणून पितामहही मीच. वेद्य म्हणजे जाणण्याजोगे, पवित्र म्हणजे ज्या योगाने पावित्र्य येते ते अग्नी, वायु, सूर्य, गंगा इत्यादी मीच. प्रत्येक वेदाचे प्रारंभी असणारा ॐ व ऋग्वेद, सामवेद व यजुर्वेद हे सर्व म्हणजे मीच आहे.

**गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत् ।**
**प्रभवः प्रलयः स्थानं निधानं बीजमव्ययम् ॥ १८ ॥**

कर्मफल, पोषण करणारा, जगाचा नाथ, साक्षी, निवासस्थान, शरण जाण्यास योग्य स्थान, जगाचा सुहृद्, जगाची उत्पत्ती, प्रलय, स्थिती, निधान ( राहण्याचे ठिकाण ) आणि त्याचे अविनाशी कारण हे सर्व मी आहे.

कांहीं जीव ज्ञान प्राप्त करून माझ्यात लीन होतात. बाकीचे लयकाली माझ्याकडे येतात. म्हणून त्यांची गती मीच आहे. कर्ता म्हणजे पोषक, प्रभू म्हणजे चालक, शास्त्र, साक्षी म्हणजे शुभाशुभांचा द्रष्टा, निवास म्हणजे सर्व जग माझ्यात राहते, शरणं– म्हणजे अत्यंत दुःख झाल्यावर भगवंताखेरीज इतरत्र कोठे जायचे ? तोच एक दुःख परिहार करणारा आहे. म्हणून उत्कृष्ट आश्रयस्थान. सुहृद् म्हणजे परत फेडीची अपेक्षा न बाळगता चराचरावर उपकार करणारा, निधानं

बीजमव्ययम् जगाचे मूळ बीज वासनारूप संकल्प कल्पांतानंतर जेथे सूक्ष्मरूपाने राहते ते निधान. हे सर्व मीच आहे.

**तपाम्यहमहं वर्षं निगृह्णाम्युत्सृजामि च**
**अमृतं चैव मृत्युश्च सदसच्चाहमर्जुन ॥ १९ ॥**

हे अर्जुना, सूर्याच्या रूपाने मी उष्णता देतो. पाणी शोषून घेतो व मीच पुनः पाऊस पाडतो. अमर वस्तु, मृत्यु तसेच सत्, असत् सर्व मीच आहे.

सूर्याच्या तेजाने मी आठ महिने तापतो व पृथ्वी, समुद्र, नद्या, नाले, तलाव यातील पाणी पंपाशिवाय वर ओढून घेतो आणि पावसाळ्याचे चार महिने पाऊस पाडून ते पाणी परत करतो. पावसावरच सर्वांचे जीवन अवलंबून असते. म्हणजे मानवांचे जीवन आणि देवांना आवश्यक असलेले अमृत मीच आहे. सध्या लोकसंख्या फार वाढली आहे. त्यामुळे सर्व पदार्थांची टंचाई भासत आहे. याचे एक कारण म्हणजे मृत्यूचे प्रमाण घटलेले आहे. बरे मृत्यूचे प्रमाण वाढले, तरी लोक ओरडतात. मृत्यू मीच असल्याने माझी दोह्रोकडून पंचाईत आहे. सत् म्हणजे कारण व असत् म्हणजे कार्य, सत् असत् दोन्ही मीच आहे.

**त्रैविद्या मां सोमपाः पूतपापा यज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयन्ते ।**
**ते पुण्यमासाद्य सुरेन्द्रलोकमश्नन्ति दिव्यान्दिवि देवभोगान् ॥२०॥**

तीन वेद जाणणारे, यज्ञामध्ये सोमपान करणारे (व त्यामुळे) पाप नष्ट झालेले याज्ञिक यज्ञ करून स्वर्गती मागतात. पुण्याचे फळ असा जो देवेन्द्राचा लोक, तो प्राप्त करून ते त्या स्वर्गलोकी दिव्य असे देवांचे भोग भोगतात.

वेदत्रयींचे अध्ययन करून यज्ञ करणारे याज्ञिक सोमपान करतात व स्वर्गाची इच्छा करतात. यज्ञामुळे स्वर्गप्राप्तीला प्रतिबंधक असलेली

पापे नष्ट होतात, व त्यामुळे याज्ञिक स्वर्गात जाऊन तेथील दिव्य भोग भोगतात. पण अर्जुना, स्वर्ग काही चांगला नव्हे. कारण—

**ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति ।**
**एवं त्रयीधर्ममनुप्रपन्ना गतागतं कामकामा लभन्ते ॥ २१ ॥**

तो विशाल स्वर्गलोक भोगल्यावर पुण्य क्षीण झाले की ते पुन: मर्त्यलोकी प्रवेश करतात. विषयांची इच्छा करून तीन वेदांनी सांगितलेल्या काम्य कर्माला अनुसरून कर्ममार्ग आचरण करणाऱ्यांना याप्रकारे जाणे येणे ( जन्ममृत्यु ) प्राप्त होते.

भगवान—अर्जुना, तुम्ही मागे राजसूय यज्ञ केलात, पण पुढे काय झाले? तुमच्या वाट्यास पुन: वनवासच आला ना? त्याचप्रमाणे स्वर्ग चांगला हे खरे; पण तेथे पुण्य असेपर्यन्तच राहता येते. पुण्य संपले की पुन: मृत्युलोकी येऊन जन्मसंसार व मृत्यू ही दु:खपरंपरा भोगावी लागते. त्यातून सुटका होत नाही; म्हणून स्वर्ग चांगला नाही.

**अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते ।**
**तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥ २२ ॥**

एकनिष्ठेने चिंतन करून जे माझी उपासना करतात, असा सतत माझ्या ठिकाणी युक्त असलेल्या लोकांचा योग ( अप्राप्य वस्तूची प्राप्ती ) व क्षेम ( प्राप्त वस्तूंचे रक्षण ) मी करतो.

न मिळालेल्या गोष्टी मिळाव्या व मिळालेल्यांचे रक्षण व्हावे अशी मानवाची इच्छा असते. माझ्या भक्ताच्या या दोन्ही इच्छा मी पूर्ण करतो. व्यवहारात नोकरी मिळावी म्हणून सत्यनारायण करतो. नोकरी लागली की विवाह व्हावा, मग मुलगा असावा, तो हुषार निपजावा, तो चतुर्भुज होऊन नातवंड व्हावे अशा एकापुढे एक अपेक्षा वाढत जातात.

निस्वो वष्टि शतं शती दशशतं लक्षं सहस्राधिपः ।
लक्षेशः क्षितिपालतां क्षितिपतिश्चक्रेशतां वांछति ॥
चक्रेशः पुनरिन्द्रतां सुरपतिर्ब्राह्मं पदं वांछति
ब्रह्मा शैवपदं शिवो हरिपदमाशावधिं को गतः ॥

एक मिळाले की त्याच्या पुढची आशा माणसाला लागते. त्या आशेला अंतच नाही.

धन मिळाले तरी त्याबरोबर औदार्य येईलच असे नाही. शिबी-सारखा राजा क्वचितच आढळतो. प्रत्येकाला घर, धन, बायको, जमीनजुमला असावे असे वाटत असते. लोक घरे बांधत आहेत, सरकारही बांधते, पण घरांची टंचाई काही दूर होत नाही. गरीबी हटविण्याचा सरकारचा प्रयत्न चालू आहे. पण दुर्भिक्षच वाढत आहे.

ऋणमेतत् प्रवृद्धं हि हृदयान्नापसर्पति ।
गोविन्देति चुक्रोश कृष्णा मां दूरवासिनी ॥

कृष्णा, कृष्णा म्हणून द्रौपदीने आक्रोश केल्यावर, तिचे मजवर भक्तिऋण वाढले असल्याने राजसभेत धावत जाऊन मला वस्त्रे पुरवावी लागली. जो माझ्याशिवाय दुसऱ्या कोणाकडेच आश्रयार्थ धाव घेत नाही, अशा अनन्य भक्तास तो काही मागत नाही. तरी त्याचा योगक्षेम मला चालवावा लागतो.

काही सकाम भक्त असतात. उदा. आर्त, जिज्ञासू, अर्थार्थी. अशा सकाम भक्तांनाही वरवरच्या भूमिका देतो. ज्ञानी भक्त निष्काम असतो. तो म्हणतो, 'मला सर्वस्व मिळाले आहे. मग मागायचे तरी काय? तरीही असा भक्त भजन करीत असतो. भजन करत असणे असा त्याचा स्वभावच बनून गेलेला असतो.

**येऽप्यन्यदेवता भक्ता यजन्ते श्रद्धयान्विताः ।**
**तेऽपि मामेव कौन्तेय यजन्त्यविधिपूर्वकम् ॥ २३ ॥**

जे श्रद्धावान भक्त माझ्याहून अन्यदेवतांचीही पूजा करतात ते देखील अर्जुना अज्ञानाने पण माझीच पूजा करतात.

वेद इहलोकीच्या क्रिया व त्याची फळे याबद्दल मार्गदर्शन करतो. शिवाय परलोकासाठी आवश्यक असलेली साधनेही सांगतो. विद्यासंपन्न मनुष्य मृत झाला व पुन: मानव जन्मात आला तरी त्याला पुन: श्रीगणेशापासून शिकावे लागते. गतजन्मीच्या शिक्षणाचे त्याला ज्ञानच नसते. कदाचित पूर्वजन्मीचे स्मरण होऊन मागील जन्मातील शिक्षणाबद्दल सांगू लागला, तरी त्याचे कोणी ऐकून घेणार नाही. म्हणून लौकिक साधनापेक्षा वैदिक साधने श्रेष्ठ. एकादशीनिमित्त उपवासाच्या नावावर खूप भगर खाल्ली तर अपचन झाल्याशिवाय रहात नाही. पण स्वर्गीय भोग कितीही भोगले तरी त्यापासून त्रास होत नाही. दोष इतकाच की पुण्य संपल्यावर पुन: मृत्युलोकी येऊन संसारात गुंतावे लागते. जरी चांगल्या कुळात जन्मला तरी संसारताप चुकत नाही.

अर्जुन—तुम्ही जगाचे अधिष्ठान व इतर सर्व पदार्थ तुमच्यावर कल्पित. म्हणून तुम्ही सर्वात्मक. सर्वात्मकाचे भजन करायला कांही हरकत नाही. इतर देवता तुमचेच अंश. मग अंशाच्या पूजनाने अंशी संतुष्ट का होऊ नये? कपाळाला गंध लावले तर कपाळाप्रमाणे सर्व शरीराचा सत्कार नाही का होत? मुलाच्या कौतुकाने मातेचाही सत्कार होतो. त्याचप्रमाणे इतर देवतांच्या पूजनाने तुम्ही संतुष्ट का होऊ नये? इतर देवतांना भजणाऱ्या भक्तांचाही तुम्ही योगक्षेम चालविला पाहिजे.

भगवान—भक्त, घरी येणाऱ्या मूर्तींची, भूमिपूजनाच्या वेळी गवताची, वटसावित्रीच्या वेळी वडाची पूजा करताह. भक्त त्या मूर्तींत, गवतात, वटवृक्षात परमेश्वर आहे अशी कल्पना करतात. इतर देवतांचे

भक्त उदा० इंद्राचे भक्त इंद्र ही पर्जन्याची देवता, राष्ट्राची, बलाची देवता आहे, म्हणून पूजन करतात. इंद्र हा सर्वात्मक परमेश्वराचा अंश आहे; हे ज्ञानच त्यांना नसते, म्हणून फक्त अंतवत् फल त्यांना मिळते.

विधी म्हणजे ज्ञान. एका बागवानाला एक हिरा सापडला. त्याला हिऱ्याचे ज्ञान नव्हते. त्याचेपासून रत्नपारखी तो फक्त दहा रुपयाला विकत घेतो. व दहा हजाराला विकून अमाप फायदा मिळवितो. रद्दीवाला दुर्मिळ पुस्तक सुद्धा दोन आण्याला विकतो. पण जाणकार त्यातील एखादे पुस्तक घेऊन ते वीस रुपयाला विकतो. कोर्टातील कारकून जे सांगतो तेच बॅरिस्टर सांगतो. पण कोर्ट बॅरिस्टरचे ऐकते. व्यवहारात सुद्धा ज्ञानामुळे असा फायदा होतो व महत्त्व येते. मग आत्मज्ञानाचा फायदा किती असेल व ते किती महत्त्वाचे असेल याची कल्पना करा.

**अहं हि सर्वयज्ञानां भोक्ता च प्रभुरेव च ।**
**न तु मामभिजानन्ति तत्त्वेनातश्च्यवन्ति ते ॥ २४ ॥**

कारण सर्व यज्ञांचा मीच भोक्ता आणि स्वामी आहे. लोक मला यथार्थ रूपाने जाणत नाहीत. म्हणून ते घसरतात.

यज्ञामुळे मी संतुष्ट होतो. पण लोक यज्ञाला विरोधच करतात. इतर ठिकाणी अनेक हत्या झालेल्या त्यांना चालतात. नासधूस, जाळपोळ झालेली खपते. पण यज्ञात झालेली त्यांना खपत नाही. यज्ञाने मीच संतुष्ट होतो व त्याचे फळही मीच देतो. या दोन गोष्टींचे ज्ञान असणे हाच विधी. पण हे ज्ञान इतर देवतांच्या भक्तांना नसल्यामुळे ते नित्य फळापासून च्युत होतात. माझ्या भक्तांना हे ज्ञान असते म्हणून मी माझ्या भक्तांना ज्ञान व भक्तियोग यांतील उच्च भूमिकांवर नेतो. ही अवांतर फळे देऊन शिवाय मोक्षही मिळवून देतो.

**यान्ति देवव्रता देवान्पितृन्यान्ति पितृव्रताः ।**
**भूतानि यान्ति भूतेज्या यान्ति मद्याजिनोऽपि माम् ॥२५॥**

देवतांची भक्ती करणारे देवताप्रत जातात. पितरांची भक्ती करणारे पितृत्वाप्रत जातात. भूतांचे पूजन करणारे भूतत्वाप्रत जातात, तसेच माझे पूजन करणारे मद्रूप होतात.

ज्याचे प्राणी सतत चिंतन, भजन करतो ते स्वरूप त्याला प्राप्त होते. त्याच न्यायाने जो परमेश्वराचे भजन करील, तो परमेश्वरस्वरूप बनून जाईल.

**पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति ।**
**तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः ॥ २६ ॥**

जो मला पान, फूल, फळ अथवा पाणी भक्तीने अर्पण करतो; त्या शुद्ध चित्ताच्या मनुष्याने भक्तिपूर्वक आणलेले ते पान, फूल इत्यादी मी सेवन करतो.

अर्जुना, मी निरपेक्ष असल्याने माझे भजन सुलभ आहे. इतर देवता सापेक्ष असल्याने त्यांचे पूजन कठीण असते. कांहीं देवतांना दुधात शिजविलेला चरूच लागतो. पाण्यात शिजविलेला भात त्यांना चालत नाही. गरीब माणसाला चहाला दूध मिळत नाही. तो दुधात भात कसा शिजवू शकेल? कांहीं देवतांना तर दधिचरू लागतो. तर 'पूषा' ही देवता म्हणते, 'मला सर्व पिठासारखे मऊमऊ पदार्थच हवेत.' कारण वीरभद्राने दक्षयज्ञाचे वेळी झालेल्या लढाईत तिचे सारे दात पाडले असल्याने ती कठीण पदार्थ स्वीकारू शकत नाही. अनंताच्या पूजेला विष्णुक्रांताचे फूल लागते. सध्या तर त्याचे नाव सुद्धा लोकांना माहीत नाही. एखादा मनुष्य तुमच्याकडे चहाच्या अपेक्षेने आला व तुम्ही त्याला दूध दिलेत, अगदी मसालेदार दिलेत, तरीही चहाबाज संतुष्ट होत नाही. सारांश, ज्या देवतेला जे प्रिय तेच त्या देवतांना अर्पण करावे लागते. ते सुद्धा मंत्रपूर्वक. भात देऊन वर तूप घातले नाही तर ते घेत नाहीत. दोन्ही बाजूला तूप लावावे लागते.

त्या देवता म्हणतात, वाटेल ते घ्यायला आम्ही काय बुभिक्षित थोडेच आहोत ? म्हणून अन्नशुद्धी झाल्याखेरीज ते अन्न आम्ही घेणार नाही. सध्या तांदळाचाच पत्ता नाही. मग शुद्धीसाठी तूप कोठून आणायचे ?

यज्ञद्रव्ये बाजारात जाऊन वाटेल ती व वाटेल त्या किंमतीला विकत घेतलेली चालत नाहीत, उदा. सोम खरेदी करायचा असेल तर त्याबद्दल अरुण रंगाची पिंगट डोळ्याची एक वर्षाची गायच द्यावी लागते. भात शिजविताना तो भसाभस कढ गेलेला चालत नाही. किंवा करपलेलाही मान्य नाही. तो राक्षसांचा भाग समजला जातो. यज्ञासाठी तूप, दूध, दही, तीळ, पशु, पैसे इत्यादी सामुग्री व ठराविक ऋत्विज, यजमान, यजमान-पत्नी अशी माणसे असणे आवश्यक असते. एकपत्नीव्रत पाळणारा राम असल्याकारणाने त्याला यज्ञासाठी सीतेची सुवर्णाची प्रतिमा करावी लागली. पण अर्जुना माझे पूजन किती सोपे आहे ? साधन नको, सामुग्री नको, ऋत्विज नको, की पत्नी नको. एकटा यजमान असला तरी चालते.

अर्जुन:—पण पत्र, पुष्प, फल, तोय हे चार पदार्थ तरी लागतात ना ?

भगवान—नाही. तसे असते तर मी 'पत्र-पुष्प-फल-तोयानि' असे बहुवचन वापरले असते. यापैकी कोणतेही एक असले तरी चालते. अरण्यात पाने कुठेही मिळतात. नळाकरता पैसे भरावे लागत असले तरी प्रत्यक्ष नदीत जाऊन ओंजळभर पाणी अजून फुकट मिळू शकते. ते दिल्यानेही मी संतुष्ट होतो. फक्त देणाऱ्याने प्रेमाने दिले पाहिजे. सुदाम्याने आणलेली पोह्याची टरफले खाऊन मी प्रसन्न झालो नाही का ? भक्ताने सुकलेले फूल दिले तरी मी प्रेमाने इतका भारावून जातो की, त्याचा वास घ्यायचे भानही मला रहात नाही. भक्ताने अर्पण करताच ते मी तोंडातच टाकतो. शास्त्रकार म्हणतात—

अरण्ये सन्ति पत्राणि नद्यां स्वादूदकानि च ।
सन्ति हस्तौ च पादौ च कथं नाराध्यते हरिः ॥

अरण्यात पाने आहेत. नद्यांमध्ये मधुर पाणी आहे. व तुमचे हातपाय तुमच्या जवळ असता तुम्ही हरीला का भजत नाही ? इतके सुलभ, नित्य फलदायी शिवाय योगक्षेमदायक असे माझे भजन असताना ते करण्यात मानवांना अडचण का भासावी ?

**यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् ।**
**यत्तपस्यसि कौन्तेय तत्कुरुष्व मदर्पणम् ॥ २७ ॥**

हे कौंतेया तू जे करतोस, जे भोगतोस, जे हवन करतोस, जे दान करतोस, जे तप करतोस ते सर्व मला अर्पण कर.

अर्जुना, वरील चार पदार्थ राहू देत. तुम्ही स्वतःसाठी म्हणून ज्या ज्या क्रिया करता, अन्नपानादि व्यवहार करता, किंवा प्रसंगी हवन, दान, जप, तप या शास्त्राने सांगितलेल्या क्रिया करता, त्या सर्व मला अर्पण करा. ही देखील माझे पूजन करण्याची एक उत्कृष्ट रीत आहे. याहून सुलभ उपाय कोणता हवा ?

अर्जुन— व्यवहारात असे दिसून येते की, सुलभ उपायाने मिळालेली फळे ही कमी प्रतीची असतात. मोठे फळ मिळण्यासाठी दुष्कर व महान साधने करावी लागतात. तुमचे भजन सुलभ आहे. हे कबूल, पण त्यायोगे महाफल कसे मिळेल ?

भगवान– भक्ताने सुलभ साधनाने जरी भक्ती केली तरी मी फलदाता असल्याने माझ्या ऐश्वर्याला साजेल असेच फल देतो. सकाम भक्ती केल्यास ‘ ये यथा मां प्रपद्यन्ते ’ या न्यायाने मी त्यांच्या मागणी-प्रमाणे फळ देतो. कारण सकाम कर्म करणे म्हणजे एक प्रकारचा व्यापारच म्हणून त्याचे फल तोलून मापून देतो. पण निष्काम बुद्धीने सुलभ साधने केली तरी मी महत् फल देतो.

अर्जुन :— असे कोणते अलौकिक फल देता ?

**शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्मबन्धनैः ।**
**संन्यासयोगयुक्तात्मा विमुक्तो मामुपैष्यसि ॥ २८ ॥**

असे केले असता कर्मांची जी शुभाशुभफलरूप बंधने त्यापासून तू मुक्त होशील. 'सर्वकर्मार्पणरूप संन्यास' हाच योग, याने युक्त होऊन मुक्त झालास म्हणजे तू मला प्राप्त होशील.

प्रत्येक प्राणी उठल्यापासून निद्रिस्त होईपर्यंत व जन्मापासून मरेपर्यंत कर्मे करतच असतो. 'न हि कश्चित् क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत्' या न्यायाने मानवाला कर्म केल्याशिवाय राहताच येत नाही. यापैकी कांही चांगली होतात, त्यांना पुण्यकर्मे म्हणतात व वाईट होतात त्यांना पापकर्मे. ही दोन्ही शुभ आणि अशुभ कर्मे मी नष्ट करतो.

पापकर्माबरोबर पुण्यकर्मेही भगवान नष्ट करतात. कारण पुण्यकर्मे म्हणजे तरी काय? व्यवहारातले सुखच देणारी कर्मे ना? उदाहरणार्थ नोकरीचे घ्या. एक तारखेला पगार हाती पडतो म्हणून सुख होते; हे कबूल. पण पहिल्या आठवड्यात सर्व पैसे संपून जातात व मग उधार उसनवारी किंवा रद्दी विकून दिवस काढावे लागतात. शिवाय अधिकाऱ्यांची मनधरणी. व ते बोलतील ते ऐकून घ्यायचे. जिथे बदलतील त्या ठिकाणी जावे लागते. शिक्षणासाठी बायकामुले एकीकडे, आपण एकीकडे अशी ताटातूट स्वीकारावी लागते. कोठेही लाचारी आणि पारंतत्र्य! पांडव लाक्षागृहातून सुटले, नंतर वनवास, मग द्रौपदीची प्राप्ती, दिग्विजय करून राजसूय यज्ञ केल्यानंतर द्यूतात हरून पुनः वनवास. रामाचे सुद्धा असेच चरित्र आहे. प्रथम राजमहालात, मग वनवासात, पुनः राज्य आणि सीता–त्याग. यावरून लक्षात येईल की, व्यवहारातील सर्व सुखे ही दुःख आणणारी आहेत. सुखाच्या मागे आणि पुढे दुःखच आहे.

पशुपक्षी एखादी शिकार करून पोट भरतात व मग पोटातील जिरेपर्यंत आराम करतात. मनुष्य तर स्वतःला पशूपेक्षा श्रेष्ठ समजतो.

मग त्याने काही काळ पोटासाठी काम करून बाकीच्या वेळी स्वस्थ का बसू नये? काही परमार्थ का करू नये? माणसाची पोटासाठी सतत धावपळ चालू असते. ही धावपळ थांबल्याशिवाय सुख नाही. एकदा झोप लागल्यावर शारीरिक व मानसिक दुःखे पळून जातात. जागा झाल्यावर तो म्हणतो, ' चार तास आनंदात गेले. कसलीही कटकट नव्हती! निद्रेप्रमाणे जागृतीत एक तरी सुख येवढे सलग मिळते काय? तुम्हाला अत्यंत आवडणारे पक्कान्न केले आहे. अगदी उत्तम साधले आहे. तुमची प्रकृती खणखणीत आहे. मागे कसली चिंता नाही. अशा परिस्थितीत सतत चार तास त्या पक्कान्नाचा तुम्ही आस्वाद घेऊ शकाल का? घेतलात तर सुख होईल का? म्हणून झोपेतले सुख हेच खरे सुख.

पण झोप येणे तरी आपल्या हाती कोठे आहे? सुखदुःखाची फले बंद होतात. तेवढ्या काळातच झोप येते. एऱ्हवी बिछान्यावर पडणे आपल्या हाती आहे. पण झोप आपल्या हाती नाही. माझ्या भक्ताला हे सुख जागृतीतही मिळते, म्हणून त्याची शुभ व अशुभ ही दोन्ही कर्मे व त्यांची फळे मी नष्ट करतो. त्यामुळे तो कर्मबंधातून मुक्त होतो. मला कर्मे अर्पण करणे, हाच संन्यास व या युक्तीनेच भक्त मुक्त होतो.

अर्जुन :— तुम्ही फल देता म्हणून अनुदार नाही. पण फक्त भक्तालाच मोक्ष देता, म्हणून तुमच्याकडे विषमतेचा दोष येतो.

भगवान:— नाही. विषमताही माझ्या ठिकाणी नाही, ऐक.

**समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः ।**
**ये भजन्ति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम् ॥ २९ ॥**

मी सर्व भूतांच्या ठिकाणी सम आहे. मला आपला व परका कोणी नाही. जे मला भक्तिपूर्वक भजतात, ते माझ्या ठिकाणी आहेत. आणि मी देखील त्यांच्या ठिकाणी आहे.

पशु, पक्षी, कृमी, मानव, दानव, देव वगैरे सर्व शरीरे मी निर्माण केलेली आहेत. त्या सर्वांमध्ये मी प्रवेश करून, मीच ती चालवितो. त्यावेळी हे कृमीचे म्हणून हीन; व देवाचे म्हणून उत्तम असे मी मानत नाही. मला कोणी प्रिय नाहीत व मी कोणाचा द्वेषही करीत नाही. जो अग्नीजवळ जातो त्याची थंडी दूर होते. पण जो दूर राहतो तो थंडीने कुडकुडतो. म्हणून अग्नीला विषम म्हणता येईल का? किंवा गढूळ पाण्यात दगड टाकल्यास अंगावर शिंतोंडे उडतात— पाणी म्हणते हे मी केले काय? नाही. मग दगडाने केले म्हणायचे का? तसेही नाही. डाग पडण्याचे काम दगड फेकण्याच्या क्रियेमुळे झाले. असेच म्हणावे लागते. साबणाने तोंड धुतले की स्वच्छ होते. पण साबण डोळ्यात गेले तर डोळे चुरचुरतात. हे त्या त्या वस्तूंच्या स्वभावामुळे घडून येते. तसेच माझे भजन केल्यास भक्ताच्या अंतःकरणातील दोष जाऊन ते निर्मल बनते व त्यात तात्काळ माझे प्रतिबिंब पडते. भिंतीवर प्रतिबिंब पडत नाही. कारण ती मलीन असते. आरसा स्वच्छ असल्याने त्यात प्रतिबिंब पडते. हा त्यांचा स्वभाव. भजनामुळे भक्तांना मुक्ती मिळते. म्हणून माझ्याकडे वैषम्य नाही.

**अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ।**
**साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ॥ ३० ॥**

( पूर्वी ) अत्यंत दुराचारी असला तरी तो जर अनन्यभक्त होऊन माझी भक्ती करील, तर तो साधूच मानला पाहिजे. कारण त्याचा यथार्थ व सुंदर निश्चय झाला आहे.

अर्जुन— एक दुराचारी व एक सदाचारी असे दोन भक्त असतील तर तुम्ही कृपा करताना विषमता धरता की नाही?

भगवान— मुळीच नाही. ते दोघेही मला सारखेच असतात.

अर्जुन— तर मग सदाचार कशाला करायचा ?

भगवान— अर्जुना, भलतीच समजूत करून घेऊ नकोस. वेदाच्या तीनचतुर्थांश भागात केवळ कर्मकांड म्हणजे सदाचाराचे प्रतिपादन केले आहे. सदाचाराला मी महत्त्व देत नसतो, तर इतकी प्रचंड जागा त्याने व्यापली असती का ? शिवाय मी काही भजनासाठी अवतार घेत नाही. तर धर्मसंस्थापनासाठी अवतार घेतो. धर्म म्हणजेच सदाचार. इतकेच नव्हे तर 'स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः' असेही मी ठासून सांगितले आहे. पहाटे उठल्यापासून रात्री निजेपर्यंतचे सर्व नियम सदाचारात येतात. या नियमांचे उल्लंघन ब्रह्मदेवाने केले तरी त्याला शिक्षा आहे. तो स्वतःच्या कन्येमागे लागला. हे निंद्य कर्म केल्याचे फळ त्याला मिळाले. सदाचार करणारा कोणीही असो. सर्व लोकांना तो तात्काळ प्रिय होतो. सदाचारांच्या जोरावरच हे विश्व सुरळीतपणे चालू आहे.

एखादा पुरुष सुदुराचारी असतो. म्हणजे त्याच्या पापाला श्रुतिस्मृति पुराणे कशातच प्रायश्चित्त नसते. पापे दोन प्रकारची असतात. जाणून केलेली व अजाणता केलेली. तसेच त्यांच्या दोन शक्ती असतात. एक व्यवहार-प्रतिबंधकत्व व दुसरी नरकदायकत्व. काही शास्त्रबाह्य गोष्टी केल्यास त्या व्यक्तीस पूर्वी वाळीत टाकीत असत. म्हणजे गावातील लोक त्याच्याशी संबंध ठेवत नसत. त्याने प्रायश्चित्त घेतले तरच त्याच्याशी पुनः व्यवहार करीत. लोकमान्य टिळकांनाही परधर्मीयासमवेत चहापान केल्याबद्दल प्रायश्चित्त घ्यावे लागले. न कळत झालेल्या पातकामुळे येणार व्यवहार-प्रतिबंधकत्व व नरकदायकत्व प्रायश्चित्ताने नाहीसे होते. पण ज्याने बुद्धिपूर्वक पातक केले असेल त्याच्याशी लोक व्यवहार करतील. पण त्याने प्रायश्चित्त घेतले तरी त्या पापाचे फळ नरक त्याला भोगावाच लागणार. पण असा पापीही

अनन्य होऊन माझे भजन करील तर त्याला नरक-यातना भोगाव्या लागणार नाहीत. इतकेच नव्हे तर तो साधू समजला जातो. व्यवहारात त्याला मानमान्यताही मिळते.

जगन्नाथ पंडिताने जाणून बुजून यवन तरुणीशी लग्न केले. अर्थातच लोकांनी त्याला बहिष्कृत केले, तो म्हणाला, " माझ्या या वर्तनास प्रायश्चित्त नाही, हे मला माहीत आहे; म्हणून 'मला शुद्ध करून घ्या' म्हणून मी कुणा व्यक्तीला विनंती करणार नाही. पण मी परतत्त्वालाच शरण जातो. असे म्हणून त्याने गंगा मातेचीच प्रार्थना सुरू केली.

'हे गंगे तू स्नेहार्द्र आहेस. माझ्या सर्व गती सुटल्या आहेत; तर तू पुण्यगती देणारी आहेस. मी रोगजर्जर तर तू सिद्ध वैद्य. मी तहानलेला तर तू सुधासिंधू. मी बालक तर तू माता आहेस. तू हवे ते कर. मी येथे बसून राहणार. हलणार नाही. तुझ्या प्रवाहातही उतरणार नाही. तूच येथे येऊन माझा उद्धार कर. असा निश्चय करून तो आपल्या यवन पत्नीसह गंगाकिनारी बसून राहिला. तेथे बसून गंगालहरीच्या श्लोकांची रचना सुरू केली. प्रत्येक श्लोकागणिक गंगा एकेक पायरी वरवर आली व शेवटच्या श्लोकाची रचना पूर्ण होताच गंगेने त्या दोघांना आपल्या पोटात सामावून घेतले. त्याचे हातून जाणूनबुजून पाप झाले असताही परमेश्वरावरील अनन्य भक्तीमुळेच तो उद्धरून गेला.

ज्ञानेश्वरानी 'तीन्ही बंधूच्या मुंजी करा' म्हणून ब्राह्मणांना अनेकदा विनविले. पण त्यांनी ऐकले नाही. एकदा संन्याशाच्या संततीला मान्यता दिली की उदाहरण घेऊन पुनः कोणी तसेच करील, म्हणून त्या वेळचे ब्राह्मण म्हणत, 'सामान्य लोकांसाठी 'तस्मात् शास्त्रं प्रमाणं ते' हाच न्याय लागू केला पाहिजे. पण ज्ञानेश्वरांनी अनन्य भक्तीने खुद्द भगवंतालाच आपलेसे करून टाकले. त्यांनी स्वतः पातक काहींच केले नव्हते, पण वडिलांच्या हातून घडलेल्या चुकीचेही त्यांनी परिमार्जन

केले. ती भावंडे अलौकिकच होती. बालवयातच ती साक्षात्कारसंपन्न झाली. आणि अशा योग्यतेच्या व्यक्तींच्या बाबतीत 'को विधिःको निषेधः निस्त्रैगुण्ये पथि विचरताम् ' असा न्याय असतो.

**क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छान्तिं निगच्छति ।**
**कौन्तेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति ।। ३१ ।।**

तो अल्पकाळात धर्मात्मा होतो. त्याला शाश्वत अशी शांती लाभते. हे कौन्तेया, माझा भक्त कधीही नाश पावत नाही. हे तू निश्चयपूर्वक समज.

इतकेच नव्हे तर मला शरण आलेला तात्काळ धर्मात्मा बनतो. येथे धर्मशास्त्राचा अर्थ ज्ञान असा घेतला पाहिजे. ज्ञानाची साधने करून तो मोक्ष मिळवितो. अर्जुना, भगवंताचा भक्त कधीही अधोगतीला अगर नाशाला प्राप्त होणार नाही हे मी खात्रीपूर्वक सांगत आहे, म्हणून संशय बाळगू नको.

**मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः ।**
**स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम् ।।३२।।**

कारण हे पार्था, माझा आश्रय केल्यावर स्त्रिया, वैश्य, शूद्र तसेच जे पापयोनीत जन्मले आहेत, तेही सर्व उत्कृष्ट गतीला पावतात.

पापयोनीत जन्मलेले म्हणजे गुह, सुग्रीव, जटायू, गजेन्द्र इत्यादी प्राणी, शबरीसारख्या स्त्रिया, वैश्य-शूद्र जो कोणी मला अनन्यभावे शरण येतो, त्याचा कोणताही भेदभाव न करता मी उद्धार करतो.

**किं पुनर्ब्राह्मणाः पुण्या भक्ता राजर्षयस्तथा ।**
**अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम् ।। ३३ ।।**

मग पुण्यशील ब्राह्मण, माझी भक्ती करणारे व ऋषीप्रमाणे आचरण करणारे राजे हे उत्कृष्ट गती पावतात यात नवल काय ? अनित्य व सुखहीन मर्त्यलोक प्राप्त झाला असता तू माझीच भक्ती कर.

अर्जुना, या निकृष्टांचा उद्धार होतो, तिथे ब्राह्मण व माझी भक्ती करणारे राजर्षी हे उद्धरून गेल्याशिवाय कसे राहतील? मुळातच ते पुण्यवान म्हणून जन्म घेतात, त्यांना या जगात भजनाशिवाय दुसरा कोणताच पदार्थ मिळविण्यासारखा नसतो. अर्जुना तूही राजर्षीच आहेस, म्हणून तुला भजन कर हे वेगळे सांगावयास नको. स्वर्ग व पाताळात अपार वैभव आहे, तर या मर्त्यलोकात दारिद्र्य भरलेले आहे. मागणारे बहुसंख्य आहेत. सर्वजण दुःखाने गांजलेले आहेत, शिवाय हा मर्त्यलोक अनित्य आहे. मृत्यू केव्हां झडप घालील हे सांगता येत नांही. म्हणून भजन करण्याचे लांबणीवर टाकणे योग्य नाही. 'आषाढ होऊ दे मग करू' 'चातुर्मास संपू दे मग करू' 'पेन्शन घेतल्यावर करू' किंवा 'मुलाने घराबाहेर काढल्यावर करू' अशी धर्म करण्यास टाळाटाळ करू नका. 'गृहीत इव केशेषु मृत्युना धर्ममाचरेत्' हे विसरू नका.

पण या मर्त्यलोकीचा एक विशेष म्हणजे येथेच मानव देहामुळे फक्त भजन करता येते, ज्याप्रमाणे मंत्रजप करून अग्नीवर झोपले तर अग्नी दाह करू शकत नाही; त्याप्रमाणे भजन करून या संसारसागरात राहिल्यास तेथील दुःखे बाधू शकत नाहीत. उलट मुक्ती मिळविता येते. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात,

> अगा माते न भजावया लागी । कवण बळ पा आपुला आंगी ।
> काई घरी की भोगी । निश्चिंती केली ॥
> ना तरी विद्या की वयसा । या प्राणियांसी ऐसा ।
> मज न भजता भरवसा । सुखाचा कोण ?

माझ्या भजनाशिवाय खात्रीशीर असा दुसरा सुखाचा मार्गच नाही, भजन हाच सर्वश्रेष्ठ पुरुषार्थ आहे. जमीन, पाणी व बीज यांचा संयोग झाल्यास फळ येते, पण त्यास उत्तम खताची जोड मिळाली, तर फळ अधिक आणि उत्तम येते. त्याप्रमाणे पुण्यशील सश्रद्ध मनाला भजनाची जोड मिळाल्यास ज्ञानरूपी फळाची प्राप्ती लवकर होते.

अर्जुन— प्रत्येक मानव सुख मिळविण्यासाठी जिवाचे रान करतो, मग सुखाच्या ऐवजी भक्तीला पुरुषार्थ का मानतात ?

भगवान—बैलाची धार काढण्याचा प्रयत्न केल्यास दुधाचा थेंबतरी हाती लागेल का ? तसेच मृत्युलोकातील सुखाचे आहे. येथील सुखे ही खरी सुखे नसून केवळ सुखाचा आभास आहे. दुःखच सुखाचे पांघरूण घेऊन मनुष्याला भुलवीत असते. भक्त या सुखाला भुलत नाही. म्हणून भक्ती हाच श्रेष्ठ पुरुषार्थ आहे. धर्म, अर्थ, काम हे मिळवावयाचे झाल्यास शरीर, इंद्रिये, वाणी यांना कष्ट देऊन शिवाय क्रिया कराव्या लागतात. पण माझ्या भजनाला फक्त मन असले की भागते. म्हणून भक्ती हाच खरा पुरुषार्थ आहे.

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।**
**मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायणः ॥ ३४ ॥**

माझ्या ठिकाणी मन अर्पण केलेला हो. माझा भक्त हो. माझे यजन करणारा हो. सर्वत्र मला एकाला नमस्कार कर. अशा रीतीने मत्परायण होऊन माझ्या ठिकाणी चित्त योजल्यावर तू माझ्याप्रतच येशील.

गीतेतील हा श्लोक फार महत्त्वाचा आहे. गीतेचा उपसंहार करताना भगवंतांनी (अध्याय १८ श्लोक ६५) पुनः हेच सांगितले आहे. भक्ती कशी करावी आणि भक्तीचे फळ काय ? याचा यात उलगडा केला आहे. भगवान भक्तीचा पहिला मार्ग सांगत आहेत— मन्मना भव— माझ्यावर मन ठेवणे हे सर्वात उत्तम साधन. सतत मदाकार चित्तवृत्ती करावी. चालता बोलता भगवंताचे अनुसंधान राखावे. शंख, चक्र, गदा, पद्मधारी, वैजयंतीमाला धारण केलेली आहे किरीट कुंडलांनी युक्त अशा प्रसन्नवदन मेघशामाचे चिंतन करावे, किंवा सच्चिदानंद निर्गुण परब्रह्माचे चिंतन चालू ठेवावे. अर्जुन म्हणतो, हे जमणे कठीण वाटते. अत्यंत विरक्त, निष्काम व योगीजनांना हे जमण्यासारखे आहे.

भगवान– अर्जुना हा एक योग आहे. फुटलेले भांडे ते अखंड होईपर्यंत जोडत रहायचे, त्याचप्रमाणे ध्यानसुद्धा अखंडाकार चित्तवृत्ती होईपर्यंत सतत करत रहायचे. पण ध्यान जमत नसेल तर 'मद्भक्तः भव' माझ्यावर प्रेम ठेव.

अर्जुन– तुमच्यावर प्रेम करायला हरकत नाही, पण आमचे प्रेम बायका, मुले, धन यात आधीच वाटले गेलेले आहे. त्याची वाट काय?

भगवान– त्यात माझाही समावेश कर. मनुष्य प्रथम एकटाच असतो. तेव्हा त्याचे स्वतःवरच प्रेम असते. लग्न झाल्यावर ते बायकोवर जाते; मुलगा झाल्यावर मुलावर मग नातवावर असे त्याच्या प्रेमाचे भागीदार वाढत जातात. तसाच मला एक भागीदार बनव.

अर्जुन– बायका, मुले प्रत्यक्ष दिसतात. म्हातारपणी किंवा अडी-अडचणीच्या वेळी ती उपयोगी पडण्याची शक्यता असते. म्हणून त्यांचेवर प्रेम बसते. तसे तुमचे कोठे आहे?

भगवान– स्त्रीपुत्रादी उपयोगी पडतील पण केव्हा? भविष्यकाळी, आणि उपयोगी पडतीलच असे खात्रीने सांगता येत नाही. मी सध्या तर तुझे सारथ्य करीत आहे. आणि पुढेसुद्धा मी खात्रीने उपयोगी पडणारा आहे. शिवाय स्त्रीपुत्रादी सर्व देणारे नाहीत. मी याच भक्ताला आत्म-स्वरूप सुद्धा देऊन टाकतो. विषयांवर प्रेम करणे म्हणजे गुलाबपुष्प शेणकाल्यात टाकण्यासारखे आहे व भगवंतावर प्रेम करणे म्हणजे गुलाबपुष्प चांदीच्या फुलदाणीत ठेवण्यासारखे आहे.

अर्जुनः– प्रेम सुंदर यात वाद नाही, आमच्या हृदयात त्याचा अखंड झरा वाहतो आहे. हेही खरे, पण पवित्र गंगेचे पाणी गटारात ओतले तर त्याचे पावित्र्य रहात नाही. त्याचप्रमाणे आमचे प्रेम ईश्वर सोडून विषयावरच जाते, त्याला काय करावे?

भगवानः– तुला प्रेम करता येत नसेल तर 'मद्याजी भव' गंध, फूल, धूप, दीप इत्यादी साधनांनी माझी पूजा कर.

अर्जुनः— पूजन करायला हरकत नाही. पण बाजारात हे सर्व पदार्थ वेळेवर मिळतीलच असे नाही. धूप असेल तर दीप नसतो. दीप असेल तर फुले नसतात. बाजारात जाऊन आणण्याचा कंटाळाही येतो.

भगवानः— पूजनाची आवड असेल तर कंटाळा येणार नाही. एखादी आवडती भाजी घेण्याची इच्छा झाली की, शहरांतील सर्व भाजी बाजारांना भेटून पडेल ती किंमत देऊन लोक भाजी खरेदी करतात. तसेच पूजनाची हौस असली की उपचाराची साधनेही हौसेने जमविली जातात. पण पूजा सुद्धा जमत नसेल तर 'मां नमस्कुरु' मला नमस्कार कर. हे तरी सोपे आहे की नाही? नमस्कार करणे म्हणजे परमेश्वर आपणापेक्षा श्रेष्ठ आहे एवढे मान्य करणे.

अर्जुन— नुसता नमस्कार करून भक्ती कशी निर्माण होईल?

भगवान— नमस्कार करणे ही क्रिया क्षुल्लक वाटली तरी त्यामुळे प्रत्येक वेळी सुकृत निर्माण होते. अशा सुकृतांचा संग्रह झाला की भगवंताचे पूजन करण्याची आवड निर्माण होते. पूजनाने प्रेम जडते व प्रेमामुळे तदाकार वृत्ती होते. बँकेमध्ये शिपाई म्हणून लागलेला मनुष्य हळूहळू वर चढत जाऊन बँकेचा मॅनेजर होतो. एखादी गोष्ट सतत करीत राहिले की अनुभव येत जातो. अनुभवाने कौशल्य येते व कौशल्यामुळे प्रगती होते. तसेच मनुष्य भक्तिभावाने मला नमस्कार करू लागला की मी त्याला वरवरच्या भूमिका देतो.

अर्जुनः— पण याचे फळ काय?

भगवानः— अर्जुना, या नवव्या अध्यायात प्रथम तुला अत्यंत गुह्य अशा ज्ञानाबद्दल सांगितले. भक्तीचे वैभव म्हणून 'स्त्रियो वैश्यास्तथा-शूद्राः' हेही तरून जातात, हेही सांगितले. भक्त मत्स्वरूप होतो हेच भजनाचे फल होय.

इति श्रीमद् भगवद् गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे राजविद्याराजगुह्ययोगो नाम नवमोऽध्यायः ॥

◊ ◊ ◊

# अध्याय १० वा.

नवव्या अध्यायात कथन केलेले भक्तीचे वैभव ऐकून अर्जुन स्तब्ध झाला. त्याने कांहींच प्रश्न केला नाही. तरी भजनासारखे अंतरंग साधन जमले नाही तर काय करावे अशी अर्जुनाच्या मनांत शंका होती. अर्जुनाने न विचारताही ती शंका भगवंताच्या लक्षात आली व ते आता एक बहिरंग साधन सांगत आहेत. त्याचेच नाव विभूति–योग. हे साधन समजावून घेऊन आपल्या भक्तांनी मुक्त व्हावे, असा भगवंताचा उदार हेतु आहे.

भगवान उवाचः–

**भूय एव महाबाहो शृणु मे परमं वचः ।**
**यत्तेऽहं प्रीयमाणाय वक्ष्यामि हितकाम्यया ॥ १ ॥**

भगवान म्हणाले, हे महाबाहो, माझ्या भाषणाने संतोष पावणाऱ्या तुला, तुझ्या हिताच्या इच्छेने जे मी आणखी देखील सांगत आहे ते माझे श्रेष्ठ भाषण ऐक.

अर्जुन ' महाबाहो ' म्हणजे अत्यंत पराक्रमी, प्रत्यक्ष शंकराला युद्धात प्रसन्न करणारा आहे. असे असूनही तो आपले भाषण अत्यंत आदराने जिवाचा कान करून ऐकत आहे हे पाहून भगवान प्रसन्न झाले आहेत व अर्जुनाच्या हितासाठी त्याने प्रश्न केला नसताही त्याला विभूतियोग सांगण्यास प्रवृत्त झाले आहेत.

**न मे विदुः सुरगणाः प्रभवं न महर्षयः ।**
**अहमादिर्हि देवानां महर्षीणां च सर्वशः ॥ २ ॥**

देवांना किंवा महर्षींनाही माझा प्रभाव माहीत नाही, कारण देव आणि महर्षी या सर्वांचे आदिकारण मी आहे.

आपले स्वरूप आपणच सांगू नये असा नियम आहे. ती आत्मश्लाघा ठरते. हा दोष पत्करूनही भगवंत आपले स्वरूप आपणच सांगत आहेत. कारण तसे केले नाहीं तर भगवंताचे स्वरूप कोणालाच कळणार नाही. देवांना ते समजत नाही. सर्व देव एकत्र येऊन प्रयत्न करू लागले, तरी त्यांना जमणार नाही. महर्षी हे तत्त्वार्थदर्शी असतात, पण त्यांनाही भगवंताचे स्वरूप आकळत नाही. प्रभव म्हणजे ईश्वराचा प्रभाव किंवा विभूति. परमेश्वर कोणत्या ठिकाणी कोणत्या रूपाने अवतीर्ण होतो, याचे ज्ञान देव वा महर्षींना नसते.

देव आणि महर्षी मानवापेक्षा श्रेष्ठ असले तरी ईश्वरापुढे ती बालकेच होत. महर्षींना पंच सिद्धी प्राप्त झालेल्या असतात. पण त्या त्यांना कोणी तरी द्याव्या लागतात. तसेच देवांना अपार वैभव मिळालेले असले, तरी त्याचा योग्य तो उपयोग करण्याची बुद्धी देवांना कोणीतरी द्यावी लागते. सिद्धी किंवा बुद्धी देणारा भगवंताशिवाय दुसरा कोणी नाही. चांगली बुद्धी नसेल तर सिद्धी किंवा वैभवाचा दुरुपयोग होतो. ईश्वर केवळ संकल्पाने ही सर्व सृष्टी उत्पन्न करतो आणि तिचा नाशही करू शकतो. अचेतन निर्माण करून त्यात चेतन मिसळून त्यांचे नियमन करण्याचे काम परमेश्वर करीत असतो. देव काय किंवा महर्षी काय ही परमेश्वराच्या हातची बाहुली आहेत. त्यांना ईश्वराचे सामर्थ्य कसे समजावे ?

अश्वत्थामा जन्मल्याबरोबर घोड्यासारखा किंकाळला. म्हणजे त्याच्या अंगात भयंकर शक्ती होती. त्याने श्रीकृष्णाला आपले ब्रह्मास्त्र घेऊन सुदर्शन देण्याची विनंती केली. श्रीकृष्ण म्हणाले, “ मला बदली काही नको. तू सुदर्शन तसेच घेऊन जा.” अश्वत्थामा सुदर्शन उचलू लागला. पण भगवंतानी ते उचलले जाऊ नये अशी इच्छा केली असल्याने अश्वत्थाम्याचे सर्व प्रयत्न वाया गेले. शेवटी भगवंताची इच्छा हीच सर्व श्रेष्ठ आहे.

**यो मामजमनादिं च वेत्ति लोकमहेश्वरम् ।**
**असंमूढः स मर्त्येषु सर्वपापैः प्रमुच्यते ॥ ३ ॥**

जो मला जन्मरहित, अनादि व लोकमहेश्वर असे जाणतो, तो मानवामध्ये ज्ञानी आहे व तो सर्व पापांपासून मुक्त होतो.

परमेश्वराचे स्वरूप समजले तर मानवाला कोणता लाभ होतो? ईश्वराशिवाय इतर पदार्थांनी आपणास सुख लागेल असे मानवाला वाटत असते. यालाच मोह म्हणतात. ईश्वराचे खरेखुरे ज्ञान झाले की ईश्वरच सुखाचा एकमेव ठेवा आहे अशी त्याची खात्री होऊन तो मानव ईश्वर-प्राप्तीसाठी कसून प्रयत्न करतो. यालाच असंमोह म्हणतात. ईश्वरप्राप्तीने मानवाची सर्व पापे नष्ट होतात. हा केवढा लाभ आहे?

**बुद्धिर्ज्ञानमसंमोहः क्षमा सत्यं दमः शमः ।**
**सुखं दुःखं भवोऽभावो भय चाभयमेव च ॥ ४ ॥**
**अहिंसा समता तुष्टिस्तपो दानं यशोऽयशः ।**
**भवन्ति भावा भूतानां मत्त एव पृथग्विधाः ॥ ५ ॥**

बुद्धी, ज्ञान, असंमोह, क्षमा, सत्य, दम, शम, सुख, दुःख, होणे न होणे, भय व अभय, अहिंसा, समता, तुष्टी, तप, दान, यश, अपयश, इत्यादी भूतांचे निरनिराळ्या प्रकारचे भाव माझ्यापासूनच उत्पन्न होतात.

प्रत्येकाला बुद्धी असते म्हणून काही प्रत्येकाला बुद्धिमान म्हणत नाहीत. अंतःकरणाचे विवेचन करण्याचे सामर्थ्य ज्याला असेल, तोच खरा बुद्धिमान व ज्ञानी होय. प्रश्न विचारल्याबरोबर मन व्याकुळ न होता गडबडून न जाता समर्पक उत्तर देता येणे, हे असंमोहाचे लक्षण आहे. दुसऱ्याने चुका केल्या असल्या व त्याला शासन करण्याचे सामर्थ्य अंगी असले तरी गप्प बसणे, सहन करणे याला क्षमा म्हणतात. हे फार कठीण काम आहे. राग आला व शारीरिक सामर्थ्य नसले तर निदान कठोर वाग्बाण सोडल्याशिवाय तरी मनुष्य रहात नाही. स्वतःला धोका

नसताना किंवा तोटा होणार नाही याची खात्री असेल तर खरे बोलणे सोपे आहे. पण स्वार्थावर प्रचंड घाला पडत असला तरी सत्यच बोलायचे, हे महत्कठीण काम आहे. धर्मराजासारखा एखादाच असा सत्य-वचनी असतो. उभ्या आयुष्यात तो एकदाच ' नरो वा कुंजरो वा ' असे असत्य बोलला. तेही श्रीकृष्णाने सांगितले म्हणून. पण तेवढ्या अपराधा-मुळे त्याचा दोन बोटे अधांतरी जाणारा रथ पृथ्वीवरून धावू लागला. मग सतत खोटे बोलणाऱ्या सामान्य मानवाची किती अधोगती होत असेल याची कल्पनाच केलेली बरी.

बाह्येन्द्रियांचा निग्रह म्हणजे दम व मनाचा निग्रह करणे यास शम म्हणतात. भव म्हणजे उत्पत्ती व अभाव म्हणजे नाश, तसेच सुख, दुःख, यश, अपकीर्ती, अहिंसा—दुसऱ्याला पीडा न देणे, समता—कोणाबद्दलही मनात राग अथवा द्वेष न बाळगणे, तुष्टी म्हणजे यदृच्छा—लाभ, संतोषवृत्ती. कोणत्याही परिस्थितीत आनंदी असणे. तप-शास्त्रीय पद्धतीने शरीराला क्लेश देणे, दान म्हणजे आपली वस्तु त्यावरील स्वामित्व सोडून ती दुसऱ्यास देणे, तसेच यश व अपयश म्हणजे कीर्ती व अपकीर्ती; हे सर्व गुण ईश्वरापासून मानवाला मिळतात. मानवाला वाटते की, स्वतःच्या प्रयत्नाचे जोरावर आपण वाटेल ते मिळवू शकू. पण भगवंताचे अधिष्ठान नसेल तर मानवाचे प्रयत्न व्यर्थ होतात. बटण खाली केल्याबरोबर दिवा लागतो हे खरे, पण विद्युत्गृहातून वीजप्रवाहच बंद केला असेल तर सतरा वेळा बटण वर खाली केले तरी काही उपयोग होत नाही. परमेश्वरी कृपेचा प्रवाह चालू असेल तरच प्रयत्न सफल होतात.

**महर्षयः सप्त पूर्वे चत्वारो मनवस्तथा ।**
**मद्भावा मानसा जाता येषां लोक इमाः प्रजाः ॥ ६ ॥**

( कश्यपादि ) प्राचीन सात महर्षी तसेच सनकादि चार व मनु हे माझे भाव माझ्या मनापासून उत्पन्न झाले, ही सर्व प्रजा यांची सृष्टी आहे.

मरीची, अत्री, अंगिरस, पुलस्त्य, पुलह, क्रतु व वसिष्ठ हे सात ऋषी. या प्रत्येकाचे सामर्थ्य इतके प्रचंड आहे की त्यांच्या शब्दाबाहेर राजेच काय पण देवसुद्धा जाऊ शकत नाहीत. सनक, सनंदन, सनातन व सनत्सुजात हे चौघे वयाने लहान पण ज्ञानवृद्ध, आणि स्वायंभुव प्रभृती चौदा मनू हे ईश्वराच्या मनापासून निर्माण झाले. म्हणूनच त्यांना ईश्वराप्रमाणे ज्ञान-ऐश्वर्य-बल-वीर्य-तेज लाभलेले होते. मनूपासून सर्व प्रजा निर्माण झाली म्हणून आपणास मानव म्हणतात.

**एतां विभूतिं योगं च मम यो वेत्ति तत्त्वतः ।**
**सोऽविकम्पेन योगेन युज्यते नात्र संशयः ॥ ७ ॥**

हा माझा विस्तार व योग म्हणजे ऐश्वर्य जो पूर्णपणे जाणतो, तो अखंड अशा महा ( अभेद ) योगाने युक्त होतो याविषयी संशय नाही.

एखाद्याचे सामर्थ्य जाणून काय फायदा? आज आपले सरकार रोज पन्नास कोटी खर्च करते इतके ते श्रीमंत आहे, पण हे समजले तरी सामान्य माणसास त्यामुळे काय मूठभर तांदूळ मिळतात असे नाही. पण विनाशी सरकार व अविनाशी परमेश्वर यांची तुलना करणेच योग्य नाही. जो परमेश्वराच्या सामर्थ्याचे ज्ञान करून घेतो, त्याला परमेश्वर अविकंपयोग म्हणजे ज्ञानयोग देतो, याबद्दल संशय बाळगण्याचे कारण नाही. ईश्वरी कृपेमुळेच भक्तांना विभूतियोगाचे ज्ञान होते.

**अहं सर्वस्य प्रभवो मत्तः सर्वं प्रवर्तते ।**
**इति मत्वा भजन्ते मां बुधा भावसमन्विताः ॥ ८ ॥**

मी सर्वांचे आदिकारण आहे, माझ्यापासून सर्व विश्वाची उत्पत्ती होते, असे जाणून व प्रेमाने युक्त होऊन ज्ञानी माझी भक्ती करतात.

भक्तियोगाचा पुरस्कार करणारे म्हणतात की, कर्माचा व ज्ञानाचा अधिकार सर्वांना नाही, पण भक्तीचा अधिकार मात्र सर्वांना आहे. म्हणून सर्वांहून भक्तियोग श्रेष्ठ. पण या श्लोकाचा अर्थ नीट लक्षात

घेतल्यास भक्तीचा अधिकारही सर्वांना नाही. तो फक्त ' बुधां ' ना आहे असे स्पष्ट होते. श्रीमद् शंकराचार्यांच्या मते बुध म्हणजे, ' बुधाः नाम अवगतसंसारतत्त्वाः ' ज्यांना संसाराचे तत्त्व समजले आहे तेच बुध होत. संसाराचे रहस्य तरी कोणते? मनासारखे काहीही न होणे व सर्वत्र पराभव होणे हेच ते रहस्य. अगदी आपल्या मनासारखे कधीच घडत नाही याचा अनुभव आपणास पदोपदी येतो.

एखाद्याचा जीवनात पराभव झाला नसेल, पण मृत्यूनंतर तरी त्याला पराभव पत्करावा लागतो. आज शहरात रहायला जागा मिळणे ही फार कठीण गोष्ट झाली आहे. पण कित्येकांना वडिलार्जित घर वा बंगला मिळतो. अशा भाग्यवान लोकांनी आपल्या वडिलांचे वास्तविक अनंत उपकार मानावयास हवेत. पण मुले वडिलांचे स्मरण म्हणून वर्षातून एकदा श्राद्ध देखील करीत नाहीत. हा वडिलांचा पराभवच म्हटला पाहिजे. पोटाला चिमटा घेऊन मुलांना शिकवावे व मुलांनी आईवडिलांची विचारपूसही करू नये अशी अनेक उदाहरणे आढळतात. क्वचित एखाद्या मातापित्यांचा मान राखला जातो. ते वृद्धांच्या ईश-भजनाचे फळ मानावे लागते. त्यामुळे मुले नम्र होतात व आदर करतात. संसारातील अपमान व पराभव चुकविण्यासाठी शहाणी माणसे ईश्वराचे भजन करतात.

**मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयन्तः परस्परम् ।**
**कथयन्तश्च मां नित्यं तुष्यन्ति च रमन्ति च ॥ ९ ॥**

माझ्या ठिकाणी ज्यांचे चित्त व माझ्या ठिकाणी ज्यांचे प्राण आहेत असे ( ते ज्ञानी ) परस्परांना माझे ज्ञान देत आणि नित्य माझ्या गुणांचे वर्णन करीत समाधान पावतात व आनंदात मग्न होतात.

जे भगवन्ताला मन व प्राण म्हणजे सर्वस्व अर्पण करून भक्ती करतात त्यांना प्रेमी भक्त म्हणतात. नारदासारखे भक्त हे या प्रकारात

येतात. त्यांच्या दोन अवस्था असतात. ध्यानमग्न असणे ही एक अवस्था व ध्यानस्थ नसणे ही दुसरी अवस्था. दुसऱ्या अवस्थेत ते समान दर्जाच्या भक्तांशी ईश्वरासंबंधी विचारांची, अनुभवांची देवाण घेवाण करतात व कमी दर्जाचे लोक भेटल्यास त्यांना ते ईश्वराच्या कथा सांगून त्यांना आनंद देतात व आपणही आनंदी होतात.

पूज्य वासुदेवानंद सरस्वतींनी सर्व भारताची यात्रा केली. ते म्हणत,ज्ञान विचारणारा एकही भक्त भेटत नाही. ' नोकरी केव्हा लागेल, लग्न केव्हा होईल, मुलगा होण्यासाठी काय करावे अशा कामना बाळगणारेच सर्व भेटत. ' अशा लोकांना ते, ' नित्य संध्या करा, पूजा करा, वैश्वदेव करा ' असा उपदेश करीत. त्यांच्या उपदेशाप्रमाणे साधने करणाऱ्यांचे मनोरथ पूर्ण होत व ते लोक श्रद्धायुक्त होऊन धार्मिक रीतीरिवाज नियमाने पाळीत. ईश्वराला सर्वस्व अर्पण केलेले महात्मे अशा रीतीने ध्यानमग्न राहून स्वतःचा काळ सार्थकी लावतात व इतर वेळी लोकांना सन्मार्गाला लावण्याचे पुण्य कर्म करतात.

**तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् ।**
**ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते ॥ १० ॥**

याप्रमाणे माझ्या ठिकाणी सतत युक्त असलेल्या व प्रीतिपूर्वक माझी भक्ती करणाऱ्यांना मी अशी बुद्धी देतो की, जिच्या योगे ते माझ्या स्वरूपास प्राप्त होतील.

जे सकाम भक्ती करतात त्यांना आपले मन बलात्काराने का होईना ईश्वराकडे लावावे लागते. पण इच्छापूर्ती झाली की त्यांचे मन ईश्वराला सोडून दुसरीकडे जाते. कामापुरता मामा या म्हणीप्रमाणे त्यांचे वागणे असते. पण निष्काम भक्त सतत ईश्वर चिंतनात मग्न असतात, त्यांचे ईश्वरावर अत्यंत प्रेम असते. त्यांना भजनाची इतकी सवय जडलेली असते की, इतर व्यवहार करीत असताही त्यांचे भजन चालूच असते.

त्यांत कधीच खंड पडत नाही. अशा भक्तांना ईश्वर ज्ञानयोग देतो. वास्तविक निष्काम भक्तांची काहीच मागणी नसते. निष्काम भक्त ज्ञानयोगाला केलेल्या भक्तीचे फळ म्हणायलाही तयार नसतात. लहान मुलगा विद्या शिकवा अशी मागणी करीत नाही. उलट त्याला काही शिकवायला लागले तर तो कुरकुर करतो. तरी सुद्धा त्याचे वडील त्याला गोडी गुलाबीने वा प्रसंगी धाक दाखवून शिक्षण देतात. कारण, मुलाचे हित कशात आहे हे त्या बालकाला कळत नाही. पण वडील जाणत असतात. निष्काम भक्तांच्या हितासाठी ईश्वर त्यांना बुद्धियोग देतो व ज्ञान झाल्यामुळे त्यांना मोक्ष प्राप्त होतो.

भक्तीच्या साधनानंतर भक्त पुन: दु:खात पडू नये म्हणून ईश्वर भक्ताची इच्छा नसली तरी त्याला ज्ञानाचा अखंड आनंद देतो. व्यवहारात ‘उपजे ते नाशे’ असा नियम आहे. भक्ती झाली तरी तीही निर्माण झालेली एक मानसिक क्रिया. ती केव्हा तरी बंद पडणारच. त्यावेळी त्याच्या आनंदात खंड पडू नये, म्हणून ईश्वर त्याला ज्ञान देतो. कारण ज्ञानाचा आनंद केव्हाही नाहीसा होत नाही. जोपर्यंत ज्ञान होत नाही तोपर्यंत भक्त कोणत्याही पायरीवर असला तरी मी वेगळा व भगवंत वेगळा असे द्वैत त्याच्या मनात असते. भक्ताचे व भगवंताचे तादात्म्य व्हावे लागते. ‘ज्ञानी त्वात्मैव मतम्’ या उक्तीप्रमाणे ज्ञानाशिवाय तादात्म्य दुसऱ्या कशानेही होत नाही. म्हणूनच ईश्वर भक्तांना ज्ञान देतो. रवा, तूप, साखर या वस्तूपासून मधुर लाडू बनतो. पण नुसत्या त्यांच्या मिश्रणाने काम भागत नाही. पाकक्रिया करून त्यांचे तादात्म्य झाल्यावरच मधुर पदार्थाचा लाभ घडतो. भक्त, भक्ती व भगवंत यांचे तादात्म्य झाले की ज्ञानानंदाचा लाभ घडतो. ज्ञानप्राप्तीनंतर आणखी कशाची अपेक्षाच शिल्लक रहात नाही.

**तेषामेवानुकम्पार्थमहमज्ञानजं तमः ।**
**नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता ॥ ११ ॥**

मी केवळ त्यांच्यावर अनुग्रह करण्याकरिता, त्यांच्या अंतःकरणात राहून प्रकाशमान अशा ज्ञानरूपी दिव्याने अज्ञानापासून उत्पन्न झालेल्या ( त्यांच्या ) मोहरूपी अंधकाराचा नाश करतो.

ज्ञानाचा आनंद भक्तांना होतो. इतरांना तो मिळत नाही. ईश्वर हे सर्व जगचक्र चालवीत असतो. या कार्यात भक्तजन धर्माने वागून ईश्वरास साहाय्य करीत असतात. साहजीकच ईश्वर त्यांचेवर प्रसन्न होतो व त्यांना ज्ञानानंद देतो. जे अधर्माने वागून धर्मकार्यात अडथळे निर्माण करतात, त्यांना ईश्वर शासन करतो. कृत ( सत्य ) युगात धर्म चार पायावर उभा होता. सर्वजण धर्मानुसार वागत होते. अपराध घडत नसल्याने शासन करण्याचीही आवश्यकता नव्हती. म्हणून त्यावेळी राजा नव्हता. पण लोक तेव्हा अधर्माने वागू लागले तेव्हा शिक्षा करणारी राजसत्ता निर्माण झाली.

प्रथम भगवंतानी ' ददामि ' म्हणजे मी देतो असा शब्दप्रयोग केला, पण आपणच दिलेल्या गोष्टीचा उल्लेख करणे योग्य नव्हे हे लक्षात घेऊन या श्लोकात अधिक खुलासा करतात की, ईश्वर भक्ताच्या हृदयात आत्माकार वृत्ती निर्माण करतो. त्यामुळे भक्ताच्या अंतःकरणातील अज्ञानाचा पडदा दूर होऊन तेथे सदैव असणाऱ्या आत्मानंदाचा लाभ घडतो. परमेश्वर भक्ताजवळ असलेलीच गोष्ट ज्ञानदीपाच्या प्रकाशात त्याला दाखवून देतो.

ईश्वराने भक्ताला ज्ञानाच्या ऐवजी ऐश्वर्य दिले तर तो सुदाम्या-सारखा भ्रमात पडण्याची शक्यता असते. सुदामा द्वारकेला सत्कार घेऊन सुदामपुरीत परतला, पण तेथील ऐश्वर्य पाहून आपण चुकून पुनः द्वारकेसच आलो की काय असा त्याला भ्रम झाला. ऐश्वर्यामुळे रूप, भाषा, स्वभाव सर्व काही बदलते. सुदामा आपल्या बायकोलाहि ओळखू शकेना. बायकोनेच सुदाम्यास हाक मारल्यावर त्याचा संशय फिटला.

ज्ञानदेवाबरोबर पंढरी सोडून तीर्थयात्रेस जाण्यास नामदेव तयार नव्हता. आपल्या अनुपस्थितीत दुसरा कोणीतरी विठोबाशी जवळीक साधेल असा त्याला संशय होता. तसेच देव फक्त पंढरीतच आहे ही त्याची भावना होती. ज्ञानदेवांच्या संगतीत राहिल्यावर नामदेवाची असंभावना व विपरीत भावना नाहीशी झाली.

गळयातच असलेला रत्नहार हरवला आहे अशी एका राजाची भावना झाली. तेव्हा एका सिद्ध पुरुषाने त्याचे पुढे मोठा आरसा धरून फक्त त्यात पहावयास सांगितले. हार आपल्या गळयातच आहे असे पाहिल्यावर राजाला अत्यानंद झाला. ही जशी प्राप्ताची प्राप्ती आहे तसेच ब्रह्मानंदाचे आहे. तो प्रत्येकाजवळ असतोच. फक्त कोणी तरी ज्ञानरूपी आरसा पुढे धरावा लागतो. भक्तासाठी ईश्वर ते कार्य करतो.

अर्जुन उवाच—

**परं ब्रह्म परं धाम पवित्रं परमं भवान् ।**
**पुरुषं शाश्वतं दिव्यमादिदेवमजं विभुम् ॥ १२ ॥**

अर्जुन म्हणाला:— तू परब्रह्म, महाभूतांचे श्रेष्ठ विश्रांतिस्थान व अत्यंत पवित्र आहेस. अनादिसिद्ध (प्रकृतीपलीकडील) दिव्य पुरुष, सर्व देवांचा देव, जन्मरहित व सर्वव्यापी आहेस असे तुला म्हणतात.

ज्याचे ज्ञान झाले असता शरीर, वाणी व मन पवित्र होते, इतकेच नव्हे तर सर्व तीर्थे जेथ वस्तीला येतात असे हे परब्रह्म आहे. ‘पुरि शेते इति पुरुषः’ आत्मा नवद्वारे असलेल्या शरीररूपी नगरात पुरीमध्ये वास करणारा आहे. म्हणून त्याला पुरुष म्हणतात. तो शाश्वत म्हणजे कधीही नष्ट होत नाही. परमेश्वर दिव्य अशा स्वमहिम्यात राहतो. कितीही मोठा पुरुष असला तरी तो पृथ्वीच्या आधारावाचून राहू शकत नाही. पृथ्वी जळाच्या आधाराने राहते, तर जलाला तेजाचा आधार असतो. तेजाला वायूचा, वायूला आकाशाचा, आकाशाला अव्यक्ताचा

व अव्यक्ताला परमेश्वराचा आधार लागतो. पण परमात्म्याला कोण आधार देणार? त्याला आधार देऊ शकणारे कोणी नसल्याने तो स्वतःच्या महिम्यातच राहतो. असा हा परमात्मा देवांचा देव म्हणून आदिदेव, अज म्हणजे जन्मरहित व विभु म्हणजे व्यापक आहे.

**आहुस्त्वामृषयः सर्वे देवर्षिर्नारदस्तथा ।**
**असितो देवलो व्यासः स्वयं चैव ब्रवीषि मे ॥ १३ ॥**

(वरीलप्रमाणेच) सर्व ऋषी, देवर्षि नारद, तसेच असित, देवल व व्यास म्हणतात व तू स्वतःही असेच सांगतोस.

**सर्वमेतदृतं मन्ये यन्मां वदसि केशव ।**
**न हि ते भगवन्व्यक्तिं विदुर्देवा न दानवाः ॥१४॥**

हे केशवा, हे तू जे मला सांगतोस ते सर्व मी सत्य मानतो. हे भगवन् देव अथवा दानव (यापैकी कोणीही) तुझे स्वरूप जाणत नाही.

**स्वयमेवात्मनात्मानं वेत्थ त्वं पुरुषोत्तम ।**
**भूतभावन भूतेश देवदेव जगत्पते ॥१५॥**

हे पुरुषोत्तमा, भूतभावना, भूतनाथा, देवाधिदेवा, जगन्नायका तू स्वतःच स्वतःला यथार्थ स्वरूपाने जाणतोस.

राजा कोठेही जात नाही, पण आपल्या राष्ट्रांतील सर्व व्यवहार आपल्या दूताकडून कळतात म्हणून त्याला चारचक्षू म्हणतात. भगवंत सर्वव्यापक असल्याने त्याला कुणाच्याही मदतीशिवाय जगांतील सर्व घडामोडींची माहिती समजते.

**वक्तुमर्हस्यशेषेण दिव्या ह्यात्मविभूतयः ।**
**याभिर्विभूतिभिर्लोकानिमांस्त्वं व्याप्य तिष्ठसि ॥१६॥**

म्हणून ज्या विभूतींनी या सर्व लोकांना व्यापून तू आहेस, अशा आपल्या दिव्य विभूती पूर्णत्वाने सांगण्यास तूच योग्य आहेस.

**कथं विद्यामहं योगिंस्त्वां सदा परिचिन्तयन् ।**
**केषु केषु च भावेषु चिन्त्योऽसि भगवन्मया ॥१७॥**

हे योगिन् सर्वथा तुझे चिंतन करण्याची इच्छा करणारा जो मी, त्या मी तुला कसे जाणावे ? हे भगवन् कोणकोणत्या विभूतीमध्ये मी तुझे चिंतन करणे शक्य आहे ?

**विस्तरेणात्मनो योगं विभूतिं च जनार्दन ।**
**भूयः कथय तृप्तिर्हि श्रृण्वतो नास्ति मेऽमृतम् ॥१८॥**

जनार्दना, आपला योग आणि विस्तार ( विभूति ) पुनः विस्ताराने मला कथन कर. कारण एकदा ऐकूनही तुझे हे अमृतमय भाषण ऐकण्याची माझी तृप्ती होत नाही.

आतापर्यन्त अर्जुनाला भगवंताच्या विभूतीबद्दल अधून मधून माहिती मिळाली होती. व्यास नारदाकडूनही त्याने ऐकले होते. पण परमेश्वराचे वर्णन, त्याचा विस्तार किती आहे ह्या गोष्टी तोच एक सांगू शकेल. तोच एक पुरुषोत्तम आहे. भूतभावन म्हणजे भूते निर्माण करणारा आहे. ईश्वर हा भूतेश म्हणजे केवळ भूते निर्माण करणाराच नव्हे, तर त्यांचे रक्षण करणारा व नियामकही आहे. आदित्य, रुद्र, वसू, प्रजापती या देवापेक्षाही श्रेष्ठ म्हणून तो देवाधिदेव व जगत्पती आहे. परमेश्वरासारखे सामर्थ्य आणखी कोणातही नाही, म्हणून त्याने ज्या ज्या विभूतींनी हे जगत् व्यापले आहे, त्याचे वर्णन करण्यास तोच एक समर्थ आहे.

आपल्या विभूतीबद्दल भगवंतानी सातव्या अध्यायात ' रसोऽहमप्सु कौन्तेय ', नवव्या श्लोकात ' अहं क्रतुरहं यज्ञः ' व याच अध्यायात ' महर्षयः सप्त पूर्वे ' इत्यादी श्लोकांत वर्णन केले आहे. पण तेवढ्याने अर्जुनाचे समाधान झालेले नाही. ईश्वराचे रूप, गुण, तेज, शक्ती सारे काही विलक्षण आहे, तो सर्वत्र आहे हे खरे. पण त्याच्या सर्व विभूतींचे

ज्ञान झाल्यास त्याचे विविध रूपाने चिंतन करता येईल, म्हणून आपल्या विभूतीबद्दल विस्ताराने वर्णन करण्याची विनंती अर्जुनाने केलेली आहे. मानव हा नेहमी नावीन्याचा भोक्ता असतो. श्रावणात शंकराचे; भाद्रपदात गणपतीचे तर आश्विनात देवीचे तो आराधन करीत असतो. एका ठिकाणी मन स्थिर करायला प्रचंड सामर्थ्य, निग्रह व अभ्यास असावा लागतो, येवढी तयारी व्हायला वेळ लागतो. तोपर्यन्त विविधतेतच मनुष्य रमतो, म्हणून सामान्य मानवांच्या हितासाठी अर्जुनाने भगवंताना आपल्या विभूती विस्ताराने सांगण्याची विनंती केली आहे. अर्जुनाची विनंती मान्य करून भगवान आपल्या विभूती सांगत आहेत.

भगवान उवाच–

**हन्त ते कथयिष्यामि दिव्या ह्यात्मविभूतयः ।**
**प्राधान्यतः कुरुश्रेष्ठ नास्त्यन्तो विस्तरस्य मे ॥१९॥**

भगवान म्हणाले, " बरे तर बाबा, माझ्या ज्या विभूति आहेत त्यांपैकी मुख्य मुख्य तुला सांगतो, कारण हे कुरुश्रेष्ठा, माझ्या विभूतींच्या विस्ताराला अंत नाही,

**अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशयस्थितः ।**
**अहमादिश्च मध्यं च भूतानामन्त एव च ॥२०॥**

हे अर्जुना, मी सर्व भूतांच्या अंतःकरणामध्ये असलेला आत्मा आहे. मीच सर्व भूतांचा आदि, मध्य व अंतही आहे.

प्रत्येकाच्या अंतःकरणात असलेला आत्मा ही परमेश्वराची सर्वश्रेष्ठ विभूति होय. प्रत्येकजण ' माझे अंतःकरण ' म्हणतो, पण त्यावर त्याची सत्ता मात्र चालत नाही. इंद्रिये, प्राण, मन, बुद्धी सोडून दिल्यास हा ' मी ' ब्रह्मरूपीच राहतो. अंतःकरणाचे गुणधर्म आत्म्यात घुसल्याने आत्मा कामी, क्रोधी, लोभी असा भासतो व त्याला जीव ही संज्ञा येते. स्वतः आनंदरूप असता दुःखी होतो. साध्या माणसाला ' पोलीस ' ही संज्ञा

येताच त्याचा पोषाख, व्यवहार, भाषा इत्यादीत बदल होतो. त्याचप्रमाणे ब्रह्मरूप आत्म्याला जीव ही संज्ञा आली की सर्व बदलते.

**आदित्यानामहं विष्णुर्ज्योतिषां रविरंशुमान् ।**
**मरीचिर्मरुतामस्मि नक्षत्राणामहं शशी ॥२१॥**

बारा आदित्यापैकी विष्णु मी आहे. प्रकाशमान पदार्थांत मी किरणवान रवी आहे. मरुद्गणापैकी मरीचि मी आहे व नक्षत्रांमध्ये मी चंद्र आहे.

बारा आदित्यांपैकी विष्णूला जाणता येत नाही, पण तेजस्वी पदार्थामध्ये सूर्य व नक्षत्रामध्ये चंद्र या ईश्वरी विभूति आहेत. म्हणून सूर्योपासना किंवा चंद्रोपासना केली तरी ती ईश्वराला पावते. तसेच या दोन विभूति—दिवसा सूर्य व रात्री चंद्र— अहोरात्र मानवासमोर असतात. त्यांच्याकडे पाहून तरी मानवाने ईश्वराचे अस्तित्व मानावे व त्याची उपासना करण्याचा बोध घ्यावा.

**वेदानां सामवेदोऽस्मि देवानामस्मि वासवः ।**
**इन्द्रियाणां मनश्चास्मि भूतानामस्मि चेतना ॥२२॥**

वेदांमध्ये सामवेद मी आहे. वेदांमध्ये इंद्र मी आहे. इंद्रियांमध्ये मन मी आहे व भूतांच्या ठिकाणी चेतना मी आहे.

वेद खरोखर एकच असता व्यासांनी त्याचे चार भाग केले. वेदासारखे हिताचा मार्ग दाखविणारे जगात दुसरे साधनच नाही. ईश्वराने ब्रह्मदेवाला प्रथम वेद दिले. ब्रह्मदेवाने सृष्टी निर्माण करून ते मानवांना दिले. म्हणजे वेद जगाच्या पूर्वी होते. जग असेपर्यन्त ते असतात व प्रलयानंतरही असणारच. अशा वेदांचे महत्त्व आम्ही भारतीय विसरत चाललो असलो तरी पाश्चात्यांना त्यांचे महत्त्व पटू लागले आहे. पाश्चात्यांनीच 'वेदो अपूर्वो ज्ञाननिधिः' असे प्रमाणपत्र दिले आहे. वेदांना संगीताची जोड दिली की सामवेद तयार होतो. मंत्रयुक्त ज्ञान

संगीतामुळे अधिक आकर्षक बनते. म्हणून सामवेद हा महत्त्वाचा ठरला आहे. तो सामवेद ही ईश्वराची विभूति आहे.

देवापैकी वासव ही विभूति आहे. देवांची मृष्टी अतिशय सूक्ष्म आहे. उपासनेने अंतःकरण उज्ज्वल झाले तरच देवता दिसतात. अगदी प्रत्यक्ष दिसतात, इतकेच नव्हे तर मानवा मानवात जसे चालणे बोलणे, घेणे देणे इत्यादी व्यवहार होतात तसेच देवता व भक्तात होतात. आपण धर्म पालनच करत नाही म्हणून ती गोष्ट आपणास अशक्य वाटते. या सर्व देवतांत विशेष आधिकारसंपन्न व वैभवशाली देवता वासव म्हणजे इंद्र होय. ती ईश्वरी विभूति समजावी.

देवतांची सृष्टी फार सूक्ष्म म्हणून अनाकलनीय वाटल्यास मानवाने स्वतःकडे लक्ष द्यावे. त्याचे मन व चेतना या शरीरातील दोन महत्त्वाच्या गोष्टी या ईश्वरस्वरूप आहेत असे समजले पाहिजे. या दोन्हीपैकी कोणतीही एक नसेल तर मानवाचे अस्तित्वच संपते. जसा देवांचा इंद्र हा अधिपती तसा मन हे पांच कर्मेन्द्रिये व पांच ज्ञानेंद्रियांवरील अधिपती आहे. आणि मनाच्यामागे चेतना म्हणजे बुद्धिवृत्ती असावी लागते.

**रुद्राणां शंकरश्चास्मि वित्तेशो यक्षरक्षसाम् ।**
**वसूनां पावकश्चास्मि मेरुः शिखरिणामहम् ॥२३॥**

अकरा रूद्र आहेत. त्यांपैकी मुख्य जो शंकर तो मी आहे. धनाधिपतीमध्यें कुबेर मी आहे. अष्ट वसूंपैकी अग्नी हे माझे स्वरूप आहे. तसेच सर्व पर्वतांमध्ये आतिशय उंच असलेला मेरू पर्वत ही माझी विभूती होय. ही सर्व परमेश्वराची रूपे समजून त्यांचे चिंतन करावे.

**पुरोधसां च मुख्यं मां विद्धि पार्थ बृहस्पतिम् ।**
**सेनानीनामहं स्कन्दः सरसामस्मि सागरः ॥२४॥**

सर्व राजांमध्ये इंद्र सर्वश्रेष्ठ. कारण तो देवांचा राजा आहे. त्या इंद्राचा पुरोहित गुरु जो बृहस्पती तो मी आहे. सेनापतींमध्ये शंकराचा

पुत्र स्कंद म्हणजे कार्तिकेय श्रेष्ठ, तो मी असे समज. अवघ्या सहाव्या वर्षी त्याने प्रचंड शक्तिसंपन्न तारकासुराचा नाश केला. सर्व जलाशयात सागर श्रेष्ठ. तेही ईश्वराचे स्वरूप समजून त्याचे भजन करावे.

**महर्षीणां भृगुरहं गिरामस्म्येकमक्षरम् ।**
**यज्ञानां जपयज्ञोऽस्मि स्थावराणां हिमालयः ॥२५॥**

महर्षींमध्ये भृगु मी आहे. वाणीमधील एकाक्षर ( ॐ ) मी आहे. यज्ञामध्ये जपयज्ञ मी आहे व स्थावर पदार्थातील हिमालय मी आहे.

सर्व ऋषींनी एकदा देवांतील सर्वश्रेष्ठ कोण याची परीक्षा घ्यायचे ठरविले, पण एकाला श्रेष्ठ ठरविले की बाकीचे आपोआपच कनिष्ठ ठरतात व त्या देवांचा रोष पत्करावा लागेल म्हणून परीक्षा घ्यायला कोणी तयार होईना. शेवटी भृगुऋषी तयार झाले. ते प्रथम शंकर मग ब्रह्मदेव यांचेकडे गेले त्यांनी लक्षच दिले नाही. नंतर ते श्रीभगवान विष्णूकडे गेले. भगवान पहुडले होते व देवी लक्ष्मी पाय चुरत होती. भृगूनीं सरळ जाऊन भगवंताच्या छातीवर लाथ मारली. पत्नीसमक्ष एका ऋषीने असे वर्तन केले तरी विष्णु रागावले नाहीत. उलट ते भृगूना वंदन करून म्हणाले, "आपल्या पायाला इजा तर झाली नाही ना ? कारण माझे वक्षस्थळ अतीशय कठीण झाले आहे. थांबा मी आपल्या पायांना तूप लावतो" या वर्तनामुळे भृगूनी श्रीविष्णूच सर्वश्रेष्ठ असल्याचा निर्णय दिला. अशा सर्वश्रेष्ठ देवाची परक्षिा घेणारे ऋषी किती श्रेष्ठ असतील याची कल्पना केलेली बरी. भगवान भृगूवर रागावले नाहीत. कारण ती त्यांचीच विभूती होती. स्थिर पदार्थात हिमालय, वाणीतील ओंकार, यज्ञातील जपयज्ञ या दैवी विभूती आहेत.

**अश्वत्थः सर्ववृक्षाणां देवर्षीणां च नारदः ।**
**गन्धर्वाणां चित्ररथः सिद्धानां कपिलो मुनिः ॥२६॥**

सर्व वृक्षांमध्ये पिंपळ, देवर्षींमध्ये नारद, गंधर्वांमध्ये चित्ररथ व सिद्धांमध्ये महामुनी कपिल मी आहे.

**उच्चैःश्रवसमश्वानां विद्धि माममृतोद्भवम् ।**
**ऐरावतं गजेन्द्राणां नराणां च नराधिपम् ॥२७॥**

अश्वामध्ये अमृतमंथनाच्या वेळी उत्पन्न झालेला उच्चैःश्रवा, गजेंद्रामध्ये ऐरावत व नरामध्ये राजा मी आहे.

**आयुधानामहं वज्रं धेनूनामस्मि कामधुक् ।**
**प्रजनश्चास्मि कन्दर्पः सर्पाणामस्मि वासुकिः ॥२८॥**

आयुधामध्ये वज्र, गायींमध्ये कामधेनु, प्रजोत्पत्तीला कारण असलेला काम-मदन-व सर्पामधील वासुकी मी आहे.

**अनन्तश्चास्मि नागानां वरुणो यादसामहम् ।**
**पितॄणामर्यमा चास्मि यमः संयमतामहम् ॥२९॥**

नागामध्ये अनंत, जलदेवतामध्ये वरुण, पितरांमध्ये अर्यमा व नियमन करणारामध्ये यम ह्या सर्व माझ्या विभूती होत.

**प्रह्लादश्चास्मि दैत्यानां कालः कलयतामहम् ।**
**मृगाणां च मृगेन्द्रोऽहं वैनतेयश्च पक्षिणाम् ॥३०॥**

दैत्य कुळातील प्रल्हाद, हरण करणाऱ्यात (गणना करणाऱ्यामध्ये) काळ, पशूत सिंह व पक्षांतील गरूड मी आहे.

**पवनः पवतामस्मि रामः शस्त्रभृतामहम् ।**
**झषाणां मकरश्चास्मि स्त्रोतसामस्मि जाह्नवी ॥३१॥**

वेगवान वस्तूमध्ये किंवा पवित्र बनविणाऱ्यात वायू, शस्त्रधारण करणारांमध्ये दाशरथी राम, मत्स्यामध्ये मकर व नद्यांमध्ये भागीरथी गंगा ही माझीच रुपे आहेत.

**सर्गाणामादिरन्तश्च मध्यं चैवाहमर्जुन ।**
**अध्यात्मविद्या विद्यानां वादः प्रवदतामहम् ॥३२॥**

हे अर्जुना, सर्व सृष्ट वस्तूंचा आदि, अंत व मध्य मीच आहे. विद्यांमध्ये अध्यात्मविद्या आणि वादविवाद करणारांचा वाद मी आहे.

गुरुशिष्यांमध्ये जो वाद होतो म्हणजे शिष्याने शंका विचारणे व गुरूनी त्याचे निरसन करणे असा वाद सर्वोत्कृष्ट, कारण अशा वादामधूनच तत्त्वबोध होतो. तत्त्वबोध करून देणारा जो वाद ते माझे स्वरूप होय. जल्पवाद म्हणजे दुसऱ्याला जिंकण्याच्या उद्देशाने केलेला वाद यात हट्ट असतो व प्रतिस्पर्ध्याला पाडायचे एवढाच उद्देश असतो. मग त्यात असत्यही बोलले जाते. वितंडवाद म्हणून जो असतो त्यात स्वतःचा कोणताच पक्ष न मांडता फक्त दुसऱ्याची मते खोडून काढायची-खंडण करायची. हे वाद निरर्थक असतात.

**अक्षराणामकारोऽस्मि द्वन्द्वः सामासिकस्य च ।**
**अहमेवाक्षयः कालो धाताहं विश्वतोमुखः ॥३३॥**

अक्षरात अकार, समासात द्वंद्व, क्षयरहित काळ म्हणजे कालाचाही काल व दक्ष, कश्यप इ. अनेक प्रजापती होऊन गेले त्यापैकी विश्वमुखी पुरुष—हिरण्यगर्भ मी आहे.

**मृत्युः सर्वहरश्चाहमुद्भवश्च भविष्यताम् ।**
**कीर्तिः श्रीर्वाक्च नारीणां स्मृतिर्मेधा धृतिः क्षमा ॥३४॥**

सर्वांचा संहार करणारा मृत्यु आणि भविष्य काळातील उत्पत्तीला कारण आणि स्त्रियामध्ये कीर्ती, संपत्ती, वाणी, स्मृती, मेधा ( बुद्धी ), धृती आणि क्षमा या सात माझ्याच विभूती आहेत.

**बृहत्साम तथा साम्नां गायत्री छन्दसामहम् ।**
**मासानां मार्गशीर्षोऽहमृतूनां कुसुमाकरः ॥३५॥**

तसेच चौदा सामामधील बृहत्साम, छंदामध्ये गायत्री, सर्व महिन्यात मार्गशीर्ष व ऋतूमध्ये वसंत ऋतु मी आहे.

मार्गशीर्ष महिन्यात अती थंडी किंवा अती उष्णता नसते, धान्याची समृद्धी असते, म्हणून या महिन्यांतील कोणत्याही दिवशी विष्णुपूजन केले तरी त्याचे हजारपटीने अधिक फळ मिळते.

**द्यूतं छलयतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ।**
**जयोऽस्मि व्यवसायोऽस्मि सत्त्वं सत्त्ववतामहम् ॥३६॥**

छळ करणाऱ्यात द्यूत, तेजस्वी लोकांतील तेज, सिद्धी किंवा विजय, उद्योगी पुरुषातील व्यवसाय किंवा निश्चय व सात्त्विक पुरुषातील सत्त्व मी आहे.

**वृष्णीनां वासुदेवोऽस्मि पाण्डवानां धनंजयः ।**
**मुनीनामप्यहं व्यासः कवीनामुशना कविः ॥३७॥**

यादवामधील श्रीकृष्ण, पांडवांतील अर्जुन, मुनीमध्ये व्यास व कवीमध्ये शुक्राचार्य या माझ्या विभूती आहेत.

**दण्डो दमयतामस्मि नीतिरस्मि जिगीषताम् ।**
**मौनं चैवास्मि गुह्यानां ज्ञानं ज्ञानवतामहम् ॥३८॥**

दमन करणाऱ्यामध्ये साधनीभूत असा दंड, जयाची इच्छा करणारे नीतिशास्त्र, गुह्यपदार्थांत मौन व ज्ञानी माणसाचे ज्ञान मी आहे.

**यच्चापि सर्वभूतानां बीजं तदहमर्जुन ।**
**न तदस्ति विना यत्स्यान्मया भूतं चराचरम् ॥३९॥**

हे अर्जुना, सर्वभूतांचे बीज म्हणजे उत्पत्तिस्थान ते मी आहे. स्थावर जंगम अशा सर्व चराचर पदार्थांत माझे अस्तित्व आहे.

**नान्तोऽस्ति मम दिव्यानां विभूतीनां परंतप ।**
**एष तूद्देशतः प्रोक्तो विभूतेर्विस्तरो मया ॥४०॥**

हे शत्रुतापना, माझ्या विभूती दिव्य असून त्यांना अंत नाही. पृथ्वीवरील रज:कण अगर आकाशांतील तारे यांची एकवेळ गणना करता येईल, पण माझ्या विभूतींची मोजदाद करता येणार नाही. म्हणून त्यातील फक्त मुख्य मुख्य मी तुला सांगितल्या.

**यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा ।**
**तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंऽशसंभवम् ॥४१॥**

जी जी वस्तु वैभवाने, संपत्तीने अथवा उदारतेने युक्त असेल, ती ती माझ्या तेजाच्या अंशापासून उत्पन्न झाली असे जाण.

भोग, ऐश्वर्य, उत्साह, ज्ञान यांचे जेथे जेथे आधिक्य आढळेल ती ती ईश्वरी विभूतीच समजली पाहिजे. सामान्यपणे दुसऱ्याचा उत्कर्ष कोणालाही सहन होत नाही. उत्कर्ष पावणाऱ्या व्यक्तीवर इतर उगाचच जळफळत असतात. पण उत्कर्षसंपन्न व्यक्ती जर ईश्वरी विभूती आहे अशी भावना बाळगली तर त्या व्यक्तीबद्दल द्वेष वाटणार नाही. दुसऱ्याचे भरघोस पीक पाहून आपण हेवा करायचे कारण काय? खूप कष्ट केले असतील, उत्तम खतपाणी दिले असेल, वेळच्या वेळी मशागत केली तर पीक चांगले आल्याशिवाय रहात नाही. ऐश्वर्य, ज्ञान, भोग हे काहीतरी विशेष पुण्य केलेले असल्याशिवाय मिळत नाहीत. म्हणून अशा लोकांना पुण्यवान समजून ते ईश्वरी विभूती आहेत असे मानले पाहिजे व आपणही पुण्यसंचय करीत राहिले पाहिजे. दुसरे, ज्या व्यक्तीला ऐश्वर्य वा भोग लाभले असेल त्यानेही ते केवळ आपल्या कृपेने लाभले आहे असे समजून फुगून जाऊ नये. तर ही परमेश्वराची देणगी आहे, असे समजून त्या वैभवाचा उपयोग सत्कार्याकडे करावा.

**अथवा बहुनैतेन किं ज्ञातेन तवार्जुन ।**
**विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत् ॥४२॥**

अथवा हे अर्जुना, प्रत्येक वस्तूचे वेगवेगळे ज्ञान तुला काय करायचे? तू येवढेच समज की, मी माझ्या एकाच अंशाने हे सर्व जग व्यापले आहे.

भगवंत ' स्थिरचर व्यापुनी दशांगुळे उरला ' असे म्हटले आहे. हे सर्व दिसणारे जग हे परमेश्वराचेच रूप आहे. पण त्याहूनही परमेश्वराचे स्वरूप मोठे आहे. जे जे भव्य दिव्य आहे तेथे ईश्वर प्रकर्षाने आहे असे समजून त्या दिव्य वस्तूचे चिंतन केल्यास ते ईश्वराचेच चिंतन होते. या अध्यायात भगवंतानी ' भरला घनदाट हरी दिसे ' हे तत्त्व अर्जुनाला समजावून दिले आहे, त्याचेच प्रात्यक्षिक आता अकराव्या अध्यायात करून दाखविणार आहेत. म्हणून विश्वरूप पाहण्याची आपण तयारी केली पाहिजे.

इति श्रीमद् भगवद् गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे विभूतियोगो नाम दशमोऽध्यायः॥

# अध्याय ११ वा.

अर्जुन उवाचः—

**मदनुग्रहाय परमं गुह्यमध्यात्मसंज्ञितम् ।**
**यत्त्वयोक्तं वचस्तेन मोहोऽयं विगतो मम ॥ १ ॥**

अर्जुन म्हणाला, "हे श्रीकृष्णा, माझ्यावर अनुग्रह करण्याकरिता अध्यात्म नांवाचे अत्यंत गुह्य असे जे तूं बोललास त्याने हा माझा मोह निःशेष नाहीसा झाला.

भगवंतानी आपल्या विभूती सांगून झाल्यावर 'एकांशेव स्थितो जगत्' असे सांगितल्यावर अर्जुनाला ते व्यापक रूप पाहण्याची उत्कंठा निर्माण झाली. तो म्हणाला, माझ्यावर अनुग्रह करून तुम्ही ज्या विभूती मला सांगितल्या व अध्यात्म गुह्य समजावून दिले, त्यामुळे माझा मोह गेला. मी मारणारा व भीष्मादिक मरणारे असा माझा समज होता, त्यामुळे 'सीदन्ति मम गात्राणि' अशी माझी विकल अवस्था झाली होती. पण आता आत्मा अकर्ता व अविकारी आहे हे ज्ञान झाले असल्याने माझा मोह पूर्णपणे गेला आहे.

**भवाप्ययौ हि भूतानां श्रुतौ विस्तरशो मया ।**
**त्वत्तः कमलपत्राक्ष माहात्म्यमपि चाव्ययम् ॥ २ ॥**

हे कमलपत्राक्षा, भूतांची उत्पत्ती व नाश ( यासंबंधी ) तुझ्याकडून विस्तारपूर्वक ऐकले आणि तसेच तुझे अपार माहात्म्यही मी तुझ्याकडून सविस्तर ऐकले.

**एवमेतद्यथात्थ त्वमात्मानं परमेश्वर ।**
**द्रष्टुमिच्छामि ते रूपमैश्वरं पुरुषोत्तम ॥ ३ ॥**

हे परमेश्वरा, तू स्वतःविषयी हे जे सांगितलेस, त्याप्रमाणे हे पुरुषोत्तमा, हे तुझे ऐश्वर्ययुक्त विश्वरूप प्रत्यक्ष पाहण्याची माझी इच्छा आहे.

विश्वरूपाबद्दल तुम्ही जे सांगितले त्यावर माझा पूर्ण विश्वास आहे. त्याबद्दल खात्री करून घेण्यासाठी मी आपणास विश्वरूप दाखवा असे कदापि म्हणणार नाही. पण ते पाहण्याची उत्कट इच्छा मात्र मला आहे. ते दाखवाच असा मी आग्रह करू शकत नाही, कारण ते पाहण्याची योग्यता माझे अंगी आहे की नाही कोण जाणे?

**मन्यसे यदि तच्छक्यं मया द्रष्टुमिति प्रभो ।**
**योगेश्वर ततो मे त्वं दर्शयात्मानमव्ययम् ॥४॥**

हे प्रभो ते पाहणे मला शक्य आहे असे जर तुला वाटत असेल तर हे योगेश्वरा, क्षयरहित असे स्वतःचे रूप तुम्ही मला दाखवा.

आपले विश्वरूप फक्त योग्यांनाच दिसू शकेल असे आपले मत असेल तर आपण मला योगी बनवा. तुम्ही योगेश्वर असल्याने ते तुम्हाला शक्य आहे. विश्वरूप पाहण्याची माझी योग्यता आहे असे तुम्हास वाटत असेल तर मला ते अवश्य दाखवा. अशी अर्जुनाने भगवंताची प्रार्थना केली.

भगवान उवाचः—

**पश्य मे पार्थ रूपाणि शतशोऽथ सहस्रशः ।**
**नानाविधानि दिव्यानि नानावर्णाकृतीनि च ॥५॥**

भगवान म्हणाले, ‘ अर्जुना पहा पहा माझी शेकडो, हजारो रूपे पहा. ही दिव्य आहेत. यांचे वर्ण, आकार नाना प्रकारचे आहेत.

**पश्यादित्यान्वसून्रुद्रानाश्विनौ मरुतस्तथा ।**
**बहून्यदृष्टपूर्वाणि पश्याश्चर्याणि भारत ॥६॥**

बारा आदित्य, आठ वसू, अकरा रुद्र, दोन अश्विनीकुमार एकूण पन्नास मरुद्गण (वायू) पहा. याशिवाय पूर्वी कधी न पाहिलेली अनेक आश्चर्ये पहा.

अर्जुना, तुला जय होईल का पराजय याबद्दल शंका होती ना ? या विश्वरूपात पहा म्हणजे विजय कुणाचा होणार आहे हे तुला स्पष्ट दिसेल.

संजय म्हणाला, ' धृतराष्ट्रा, भगवंतानी विश्वरूप पहा असे म्हटल्या-बरोबर तात्काळ तू पांडवाशी संधी करायला पाहिजे होता. तू स्वस्थ राहिलास याचा परिणाम काही चांगला होणार नाही. भगवान म्हणतात—

**इहैकस्थं जगत्कृत्स्नं पश्याद्य सचराचरम् ।**
**मम देहे गुडाकेश यच्चान्यद् द्रष्टुमिच्छसि ॥७॥**

हे अर्जुना, सर्व जग माझ्या देहात एकत्र झालेले तुला दिसेल. हे गुडाकेश—(निद्रेवर विजय मिळविलेला) लक्षपूर्वक पहा असे सांगण्याची आवश्यकता आहे.

भगवान पहा पहा म्हणतात, पण अर्जुन स्तब्ध उभा होता, कारण त्याला काहीच दिसत नव्हते. अर्जुनाची गोंधळलेली स्थिती पाहून भगवान म्हणाले,

**न तु मां शक्यसे द्रष्टुमनेनैव स्वचक्षुषा ।**
**दिव्यं ददामि ते चक्षुः पश्य मे योगमैश्वरम् ॥ ८ ॥**

अर्जुना, तुला तुझ्या चर्मचक्षूंनी माझे हे सर्वात्मक रूप दिसणार नाही. म्हणून मी तुला दिव्य दृष्टी देतो. तिने माझे ईश्वरी सामर्थ्य पहा.

**संजय उवाचः—**

**एवमुक्त्वा ततो राजन्महायोगेश्वरो हरिः ।**
**दर्शयामास पार्थाय परमं रूपमैश्वरम् ॥ ९ ॥**

संजय म्हणाला, 'असे म्हणून त्या महायोगेश्वर हरीने पार्थाला आपले दिव्यरूप दाखविले.

**अनेकवक्त्रनयनमनेकाद्भुतदर्शनम् ।**
**अनेकदिव्याभरणं दिव्यानेकोद्यतायुधम् ॥१०॥**

त्याला अनेक मुखे व अनेक डोळे होते. त्यात अद्भुत देखावे होते. अनेक दिव्य अलंकार त्याने धारण केलेले होते. त्याच्या हातात उगारलेली नाना आयुधे होती.

**दिव्यमाल्याम्बरधरं दिव्यगन्धानुलेपनम् ।**
**सर्वाश्चर्यमयं देवमनन्तं विश्वतोमुखम् ॥११॥**

त्याच्या गळ्यांतील माळा, वस्त्रे, उटया सारेच दिव्य होते. सर्व आश्चर्यांनी युक्त, अनंत, सर्वतोमुख व दिव्य स्वरूप असलेला देव अर्जुनाने पाहिला.

**दिवि सूर्यसहस्रस्य भवेद्युगपदुत्थिता ।**
**यदि भाः सदृशी सा स्याद्भासस्तस्य महात्मनः ॥१२॥**

आकाशामध्ये सहस्र सूर्यांची प्रभा जर एकदम प्रगट झाली तर ती त्या महात्म्याच्या ( श्रीहरीच्या ) प्रभेसारखी ( कांहीशी ) होईल.

हजार सूर्यांचे तेज एकत्र केले तरी ते श्रीहरीच्या तेजापुढे फिके पडेल, असे ऐकल्यावर धृतराष्ट्राला आनंद झाला. तो मनात म्हणाला, 'एका सूर्याकडे जरी पहायचे म्हटले तरी दृष्टी दिपून जाते. मग हजार सूर्याहूनही प्रखर तेज असलेल्या विश्वरुपाला पाहून अर्जुन निश्चित घाबरून गेला असेल. कारण भगवंताने त्याला दिव्य चक्षू दिले आहेत, दिव्य मन कुठे दिले आहे? अर्जुन विरागी बनून निघून गेला तर माझ्या मुलांना आपोआप राज्य मिळेल

**तत्रैकस्थं जगत्कृत्स्नं प्रविभक्तमनेकधा ।**
**अपश्यद्देवदेवस्य शरीरे पाण्डवस्तदा ॥१३॥**

त्या देवदेवाच्या शरीरात अर्जुनाला अनेक रुपांनी विभागलेले संपूर्ण जग एकवटलेले दिसले.

**ततः स विस्मयाविष्टो हृष्टरोमा धनंजयः ।**
**प्रणम्य शिरसा देवं कृताञ्जलिरभाषत ॥१४॥**

तेव्हां तो आश्चर्य व रोमांचयुक्त झालेला अर्जुन देवासमोर मस्तक नमवून व हात जोडून म्हणाला–

अर्जुन शुद्ध चारित्र्यसंपन्न व दैवी संपत्तीने युक्त होता. तो धृतराष्ट्राच्या कल्पनेप्रमाणे गोंधळून गेला नाही किंवा विरक्तही बनला नाही. उलट विश्वरूप पाहून अर्जुन आश्चर्यचकित झाला. आनंदातिशया-मुळे त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले. हे भव्य दिव्य विलक्षण रूप ज्याच्या कृपेने–वैभवामुळे आपण पाहू शकत आहोत, त्याचेबद्दल कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी आपण काहीच केले नाही असा विचार अर्जुनाच्या मनात आला व कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी त्याने विश्वरूपाला साष्टांग नमस्कार घातला आणि नम्रपणे हात जोडून बोलू लागला.

अर्जुन उवाच–

**पश्यामि देवांस्तव देव देहे सर्वांस्तथा भूतविशेषसङ्घान् ।**
**ब्रह्माणमीशं कमलासनस्थमृषींश्च सर्वानुरगांश्च दिव्यान् ॥१५॥**

अर्जुन म्हणाला, " हे देवा, तुझ्या देहामध्ये सर्व देव त्याचप्रमाणे भूतविशेषांचे ( स्थावर जंगमादि ) सर्व समुदाय, कमलामध्ये असलेला ब्रह्मदेव, शंकर, सर्व ऋषी आणि दिव्य नाग मी पहात आहे.

संजय म्हणाला, " हे राजा, एका देवतेचे दर्शन झाले तरीही इच्छा पूर्ण होतात. अर्जुनाच्या तर सर्वच देवांचे दर्शन झाल्यामुळे त्याच्या सर्व इच्छा फलद्रूप झाल्या हे वेगळे सांगायला नको. राजा अर्जुन

कांहीं तरी सांगतो आहे असे मानू नकोस. व्यासकृपेने मलाही त्या दिव्यरूपाचे दर्शन घडत आहे. ”

विश्वरूपात अर्जुनाला सर्व देवांचे दर्शन झाले. मर्त्यलोकी उत्कट उपासना केली तर त्याचे फळ म्हणून देवत्व मिळते. देव परोपकारी असतात. त्यांना भरपूर वैभव मिळालेले असते. ऋषी तपाने संपन्न तर सिद्धांकडे सर्व सिद्धी असतात. ऋषी जगाचे क्षेम चिंतितात तर सर्प संहार करतात. हे परस्पर-विरोधी दिव्यरूपात एकत्र नांदत असलेले पाहून अर्जुन चकित झाला.

**अनेकबाहूदरवक्त्रनेत्रं पश्यामि त्वां सर्वतोऽनन्तरूपम् ।**
**नान्तं न मध्यं न पुनस्तवादिं पश्यामि विश्वेश्वर विश्वरूप ॥१६॥**

हे विश्वेश्वरा, विश्वरूप श्रीकृष्णा मी तुला अनेक हात, पोट, मुखे व नेत्र असलेला व अनंतरूपांनी सर्व ठिकाणी भरलेला असा पहात आहे. तुझा आरंभ, मध्य, अंत यापैकी मला काहीच दिसत नाही.

विष्णूला चार, दत्तात्रेयांना सहा, देवीला आठ, शंकराला दहा हात असतात. पण या विश्वरुपाचे हात मोजताच येत नाहीत. आपल्या सर्व तऱ्हेच्या भक्तांना वेगवेगळी फळे देण्यासाठी हे अनंत हस्त असावेत व उदर, मुखे, नेत्र इ. सर्व अवयव अनंत आहेत. या विश्वरुपाची सुरवात कोठे होते व अंत कोठे होते हे कळत नसल्यामुळे त्याचा मध्य कोठे याचाही पत्ता लागत नाही.

**किरीटिनं गदिनं चक्रिणं च तेजोराशिं सर्वतो दीप्तिमन्तम् ।**
**पश्यामि त्वां दुर्निरीक्ष्यं समन्ताद्दीप्तानलार्कद्युतिमप्रमेयम् ॥१७॥**

तुझ्या प्रत्येक मस्तकावर किरीट आहे. अनेक गदा व चक्रे तू धारण केली आहेस. तू तेजोराशी म्हणजे लावण्याची खाणच आहेस. तू सर्वत्र प्रकाशमान आहेस. दिव्य दृष्टीशिवाय तुझे रूप पाहता येणेच शक्य नाही. प्रलयकालीचा अग्नी व सूर्य या दोघांचा संयोग झाल्यावर

जसे ते तेज असह्य होईल, तसे तुझे तेज प्रखर आहे. एकंदरीत तू अप्रमेय आहेस म्हणजे ज्ञानात विषय होत नाहीस. कारण तू दृश्य नसून द्रष्टा आहेस, विषय नसून विषयी आहेस.

**त्वमक्षरं परमं वेदितव्यं त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ।**
**त्वमव्ययः शाश्वतधर्मगोप्ता सनातनस्त्वं पुरुषो मतो मे ॥१८॥**

वेदाकडून जाणण्याला योग्य असे अविनाशी ब्रह्म तू आहेस. या विश्वाचा अखेरचा आश्रय तू आहेस. तू अव्यय, शाश्वत अशा धर्माचे रक्षण करणारा सनातन पुरुष तू आहेस, असे मला वाटते.

जगात परा आणि अपरा अशा दोनच विद्या आहेत. बायका, मुले, देह याकरता म्हणजे दुसऱ्याकरता जी उपयोगी ती अपरा. स्वत:साठी जी उपयोगी पडते ती परा म्हणजेच अध्यात्म विद्या. ती अध्यात्म विद्या तू आहेस. कोणत्याही अवस्थेत विश्वाला तुझा आश्रय घेता येतो. पण प्राय: संकटप्रसंगी मनुष्य ईश्वराचा धावा करतो. संकट नसता, सुखासमाधानात असताही जो मानव ईश्वराला स्मरत असेल, त्याच्या अंकित होऊन रहात असेल तर त्या मानवाच्या पूर्वजन्मीचे प्रबळ संस्कार फळास आले असे जाणावे.

धर्म कुणालाही नको असतो म्हणून प्रत्येकजण धर्माला टाळत असतो. पण परमेश्वर अवतार घेतो ते धर्माच्या रक्षणासाठी. युधिष्ठिर भीमाप्रमाणे बळवान नव्हते, अर्जुनाप्रमाणे शौर्यशाली नव्हते, नकुलासारखे सुंदर नव्हते किंवा सहदेवासारखे सेवातत्परही नव्हते. पण या चौघांनाही ते आपल्या ताब्यात ठेवीत. कारण त्यांच्याजवळ भरपूर धर्मबळ होते. त्यांना धर्मराज हे नांव मिळाले. प्रत्यक्ष भगवान श्रीकृष्ण त्याला वंदन करीत व अशा धर्माचा जय व्हावा म्हणून भगवंत त्याच्या बाजूने लढत होते.

विश्वरूप सनातन म्हणजे कोणत्याही काळात बदलत नाही किंवा त्यात विकार उत्पन्न होत नाहीत. या विश्वरूपाला पुरुषोत्तम म्हटले आहे. 'क्लेशकर्म-विपाकाशयैः अपरामृष्टः पुरुषविशेषः ईश्वरः' अशी पतंजलीने पुरुष शब्दाची व्याख्या केली आहे. मनुष्याला क्लेश नाहीत असे कधी होत नाही. कर्म, अंतःकरण, भोग इत्यादींची मानवाला पीडा होत असते. ईश्वराला कोणत्याही प्रकारची पीडा होत नाही, म्हणून त्याला पुरुष म्हटले आहे. मुख, वस्त्रे, घर, देह इत्यादी स्वच्छ ठेवायचे म्हणजे क्लेश होतात. संपत्ती सुरक्षित ठेवायची म्हणजे तर अतिशय पीडा आहे. पण ईश्वर या सर्व क्लेशापासून मुक्त असतो.

**अनादिमध्यान्तमनन्तवीर्यमनन्तबाहुं शशिसूर्यनेत्रम् ।**
**पश्यामि त्वां दीप्तहुताशवक्त्रं स्वतेजसा विश्वमिदं तपन्तम् ॥१९॥**

तुला आदी, मध्य, अंत तिन्हीही नाहीत. तू अनंत सामर्थ्यसंपन्न आहेस. तुला अनंत हात असून चंद्र सूर्य तुझे नेत्र आहेत. प्रज्वलित अग्नीप्रमाणे तुझे मुख दिसत आहे. आपल्या तेजाने सर्व जगताला तू तापवीत आहेस.

**द्यावापृथिव्योरिदमन्तरं हि व्याप्तं त्वयैकेन दिशश्च सर्वाः ।**
**दृष्ट्वाद्भुतं रूपमुग्रं तवेदं लोकत्रयं प्रव्यथितं महात्मन् ॥२०॥**

हे महात्म्या, स्वर्ग आणि पृथ्वी यामधील सर्व अंतर (अंतरिक्ष) त्याप्रमाणे सर्व दिशा तू व्यापलेल्या आहेस. हे तुझे उग्र व अद्भुत रूप पाहून त्रैलोक्य भयभीत झाले आहे.

**अमी हि त्वां सुरसङ्घा विशन्ति केचिद्भीताः प्राञ्जलयो गृणन्ति ।**
**स्वस्तीत्युक्त्वा महर्षिसिद्धसङ्घाः स्तुवन्ति त्वां स्तुतिभिः पुष्कलाभिः ॥२१॥**

हे देवांचे समुदाय तुझ्यामध्ये प्रवेश करीत आहेत. कोणी भयभीत होऊन हात जोडून तुझे स्तवन करीत आहेत. महर्षी व सिद्ध यांचे

समुदाय 'स्वस्ति' असे म्हणून दीर्घ स्तोत्रांनी तुझी स्तुती करीत आहेत.

देवा तूच परब्रह्म आहेस असे मागे मी उगीचच म्हटले असे समजू नको. कारण देव व दानव कुणापुढेही वाकत नाहीत. बलवान असल्याने ते कुणालाही जुमानीत नाहीत, पण तुझ्यापुढे मात्र नम्र झालेले आहेत. महर्षींचे सामर्थ्य विद्येमुळे फारच वाढलेले असते. ब्रह्मदेव जेव्हा त्रैलोक्य नष्ट करतो तेव्हा ते महर्लोकांत जाऊन राहतात व जेव्हा पुनः सृष्टी निर्मितीचे कार्य सुरू होते, तेव्हा परत खाली येऊन वेदांचा प्रचार करतात. असे महर्षी, देव, असुर, सिद्ध हे सर्व तुझ्यापुढे नम्र होऊन तुझे स्तवन करीत आहेत. असे तुझे असामान्य सामर्थ्य असल्याने तूच परब्रह्म आहेस.

सामान्यपणे नसलेले गुण एखाद्या व्यक्तीला चिकटविणे याला व्यवहारात स्तुती म्हणतात. पण तुझ्या बाबतीत तुझे असलेले सर्व गुण कोणाला सांगता येत नाहीत, इतके ते अनंत आहेत. 'वाचं अर्थोनुधावति' असे वाणीत अमोघ सामर्थ्य असलेले व ज्यांचे बोलणे गंभीर असते असे ऋषी तुझी स्तुती करतात.

**रुद्रादित्या वसवो ये च साध्या विश्वेऽश्विनौ मरुतश्चोष्मपाश्च ।**
**गन्धर्वयक्षासुरसिद्धसङ्घा वीक्षन्ते त्वां विस्मिताश्चैव सर्वे ॥२२॥**

अकरा रुद्र, बारा आदित्य, आठ वसू, साध्यदेव, विश्वदेव, अश्विनीकुमार, वायू, उष्मप म्हणजे पितर, गंधर्व, यक्ष, राक्षस व सिद्ध यांचे समुदाय विस्मयाने तुजकडे पाहतात. या सर्वांना तुझे रूप एकदेशीय दिसते. मला मात्र तुझ्या कृपेमुळे तुझे हे रूप संपूर्णपणे दिसत आहे.

**रूपं महत्ते बहुवक्त्रनेत्रं महाबाहो बहुबाहूरुपादम् ।**
**बहूदरं बहुदंष्ट्राकरालं दृष्ट्वा लोकाः प्रव्यथितास्तथाहम् ॥२३॥**

हे महाबाहो, अनंत मुखे व अनंत नेत्र असलेले, अनंत बाहू, मांड्या व पाय असलेले, अनंत उदरे असलेले, अनंत दाढामुळे भीषण असलेले तुझे प्रचंड रूप पाहून मी तसेच हे लोक देखील व्याकूळ झाले आहेत.

येथे लोक म्हणजे देव ( प्रकाशमान असणारे ) असा अर्थ घ्यावयाचा ( लोक्यन्ते अनेन ते लोकाः).

**नभःस्पृशं दीप्तमनेकवर्णं व्यात्ताननं दीप्तविशालनेत्रम् ।**
**दृष्ट्वा हि त्वां प्रव्यथितान्तरात्मा धृतिं न विन्दामि शमं च विष्णो ॥२४॥**

हे विष्णो, गगनस्पर्शी, दीप्तिमान, रंगीबेरंगी, जबडा पसरलेले, तेजस्वी व विशाल नेत्र असलेले तुझे रूप पाहून अंतरात्मा व्याकूळ झाल्याने मी धैर्य धरू शकत नाही व शांतीही धरू शकत नाही.

केवळ तुमचा पसरलेला जबडा पाहून मी भयभीत झालो नाही. पण तुम्ही डोळेही वटारलेले आहेत; त्यामुळे मी धीर धरू शकत नाही. वास्तविक तुमच्या दर्शनाने मला शम म्हणजे प्रसन्नता वाटायला पाहिजे. पण तसे होत नाही.

**दंष्ट्राकरालानि च ते मुखानि दृष्ट्वैव कालानलसन्निभानि ।**
**दिशो न जाने न लभे च शर्म प्रसीद देवेश जगन्निवास ॥२५॥**

आणि दाढांच्या योगाने विक्राळ व प्रलयकालीन अग्नीप्रमाणे दिसणारी तुझी मुखे पाहून मी इतका गर्भगळीत झालो आहे की मला पूर्व कोणती व पश्चिम कोणती हेही कळेनासे झाले आहे. मला सुख वाटत नाही. हे जगन्निवासा, प्रसन्न व्हा व हे तुमचे भयानक रूप आवरा.

**अमी च त्वां धृतराष्ट्रस्य पुत्राः सर्वे सहैवावनिपालसङ्घैः ।**
**भीष्मो द्रोणः सूतपुत्रस्तथासौ सहास्मदीयैरपि योधमुख्यैः ॥२६॥**
**वक्त्राणि ते त्वरमाणा विशन्ति दंष्ट्राकरालानि भयानकानि ।**
**केचिद्विलग्ना दशनान्तरेषु संदृश्यन्ते चूर्णितैरुत्तमाङ्गैः ॥२७॥**

तसेच राजांच्या सर्व समुदायासह वर्तमान हे धृतराष्ट्राचे सर्व पुत्र, भीष्मद्रोण, कर्ण आणि आमच्या बाजूचे धृष्टद्युम्नादी मुख्य योद्धेही—

भयानक दाढांच्या योगाने अधिकच भयानक अशा तुझ्या मुखामध्ये त्वरेने शिरत आहेत. कोणी चूर्ण झालेल्या मस्तकांनी दातांमध्ये अडकलेले दिसतात.

सर्व योद्धे तुमच्या तोंडात शिरतात. ते बाहेर पडण्याची धडपड करीत असता तुम्ही जबडा मिटला की त्यांचा चक्काचूर होतो. त्यापैकी कांहीं जणांच्या मस्तकांचे तुकडे तुमच्या दाढात अडकलेले दिसतात.

**यथा नदीनां बहवोऽम्बुवेगाः समुद्रमेवाभिमुखा द्रवन्ति ।**
**तथा तवामी नरलोकवीरा विशन्ति वक्त्राण्यभिविज्वलन्ति ॥२८॥**

ज्याप्रमाणे नद्यांचे अनेक प्रवाह अबुद्धिपूर्वक समुद्राकडेच धाव घेतात, त्याप्रमाणेच हे नरवीर तुझ्या जळत्या मुखात अबुद्धिपूर्वक घुसत आहेत.

**यथा प्रदीप्तं ज्वलनं पतङ्गा विशन्ति नाशाय समृद्धवेगाः ।**
**तथैव नाशाय विशन्ति लोकास्तवापि वक्त्राणि समृद्धवेगाः ॥२९॥**

ज्याप्रमाणे वेगवान पतंग दिव्यावर बुद्धिपुरःसर झेप घेतात, त्याप्रमाणे हे भीष्मद्रोणादी तुझ्या मुखात हेतुपुरःसर तुझ्या हातून मरण येऊन धन्य होण्याकरिता वेगाने शिरत आहेत.

**लेलिह्यसे ग्रसमानः समन्ताल्लोकान्समग्रान्वदनैर्ज्वलद्भिः ।**
**तेजोभिरापूर्य जगत्समग्रं भासस्तवोग्राः प्रतपन्ति विष्णो ॥३०॥**

तुझ्या जळजळीत मुखात शिरणाऱ्या सर्वांना भक्षण करून त्यांचे रक्त तुम्ही मिटक्या मारीत, जिभा चाटत प्राशन करीत आहात. तुमच्या तेजाने सर्व विश्व तापले आहे.

**आख्याहि मे को भवानुग्ररूपो नमोऽस्तु ते देववर प्रसीद ।**
**विज्ञातुमिच्छामि भवन्तमाद्यं न हि प्रजानामि तव प्रवृत्तिम् ॥३१॥**

उग्ररूपधारी तुम्ही कोण आहात हे मला सांगा. तुम्हाला माझा नमस्कार असो. मजवर कृपा करा. तुमचे स्वरूप जाणण्याची मला उत्कंठा आहे. पण या सर्वामागील तुमचा उद्देश मला कळत नाही.

भगवान उवाच:–

**कालोऽस्मि लोकक्षयकृत्प्रवृद्धो लोकान्समाहर्तुमिह प्रवृत्तः ।**
**ऋतेऽपि त्वां न भविष्यन्ति सर्वे येऽवस्थिताः प्रत्यनीकेषु योधाः ॥३२॥**

भगवान म्हणाले, 'लोकांचा संहार करणारा व त्यासाठी वृद्धी पावलेला काळ मी आहे. येथे लोकांच्या संहारासाठी प्रवृत्त झालो आहे. तुझ्याखेरीज दोन्ही सेनेतील योद्धे नाहीसे होतील.

परमेश्वर हाच काल आहे. भगवंतानी अर्जुनाला युद्ध कर म्हणून सांगितले असता मी साफ लढणार नाही असे त्याने सांगितले. पण विश्वरूप दाखवून भगवंतानी त्याला प्रत्यक्ष दाखवून दिले की अर्जुनाच्या सहाय्याशिवाय भगवान सर्वांना एकदम मारण्यास समर्थ आहे. मीच एक जगदेकवीर आहे असा जो अर्जुनाला अभिमान होता तो हे विश्वरूप पाहून नाहीसा झाला. दुसरा अर्थ असा की, सर्वांचा संहार होत असलेला अर्जुनाने पाहिला, पण तो स्वतः बचावला होता. भगवंत आपल्या भक्ताचे रक्षण करतो हेही त्याला समजून आले.

**तस्मात्त्वमुत्तिष्ठ यशो लभस्व जित्वा शत्रून् भुङ्क्ष्व राज्यं समृद्धम् ।**
**मयैवैते निहताः पूर्वमेव निमित्तमात्रं भव सव्यसाचिन् ॥३३॥**

म्हणून अर्जुना तू ऊठ. विजयी हो. शत्रूंना जिंकून समृद्ध राज्याचा उपभोग घे. अरे मी ह्यांना पूर्वीच मारले आहे त्यांनाच तू मार. हे सव्यसाची अर्जुना तू फक्त निमित्तमात्र हो.

ज्यावेळी श्रीकृष्णाने पांचजन्य शंख फुंकला त्या आवाजानेच सर्व मृतवत् झालेले होते. हे सर्व वीर म्हणजे पेंढा भरलेल्या चित्राप्रमाणे

आहेत. आपल्या परमभक्त अर्जुनाची कीर्ती व्हावी म्हणून भगवंतच अर्जुनाला पुढे करून सर्व सूत्रे हलवीत असतात. भगवंत अर्जुनाला सव्यसाची असे संबोधून त्याला त्याच्या पराक्रमी स्वभावाची आठवण करून देतात व वेळ न घालविता ऊठ, आणि युद्ध करून विजयी हो. असा संदेश देतात.

**द्रोणं च भीष्मं च जयद्रथं च कर्णं तथान्यानपि योधवीरान् ।**
**मया हतांस्त्वं जहि मा व्यथिष्ठा युध्यस्व जेतासि रणे सपत्नान् ॥३४॥**

द्रोण, भीष्म, जयद्रथ, कर्ण आणि युद्धातील इतर वीर मी मारलेले आहेत. त्यांना तू ठार कर. भिऊ नको. युद्ध कर. प्रतिपक्षीयांना तू या युद्धात जिंकशील.

द्रोणाचार्य उत्कृष्ट धनुर्वेद जाणणारे होते. भीष्म इच्छामरणी होते. कर्ण कवचकुंडलधारी असल्याने त्याला मरणाची भीती नव्हती. तर जयद्रथाच्या पित्याने शंकराला प्रसन्न करून घेऊन माझ्या मुलाला मारणारा मरावा असा वर मिळविलेला होता. असे हे मरणाची भीती न बाळगणारे योद्धेसुद्धा भगवंतानी विश्वरूपाच्या मुखात गेल्याचे दाखवून दिले. याचाच अर्थ तुझा जय खात्रीने आहे, असा आशीर्वादच भगवंतानी अर्जुनाला येथे दिला आहे.

संजय उवाच—

**एतच्छ्रुत्वा वचनं केशवस्य कृताञ्जलिर्वेपमानः किरीटी ।**
**नमस्कृत्वा भूय एवाह कृष्णं सगद्गदं भीतभीतः प्रणम्य ॥३५॥**

संजय म्हणाला, भगवंताचे हे भाषण ऐकून अर्जुन थरथर कापू लागला व हात जोडून पुन: पुन: नमस्कार करून भयभीत होऊन सद्गदित वाणीने म्हणाला— (अर्जुन उवाच)—

**स्थाने हृषीकेश तव प्रकीर्त्या जगत्प्रहृष्यत्यनुरज्यते च ।**
**रक्षांसि भीतानि दिशो द्रवन्ति सर्वे नमस्यन्ति च सिद्धसङ्घाः ॥३६॥**

हे हृषीकेशा, तुझ्या माहात्म्याने जग हर्ष व प्रेम पावते हे योग्यच आहे. भयभीत झालेले राक्षस दशदिशांना पळत आहेत व सर्वसिद्धांचे संघ तुला नमन करीत आहेत.

हृषीक म्हणजे इंद्रिये. आपली इंद्रिये ही ईश्वराच्या ताब्यात असतात म्हणून त्याला हृषीकेश म्हणजे इंद्रियांचा स्वामी असे म्हणतात. मनुष्य इंद्रियांना खाणेपिणे देऊन पुष्ट करू शकतो. पण ईश्वरी प्रेरणा नसेल तर ती इंद्रिये हालचाल करू शकत नाहीत. आपली जमीन आपण चांगली तयार केली असली तरी सरकारला जरूर वाटली तर सरकार ती ताब्यात घेते, तसेच इंद्रिये आपली असली तरी त्यावर ताबा ईश्वराचा असतो.

तुझ्या कीर्तीने जगाला आनंद होतो. पदरी पुण्य असेल तरच ईश्वराची कीर्ती कानावर पडते, त्या श्रवणाने पातके जातात. ' कीर्तिं पापहरां विधाय जगतां तं जानकीशं भजे ' प्रत्येक अवतार अशी कीर्ती स्थापन करून नंतर ब्रह्मत्वाला जातो. हिमालयाचे उत्तुंग शिखरावर ध्वज लावणाऱ्याची, चंद्रावर जाऊन येणाऱ्याची किंवा बुद्धिबळ—पटूची सर्वत्र कीर्ती पसरते. पण त्या कीर्ती—श्रवणाचा सामान्य मानवाला काहीच उपयोग नसतो. पण भगवंताचे गुणगान ऐकल्यास पुण्यलाभ होतो.

' कालोऽस्मि लोकक्षयकृत्प्रवृद्धो ' हे भगवंताचे प्रकृष्ट वचन ऐकून जगताला विशेषतः सज्जनांना आनंद झाला. दुर्जनांच्या पीडेपासून रक्षण-कर्ता मिळाला म्हणून ते ईश्वरावर प्रेम करू लागले. कोणावर प्रेम करावे याला महत्त्व आहे. प्रेम करणे म्हणजे स्वतः अडकणे व दुसऱ्यालाही पाशात गोवणे होय. लहान मुलावर प्रेम असते. ते मूल आजारी पडले की काळजी व दुःख मागे लागते. तेच ईश्वरावर प्रेम केल्यास काळजी किंवा दुःख करण्याचा प्रसंगच येणार नाही. उलट मुक्ती मिळते. पोपटाला मांजरापासून वाचविण्यासाठी आपण त्याला पिंजऱ्यात ठेवतो. शिवाय

पोपट उडून जाऊ नये हा हेतूही असतो. आपण ईश्वराच्या प्रेम-पिंजऱ्यात स्वत:ला बद्ध करून घेतल्यास आपल्यावर काळाची झडप पडणार नाही व ईश्वर सर्वव्यापक असल्याने आपणास कोठे जाण्याचा प्रश्नही येणार नाही.

भक्त—वात्सल्यामुळे भगवंतानी अर्जुनाला विश्वरूप दाखविले म्हणून सिद्धांना आनंद झाला. पण ते पाहून राक्षस मात्र दशदिशांना पळत सुटले. म्हणून सर्वसिद्ध—संघानी भगवंताला नमस्कार केला. ईश्वराच्या कीर्तीमुळे चार कार्ये होतात, सज्जनांचे संरक्षण, दुर्जनांचे निर्दालन, सिद्धांचे वंदन व राक्षसांचे पलायन. जगत् चौघांना नमस्कार करते. शौर्यशाली, सत्ताधीश, धनाढ्य व विद्यासंपन्न हे ते चौघे होत, हे चारही गुण एका ईश्वराच्या ठिकाणी सामावलेले असतात, पण राक्षसांच्या स्वभावात नम्रतेचा अभाव असल्याने ते ईश्वरालाही नमन करीत नाहीत. पण ईश्वर अशा दुष्टांनाही शत्रू समजत नाही. त्यांचा वध करून त्यांचे कल्याणच करतो.

**कस्माच्च ते न नमेरन्महात्मन् गरीयसे ब्रह्मणोऽप्यादिकर्त्रे ।**
**अनन्त देवेश जगन्निवास त्वमक्षरं सदसत्तत्परं यत् ॥३७॥**

हे महात्मन्, अत्यंत महान ब्रह्माचा देखील आदिकर्ता तू आहेस, त्या तुला ते राक्षस कां नमस्कार करीत नाहीत? हे अनंत देवाधिदेवा जगन्निवासा, अक्षर, सत्-असत् व त्याच्या अतीत असलेले परब्रह्म तूच आहेस.

येथे भगवंताला गरीयसे, देवेश, जगन्निवास व अक्षर सत्—असत् अशी विशेषणे अर्जुनाने लावली आहेत. गरीयसे म्हणजे गुरूत्तम त्याच्या ज्ञानाची ऐश्वर्याची, तेजाची, बलाची, वीर्याची सर कोणालाच येत नाही. ब्रह्मदेवाने जगाची निर्मिती केली म्हणून तो वंद्य, तर भगवंत ब्रह्मदेवाचाही निर्माता म्हणून तो वंद्यतम आहे. देव सृष्टीचे नियमन करतात तर

परमेश्वर देवांचे नियमन करतो, म्हणून त्यास देवेश म्हटले आहे. तो जगाचा आधार म्हणून त्यास जगन्निवास म्हणतात. कुटुंबातील कर्ता-पुरुष हा त्या कुटुंबाचा आधार असतो. दुर्दैवाने तो गेला तर त्या कुटुंबाची दुर्दशा होते. इतर माणसे व पैसा असला तरी त्यांचा काही उपयोग होत नाही. सामान्य माणसाला जर इतके महत्त्व येते, मग जगाचा आधार असलेल्या परमेश्वराचे माहात्म्य काय वर्णावे? परमेश्वर अक्षर म्हणजे अविनाशी आहे. तो सत् म्हणजे इंद्रियगम्य पदार्थ व असत् म्हणजे अनुमानगम्य पदार्थ म्हणजेच कार्य व कारण तोच आहे. तसेच देशकाल वस्तू यांनी अपरिच्छिन्न असलेले परब्रह्महि तोच आहे.

**त्वमादिदेवः पुरुषः पुराणस्त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ।**
**वेत्तासि वेद्यं च परं च धाम त्वया ततं विश्वमनन्तरूप ॥३८॥**

तूं आदिदेव पुराण पुरुष आहेस.तू या विश्वाच्या अखेरीचे निवासस्थान आहेस. तू सर्व जाणतोस. जाणण्यालाही तूच योग्य आहेस. अत्यंत श्रेष्ठ आश्रयस्थान तूच आहेस. तू हे विश्व व्यापले आहेस.

आदिदेव म्हणजे सर्व जगाचा आद्य व स्वप्रकाश असलेला. पुरुष हे ईश्वराच्या पूर्णत्वाला उद्देशून घातलेले पद आहे. तो पूर्ण असून पुराण आहे म्हणजे सर्वात जुना व जीर्ण न होणारा आहे. कारण तो निर्विकार आहे. तो मन, अहंकार, इंद्रिये या सर्वांना पृथक् रूपाने जाणणारा (वेत्तासि) सारभूत पदार्थ आहे. परं निधान म्हणजे अव्याकृत माया तोच आहे. वेद्य म्हणजे जगातील सर्व पदार्थ ही तुझीच रूपे आहेत. परमेश्वर हेच परंधाम म्हणजे श्रेष्ठ तेज किंवा प्रकाश. प्रकाशामुळे अंधार जातो व भीतीही जाते. विजेचे दिवे प्रकाश देतात, पण जास्त शक्तीचे लावले तर उकडू लागते. शिवाय ते बारीक मोठे करता येत नाहीत. जास्त प्रकाशामुळे उकडू लागले तर पंखा लावावा लागतो, त्यामुळे वीज अधिक खर्च होऊन अधिक पैसे द्यावे लागतात. याप्रमाणे व्यवहारातील

तेज साधक व बाधक असे दोन्ही परिणाम करणारे असते, पण ईश्वराचे तेज कधीही बाधक होत नाही. ते नेहमी साधकच असते. ते तेज म्हणजेच जीव होय. परमेश्वर अनंतरूप असल्याने त्याने हे सर्व व्यापले आहे.

**वायुर्यमोऽग्निर्वरुणः शशाङ्कः प्रजापतिस्त्वं प्रपितामहश्च ।**
**नमो नमस्तेऽस्तु सहस्रकृत्वः पुनश्च भूयोऽपि नमो नमस्ते ॥३९॥**

वायु, यम, अग्नि, वरुण, चंद्र, ब्रह्मदेव आणि ब्रह्मदेवाचा पिता तूच आहेस. तुला सहस्रावधी नमस्कार असोत. पुनः पुनः तुला नमस्कार करतो.

वायु हा परमेश्वर आहे. वायु म्हणजे प्राण. प्राणामुळेच शरीराला किंमत आहे. प्राणहीन शरीराचा ताबडतोब नाश करावा लागतो. यम-ही त्याचेच रूप आहे. यम कोणाचे ऐकत नाही. त्याच्यापुढे कोणाचे काही चालत नाही. तो यावा म्हणून रोगी, जराजर्जर त्याची प्रार्थना करतात, पण त्यांचे न ऐकता एखाद्या ऐन उमेदीत असलेल्या तरुणाला तो घेऊन जातो. अग्नी हे देखील भगवंताचेच रूप आहे. शरीरात जठराग्नीच्या रुपाने तो राहतो, म्हणून अन्न पचन होते. अग्नी हा देवांचाही निर्वाहक आहे. यज्ञात दिलेले हविर्भाग अग्नीच ज्याचे त्यांना पोहोचते करतो. प्रत्येक कार्यात प्रारंभी विघ्नहर्त्या गणपतीचे जसे पूजन करतात तसेच वरुणाचेही करतात. वरुणही नीतीची अधिष्ठात्री देवता आहे व वरुण हे ईश्वराचेच रूप आहे. नीती हे सुखाचे साधन आहे. पण मनुष्य सुखाच्या लालसेने नीतिबाह्य वर्तन करतो व परिणामी दुःखाचा धनी होतो. ईश्वर चंद्ररुपाने वनस्पतीमध्ये रस निर्माण करतो. ब्रह्मदेवाने प्रथम मरीच्यादि ऋषी निर्माण केले व त्यांनी ही प्रजा निर्माण केली. म्हणून ब्रह्मदेव हा पितामह व ब्रह्मदेवाला निर्माण करणारा ईश्वर हा प्रपितामह होय. ही परमेश्वराचीच वेगवेगळी रूपे आहेत.

अर्जुन म्हणतो, 'भगवंता तुला माझा सहस्रवेळा नमस्कार असो. तुझे कोणालाच वर्णन करता येत नाही. तुझी स्तुती करता येत नाही. मग तुला नमस्काराखेरीज दुसरे काय द्यायचे? 'स्तवनेन वा नमस्कारेण वा' तुझी पूजा करावी असे शास्त्र आहे. नमस्कार करणे म्हणजे तुझे श्रेष्ठत्व मान्य करणे व स्वत:चे वेगळेपण विसरणे. देवा या तुझ्या विश्वरूपाची पूजा कोणत्याही उपचारांनी करता येणार नाही. नुसते गंध लावायचे म्हटले तरी आयुष्य पुरणार नाही, इतकी अगणित मस्तके आहेत. आब्रह्म व्यापलेल्या विश्वरूपाला माझ्या जवळची तोटगी उपचार साधने कशी पुरी पडतील. म्हणून पुन: पुन: नमस्कार करणे येवढेच माझ्या हाती आहे."

श्रद्धेचा व भक्तीचा आवेग आल्यावर तो आवरत नाही. याच अवस्थेत असलेला अर्जुन पुढे म्हणाला,

**नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते नमोऽस्तु ते सर्वत एव सर्व ।**
**अनन्तवीर्यामितविक्रमस्त्वं सर्वं समाप्नोषि ततोऽसि सर्वः ॥४०॥**

हे सर्वत्र असणाऱ्या प्रभो पुढून, मागून, सर्व बाजूंनी तुला नमस्कार असो. सामर्थ्याला अंत नसलेला व पराक्रमाला इयत्ता नसलेला तू आहेस. तू सर्व व्यापून आहेस, म्हणून सर्व तूच आहेस.

अर्जुनाने भगवंताला सर्व बाजूंनी नमस्कार केला. व्यवहारात पुढून नमस्कार केला जातो. त्याची पाठ वळली की त्याचे दोष काढायला सुरवात होते. लोखंडाच्या तापलेल्या गोळ्यात जशी आंत व बाहेर सर्वत्र उष्णता भरलेली असते, त्याप्रमाणे ईश्वर जगाच्या अंतर्बाह्य भरलेला आहे. म्हणून त्याला 'सर्व' हे नाव योग्य आहे. तो कोणत्याही व्यक्तीची कोणत्याही कार्यात योजना करतो. तो जी इच्छा करील ते होते. म्हणून त्याला अनंतवीर्य असे म्हटले आहे. एकाच

पावलात पृथ्वी व्यापण्याचा त्याने पराक्रम केला, म्हणून त्याला अमित-विक्रम म्हणतात.

**सखेति मत्वा प्रसभं यदुक्तं हे कृष्ण हे यादव हे सखेति ।**
**अजानता महिमानं तवेदं मया प्रमादात्प्रणयेन वापि ॥४१॥**

तुझा हा महिमा न जाणणारा मी प्रमादामुळे अथवा प्रेमामुळे मित्र समजून तुच्छतापूर्वक 'हे कृष्णा, हे यादवा, हे सख्या इत्यादी जे तुला बोललो—

अर्जुन म्हणतो, "तुला मी सखा म्हणजे मित्र मानले. पण कुठे तू व कुठे मी? बाळपणातील मैत्रीच्या आधारावर एखाद्या उच्च पदस्था-बरोबर मैत्रीचे संबंध जोडू पाहणे हास्यास्पद ठरते. शिवाय

'ददाति प्रतिगृह्णाति गुह्यमाख्याति पृच्छति ।
भुंक्ते भोजयते चैव षड्विधं प्रीतिलक्षणम् ॥"

(देणे–घेणे गुह्य सांगणे–विचारणे, जेवणे व जेऊ घालणे ही मैत्रीची सहा लक्षणे होत) यापैकी कोणतीच संभावना नसता मी तुला मित्र मानले, हा माझा धीटपणाच म्हटला पाहिजे. अरे कृष्णा, अशा तुला एकेरी हाका मारल्या. हे यादवा, असे तुझ्या कुलपुरुषावरून संबोधिले. पण देवा हे सर्व माझ्या अज्ञानामुळे घडून आले. आता तुझ्या स्वरूपाचे यथार्थ ज्ञान झाल्याने माझेकडून अशी चूक पुनः घडणार नाही.

**यच्चावहासार्थमसत्कृतोऽसि विहारशय्यासनभोजनेषु ।**
**एकोऽथवाप्यच्युत तत्समक्षं तत्क्षामये त्वामहमप्रमेयम् ॥४२॥**

आणि हे अच्युता क्रीडा, शयन, आसन, भोजन इत्यादी प्रसंगी तू एकटा असता अथवा लोकादेखत तुझा उपहास करण्याकरिता जो तुझा अपमान केला, त्याबद्दल हे अप्रमेया तू मला क्षमा कर.

अनेक प्रसंगी अर्जुनाचे हातून सहज कृष्णाचे बाबतीत तो एकटा असताना किंवा चारचौघादेखत अपराध घडले असतील, त्याबद्दल त्याने

भगवंताची क्षमा मागितली. भोजनप्रसंगी प्रमाद अधिक घडतात. म्हणून आपल्या शास्त्रकारांनी जेवताना मौन पाळावे असे सांगितले आहे. (पाश्चात्य संस्कृती बरोबर याच्या विरुद्ध आहे) दुसऱ्याने केलेले अपराध मनुष्य सहसा विसरत नाही, उलट संधी साधून उट्टे काढल्याशिवाय रहात नाही. पण भगवान क्षमाशील आहे हे जाणून अर्जुनाने विनंती केली.

**पितासि लोकस्य चराचरस्य त्वमस्य पूज्यश्च गुरुर्गरीयान् ।**
**न त्वत्समोऽस्त्यभ्यधिकः कुतोऽन्यो लोकत्रयेऽप्यप्रतिमप्रभाव ॥४३॥**

या चराचर जगाचा तूं पिता आहेस. अत्यंत पूज्य व आद्य असा तू जगाचा गुरू आहेस आणि गुणादिकांनी श्रेष्ठ आहेस. हे अप्रतिमप्रभावा, तीन्ही लोकात देखील तुझ्यासारखा कोणीही नाही. मग तुझ्याहून अधिक कोठून असणार ?

परमेश्वर सर्व चराचराचा पिता असल्याने त्याचे सामर्थ्य प्रचंड आहे. तो पूज्य म्हणजे आदरणीय व वंद्य आहे. सामान्य पित्याजवळ काही गुण तर काही दोष असतात. म्हणून त्याचा अपराध केला तर एक वेळ खपून जाईल. वात्सल्यामुळे पिता ते विसरेलही. पण भगवंतात फक्त गुण आहेत दोष तर सापडणारच नाहीत. असे असताही अर्जुनाचे हातून त्याचे अपराध घडले म्हणून त्याला खंत वाटत आहे. ईश्वराची बरोबरीसुद्धा कोणी करू शकत नाही, मग त्याच्याहून अधिक गुणवान कसा सांपडू शकेल. ईश्वराच्या प्रभावाला दृष्टांतच देता येत नाही.

**तस्मात्प्रणम्य प्रणिधाय कायं प्रसादये त्वामहमीशमीड्यम् ।**
**पितेव पुत्रस्य सखेव सख्युः प्रियः प्रियायार्हसि देव सोढुम् ॥४४॥**

म्हणून शरीर नम्र करून तुझी कृपा भाकतो. तू स्तुती करण्यास योग्य आहेस. म्हणून ज्याप्रमाणे पिता पुत्राला क्षमा करतो, मित्र मित्राचे

अपराध मनात आणीत नाही, प्रिय पत्नीचे अपराध पति विसरतो, त्याप्रमाणे तूही माझे अपराध पोटात घाल.

**अदृष्टपूर्वं हृषितोऽस्मि दृष्ट्वा भयेन च प्रव्यथितं मनो मे ।**
**तदेव मे दर्शय देव रूपं प्रसीद देवेश जगन्निवास ॥४५॥**

आतापर्यंत कधीही न पाहिलेले हे विश्वरूप मला पहावयास मिळाले म्हणून मला आनंद झाला हे खरे. पण त्यातील ऊग्रता पाहून मात्र मी भयभीत झालो आहे. म्हणून देवाधिदेवा, जगन्निवासा मजवर प्रसन्न होऊन हे आपले भयानक रूप आवरून घे व नेहमीचे शामसुंदर रूप मला दाखव.

**किरीटिनं गदिनं चक्रहस्तमिच्छामि त्वां द्रष्टुमहं तथैव ।**
**तेनैव रूपेण चतुर्भुजेन सहस्रबाहो भव विश्वमूर्ते ॥४६॥**

किरीट, गदा व सुदर्शनचक्र धारण केलेले तुझे रूप बघण्याचीच माझी इच्छा आहे. म्हणून हे सहस्रबाहूधारी विश्वरूप आवरते घेऊन तुझे चतुर्भुज रूप प्रगट कर.

श्रीभगवान उवाच—

**मया प्रसन्नेन तवार्जुनेदं रूपं परं दर्शितमात्मयोगात् ।**
**तेजोमयं विश्वमनन्तमाद्यं यन्मे त्वदन्येन न दृष्टपूर्वम् ॥४७॥**

श्रीभगवान म्हणाले—अर्जुना, तुझ्यावर प्रसन्न होऊन माझ्या योग-सामर्थ्याने श्रेष्ठ, तेजोमय व आदि अंत नसलेले विश्वात्मक रूप मी तुला दाखविले. तुझ्याखेरीज हे विश्वरूप मी कोणासही आतापर्यन्त दाखविलेले नव्हते.

**न वेदयज्ञाध्ययनैर्न दानैर्न च क्रियाभिर्न तपोभिरुग्रैः ।**
**एवंरूपः शक्य अहं नृलोके द्रष्टुं त्वदन्येन कुरुप्रवीर ॥४८॥**

वेदाध्ययन, यज्ञ, दान, उग्र तप वगैरे क्रियांनीसुद्धा माझे हे विश्वरूप तुझ्याखेरीज दुसरा कोणी पाहू शकलेला नाही. तू जसे मला विश्वरूपात पाहिलेस, तसे रूप कोणत्याही साधनांनी दिसू शकणार नाही.

**मा ते व्यथा मा च विमूढभावो दृष्ट्वा रूपं घोरमीदृङ्ममेदम् ।**
**व्यपेतभीः प्रीतमनाः पुनस्त्वं तदेव मे रूपमिदं प्रपश्य ।।४९।।**

हे घोर रूप पाहून आता तू गोंधळून जाऊ नकोस. व्यथितही होऊ नको. तुला हवे असलेले माझे पूर्वीचे रूप पुनः पाहा. आता तुझी भीती जायला हरकत नाही. तू प्रसन्नचित्त हो.

संजय उवाच—

**इत्यर्जुनं वासुदेवस्तथोक्त्वा स्वकं रूपं दर्शयामास भूयः ।**
**आश्वासयामास च भीतमेनं भूत्वा पुनः सौम्यवपुर्महात्मा ।।५०।।**

संजय म्हणाला, असे बोलून वासुदेवाने पुनः पूर्वीचे रूप दाखविले व तो महात्मा सौम्यरूपधारी होऊन भयभीत अर्जुनाला धीर देता झाला.

अर्जुनाला भगवंतानी विश्वरूप दाखविले. अर्जुन आश्चर्यचकित व भयभीत झाला व त्याने पुनः सौम्य रूप दाखविण्याची विनंती केली, यावरून अर्जुनाची अयोग्यता व्यक्त झाली. तरी भगवंत त्यावर रागावले नाहीत. मोठ्या माणसाकडे गेल्यावर त्याने देऊ केलेली गोष्ट नाकारल्यास त्या मोठ्या व्यक्तीस राग येतो, त्याला आपला अपमान झाला असे वाटते. अर्जुनाने विश्वरूप पाहण्याचे नाकारले तरी भगवान श्रीकृष्ण महात्मे मोठ्या मनाचे असल्याने रागावले नाहीत. शिवाय अर्जुन त्यांचा प्रिय शिष्य होता. यावरून अर्जुनाचे महद्भाग्यच सिद्ध होते. नुसते सौम्य रूप पाहून कदाचित अर्जुनाची भीती कमी होणार नाही, म्हणून कृपावंत होऊन भगवंतानी त्याचेवर अमृतमय वाणीचा वर्षाव केला. सुदैवाने मृताला अमृताचा लाभ झाल्यावर त्याला जसा आनंद होईल, त्याप्रमाणे अर्जुन आनंदातिशयाने बोलू लागला.

अर्जुन उवाच—

**दृष्ट्वेदं मानुषं रूपं तव सौम्यं जनार्दन ।**
**इदानीमस्मि संवृत्तः सचेताः प्रकृतिं गतः ।।५१।।**

अर्जुन म्हणाला हे, जनार्दना, हे तुझे सौम्य मानवरूप पाहून आता मन ठिकाणावर येऊन मी पूर्ववत् सावध झालो आहे.

जन ज्याची प्रार्थना-याचना करतात तो जनार्दन. त्याच्या प्रेममय स्वभावाची अर्जुनाला जाणीव झाली. ‘ आपदि मित्रपरीक्षा ’ म्हणजे संकटकाळी मित्राची परीक्षा होते. अर्जुन भीतीने संकटात सापडल्या-सारखा झाला होता. सौम्यरूप दाखवून जनार्दनाने त्याला संकटातून मुक्त केले. देव हे तेजस म्हणून त्याना भगवंताचे तेजोमय विश्वरूप आवडते. पण मानवाला देवाचे पार्थिव शरीरच आवडते. भीष्म-द्रोणा-सारख्या महान योद्ध्यांचा विश्वरूपाच्या कराल दाढेत झालेला चेंदामेंदा पाहून अर्जुनाला आपलीही तीच गत होते की काय अशी भीती वाटत होती. त्यामुळे सौम्यरूप पाहून त्याची भीती नष्ट झाली. भगवंताचे सौम्यरूप इतके सुबक होते की, शत्रूनेही त्यावर मोहित होऊन पहात रहावे. या साजिऱ्या गोजिऱ्या मुखाने भगवान आपला ग्रास घेणार नाही अशी त्याची खात्री होती.

श्रीभगवान उवाच—

**सुदुर्दर्शमिदं रूपं दृष्टवानसि यन्मम ।**
**देवा अप्यस्य रूपस्य नित्यं दर्शनकाङ्क्षिणः ॥५२॥**

श्रीभगवान म्हणाले— महत्प्रयासानेही दिसण्याला कठीण असे जे माझे रूप तू पाहिलेस, त्या रूपाचे दर्शनासाठी देव देखील नेहमी उत्सुक आहेत.

बल, पराक्रम, सात्त्विकता, कर्तृत्व, अधिकार इत्यादी गुणांनी युक्त असलेले देव मानवापेक्षा किती तरी श्रेष्ठ, ते सुद्धा विश्वरूप पाहण्या-साठी उत्सुक असतात. पण त्यांनाही भगवंतानी ते दाखविलेले नाही.

**नाहं वेदैर्न तपसा न दानेन न चेज्यया ।**
**शक्य एवंविधो द्रष्टुं दृष्टवानसि मां यथा ॥५३॥**

ज्या प्रकारे तू मला पाहिलेस त्या प्रकारे वेदपठणाने, तपाने, दानाने अथवा यज्ञाने देखील मी कोणाला दिसणे शक्य नाही.

परमार्थाची साधने फक्त वेदांनीच प्रतिपादावी. 'तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते' या वाक्याने भगवंतानीही वेदांचा अधिकार मानला आहे. ती जबाबदारी ते आपल्यावर घेत नाहीत. वेदांचा अर्थ कळला तर उत्तमच. पण गुरुमुखातून निघालेल्या उच्चाराबरहुकूम अर्थ न कळताही जरी वेदपठण केले तरी पुण्य लाभते. पण यासाठी वाणी अतिशय शुद्ध असावी लागते. तप करायला अंगात शक्ती हवी. दान व यज्ञ करायला पैशाचे व सहकाऱ्यांचे पाठबळ हवे. ही साधने कामना बाळगून केलेली असतात. म्हणून ती कितीही केली तरी त्यामुळे अर्जुनाला घडले तसे विश्वरूपदर्शन घडणार नाही. मग अर्जुनाला विश्वरूप कोणत्या बळावर घडले ते भगवान पुढे सांगतात.

**भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन ।**
**ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप ।।५४।।**

पण हे अर्जुना अशा स्वरूपाच्या मला अनन्य भक्तीच्या योगाने तत्त्वतः जाणणे, पाहणे व माझ्यामध्ये लीन होणे शक्य आहे.

वर सांगितलेली साधने व्यर्थ असून एक अनन्य भक्तीनेच विश्वरूपाचे दर्शन घडते. भगवंताचे ज्ञान होण्यास, त्याचे दर्शन घडण्यास व प्रत्यक्ष तत्त्वसाक्षात्कार होण्यासाठी अनन्य भक्तीच हवी. त्या अनन्य भक्तीचा सोपा मार्ग पुढील श्लोकात भगवंत सांगत आहेत.

**मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्तः सङ्गवर्जितः ।**
**निर्वैरः सर्वभूतेषु यः स मामेति पाण्डव ।।५५।।**

हे पांडवा, मत्प्रीत्यर्थ कर्म करणारा, मीच प्राप्तव्य आहे असे मानणारा माझा भक्त, संसार-संगरहित, कोणाही भूताशी वैरभाव नसलेला असा पुरुष मजप्रत येतो.

ईश्वरासाठी सर्व कर्मे करायची याचेच नांव कर्मयोग. ईश्वराला सर्वश्रेष्ठ मानून त्याचेवर प्रेम करायचे याचे नांव भक्तियोग. आसक्ती सोडायची व निर्वैर व्हायचे यात सर्व ज्ञानयोग आला. कर्म, भक्ती व ज्ञानाचे रहस्य सांगणारा हा श्लोक म्हणजे सर्व गीतेचे सार होय असे कांही विद्वानांचे मत आहे. नोकरी हेच ध्येय ठरल्यावर कुठेही बदली झाली, राहण्याची सोय नसली किंवा भोजनाची पंचाईत असली,तरी मनुष्य बदलीच्या गावी जातो. तो इतर गोष्टींची पर्वा करीत नाही. तसेच ईशप्राप्तीचे ध्येय पुढे ठेवायचे. त्याला प्राधान्य देऊन धनदौलत, बायकामुले यांना गौण समजले पाहिजे. अनन्य भक्तीनेच परमेश्वरप्राप्ती होते. मग नित्यनैमित्यिक कर्मे कशाला करायची असे म्हणून ती कोणी बंद करील म्हणून भगवंतानी एकाच श्लोकात भक्ती, कर्म व ज्ञानाचे महत्त्व प्रतिपादन केले आहे. विहित कर्मे ही केलीच पाहिजेत. नाहीतर भक्तीच श्रेष्ठ असा सिद्धांत मांडल्यास तो कर्मयोगाचा अपसिद्धांत ठरेल. ज्या वेदांनी भक्तीचा महिमा गायला आहे त्या वेदांनीच कर्ममार्गाचेही प्रतिपादन केले आहे. ' रामकृष्णहरी ' हाच मंत्र आणि ' केशवाय नमः ' हा मंत्र नव्हे असे कोणी म्हणत नाही. वेदाचे अक्षर अन् अक्षर मंत्ररूपच आहे. वेदप्रणीत सर्व कर्मे करा. फक्त ती स्वर्ग किंवा अन्य विषयप्राप्तीची कामना बाळगून करू नका, तर ईश्वर प्राप्तीसाठी करा, म्हणजे भुक्ती व मुक्ती या दोन्हींचा लाभ घडतो.

इति श्रीमद् भगवद् गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे विश्वरूपदर्शनयोगो नाम एकादशोऽध्यायः॥

◊ ◊ ◊

# अध्याय १२ वा.

अर्जुन उवाच–

**एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्युपासते ।**
**ये चाप्यक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमाः ॥ १ ॥**

अर्जुन म्हणाला– याप्रमाणे सतत ( तुझ्या व्यक्त रूपाच्या ठिकाणी) युक्त असलेले जे भक्त तुझी उपासना करतात आणि जे अव्यक्त अशा अक्षर ब्रह्माची उपासना करतात, त्या दोन प्रकारच्या योग्यांपैकी उत्तम योगी कोणते ?

एवं हे पद अकराव्या अध्यायाच्या शेवटी सांगितलेल्या भक्ताच्या पांच लक्षणांना उद्देशून आहे. ती लक्षणे अशी– १ ) मत्कर्मकृत्– माझ्यासाठी कर्मे करणारा, २ ) मत्परमो– मलाच श्रेष्ठ मानणारा ३ ) मद्भक्त-- माझ्यावर प्रेम करणारा, ४ ) संगवार्जित-- आसक्ती नसलेला व ५ ) निर्वैर-- वैरभाव नसलेला. या पाच लक्षणांनी युक्त असलेला सगुणोपासक भक्त श्रेष्ठ की अव्यक्ताची उपासना करणारे निर्गुणोपासक श्रेष्ठ असा अर्जुनाचा सवाल आहे. सगुणोपासना श्रेष्ठ मानली तर निर्गुणोपासनेस गौणत्व येते का ? इंद्रियांचा संयम, समबुद्धित्व, सर्वभूतहितत्व अशा साधनांनी ज्याची प्राप्ती होते ते कमी प्रतीचे कसे असेल असा अर्जुनाचा विचारण्याचा रोख आहे.

' न जायते म्रियते वा कदाचित् ' या श्लोकापासून भगवंतानी निर्गुणोपासना सांगितली व सात आठ व दहा या अध्यायात सगुणोपासना प्रतिपादन केली. भगवंताकडून दोन्ही उपासनेबद्दल श्रवण केल्यावर यापैकी श्रेयस्कर कोणती असा साहजिकच प्रश्न उभा राहतो. कोणत्याही शंका राहू नयेत असा भगवंताचा प्रयत्न आहे. म्हणून अर्जुनाला निमित्त करून भगवंत जगाला उपदेश करीत आहेत.

साधकाने प्रथम सगुणोपासना सुरू करावी, कारण ती सुलभ आहे. शंखचक्र–गदापद्मधारी भगवान विष्णूचे किंवा दंडधारी प्रभू रामचंद्राचे ध्यान करावे. या स्वरूपसुंदर मूर्तींच्या ठिकाणी मन सहज रमते. ध्यानातच पूजा, अर्चा इत्यादींचा समावेश होतो. सगुणोपासना परिपूर्ण झाली तर साधकास या जन्मातच साक्षात्कार होतो. अपूर्ण राहिल्यास त्यास क्रममुक्ती मिळते. म्हणजे प्रथम तो देवलोकी जातो व तेथून ब्रह्मलोकात जातो. ब्रह्मलोकात त्याला ब्रह्मदेवाकडून ज्ञान मिळते व तो मुक्त होतो. भक्ताने मोक्षाची मागणी केली नसली तरी परमेश्वर त्याला ज्ञानसंपन्न करून मुक्त करतो. कारण ‘ददामि बुद्धियोगं तं’ हे त्याचे ब्रीद आहे.

नामदेव विठ्ठलाची सगुणभक्ती करीत होता. देव त्याच्याशी बोलत इतकी त्याची भक्ती उत्कट होती. तरी देवानी प्रथम त्याला ज्ञानासाठी विसोबा खेचराकडे पाठविले. विसोबानी गुरूपदेश देऊन त्यास निर्गुणाचा बोध केला. ‘तेषामहं समुद्धर्ता’ अशी सगुणोपासकांची जोखीम भगवंताने पत्करली आहे, म्हणून सगुणोपासना सुलभ. एकाला परीक्षेत प्रथम श्रेणीत प्रथम क्रमांक मिळाल्यामुळे नोकरी लागली तर दुसरा कोणाच्या तरी वशिल्याने चिकटतो. सगुणोपासकास ईश्वराच्या सहाय्याने मुक्ती मिळते. कोणी मेलने प्रवास करतात तर कोणी पॅसेंजर गाडीने. मेल गाडी अधली मधली स्टेशने घेत नाही. त्यामुळे ती मुक्कामास लवकर जाऊन पोहचते. ज्याची पूर्वजन्मीची तयारी असेल तो मधली ठाणी वगळून निर्गुणाच्या मुक्कामी लवकर जाऊन पोहचतो.

विहित कर्मे करायची व ती ईश्वराला अर्पण करून टाकायची. त्याचे फळ मागायचे नाही. असे करता करता ईश्वराशी प्रेमाचे नाते जमते. प्रथम तो भक्त बनतो, नंतर त्याला ज्ञान होते. विष्णूचे ध्यान करताना प्रथम पदकमळापासून सुरवात करून शेवटी भगवंताच्या मुखावरील हास्यावर दृष्टी केन्द्रित करावयाची असते. एकदम आनंदावरच

दृष्टी ठेवण्यास हरकत नाही, पण ते जमणे अशक्य होते. साधनाऐवजी साध्यच एकदम घ्यावयास गेले तर घोटाळा होतो. म्हणून प्रथम साधने करणे आवश्यक आहे.

एक गोष्ट श्रेष्ठ म्हटली की दुसरी कनिष्ठ होतेच असे नाही. अर्जुन भक्तराज म्हणून श्रेष्ठ आहे असे म्हटले म्हणजे धर्मराज कनिष्ठ ठरत नाही. सगुणोपासना जमायला योग यावा लागतो. जसे मुलीला उत्कृष्ट स्थळ, रहायला मध्यवस्तीत स्वस्तात घर किंवा मनासारखी नोकरी मिळायची असेल तर योग जुळून यावा लागतो. पूर्वपुण्याई असावी लागते. भक्ती चांगली खरी, पण ती पूर्वपुण्याईशिवाय जमत नाही. धन, पत्नी, मुलगा, नातू इत्यादींमधे मन सहज रमते. ईश्वराकडे मन लागायला योग यावा लागतो.

ज्ञानी स्वसामर्थ्यावर मोक्ष मिळवितो, म्हणून निर्गुण श्रेष्ठ हे खरे. पण त्यासाठी मनातून आसक्तीचा पूर्ण निरास व्हावा लागतो. आसक्ती आपोआप नष्ट होत नाही. त्यासाठी अनेक साधने करावी लागतात. सगुणोपासना हे त्यापैकी एक आहे. सुरवातीसच एकच भाकरी करू व ती उत्तम करू असे म्हटले तर ते शक्य होणार नाही. पांच दहा भाकरी भाजाव्या तेव्हा त्यातील एखादी चांगली होईल. म्हणून ईश्वर-प्रसन्नतेसाठी जमतील तितकी साधने करावी.

गीता हा प्रमाणभूत ग्रंथ मानला जातो. कारण गीतेत प्रक्षिप्त असे काही नाही. गीतेने सगुण श्रेष्ठ आहे असे सांगून पुढे सगुणाचीच स्तुती केली आहे. सगुणोपासक ईश्वरापासून निराळा असतो. म्हणून हवे तर त्यास श्रेष्ठ मानावे. पण निर्गुणोपासक ज्ञानामुळे भगवद्रूपच बनतो. त्यामुळे तेथे श्रेष्ठ-कनिष्ठ असा प्रश्नच उपस्थित होत नाही.

श्रीभगवान उवाच—

**मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते ।**
**श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः ॥ २ ॥**

भगवान म्हणाले, " माझ्या ठिकाणी मन ठेवून, नित्ययुक्त होऊन अतिशय श्रद्धेने युक्त असे जे माझी उपासना करतात ते सर्वांत उत्कृष्ट योगी ( सगुणोपासक ) असे मी समजतो.

यज्ञयागादी शास्त्रोक्त कर्मे कठीण,कारण त्यात अनेक नियम पाळावे लागतात. अशी कर्मे करून ती ईश्वरार्पण करणे त्याहीपेक्षा कठीण. उपासनेत मत्कर्मकृत् वगैरे प्रथम सांगितलेले पाच नियम आहेत,ते पाळणे कर्मापेक्षा क्लेशकारक असून ज्ञान त्याहीपेक्षा कठीण, कारण त्यात पुढील गोष्टी असाव्या लागतात—

**ये त्वक्षरमनिर्देश्यमव्यक्तं पर्युपासते ।**
**सर्वत्रगमचिन्त्यं च कूटस्थमचलं ध्रुवम् ॥ ३ ॥**

तथापि जे अक्षर, अनिर्देश्य, अव्यक्त, सर्वव्यापी, अचिंत्य, अविकारी, अचल व ध्रुव ( अशा वस्तूची ) उपासना करतात.

निर्गुण ब्रह्म हे अक्षर म्हणजे नाश न पावणारे आहे. त्याचे शब्दांनी वर्णन करता येत नाही. ते अव्यक्त आहे. सर्वत्र त्याचीच सत्ता आहे. ते सर्वव्यापक आहे. मन सूक्ष्म पण ब्रह्म त्याहूनही सूक्ष्म म्हणून तेथे मनाची गती चालत नाही. कूटस्थ म्हणजे निर्विकार. अचलं ध्रुवं म्हणजे नित्य. अशा निर्गुण ब्रह्माची उपासना करणाऱ्यांना ईश्वराची एकदम प्राप्ती होते.

**संनियम्येन्द्रियग्रामं सर्वत्र समबुद्धयः ।**
**ते प्राप्नुवन्ति मामेव सर्वभूतहिते रताः ॥ ४ ॥**

ते ( उपासक ) इंद्रिय समुदायाचे नियमन करून सर्वत्र समबुद्धी ठेवणारे, व सर्वभूतांचे जे हित त्यामध्ये रत असणारे देखील माझ्याप्रतच येतात.

निर्गुण उपासनेत इंद्रियांचा निग्रह करावा लागतो. विषय दिसला म्हणजे नव्हे तर त्याचे नुसते स्मरण झाले तरी इंद्रिये धावू लागतात, त्यांना आवरणे अतिशय कठीण. बाळपणापासून निग्रहाची सवय असावी लागते. पूर्वी विद्यार्थ्यास गुरुगृही राहावे लागे. गुरु वा गुरुपत्नी सांगतील ती व सांगतील तेव्हा कामे करावी लागत. तहानभूक लागली असली तरी बोलता येत नसे. अशी गुरुसेवा, वृद्धसेवा करावी लागल्याने आपोआप संयम पाळण्याचे शिक्षण मिळत असे.

निर्गुणोपासकाची सर्वत्र सम बुद्धी असावी लागते. पदार्थ दिसल्याबरोबर त्याबद्दल आवड किंवा नावड निर्माण होते. हे बंद करावे लागते म्हणजे समबुद्धी होते. आपल्या प्रिय व्यक्तीला पीडा देण्याची आपली प्रवृत्ती नसते. असेच वर्तन सर्वांबद्दल असले पाहिजे. दुसरा आपणास त्रास देतो. त्याला तशी बुद्धी आपल्या कर्मांमुळे होत असते, हे लक्षात घेऊन त्रास देणाऱ्यावर रागावणे इष्ट नाही. प्रभू रामचंद्र, नलराज, धर्मराज अशा सदाचारसंपन्न लोकांनाही विपत्ती भोगाव्या लागल्या. मग आपली काय कथा असा विवेक करून दुसऱ्याने पीडा दिली तरी परतफेड करू नये. अशी ही निर्गुण उपासनेची साधने क्लेशदायक आहेत.

**क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ।**
**अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥५॥**

अव्यक्त ब्रह्माच्या ठिकाणी ज्यांचे चित्त आसक्त आहे त्यांना अधिक क्लेश असतात. कारण देहधारी व्यक्तींना अव्यक्त ब्रह्मप्राप्तीचा मार्ग कष्टाने साध्य होतो.

निर्गुण उपासनेत क्लेश अधिक, कारण देह म्हणजेच मी हा अनेक जन्मींचा संस्कार सुटता सुटत नाही. जग हे सत्य आहे ही दुसरी भावनाही सहजासहजी नष्ट होत नाही. राज्य मिळावे म्हणून सर्वजण धडपडत असतात. पण हक्काचे युवराजपद चालून आले असता पितृवचन

खरे करण्यासाठी ते सोडून वनवास पत्करणारा रामासारखा एखादाच. त्याचप्रमाणे देहासक्ती सोडणारेही दुर्भिळ असतात. जन्मांतरीची पुण्याई असेल तरच निर्गुण उपासनेकडे मनुष्य वळतो. सर्व विषयवासना सोडायच्या, अवघड नियम पाळायचे हे काम क्लेशकारक खरे. पण सर्वोत्कृष्ट फळ हवे असेल तर कष्टही तसेच करावे लागतात. मोठेपणाचा मार्ग मरणाच्या दारातून जातो ही म्हण म्हणूनच पडलेली आहे. क्लेश न घेता जे फळ मिळते ते नित्य टिकत नाही, हेही लक्षात ठेवावे.

> ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः ।
> अनन्येनैव योगेन मां ध्यायन्त उपासते ॥६॥
> तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् ।
> भवामि न चिरात्पार्थ मय्यावेशितचेतसाम् ॥७॥

पण हे पार्था, जे सर्व कर्मे मला अर्पण करून, मत्पर होऊन अनन्य भक्तियोगाने माझे ध्यान करीत उपासना करतात— माझ्या ( सगुण स्वरूपाच्या ) ठिकाणी ज्यांनी चित्त ठेवले आहे अशा त्यांना ( भक्तांना ) मी अल्पकाळात मृत्युरूप संसार-सागरातून वर काढतो.

प्रतिबंध नसतील व मन एकाग्र होत असेल तरच सगुणभक्ती करता येते. भगवंताच्या सुहास्य मूर्तीचे ध्यान करू लागल्यावर मनात सुंदर रूपाऐवजी भलभलते विषय येतात. ध्यान साधायला दीर्घ प्रयत्न व निश्चयाची आवश्यकता असते. जगातील सर्व पदार्थ सोडून फक्त भगवंताला आत्मसात करणे याचे नांव सगुणध्यान.

मानवी देहात सत्त्व रज तम या त्रिगुणांची वस्ती आहे. भगवंत शुद्धसत्त्व विग्रहवान असल्याने आपल्या देहांतील सत्त्वगुणाची वृद्धी झाल्याखेरीज भगवंत भेटू शकत नाही. ' सत्त्वात् संजायते ज्ञानम् ' या उक्तीप्रमाणे सत्त्ववृद्धी झाली की ध्यान-धारणेची परिणती आपोआप निर्गुण उपासनेत होते. वस्त्रापेक्षा शरीराची किंमत जास्त व शरीरापेक्षा

आतील चेतन मौल्यवान. भगवंताचे रूप अवर्णनीय सुंदर दिसते त्याला कारण आतील चेतन होय. निर्गुणोपासक या आतील आनंदाचा लाभ करून घेतो. सगुणोपासक आपली जबाबदारी परमेश्वरावर टाकत नाही. ईश्वरच आपणहून त्याची जबाबदारी घेतो. निर्गुणोपासक चिंतनाने, स्वसामर्थ्याने, 'ज्ञानी त्वात्मैव मे मतम्' या न्यायाने ईश्वराचा आत्माच बनून जातो. म्हणून त्याचे रक्षण करण्याची वेगळी गरज रहात नाही. अचिंत्य अव्यक्त परमात्म्याचे चिंतन करणे म्हणजे निर्गुणाचे ध्यान करणे असे भाष्यकार म्हणतात.

स्वसामर्थ्याने भवसागर तरून जाणे कठीण म्हणून त्यास मृत्युसंसार सागर असे म्हटले आहे. या संसारसागराच्या पोटी तापत्रयाचा वडवानळ आहे. रागद्वेषाच्या मगरी आहेत. पण ज्ञान प्राप्त झाल्यावर या संकटांचा त्रास होत नाही. कारण ज्ञानी ईश्वरी आनंदात निमग्न झालेला असतो. सगुण भक्त पूर्णपणे 'मय्यावेशित' झाला की ईश्वर धावून जातो. भर राजसभेत विंटबना सुरू होताच द्रौपदीने प्रथम आपल्या पतीकडून मदतीची अपेक्षा केली. पण त्यांनी माना खाली घातल्या होत्या. भीष्मद्रोणांनी मौन धारण केले. अशा वेळी 'तुजविण दूजा और न कोई' असा भगवंताचा धावा केला. तेव्हा त्याला वस्त्रे पुरविणे भाग पडले.

मनाची धांव विषयाकडे असते व त्यातच ते रमते. प्रयत्नपूर्वक मन ध्यानात गुंतविले असता दूध आले किंवा उतू गेले असे शब्द कानी येताच मन ईश्वराला सोडून दुधात बुडी मारते. कितीही अडथळे आले तरी ज्याचे मन पुनः पुनः ईश्वराकडेच धांव घेते, त्याचा संसार-सागरातून परमेश्वर उद्धार करतो.

**मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय ।**
**निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं न संशयः ॥८॥**

माझ्या ठिकाणी मन स्थापन कर. माझ्या ठिकाणी बुद्धी स्थिर कर म्हणजे त्यानंतर तू माझ्या ठिकाणी निवास करशील, मद्रूप होशील यात संशय नाही.

सतत ईश्वराचे चिंतन करणारा व ईश्वर प्राप्ती करून घेण्याचा दृढनिश्चय असलेला मुक्त होतो. प्रयत्न अपुरे पडले किंवा पुरे होण्या-पूर्वीच मृत्यु आला तर तो पुनः 'शुचीनां श्रीमतां गेहे' जन्म घेऊन अभ्यास पुरा करतो व मुक्त होतो.

मन सतत परमेश्वरावर ठेवणे हे सर्वोत्कृष्ट साधन, पण त्यासाठी प्रकृतीचे स्वास्थ्य पाहिजे; व मनावर कसलेही दडपण अगर चिंता नसावी लागते. दुसऱ्याची भांडणे वा कटकटीही कानावर येऊ नयेत म्हणजेच संगती चांगली असावी लागते. हे सर्व जमणे कठीण. भगवान दुसरे साधन सांगत आहेत.

**अथ चित्तं समाधातुं न शक्नोषि मयि स्थिरम् ।**
**अभ्यासयोगेन ततो मामिच्छाप्तुं धनंजय ॥ ९ ॥**

अथवा माझ्या ठिकाणी चित्त स्थिर करण्यास समर्थ नसलास, तर हे धनंजया ( चित्तैकाग्रतेचा अथवा ध्यानाचा ) अभ्यास करून माझी प्राप्ती करून घेण्याची इच्छा कर.

राजसूय यज्ञाच्या वेळी उत्तर दिशेला दिग्विजय करून अर्जुनाने अपार धन आणले म्हणून त्यास धनंजय हे नांव मिळाले. धनप्राप्तीसाठी जसे भयंकर कष्ट करावे लागतात, तसे ईश्वरप्राप्तीसाठीही यत्न हवेत. कारण ईश्वर हाही धनरूपीच आहे. एखादी गोष्ट व्यवस्थितपणे करता येईपर्यन्त पुनः पुनः करीत राहणे याचे नांव अभ्यास. अभ्यास करीत राहिल्यास असाध्य असे काही नाही. अभ्यास करताना चुका झाल्या तरी खपतात. पण हेही जमत नसेल तर भगवंत आणखी सोपे साधन सांगतात.

**अभ्यासेऽप्यसमर्थोऽसि मत्कर्मपरमो भव ।**
**मदर्थमपि कर्माणि कुर्वन्सिद्धिमवाप्स्यसि ॥१०॥**

अभ्यासयोगासही असमर्थ असलास तर सर्वस्वी माझ्याकरता कर्मे करणारा हो. माझ्याकरिता जरी कर्मे केलीस तरी तू सिद्धी मिळविशील.

ईश्वरासाठी कर्मे करा. कर्म याचा अर्थ कोणतीही कर्मे असा नव्हे तर

श्रवणं, कीर्तनं, विष्णोः स्मरणं पादसेवनं ।
अर्चनं वंदनं दास्यं सख्यं आत्मनिवेदनं ॥

अशी शास्त्रसंमत कर्मे. दुसऱ्यासाठी काम करायला मन माघार घेते, म्हणून ईश्वराबद्दल ममत्व बाळगा. येथे कर्माणि असे अनेक वचन असले तरी बिचकून जाऊ नये. अनेक कर्मे राहू देत, ईश्वरासाठी एखादे तरी कर्म करा. हेही मानवाला जमत नसले तर आणखी एक पर्याय भगवंत दाखवून देतात.

**अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं मद्योगमाश्रितः ।**
**सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु यतात्मवान् ॥११॥**

अथवा मद्योगाचा आश्रय करून हे ( माझ्या ठिकाणी कर्माचा संन्यास ) करण्यासही जर तूं असमर्थ असशील तर नियतचित्त होऊन सर्व कर्मफळांचा त्याग कर.

जे जे कर्म केले जाईल ते स्वतःसाठी करून फक्त ईश्वराला अर्पण करावयाचे याहून सोपे आणखी कोणतेही साधन नाही. या चारही साधनांपैकी कोणतेही कमी प्रतीचे नाही. भस्म म्हणजे राखच. पण परमेश्वराने स्वीकारलेली. म्हणून ते वंदनीय होते. ईश्वराच्या केवळ संबंधाने इतके पावित्र्य येते. वरील चारी साधने ईश्वराशी संबंधित असल्याने ती श्रेष्ठच आहेत. मानवाने कोणतेही साधन करावे.

**श्रेयो हि ज्ञानमभ्यासाज्ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते ।**
**ध्यानात्कर्मफलत्यागस्त्यागाच्छान्तिरनन्तरम् ॥१२॥**

अभ्यासापेक्षा ज्ञान गहन आहे. ज्ञानापेक्षा ध्यान श्रेष्ठ आहे. ध्याना-पेक्षा कर्मफलत्याग अधिक चांगला. त्याने शांति सत्वर मिळते.

श्रवण मनन या दोन्हीला अभ्यास म्हणतात. अभ्यास चांगला पण त्याहीपेक्षा ज्ञान श्रेष्ठ. ज्ञानापेक्षा निदिध्यासन उच्च प्रतीचे व त्याही-पेक्षा कर्मफल-त्याग उत्तम. कर्मफल-त्यागाने शांती मिळते. ही कर्मफल-त्यागाची स्तुती आहे. याला अर्थवाद म्हणतात. अगस्तीने समुद्राचे प्राशन केले किंवा परशुरामाने एकवीस वेळा पृथ्वी निःक्षत्रिय केली हा देखील अर्थवाद आहे. याचे तात्पर्य असे की, हे पुरुष महापराक्रमी व वंदनीय होते. कर्मफल-त्याग म्हणजे सर्वकामना निःशेष होणे. हे साधेल तेव्हा अमृतत्व मिळेल. त्यासाठी एक एक कामना नष्ट करीत गेले पाहिजे.

एका गृहस्थाने नोकरी देतो म्हणून सांगितले. एका तरुणाने त्याचेकडे मोठ्या आशेने शंभर हेलपाटे घातले व शेवटी त्याच्या पदरी निराशा आली. अर्थातच त्याला अतिशय दुःख झाले. फळाची आशा धरल्यामुळे दुःख वाटयास येते. फलाची आशा न करता प्रयत्न केले व यश आले नाही तर निदान निराशा तरी वाटयास येत नाही.

मानव देह प्राप्त झाला असताही केवळ उदरभरण करीत काळ कंठणे म्हणजे आपण पशूसमान आहोत असे मान्य करण्यासारखे आहे. पशूपक्षी अहर्निश पोटासाठी प्रयत्न करीत असतात. ईश्वरप्राप्तीसाठी ते काही करू शकत नाहीत. कारण त्यांची ती पात्रताच नाही. फक्त मानव जन्मातच ईश्वरभक्ती करून जीवनाचे सार्थक करण्याची संधी लाभते. ती संधी गमावली तर पुनः लाभणे अशक्य. मानवाने आपले कल्याण करून घ्यावे म्हणून भगवंतानी वेगवेगळे मार्ग दाखवून दिले आहेत. आता भगवंत भक्ताची लक्षणे सांगत आहेत.

**अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च ।**
**निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी ॥१३॥**

सर्व भूतांच्या ठिकांणी द्वेष न करणारा, मैत्रीने वागणारा आणि तसाच कृपायुक्त, मी—माझेपण—रहित, सुखदुःख समान मानणारा व क्षमाशील—

भगवंताने सांगितलेली चार साधने करून सगुण उपासना केली तर तो भक्त निर्गुण श्रेष्ठ बनतो. व मग त्याचे अंगी कोणकोणते गुण येतात हे येथे सांगितले आहे. प्रथम तो अद्वेष्टा बनतो. तो कोणाबद्दलही द्वेष करीत नाही. नुसता द्वेष कमी झाला तरी साधकाची योग्यता वाढते. मग द्वेषाचे समूळ उच्चाटन झाले की परमेश्वराने त्याला आपले मानले नाही तरच नवल. ( निर्वैरः सर्वभूतेषु यः स मामेति पांडव ) निर्गुणोपासक कोणाचाही द्वेष करीत नाही. कारण तो सर्वात्मक म्हणजे सर्वांचाच आत्मा बनलेला असतो. दुसऱ्याचा द्वेष करायचा म्हणजे स्वतःचाच द्वेष करण्यासारखे आहे, हे त्याला समजलेले असते. सगुणोपासक त्रैलोक्याचे राज्य वा मोक्ष दिला तरी नाकारतो. म्हणजे एक प्रकारे तो त्या फलांचा द्वेषच करीत नाही काय? पण निर्गुणोपासक जग मानीत नाही. फक्त परमेश्वराचे चिंतन येवढेच तो जाणतो. मग तो द्वेष कोणाचा व कसा करेल? जे त्याला विरोध करतात त्यांचाही तो द्वेष करीत नाही. जे त्याला अनुकूल असतात व तत्त्व जाणण्याचे इच्छेने त्याचेकडे येतात त्यांना तो अत्यंत कळकळीने उपदेश करतो. म्हणजे त्यांचा तो मित्रच बनतो. संसारात गुरफटलेल्यांबद्दल त्याच्या मनात कारुण्य असते. त्यांचे दुःख कसे दूर करता येईल या विचारात तो असतो.

आपण आपणास प्रतिकूल असतील त्यांची उपेक्षा वा प्रसंगी अनादरही करतो. पण निर्गुणोपासकाचे ममत्व व अहंकार नष्ट झाले असल्याने तो सर्वांना समान मानतो. सुख व दुःख दोन्ही त्याचे दृष्टीने सारखीच. स्वप्नात लाखाचे बक्षीस लागले किंवा लाख रुपये बुडाले या

दोन्हींचा जसा अर्थ सारखाच, तशीच त्याची प्रत्यक्षातील सुखदुःखाबद्दल भावना असते. ब्रह्म सत्य व बाकीचे सर्व जग मिथ्या याची त्याला प्रतीती आलेली असते. मग या जगांतील सुखःदुःखे तरी तो खरी कशी मानील? तो क्षमी म्हणजे सहनशील असतो. दुःखे आल्यास ती आपल्याच दुष्कर्मांचा परिपाक आहे व तो भोगलाच पाहिजे हे जाणून तो आक्रोश न करता किंवा रडगाणे न गाता ती दुःखे सहन करतो.

कोणत्याही परिस्थितीत परमेश्वर-प्राप्तीचा मार्ग दाखवून देणारे गीताशास्त्रासारखे दुसरे शास्त्र जगात कोठेही नाही. डोळे गेले तर श्रवण करा. कान गेले तर वाचन करा. शरीर दुबळे झाले असल्यास मनन चिंतन करा, असे हे शास्त्र सांगते. परिस्थिती कोणतीही असो, परमेश्वराचे अनुसंधान राखता येते. दुःखे व संकटे विलाप न करता सहन केल्यास याला केव्हा एकदा दुःखमुक्त करतो असे परमेश्वराला होऊन जाते. पित्यालासुद्धा आपल्या गुणी व समाधानी मुलाबद्दल असेच वाटते. पण पिता मुलाचे प्रारब्ध बदलू शकत नाही. ईश्वर भक्तासाठी काय वाटेल ते करतो. तसे करणे त्यालाच शक्य आहे. कारण हे सर्व विश्व त्याच्याच इच्छेने चालले आहे.

संतुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः ।
मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मद्भक्तः स मे प्रियः ॥१४॥

सर्वदा संतुष्ट, योगी, नियतचित्त, माझ्या ठिकाणी दृढ मन असलेला, माझ्या ठिकाणी मन व बुद्धी अर्पण केलेला जो माझा भक्त असतो तो मला प्रिय आहे.

पदार्थ मिळाले नाहीत म्हणून किंवा मिळाले तर अधिक मिळाले नाहीत म्हणून मनुष्य नेहमी असंतुष्ट असतो, पण निर्गुणोपासक सदैव संतुष्ट असतो. कारण त्याचे मन ईश्वराशी तदाकार झालेले असल्याने म्हणजे तो योगी असल्याने त्याला व्यवहारातील पदार्थांची अपेक्षाच

नसते. ईश्वराला प्राप्त करून घेईनच असा त्याचा दृढनिश्चय असतो. असा दृढनिश्चय नसेल तर साधना करताना मन कंटाळते. मन प्रापंचिक गोष्टीकडे ओढ घेते. त्यातच अधिक रमते. खाणे, पिणे, खेळणे यातून परमार्थाला अवसरच मिळत नाही. ज्ञानी प्रपंच गौण व परमार्थ प्रधान मानतो, म्हणून त्याचा निश्चय ढळत नाही.

काशीला दक्षिणामूर्ति नावाचे एक संन्यासी होते. लोकमान्य टिळकांची व त्यांची भेट झाली असता लोकमान्य त्याना म्हणाले, " आपल्या अंगी बुद्धिमत्ता, वक्तृत्व, अभ्यासूपणा आहे. आपण राजकारणात सहभागी झाल्यास आपल्या हातून देशाची सेवा घडेल व देशाचाही लाभ होईल. " त्यावर दक्षिणामूर्ति म्हणाले, " मी संन्यास घेतला आहे तो ईश्वरप्राप्तीसाठी. अन्य गोष्टीकडे मी मुळीच वळणार नाही " याला दृढनिश्चय म्हणतात.

अहंबुद्धी म्हणजे काम-क्रोध-लोभांनी युक्त असलेली बुद्धी व इदं बुद्धी म्हणजे ' इदं सकलं जगत् अहं च वासुदेवः ' अशी भावना असणे. यालाच ' मय्यर्पित मनोबुद्धि ' म्हणतात. मन ब्रह्मचिंतनात मग्न असेल तर दुःखे आत प्रवेशच करू शकत नाहीत. ती बाहरच्या बाहेर पसार होतात.

' अद्वेष्टा सर्वभूतानां ' पासून सांगितलेल्या लक्षणांनी युक्त असलेला भक्त परमेश्वराला अत्यंत प्रिय असतो.

**यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः ।**
**हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः स च मे प्रियः ॥१५॥**

ज्याचा लोक कंटाळा करीत नाहीत व जो लोकांना कंटाळत नाही, जो हर्ष, क्रोध, भय, आणि उद्वेग यापासून सुटला आहे तोच मला प्रिय आहे.

कांही लोकांकडे नुसते पाहिले तरी पीडा होते. कांहीचे बोलणे तापदायक असते, कांहीच्या कृतीमुळे दुसऱ्यांना त्रास होतो.

कोणाला पीडा देत नाही असा मानव मिळणे दुर्मीळ. कोणी जगाला पीडा देतो, तर कोणी घरच्या लोकांना येवढाच फरक.

वरून निरुपद्रवी दिसणारे कोणाला तरी लुबाडण्याच्या विचारात मग्न असतात. पण ज्ञानी पुरुषाची कोणालाच पीडा नसते. त्याने सर्व-भूतांना अभय दिलेले असते. ज्याचा उत्कर्ष जवळ आला आहे तो ज्ञानी पुरुषाला पाहून आनंदित होतो. ज्ञानी पुरुष उदासीन असल्याने इतरांच्या कृतीमुळे त्याला पीडा होत नाही,

एकनाथ महाराजांच्या अंगावर थुंकणारा लाजला व त्याने नाथांचे पाय धरून क्षमा मागितली. नाथ म्हणाले, ' मी रागावलो असेन तर क्षमा करायची. उलट तुझ्या कृतीमुळे मला एकवीस वेळा गंगास्नान घडले, म्हणून मीच तुझे आभार मानले पाहिचेत.' अशा शांतिब्रह्म ज्ञानी पुरुषांची कोणाला पीडा होईल का? व जग कशीही क्रिया करो, खरा ज्ञानी त्याचा त्रास मानीत नाही.

हर्ष, अमर्ष, भय व उद्वेग हे विकाराचे चार प्रकार होत. हर्ष हा विकारच आहे. अती हर्ष झाल्यास मनुष्य उन्मादवायू होऊन दगावण्याची शक्यता असते. शरीर सुस्थितीत असता मन शांत ठेवणे अवघड नाही. पण शरीराला विकलता आल्यावरही मनाची शांती ढळू न देणे याला अमर्ष म्हणतात. शरीराबरोबर जर मन विकल झाले तर त्या मनुष्याचे जीवन त्याला स्वतःला व इतरांनाही पीडादायक होते. साप, वाघ, चोर पाहून मन गडबडून जाणे याला भय म्हणतात. लहान मुले चित्रातील वाघ पाहून किंवा बागुलबोवा आला असे शब्द ऐकून घाबरून जातात. जरा मोठे झाल्यावर आपण उगाच खोटया काल्पनिक गोष्टींना भीत होतो, असे ज्ञान होते. ज्ञानी पुरुषाला बागुलबोवाप्रमाणे जग हे मिथ्या आहे असा स्पष्ट अनुभव आलेला असतो. म्हणून त्याचे दृष्टीने वाघ व गाय सारखीच असतात. म्हणून त्याला भय स्पर्श करीत नाही.

परचक्र, लूटालूट, जाळपोळ इत्यादींच्या वार्ता ऐकून ज्ञानी पुरुषाचे मन विचलित होत नाही, म्हणजेच त्याला उद्वेग वाटत नाही.

सोसाटयाच्या वाऱ्याने घराची छपरे उडून जातात पण दारे खिडक्या बंद असतील तर वारा घरात शिरत नाही. झोपलेल्या माणसाला शिव्यांची लाखोली वाहिली तरी त्याचेवर काही परिणाम होत नाही. बाहेर गारठा असला तरी थर्मासमधील पदार्थ गरम राहतो. त्याप्रमाणे ज्ञानी पुरुष बाहेरील विकारांपासून अलिप्त असतो. त्याचे अंतःकरण ब्रह्मानंदाने पुरेपूर भरलेले असल्याने इतर विकार आत शिरूच शकत नाहीत, मन मोकळे असेल तर विकारांना आत शिरून धुडगूस घालायला वाव मिळतो.

असा विकाररहित ज्ञानी परमेश्वरास नित्य प्रिय असतो, आपले एकमेकांशी प्रेम असते पण ते नित्य नसते. सेवक सेवा करतो तोपर्यंत प्रिय असतो. पत्नी सुद्धा नेहमी प्रिय असेलच असे नाही. तिने घटस्फोट घेतला तर प्रेम राहील का ? मुलगा बाळपणी अत्यंत प्रिय असतो. पण मोठेपणी जर त्याने घराबाहेर काढले तर तो प्रिय कसा राहील ? म्हणून संसारातील व्यक्ती नैमित्तिक प्रिय असतात. पण आपला आत्मा अप्रिय कधीच नसतो. तो काहीएक करीत नाही तरीही तो सदैव प्रिय असतो. हा आत्म्याचा एक विशेष आहे, त्याचप्रमाणे ज्ञानी पुरुष ईश्वराला सदासर्वदा प्रिय असतो, कारण तो भगवंताचा आत्माच बनलेला असतो,

**अनपेक्षः शुचिर्दक्ष उदासीनो गतव्यथः ।**
**सर्वारम्भपरित्यागी यो मद्भक्तः स मे प्रियः ॥१६॥**

निरपेक्ष, शुद्ध, तत्त्वार्थीचा देखणा, उदासीन, संसारदुःख-विरहित, कर्मारंभास आवश्यक असलेला अहंकार सोडलेला असा जो माझा भक्त असतो, तो मला प्रिय आहे.

ज्ञानी भक्ताला कशाचीच अपेक्षा नसते. दृष्ट, अदृष्ट, स्वर्ग इतकेच काय पण त्याला स्वतःच्या जीविताचीही अपेक्षा नसते. सामान्य मनुष्य कोणतीही क्रिया काहीतरी मिळावे म्हणून करीत असतो. पैसा हे सुखाचे साधन असे समजून तो मिळविण्यासाठी जन्मभर नोकरी करतो. सुंदर व मनाप्रमाणे वागणारी पत्नी मिळावी या अपेक्षेने विवाह करतो. बायकाही चांगला पती मिळावा म्हणून कडक व्रते करतात. पार्वती इतकी सुकुमार व सुंदर पण तिनेही शंकर हाच पती लाभावा म्हणून उग्र तप केले, इतके की आता तप पुरे असे तिला सांगावे लागले. त्यावरूनच तिला उमा हे नांव पडले. पुत्रासाठी तर बायका वाटेल ते नवस करतात. ही सर्व सुखाची साधने माणसाला प्रयत्नाने मिळतात, पण त्यापासून सुख मिळायचे झाले तर अदृष्ट चांगले पाहिजे. साधनांनी सुख होत नसून त्यासाठी पूर्व कर्मे चांगली असावी लागतात. म्हणून ज्ञानी कर्म करतो पण कशाचीही अपेक्षा बाळगत नाही. सरकारने धान्य देण्याऐवजी जेवण देण्याचीच सोय केली तर उन्हातान्हात, रांगेत उभे राहून रेशन आणा, ते निवडा, स्वयंपाक करा, हे कष्ट कोण व कशाला करील ? तसेच ज्ञानी भक्ताला साक्षात् आनंदाचा लाभ घडत असल्याने तो सुखाची साधने मिळविण्याच्या मागे नसतो.

ज्ञानी सदैव पवित्र असतो. कारण ' नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ' असे ज्ञान व त्याचे जवळ असल्याने अपावित्र्य त्याला स्पर्श करू शकत नाही. ज्ञानी दक्ष म्हणजे चतुर असतो. त्याला स्वतःला बोध झालेला असतो व दुसऱ्यांना बोध करतो. स्वतः कार्य करतो व दुसऱ्याकडून कार्य करून घेण्याचे सामर्थ्य त्याचेजवळ असते. भोजन, निद्रा, खेळ यापासून आपणास आनंद मिळतो, पण तो लेशमात्र असतो. ब्रह्माच्या आनंदाचेच ते लेश असतात. ज्ञानी पुरुषाने आनंदाचा गड्डा जे ब्रह्म तेच मिळविलेले असते, अंश नव्हे तर अंशी मिळालेला असल्याने तो घरबसल्या सम्राटाचा आनंद उपभोगतो.

उदासीनता हे ज्ञान्याचे एक लक्षण आहे. जे होते ते भगवंताच्या इच्छेने होते, ही भावना दृढ असल्याने तो सर्व सहन करतो. तो नाइलाज म्हणून भिक्षेसाठी जातो. भिक्षा मिळाली तरी आनंद नाही व नाही मिळाली म्हणून खेद नाही. परमपूज्य वासुदेवानंद स्वरस्वतींनी एकदा भूक भागविण्यासाठी काही मिळाले नाही म्हणून पाण्यात शाडू (पांढरी माती) कालवून ते मिश्रण सेवन करून भूक भागविली. आहाराबद्दल अशी उदासीनता असूनही अशा पुरुषांचे शरीर कणखर असते. पण रोज पक्वान्ने खाऊन, शक्तिवर्धक औषधे व इंजक्शने घेऊनही तब्येत बरोबर नाही, ही आपली तक्रार काही संपत नाही. त्याची दुःखे गेलेली असतात. कारण शरीर हे दुःखाचे मूळ असून आत्मा दुःखमुक्त आहे हे ज्ञान असल्याने तो सदैव आनंदात असतो. म्हणून त्यास गतव्यथः असे म्हणतात.

ज्ञानी सर्व कर्मांचा त्याग करतो. मनुष्य फळाची आशा असते म्हणून कर्म करतो. ज्ञान्याने फलेच्छा सोडलेली असल्याने तो कर्मेही करीत नाही. कर्मफलापेक्षा श्रेष्ठ असलेले ज्ञान त्याला मिळालेले असते. ' न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन ' असे भगवंत म्हणतात. आणि कर्मेही करतात. कारण त्यांना हे जगच्चक्र फिरत ठेवायचे असते. ज्ञानी पुरुषावर ती जबाबदारी नसल्याने तो कर्मेही करीत नाही. हुषार मुलाला त्याचे वडील घरची कामे लावीत नाहीत. वडील त्याला म्हणतात, ' तू फक्त अभ्यास कर, तुझी सर्व कामे मी करतो.' भक्ताला ईश्वर असेच आश्वासन देतो. नारायण स्वामींना दोन मुली होत्या. त्या लहान असताच त्यांची पत्नी निवर्तली. नारायण स्वामी समाधीत मग्न असत. तेव्हा प्रत्यक्ष देव त्यांचे रूप घेऊन मुलींचा सांभाळ करीत असे. सध्या लोकांनी फक्त स्नानसंध्यादी विहित कर्मे सोडली आहेत. असा अर्धवटपणा काय कामाचा? सोडायची तर सर्व कर्मे सोडली पाहिजेत. पण ते काम ज्ञानी भक्तालाच शक्य आहे. असे भक्त ईश्वराला अत्यंत प्रिय असतात.

**योन हृष्यति न द्वेष्टि न शोचति न काङ्क्षति ।**
**शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्यः स मे प्रियः ॥१७॥**

जो हर्ष पावत नाही, द्वेष करीत नाही, (अप्राप्त वस्तूची) इच्छा करीत नाही. चांगले व वाईट या दोन्हींचा त्याग केलेला असा भक्तिमान मनुष्य मला प्रिय आहे.

मनुष्य रागावला की त्याला इतर आनंदाचा उपभोग घेता येत नाही. संतापलेल्या माणसाला सुग्रास अन्न वाढले किंवा सुस्वर गाणे ऐकवले तरी त्याचे तिकडे लक्ष नसते. राग, द्वेष म्हातारपणी कमी होत नाहीत. उलट जसजशी शक्ती क्षीण होत जाते, तसे हे वाढतच जातात. ज्ञानेश्वरानी यांना ज्ञाननिधीचे भुजंग, लुटारू अशी विशेषणे दिली आहेत. ज्ञानी हर्षाला सुद्धा मनात थारा देत नाही. तो शोक म्हणजे मनस्ताप करून घेत नाही. दुःखे जावीत अशीही तो इच्छा करीत नाही. दुःखे प्रारब्धामुळे येतात. प्रारब्ध संपल्याशिवाय ती जात नाहीत. मग त्यासाठी वेगळी इच्छा कशाला करायची? शुभाशुभ पापपुण्याचाही तो परित्याग करतो. कारण जीवात्मा हाच कर्ता असे प्रथम वाटत असते. ज्ञान झाल्यावर जीवात्मा अकर्ता असून त्याचे अंतःकरणात पडलेले प्रतिबिंब म्हणजेच चिदाभास याची प्रतीती येते. म्हणून पापपुण्याचा संबंध त्या प्रतिबिंबाशी, आपला काही संबंध नाही असे ज्ञानी म्हणतो. ज्ञानी सर्वकाळ ईश्वराचे अनुसंधान (स्मरण) करीत राहतो.

**समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः ।**
**शीतोष्णसुखदुःखेषु समः सङ्गविवर्जितः ॥१८॥**
**तुल्यनिन्दास्तुतिर्मौनी संतुष्टो येन केनचित् ।**
**अनिकेतः स्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियो नरः ॥१९॥**

शत्रु व मित्र; मान व अपमान यांना समान मानणारा, शीतउष्ण, सुखदुःख यांच्या ठिकाणी समान असणारा, ( अंतर्बाह्य ) संगरहित, निंदा स्तुती समान मानणारा, मौनी, जे जे काही मिळेल त्यातच संतोष मानणारा, कोठेच आश्रय धरून न राहणारा, स्थिरबुद्धी असलेला भक्तिमान पुरुष मला प्रिय आहे.

आपण जग खरे मानतो व परमेश्वर ही एक कल्पना म्हणजे असत्य आहे असे मानतो. या उलट ज्ञानी ' ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या ' असे मानतो. स्वप्नात आपला कोणी सन्मान केला वा चार शिव्या दिल्या तर जागे झाल्यावर त्या दोन्ही गोष्टी आपण सारख्याच मानतो. त्याप्रमाणे स्वप्नवत् असलेल्या या मिथ्या जगातील शत्रु-मित्र, मान अपमान ज्ञान्याला एकाच लायकीची वाटतात. गाडी पकडण्याची घाई असेल व आपण जेवत असलो तर सर्व लक्ष गाडी कशी मिळेल इकडे वेधलेले असल्याने भोजनातील पदार्थांच्या चवीकडे आपले लक्ष जात नाही. ज्ञानी आत्मचिंतनात गढून गेलेला असतो. त्याचे सर्व व्यवहार चालू असतात. पण त्याला शीतोष्ण, सुखदुःख यांचा स्पर्श होत नाही. तो संगविवर्जित म्हणजे अहंकार-विरहित असतो. त्याचा अहंकार आत्म्यावर केंद्रित झालेला असतो. आपला देहावर असतो. म्हणून आपणास सर्व द्वंद्वे जाणवतात. जीव चेतन व शब्दस्पर्शादि विषय जड आहेत. चेतन श्रेष्ठ असूनही जड विषय त्याच्यावर सत्ता गाजवितात, पण ज्ञानी या विषयांच्या आहारी जात नाही.

निंदा म्हणजे असलेले व नसलेले दुर्गुण तोंडावर सांगायचे. स्तुती म्हणजे नसलेले गुण ऐकवायचे. हे गुण अवगुण देहाशी संबंधित असतात. ज्ञानी स्वतःस देहाहून वेगळा समजतो, म्हणून देहाच्या निंदा-स्तुतीची त्याला पर्वा नसते. ज्ञानी आवश्यक असेल तरच व आवश्यक तेवढेच

ज्ञानी भक्ताला कशाचीच अपेक्षा नसते. दृष्ट, अदृष्ट, स्वर्ग इतकेच काय पण त्याला स्वतःच्या जीविताचीही अपेक्षा नसते. सामान्य मनुष्य कोणतीही क्रिया काहीतरी मिळावे म्हणून करीत असतो. पैसा हे सुखाचे साधन असे समजून तो मिळविण्यासाठी जन्मभर नोकरी करतो. सुंदर व मनाप्रमाणे वागणारी पत्नी मिळावी या अपेक्षेने विवाह करतो. बायकाही चांगला पती मिळावा म्हणून कडक व्रते करतात. पार्वती इतकी सुकुमार व सुंदर पण तिनेही शंकर हाच पती लाभावा म्हणून उग्र तप केले, इतके की आता तप पुरे असे तिला सांगावे लागले. त्यावरूनच तिला उमा हे नांव पडले. पुत्रासाठी तर बायका वाटेल ते नवस करतात. ही सर्व सुखाची साधने माणसाच्या प्रयत्नाने मिळतात, पण त्यापासून सुख मिळायचे झाले तर अदृष्ट चांगले पाहिजे. साधनांनी सुख होत नसून त्यासाठी पूर्व कर्मे चांगली असावी लागतात. म्हणून ज्ञानी कर्म करतो पण कशाचीही अपेक्षा बाळगत नाही. सरकारने धान्य देण्याऐवजी जेवण देण्याचीच सोय केली तर उन्हातान्हात, रांगेत उभे राहून रेशन आणा, ते निवडा, स्वयंपाक करा, हे कष्ट कोण व कशाला करील? तसेच ज्ञानी भक्ताला साक्षात् आनंदाचा लाभ घडत असल्याने तो सुखाची साधने मिळविण्याच्या मागे नसतो.

ज्ञानी सदैव पवित्र असतो, कारण 'नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते' असे ज्ञान व पावित्र्य जवळ असल्याने अपावित्र्य त्याला स्पर्श करू शकत नाही. ज्ञानी दक्ष म्हणजे चतुर असतो. त्याला स्वतःला बोध झालेला असतो व दुसऱ्यांना बोध करतो, स्वतः कार्य करतो व दुसऱ्या-कडून कार्य करून घेण्याचे सामर्थ्य त्याचेजवळ असते. भोजन, निद्रा, खेळ यापासून आपणास आनंद मिळतो, पण तो लेशमात्र असतो. ब्रह्माच्या आनंदाचेच ते लेश असतात. ज्ञानी पुरुषाने आनंदाचा गड्डा जे ब्रह्म तेच मिळविलेले असते, अंश नव्हे तर अंशी मिळालेला असल्याने तो घरबसल्या सम्राटाचा आनंद उपभोगतो.

उदासीनता हे ज्ञान्याचे एक लक्षण आहे. जे होते ते भगवंताच्या इच्छेने होते, ही भावना दृढ असल्याने तो सर्व सहन करतो. तो नाइलाज म्हणून भिक्षेसाठी जातो. भिक्षा मिळाली तरी आनंद नाही व नाही मिळाली म्हणून खेद नाही. परमपूज्य वासुदेवानंद स्वरस्वतींनी एकदा भूक भागविण्यासाठी काही मिळाले नाही म्हणून पाण्यात शाडू ( पांढरी माती ) कालवून ते मिश्रण सेवन करून भूक भागविली. आहाराबद्दल अशी उदासीनता असूनही अशा पुरुषांचे शरीर कणखर असते. पण रोज पक्वान्ने खाऊन, शक्तिवर्धक औषधे व इंजक्शने घेऊनही तब्येत बरोबर नाही, ही आपली तक्रार काही संपत नाही. त्याची दु:खे गेलेली असतात. कारण शरीर हे दु:खाचे मूळ असून आत्मा दु:खमुक्त आहे हे ज्ञान असल्याने तो सदैव आनंदात असतो. म्हणून त्यास गतव्यथ: असे म्हणतात.

ज्ञानी सर्व कर्मांचा त्याग करतो. मनुष्य फळाची आशा असते म्हणून कर्म करतो. ज्ञान्याने फलेच्छा सोडलेली असल्याने तो कर्मेही करीत नाही. कर्मफलापेक्षा श्रेष्ठ असलेले ज्ञान त्याला मिळालेले असते. ' न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन ' असे भगवंत म्हणतात. आणि कर्मेही करतात. कारण त्यांना हे जगचक्र फिरत ठेवायचे असते. ज्ञानी पुरुषावर ती जबाबदारी नसल्याने तो कर्मेही करीत नाही. हुषार मुलाला त्याचे वडील घरची कामे सांगीत नाहीत. वडील त्याला म्हणतात, ' तू फक्त अभ्यास कर, तुझी सर्व कामे मी करतो. ' भक्ताला ईश्वर असेच आश्वासन देतो. नारायण स्वामींना दोन मुली होत्या. त्या लहान असताच त्यांची पत्नी निवर्तली. नारायण स्वामी समाधीत मग्न असत. तेव्हा प्रत्यक्ष देव त्यांचे रूप घेऊन मुलींचा सांभाळ करीत असे. सध्या लोकांनी फक्त स्नानसंध्यादी विहित कर्मे सोडली आहेत. असा अर्धवटपणा काय कामाचा? सोडायची तर सर्व कर्मे सोडली पाहिजेत. पण ते काम ज्ञानी भक्तालाच शक्य आहे. असे भक्त ईश्वराला अत्यंत प्रिय असतात.

**यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न काङ्क्षति ।**
**शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्यः स मे प्रियः ॥१७॥**

जो हर्ष पावत नाही, द्वेष करीत नाही. (अप्राप्त वस्तूची) इच्छा करीत नाही. चांगले व वाईट या दोन्हींचा त्याग केलेला असा भक्तिमान मनुष्य मला प्रिय आहे.

मनुष्य रागावला की त्याला इतर आनंदाचा उपभोग घेता येत नाही. संतापलेल्या माणसाला सुग्रास अन्न वाढले किंवा सुस्वर गाणे ऐकवले तरी त्याचे तिकडे लक्ष नसते. राग, द्वेष म्हातारपणी कमी होत नाहीत. उलट जसजशी शक्ती क्षीण होत जाते, तसे हे वाढतच जातात. ज्ञानेश्वरानी यांना ज्ञाननिधीचे भुजंग, लुटारू अशी विशेषणे दिली आहेत. ज्ञानी हर्षाला सुद्धा मनात थारा देत नाही. तो शोक म्हणजे मनस्ताप करून घेत नाही. दुःखे जावीत अशीही तो इच्छा करीत नाही. दुःखे प्रारब्धामुळे येतात. प्रारब्ध संपल्याशिवाय ती जात नाहीत. मग त्यासाठी वेगळी इच्छा कशाला करायची? शुभाशुभ पापपुण्याचाही तो परित्याग करतो. कारण जीवात्मा हाच कर्ता असे प्रथम वाटत असते. ज्ञान झाल्यावर जीवात्मा अकर्ता असून त्याचे अंतःकरणात पडलेले प्रतिबिंब म्हणजेच चिदाभास याची प्रतीती येते. म्हणून पापपुण्याचा संबंध त्या प्रतिबिंबाशी, आपला काही संबंध नाही असे ज्ञानी म्हणतो. ज्ञानी सर्वकाळ ईश्वराचे अनुसंधान (स्मरण) करीत राहतो.

**समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः ।**
**शीतोष्णसुखदुःखेषु समः सङ्गविवर्जितः ॥१८॥**
**तुल्यनिन्दास्तुतिर्मौनी संतुष्टो येन केनचित् ।**
**अनिकेतः स्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियो नरः ॥१९॥**

शत्रु व मित्र; मान व अपमान यांना समान मानणारा, शीतउष्ण, सुखदु:ख यांच्या ठिकाणी समान असणारा, (अंतर्बाह्य) संगरहित, निंदा स्तुती समान मानणारा, मौनी, जे जे काही मिळेल त्यातच संतोष मानणारा, कोठेच आश्रय धरून न राहणारा, स्थिरबुद्धी असलेला भक्तिमान पुरुष मला प्रिय आहे.

आपण जग खरे मानतो व परमेश्वर ही एक कल्पना म्हणजे असत्य आहे असे मानतो. या उलट ज्ञानी 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या' असे मानतो. स्वप्नात आपला कोणी सन्मान केला वा चार शिव्या दिल्या तर जागे झाल्यावर त्या दोन्ही गोष्टी आपण सारख्याच मानतो. त्याप्रमाणे स्वप्नवत् असलेल्या या मिथ्या जगातील शत्रु–मित्र, मान अपमान ज्ञान्याला एकाच लायकीची वाटतात. गाडी पकडण्याची घाई असेल व आपण जेवत असलो तर सर्व लक्ष गाडी कशी मिळेल इकडे वेधलेले असल्याने भोजनातील पदार्थांच्या चवीकडे आपले लक्ष जात नाही. ज्ञानी आत्मचिंतनात गढून गेलेला असतो. त्याचे सर्व व्यवहार चालू असतात. पण त्याला शीतोष्ण, सुखदु:ख यांचा स्पर्श होत नाही. तो संगविवर्जित म्हणजे अहंकार–विरहित असतो. त्याचा अहंकार आत्म्यावर केंद्रित झालेला असतो. आपला देहावर असतो. म्हणून आपणास सर्व द्वंद्वे जाणवतात. जीव चेतन व शब्दस्पर्शादि विषय जड आहेत. चेतन श्रेष्ठ असूनही जड विषय त्याच्यावर सत्ता गाजवितात, पण ज्ञानी या विषयांच्या आहारी जात नाही.

निंदा म्हणजे असलेले व नसलेले दुर्गुण तोंडावर सांगायचे. स्तुती म्हणजे नसलेले गुण ऐकवायचे. हे गुण अवगुण देहाशी संबंधित असतात. ज्ञानी स्वत:स देहाहून वेगळा समजतो, म्हणून देहाच्या निंदा-स्तुतीची त्याला पर्वा नसते. ज्ञानी आवश्यक असेल तरच व आवश्यक तेवढेच

बोलतो, म्हणून त्याला मौनी म्हणतात. कोणत्याही परिस्थितीत तो संतोषी असतो. प्रारब्धाने देह आलेला आहे व त्या प्रारब्धयोगेच त्याचे पोषण होते. प्रारब्धातच अन्न नसेल तर प्रयत्न करूनही मिळणार नाही. संतोष हे एक धर्माचे साधन आहे, हे त्याला समजलेले असते. तो अनिकेत म्हणजे गृहहीन, गृहाचे ममत्व नसलेला. एकाच ठिकाणी फार काळ राहिले की ममत्व निर्माण होते, म्हणून यतीने एका ठिकाणी तीन दिवसावर राहू नये असे शास्त्र सांगते. फार काळ एका घरात राहिलेल्या भाडेकरूलाही घर सोडताना दुःख होते. ममत्वामुळे तंटेबखेडे होतात. ज्ञानी स्थिरबुद्धी म्हणजे साधनेत कितीही अडथळे आले तरी त्यांना न जुमानता आपली साधना चालू ठेवणारा असतो. मरेपर्यन्त प्रपंचात गुरफटून फायदा काय, तर शेवटी मुलाकडून अपमानित वा दुर्लक्षित व्हायचे. त्यापेक्षा परमार्थात मन गुंतवलेले काय वाईट?

भगवान अर्जुनाला सांगतात, 'अर्जुना, तू नरनारायणापैकी एक आहेस. पूर्वी जगाच्या कल्याणासाठी तप करायला तयार झालास. मग आता युद्ध कां करीत नाहीस? सगुणातून निर्गुणात ये व जगाचा विचार करून युद्धास प्रवृत्त हो.'

एका दिव्यावर दुसरा दिवा लावला तर दोन्ही सारखेच होतात. दिलीप व त्याचा पुत्र रघू एकसारखे होते, असे कालीदासाने वर्णन केले आहे. पितापुत्र, पतिपत्नी, गुरुशिष्य यांचे स्वभाव जुळत असले तरच त्यांच्यात ऐक्य निर्माण होते. श्रीकृष्ण व अर्जुन यांच्यात असे ऐक्य होते, म्हणून भगवंताला अर्जुन अत्यंत प्रिय झाला होता. आपल्या प्रिय भक्ताची लक्षणे भगवंतानी येथे सांगितली आहेत. अशा भक्तालाच दुसऱ्या अध्यायात 'स्थितप्रज्ञ' असे संबोधिले आहे.

**ये तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते ।**
**श्रद्धाना मत्परमा भक्तास्तेऽतीव मे प्रियाः ॥२०॥**

मी ज्यांना अत्यंत प्रिय आहे असे श्रद्धायुक्त भक्त हे माझे धर्मास अनुसरून असलेले अमृतासारखे सांगणे सेवन करतात, ते मला अत्यंत प्रिय आहेत.

भगवंताने जे सांगितले आहे ते धर्म्य व अमृतासारखे आहे. मुमुक्षूंनी अवश्य संपादन करावे असे आचार त्यानी सांगितले आहेत. सगुणोपासना केली की त्याला निर्गुणरूपी अमृताचा लाभ घडतो. ईश्वराच्या ज्ञानासारखे दुसरे ज्ञान नाही. त्याच्या रूपासारखे रूप नाही. त्याच्या तेजासारखे दुसरे तेज नाही, असा ज्याचा दृढ विश्वास असतो, तो खरा भक्त. भक्त होणे म्हणजे ईश्वरापासून विभक्त न होणे. सदैव ईश्वराचे स्मरण करणारा भक्त ईश्वराला अत्यंत आवडतो.

इति श्रीमद् भगवद् गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे भक्तियोगो नाम द्वादशोऽध्यायः॥

# अध्याय १३ वा.

श्रीभगवान उवाच—

**इदं शरीरं कौन्तेय क्षेत्रमित्यभिधीयते ।**
**एतद्यो वेत्ति तं प्राहुः क्षेत्रज्ञ इति तद्विदः ॥ १ ॥**

श्रीभगवान म्हणाले, " हे कौन्तेया, या शरीराला ' क्षेत्र ' असे म्हणतात. आणि जो हे जाणतो त्यास ' क्षेत्रज्ञ ' असे त्यास ( क्षेत्र-क्षेत्रज्ञास ) जाणणारे म्हणतात."

मागील अध्यायात ' तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् ' असे सांगितले. आता तो उद्धार कसा केला जातो ते येथे भगवंत सांगत आहेत.

सगुणभक्त कितीही एकनिष्ठ असला तरी त्याचे सर्व दुःख जात नाही. ज्ञानेश्वरानी नामदेवाला आपल्याबरोबर तीर्थयात्रेला चल म्हटल्यावर खरे पाहू जाता नामदेवास आनंद व्हावयास पाहिजे होता. पण प्रत्यक्षात त्याला दुःखच झाले. आपण यात्रेला गेलो तर आपली व विठ्ठलाची ताटातूट होईल अशी त्याला भीति वाटत होती. देव फक्त देवळातच आहे असे त्याला अपूर्ण ज्ञान होते. परमेश्वर सर्वत्र भरलेला आहे हे समजण्यासाठी सगुणोपासकांना भगवंत निर्गुणाचे ज्ञान करून देत आहेत.

प्रत्येकजण सकाळी उठल्यापासून रात्री निजेपर्यन्त सुखसाधने गोळा करून दुःखसाधने दूर करण्याचा प्रयत्न करीत असतो. तथापी ती दूर मात्र होत नाहीत. सगुणोपासकांना भगवंत प्रसन्न झाले तर त्यांची दुःखसाधने तो दूर करतो. पण दुःखसाधने पुनः पुनः निर्माण होत असतात. सर्व गवत काढून टाकलेले असले तरी पावसाचे चार थेंब पडताच ते पुनः तरारून उगवते. त्यासाठी पेरणी करावी लागत

नाही. घरातील केर कितीही वेळा काढला तरी तो जसा पुनः निर्माण होतोच, तशीच दुःखे पुनः पुनः उद्‌भवतात. या सर्व जगाचे मूळ माया आहे व या मायेमध्ये सर्व दुःखे बीजरूपाने असतात. बीज शिल्लक राहिल्यामुळे दुःखसाधने कितीही दूर केली तरी पुनः पुनः नवी नवी दुःखे निर्माण होतातच. ती दुःखे घालविण्यासाठी तत्त्वज्ञानच हवे.

चार वेदांत चार महावाक्ये आहेत. त्यापैकी ' तत्त्वमसि ' हे सामवेदांतील आहे. गीतेच्या पहिल्या सहा अध्यायात 'न जायते म्रियते' वगैरे सांगून ' त्वं ' पदाचा विचार केला आहे. दुसऱ्या सहा अध्यायात ' तत् ' पदाचा म्हणजे ईश्वराचा विचार केलेला आहे. आणि या शेवटच्या सहा अध्यायात ' असि ' पदाचा म्हणजे दोघांचे ऐक्य प्रतिपादन केले आहे.

एखाद्या पातळाच्या दुकानात जर सर्व नग एकाच रंगाचे-काठ, पोत, पदर, किंमत या सर्व दृष्टीने सारखे असले तर दुकान चालेल काय? जितके नग तितके प्रकार असतील तरच दुकानात गर्दी होईल. कारण सर्व माणसांची आवड एकसारखी नाही. त्यात भिन्नता आहे. त्याचप्रमाणे उपासनाही एकाच प्रकाराची असून चालणार नाही. माणसांचे उत्तम, मध्यम व मंद असे तीन प्रकार असतात. त्याप्रमाणे उपासनेचेही तीन प्रकार आहेत.

आपण घराची स्वच्छता करतो, दांत पांढरे शुभ्र दिसावेत म्हणून नाना प्रकारची मंजने वापरतो, कपडे स्वच्छ ठेवण्यासाठी रोज किती सोडा साबण संपत असेल याची गणती करता येणार नाही. पोट तुडुंब भरल्यावरही मुखशुद्धीसाठी कांही लोक शेंगदाणे खातात. जेवताना भातावर तूप घेऊन अन्नशुद्धि केली जाते. शरीरांतर्गत शुद्धीसाठी पंचगव्य घेतले जाते. सारांश, सर्व तऱ्हेच्या शुद्धीसाठी मनुष्य तत्पर असतो. पण मनःशुद्धीकडे मात्र पूर्णपणे दुर्लक्ष केले जाते. ' मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयोः ' इतके मनाला महत्त्व आहे. चांदीचे भांडे खरखरीत राखेने

घासावयाचे नाही. ते साबणाने ( पूर्वी शेणाने ) घासायचे. कारण चांदी मृदु आहे. म्हणून स्वच्छ करणारे साधनही मृदूच हवे. मनही तसेच मृदु आहे व शास्त्राने मनाच्या शुद्धतेसाठी उपासना हे साधन सांगितले आहे. मन मलीन असल्यास सगुण उपासना व मन शुद्ध असल्यास किंवा झाल्यावर निर्गुण उपासना करावी.

बाराव्या अध्यायात 'अद्वेष्टा, मैत्र, करुण, निर्ममः' इत्यादी साधने सांगितली आहेत. सामान्य मानवाला ही आचरण्यास कठीण असली तरी जीवनमुक्तांचा तो स्वभावच बनलेला असतो. साधकाने ते गुण अंगी बाणण्यासाठी प्रयत्न केले पाहिजेत. एकदा ज्ञान झाले की माणसाचा स्वभावही पालटतो.

या पूर्वीच्या अध्यायात सुरवातीस अर्जुन प्रश्न करतो आणि मग भगवंत त्याच्या शंकांचे निरसन करतात. येथे अर्जुनाने प्रश्न केलेला नाही. भगवंत सर्वज्ञ सर्वव्यापी आहे, मग त्याला आपल्या मनांतील व्यापार समजल्याशिवाय कसे राहतील हे ज्ञान अर्जुनाला झालेले आहे. शिवाय भगवंतासारख्या सर्वश्रेष्ठाला प्रश्न विचारायचा म्हणजे प्रश्नही त्याच योग्यतेचा हवा. आपली शंका भगवंताला अगदीच सामान्य वाटण्याची शक्यता आहे म्हणून गप्प बसलेले बरे, असाही अर्जुनाने विचार केला असावा. अर्जुनाच्या मनात बंध म्हणजे काय? मोक्ष कशाने मिळतो? जीवाशिवाचे ऐक्य कसे संभवते? हे जाणून घेण्याची उत्कंठा होती. अर्जुनाची उत्कंठा सर्वज्ञ भगवंताने जाणली व त्यांचे निरसन करण्यास प्रारंभ केला.

क्षेत्र म्हणजेच प्रकृती. सत्त्व, रज व तम या तीन गुणांची समानावस्था. प्रलयकालानंतर प्राण्यांची कर्मे फलोन्मुख होतात किंवा ईश्वरेच्छेमुळे त्यात कमी अधिकपणा निर्माण होतो. प्रकृति म्हणजे मूळ पदार्थ. तिजपासून महत्तत्त्व—समष्टि बुद्धि—निर्माण होते. नंतर अहंकार

व त्यानंतर पंच तनूमात्रा म्हणजे सूक्ष्म भूते निर्माण होतात. शरीरात कफ, पित्त व वात हे त्रिदोष आहेत. 'धातुसाम्यं अरोगिता' असे वचन आहे. यात कमीअधिकपणा निर्माण झाला कीं रोग उत्पन्न होतात. अन्न, विचार व आचार (जाग्रण, निद्रा, आळस, कष्ट इ.) यांत बिघाड झाला की हे साम्य बिघडून शरीरात रोगांचा प्रादुर्भाव होतो.

तेलवात घालून दिवा लावला व तो वाऱ्याने विझणार नाही अशा सुरक्षित जागी ठेवला व त्याकडे पुनः पाहिलेच नाही तर तो कायम तेवत राहील का? जोवर तेल आहे तोवरच राहणार. वेळ संपताच तो विझून जाईल. त्याचप्रमाणे तुम्ही शरीर कितीही सुरक्षित ठेवण्याचा प्रयत्न केला तरी मुदत भरताच आतील प्राणज्योत मालवते. 'शीर्यते तत् शरीरं' म्हणजे विकार पावते, बदलत असते ते शरीर. शरीरात प्रत्यही फरक होत असतो, पण त्याची जाणीव वार्धक्यात प्रकर्षाने होते. रागद्वेषांचे प्राबल्य झाल्यास शरीर लवकर नष्ट होते. तसेच 'क्षतात् त्रायते इति शरीरं' असेही शरीराचे गुणगान केलेले आहे. कारण मानवाला अमरत्व प्राप्त करून घ्यावयाचे असेल तर शरीर हेच मुख्य साधन आहे. तत्त्वज्ञानाने मनुष्य अमर होतो व तत्त्वज्ञान मिळविण्याचे साधनही शरीरच आहे.

व्यवहारात क्षेत्र म्हणजे जमीन असा अर्थ आहे. या स्थूल शरीररूपी जमिनीत नाना रोगांचे पीक येत असते व सूक्ष्म शरीरात काम क्रोधादि विकारांचे तण माजते. जमिनीत निरुपयोगी व वाईट पिके सहज उगवतात. चांगल्या पिकांसाठी मात्र विशेष मशागत करावी लागते.

आत्मा समजला की अनात्मा समजतो. आत्मा समजावून देण्यासाठीच वेदांत प्रवृत्त झालेला आहे. वेदांतात सर्व पदार्थांचे साकल्याने विवेचन केलेले असते. प्रकृती म्हणजेच बुद्धी किंवा अनात्मा. पांढऱ्या शुभ्र स्फटिकाशेजारी तांबडे फूल ठेवल्यास तो स्फटिक तांबडा भासतो.

त्याचप्रमाणे निर्गुण आत्म्याजवळ बुद्धी आल्यावर बुद्धीचे गुणधर्म आत्म्यावर भासतात व त्यामुळे बंध निर्माण होतात. यथार्थज्ञान झाल्यावर आत्म्याला होणारे बंध हा केवळ भास आहे— मिथ्या आहे. हे कळून येते. अंधारात पडलेली दोरी सापासारखी नव्हे, सापच आहे असे वाटते. ज्ञानरूपी दिवा जवळ नेताच भास नाहीसा होऊन खरे स्वरूप प्रगट होते. म्हणून आपले सत्यस्वरूप समजून घ्यावयाचे असेल तर आत्मज्ञानरूपी दिवा हाती घेतला पाहिजे. वेदांतांच्या अभ्यासाने आत्मज्ञानाचा मार्ग सुलभ होतो.

सर्व पदार्थ ज्ञानात विषय होतात म्हणून ते अनात्मे. आत्मा मात्र ज्ञानात कधीहि विषय होत नाही कारण तो विषय नसून विषयी आहे. घटाचे ज्ञान काही घटाला नसते, तसेच या जड शरीराचा ज्ञाता त्याहून पृथक् असला पाहिजे. पण तो स्थूल शरीर, इंद्रिये, मन, प्राणाप्रमाणे दिसत नाही. मग तो आहे तरी कशावरून ? सामान्य माणसांना तो दिसला नाही तरी आत्मवेत्त्यांना तो स्पष्ट दिसतो. म्हणून तो आहे हे मान्य करावे लागते. इतर प्रमाणे आत्म्यामुळे सिद्ध होतात. आत्मा स्वतः सिद्ध आहे. त्याच्या सिद्धीकरता इतर साधनांची गरज नाही. आत्म्यामुळेच मोक्ष मिळतो. सहा शास्त्रे, कर्म, उपासना सर्व आत्म्यावरच अवलंबून आहेत. आत्मा न मानणारे 'ऋणं कृत्वा घृतं पिबेत। भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुतः?' असे म्हणून अनाचारास प्रवृत्त होतात.

आत्मा जर ज्ञानात विषय होत नाही मग आत्मज्ञान कसे होते ? कोठल्याही लौकिक साधनांनी ते होत नाही. पण वेदोक्त साधनेने व गुरुसेवेमुळे ते होऊ शकते. पोपट पिंजऱ्यात असला की तो बद्ध असतो. पण तो जर आपण होऊन घरात आला तर स्वतंत्रच असतो. तसेच शरीरत्रयात जीवात्मा बद्ध झालेला आहे. अज्ञानाचा पिंजरा काढून

टाकल्यावर घरात आलेल्या मुक्त पोपटाप्रमाणे जीवात्मा शरीरात असूनही मुक्त असतो. त्याला केव्हाही जाण्यायेण्याचे स्वातंत्र्य असते.

**क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि सर्वक्षेत्रेषु भारत ।**
**क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतं मम ॥ २ ॥**

हे भरतश्रेष्ठा, आणि सर्व क्षेत्रांच्या ठिकाणी जो क्षेत्रज्ञ तो मी आहे असे जाण. क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचे ( वेगळेपणाचे ) ज्ञान ते यथार्थज्ञान आहे असे माझे मत आहे.

शरीर म्हणजे क्षेत्र व ते जाणणारा क्षेत्रज्ञ. पण शरीरात जीवात्मा व परमात्मा हे दोघे आहेत त्यापैकी कोण? येथे जीव हा अर्थ घ्यावयाचा. जीव ब्रह्मरूपी आहे. हा एक सूत्रमय श्लोक असून तो चार गोष्टी सिद्ध करतो. १) ब्रह्म अप्रत्यक्ष आहे. शास्त्रात त्याचे वर्णन केलेले असते. पण प्रत्यक्ष मात्र कधीच दिसत नाही. जीव मात्र दिसतो. जीव-ब्रह्माच्या एकत्वाच्या ज्ञानाने त्याचे अप्रत्यक्षपण जाते. २) ब्रह्म अद्वितीय आहे असे वेद सांगतात. जीव व शिव भिन्न भिन्न मानल्यास शास्त्राला बाध येतो. पण दोन्ही एकच धरल्यास त्यांचे अद्वितीयत्व कायम राहिल्याने शास्त्र सफल होते. ३) जीव हा संसारी आहे व ४) जीव दुःखरूपी आहे.

वैभवसंपन्न राजा झाला तरी त्याच्यामागचे दुःख काही जात नाही. सर्वांच्यामागे दुःख लागलेलेच आहे. फरक इतकाच की काही लोक आपली दुखे सांगतात, तर काही ती मनातच ठेवतात. जीव व ब्रह्म एक मानल्यास जीवाचे सांसारिकत्व जाते व दुःखरूपही जाते. कारण ब्रह्मास प्रपंच नाही व ते निव्वळ आनंदरूप आहे.

सांख्यशास्त्राप्रमाणे क्षेत्र व क्षेत्रज्ञाला प्रकृति व पुरुष अशी संज्ञा आहे. प्रकृति म्हणजे अनात्मा व पुरुष म्हणजे आत्मा. हे वेगवेगळे आहेत हे समजणे म्हणजेच ज्ञान होणे. पण अनुभवाशिवाय दुःखनिवृत्ति

होत नाही. म्हणून सांख्यांचे ज्ञान ( मत ) यथार्थ नाही. कारण देहाला पापपुण्य, सुखदु:खे आहेत. लिंग देहाला कर्तृत्व, भोक्तृत्व तर स्थूल देहाला जरा, मरण, व्याधि, बाल्य, तारुण्य, वार्धक्य, जागृति–स्वप्न–सुषुप्ति इ. अवस्था आहेत. म्हणजेच सारे गुणधर्म व विकार आहेत. पण आत्मा त्यापेक्षा वेगळा असता जीव हे सर्व गुणधर्म व विकार हे आत्म्याचेच असे मानून दु:खी होतो. स्वप्नात झालेल्या चोरीबद्दल जागे झाल्यावर कोणी तक्रार नोंदवीत नाही. तसेच जीव-ब्रह्माचे ऐक्य आहे असे ज्ञान म्हणजेच साक्षात्कार झाल्यावर आत्मा निरुपाधिक आहे हे कळते व शरीर विद्यमान असताही तो उपाधींबद्दल तक्रार करीत नाही. त्यालाच जीवनमुक्त म्हणतात.

व्यवहारातील सर्व ज्ञाने निष्फळ आहेत. इंजिनियर झालेला तरुण जर म्हणाला की, मी पैशासाठी धडपडणार नाही. नोकरीही करणार नाही. अशा तरुणाला तो ज्ञानी असला तरी त्यास वर म्हणून कोणी पसंत करील असे वाटत नाही. पण सैन्यातील अधिकारी–याचा जीव सदैव धोक्यात असला तरी त्याला भरपूर पगार मिळतो. म्हणून मुली असा वर पसंत करतात. यावरून हे दिसून येते की, लोकांचे लक्ष ज्ञानाकडे नसून पैशाकडे असते. एक वर्ष नोकरी: करून राजीनामा सादर केला तर त्याला पेन्शन मिळत नाही. त्यासाठी २०।२५ वर्षे सतत नोकरी करावी लागते. म्हणजे व्यवहारातील ज्ञानाने फक्त क्रियेची योग्यता येते. व्यावहारिक ज्ञान हे क्रियेचे एक अंग बनते. ज्ञान गौण ठरते. तत्त्वज्ञानात मात्र ज्ञानच श्रेष्ठ ठरते, कारण हे ज्ञान झाल्यावर सर्व क्रियाच संपतात.

एका अत्यंत धनिक गृहस्थाने आलिशान बंगला बांधून त्यात असंख्य विजेचे दिवे लावले. जिकडे तिकडे लखलखाट झाला. तो पहायला खूप लोक जमले; तोच अचानक दिवे जाऊन अंधार पसरला. तुम्ही घर माझे म्हणता, पण त्यांतील दिव्यांवर जशी घरमालकाची सत्ता

चालत नाही, तसेच देह माझा म्हणणाऱ्याचीही त्यातील चैतन्यदीपावर सत्ता चालत नाही.

हल्ली काही घरातून दिव्यांची अशी रचना केलेली असते की तेथे दिवा दिसत नाही, त्याचा प्रकाश मात्र पसरलेला असतो. असे खूप दिवे लावले तर घर प्रकाशाचेच बनले. आहे असे भासते. प्रकाश व घर यांचे तादात्म्य झाल्यामुळे प्रकाशाची उपाधी घरावर लादली जाते. त्याचप्रमाणे जीव व शरीरत्रयींचे तादात्म्य झाल्यामुळे प्रपंच सत्य भासतो आणि सारा घोटाळा होतो.

भगवान सांगतात, 'अर्जुना क्षेत्रज्ञसुद्धा मीच आहे.'

अर्जुन :– जीव हा क्षेत्रज्ञ असून तोच प्रत्येक शरीरात आहे, मग तुम्ही स्वत:ला क्षेत्रज्ञ कसे म्हणता ?

भगवान :– अर्जुना जो जीव आहे तोच शिवही आहे. तुझ्या घरातील आकाश व शेजारच्या घरातील आकाश ही काय भिन्न आहेत ? एकच आहेत, पण घरांच्या उपाधीमुळे वेगवेगळी वाटतात. तसेच देहाच्या उपाधीमुळे जीव व शिव हे भिन्न वाटतात. पण वास्तविक ते दोघे एकच आहेत.

**तत्क्षेत्रं यच्च यादृक्च यद्विकारि यतश्च यत् ।**
**स च यो यत्प्रभावश्च तत्समासेन मे शृणु ॥ ३ ॥**

ते क्षेत्र कोणते, कोणत्या प्रकारचे, कोणत्या विकारांनी युक्त आणि त्यापासून कोणते कार्य उत्पन्न होते आणि तो क्षेत्रज्ञ कोण व त्याचा प्रभाव कोणता हे माझ्याकडून संक्षेपाने ऐक.

जगात शुद्ध पदार्थ मिळणे दुरापास्त आहे. तो पदार्थ बाजारात येण्यापूर्वी त्यात कांहीतरी मिश्रण केले जाते. शुद्ध व मिश्रित पदार्थ हुडकून काढणे जसे अवघड जाते, तसेच क्षेत्र व क्षेत्रज्ञ हुडकणे कठीण आहे. क्षेत्रज्ञ म्हणजे ते क्षेत्र–शरीर जाणणारा. अनेक देहांतील क्षेत्रज्ञ

अनेक नसून एकच आहे. हे तत्त्व फार सूक्ष्म आहे. पुनः पुनः सांगितले तरी पुनः पुनः विसर पडतो. म्हणून शास्त्रकार तत्त्वविवेचन पुनः पुनः करा असे प्रतिपादन करतात. मुलगी देण्यापूर्वी मुलाची सर्व माहिती काढलेली असली तरी त्याचे खरे स्वरूप लग्नानंतर होणाऱ्या परिचयानेच समजून येते. क्षेत्र—क्षेत्रज्ञ विवेकाचा जसजसा अधिकाधिक परिचय घडून येईल, तसतसे ज्ञान पक्के होते. या क्षेत्र व क्षेत्रज्ञासंबंधी आतापर्यंत अनेकांनी चर्चा केली आहे. पण येथे भगवंत थोडक्यात वर्णन करून सांगत आहेत. क्षेत्र हे दृश्य आहे व विकारी आहे.

**ऋषिभिर्बहुधा गीतं छन्दोभिर्विविधैः पृथक् ।**
**ब्रह्मसूत्रपदैश्चैव हेतुमद्भिर्विनिश्चितैः ॥ ४ ॥**

हे ऋषींनी वेगवेगळ्या प्रकारांनी चर्चिले, छंदोबद्ध ग्रंथांनी अनेक प्रकारांनी वेगवेगळे वर्णन केले. युक्तियुक्त व निश्चित अशा ब्रह्मसूत्रांनी हे चांगले निश्चित करण्याचा प्रयत्न केला आहे.

वासिष्ठ, पराशर, व्यास यासारख्या ऋषींनी योगवासिष्ठ, अग्नि-पुराण, वायुपुराण या ग्रंथांत या विषयाची चर्चा केली आहे. छंद म्हणजे वेद. या वेदांनीही याचे वर्णन केले आहे. 'अथातो ब्रह्मजिज्ञासा', 'जन्माद्यस्य यतः' ही ब्रह्मसूत्रे व्यासानी रचिली आहेत. यांचा अभ्यास केल्यास साक्षात्कार हमखास झालाच पाहिजे, असा त्यांचा अधिकार आहे. हेतुमद्भिः म्हणजे युक्तियुक्त. व्यासांची सूत्रे निश्चित बोध करतात. काही डॉक्टर हे तपासा, ते तपासा, अमका फोटो काढा, तमकी परीक्षा करून या, असे करायला लावतात, तरीही त्यांना खऱ्या रोगाची परीक्षाच होत नाही. त्यामुळे अचूक औषध योजनाही ते करू शकत नाहीत. व्यासांचे तसे नाही, त्यांची सूत्रे निश्चित बोध करतात.

**महाभूतान्यहंकारो बुद्धिरव्यक्तमेव च ।**
**इन्द्रियाणि दशैकं च पञ्च चेन्द्रियगोचराः ॥ ५ ॥**

पाच महाभूते, अहंकार, बुद्धि, अव्यक्त (मूळ प्रकृति), दहा इंद्रिये व अकरावे मन आणि इंद्रियांचे दहा विषय.

पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश ही पंचमहाभूते, अहंकार, समष्टि बुद्धि, अव्यक्त म्हणजे माया, नाक, कान, डोळे, जीभ व त्वचा ही पांच ज्ञानेंद्रिये, हात, पाय, वाणी व मलमूत्र विसर्जन करणारी दोन अशी पांच कर्मेंद्रिये व या इंद्रियांना प्रेरणा करणारे मन व शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हे इंद्रियांचे पांच विषय.

**इच्छा द्वेषः सुखं दुःखं संघातश्चेतना धृतिः ।**
**एतत्क्षेत्रं समासेन सविकारमुदाहृतम् ॥ ६ ॥**

इच्छा, द्वेष, सुख, दुःख, चेतना, धैर्य आणि संघात हे विकारासह क्षेत्र आहे असे संक्षेपाने सांगितले आहे.

नैय्यायिक म्हणतात इच्छा, द्वेष, सुख, दुःख, धैर्य वगैरे पाषाणाला निर्माण होत नाहीत. चेतनालाच निर्माण होतात. म्हणून तेही आत्म्याचेच धर्म आहेत. पण हे म्हणणे बरोबर नाही. इच्छा द्वेष वगैरे क्षणोक्षणी बदलत असतात व आत्मा सदैव एकरूपाने राहतो. मग ते आत्म्याचे गुण कसे होतील? शिवाय प्रत्येकाच्या म्हणजे प्रत्येक अंतःकरणाच्या इच्छा वेगवेगळ्या असतात. पण आत्मा एकच आहे. इच्छा वेगवेगळ्या म्हणून आत्मेही अनेक मानावे लागतील. म्हणून हे गुण आत्म्याचे मानता येत नाहीत. अर्जुना हे मी तुला 'समुदाहृतम्' म्हणजे उत्कृष्ट रीतीने सांगितले.

क्षेत्रज्ञ म्हणजे क्षेत्रापेक्षा विलक्षण, चेतन, द्रष्टा, अधिकारी, नित्य, अपरिमित असा आहे. शरीर सारखे बदलत असते. त्याला बाल्य, तारुण्य, वृद्धत्व, जागृति, स्वप्न, सुषुप्ति इत्यादि अवस्था प्राप्त होत असतात. पण क्षेत्रज्ञ बदलत नाही. त्याचे स्वरूप फारच सूक्ष्म आहे. अंतःकरणातील दोष नाहीसे झाल्याखेरीज ते सूक्ष्म रूप कळणार नाही. नुसत्या

डोळ्यांनी सूर्याचे परीक्षण करता येत नाही. त्याकरता विशेष प्रकारची दुर्बीण घ्यावी लागते. अशुद्ध मनाने क्षेत्रज्ञाचे ज्ञान होणार नाही. शुद्ध मन करण्यासाठी पुढील साधने आहेत.

**अमानित्वमदम्भित्वमहिंसा क्षान्तिरार्जवम् ।**
**आचार्योपासनं शौचं स्थैर्यमात्मविनिग्रहः ।। ७ ।।**

अमानित्व, दंभराहित, अहिंसा, सर्वसहनशीलता, सरळपणा, सद्गुरु–सेवा ( अंतर व बाह्य ) शुद्धि, स्थैर्य, अंतःकरण–निग्रह.

**अमानित्व–** मनुष्य हा स्तुतिप्रिय आहे. लोकांनी आपले कौतुक करावे म्हणून आपल्या असलेल्या व नसलेल्या गुणांचीही जाहिरात करीत असतो. पण संत तुकाराम म्हणतात, ' लहानपण देगा देवा । मुंगी साखरेचा रवा ।। मोठेपणाबरोबर अंगावर जबाबदाऱ्या येतात. हत्तीला अंकुशाचा मार सहन करावा लागतो. पण लोक हे विसरतात. ज्ञानेश्वरही ' थोरपणा पऱ्हा सांडिजे । येथ व्युत्पत्ति अवघी विसरीजे । जै जगा धाकुटा होईजे । तै जवळीक माझी ।। असे लहानपणाचेच कौतुक करतात. मानित्व आपोआप येते. अमानित्व अंगी यावयास विवेकाची गरज असते. मोठा अडकतो पण लहान सुटतो. म्हणून मोठेपणा, मानसन्मान इत्यादी गोष्टींच्या मागे माणसाने लागू नये.

**अदंभित्व–** आपण केलेला धर्म व साधने कायावाचेने प्रगट करणे म्हणजे दंभ. येवढेसे कुठे काही केले की लगेच त्याचा गाजावाजा कशाला हवा ? शिवाय ' धर्मः क्षरति कीर्तनात् ' असा नियम आहे. ईश्वर सर्वसाक्षी व सर्वांतरयामी असल्याने तुम्ही काय करता हे का त्याला कळत नाही ? त्यासाठी डांगोरा पिटण्याची आवश्यकताच नाही.

**अहिंसा :–** दुसऱ्याला कायावाचामनानेही पीडा न देणे याचे नाव अहिंसा. पूर्वकालीन ऋषींच्या आश्रमात गायी व वाघ एकत्र नांदत असत. कारण आश्रमवासी दुसऱ्याला पीडा न देण्याचे व्रतच पाळीत असत.

अहिंसा धर्माने वागल्यास वैरभावही नष्ट होतो. ' अहिंसायां प्रतिष्ठायां वैरत्यागः तत्संनिधौ. '

**क्षान्ति :—** लहानाला खुशाल शासन करा, पण बरोबरीच्या किंवा तुमच्याहून वडील मंडळींच्या हातून चूक झाल्यास गप्प बसा. ईश्वर त्यांना शासन करण्यास समर्थ आहे. ईश्वराचा कायदा माणसाने हाती घेऊ नये.

**आर्जवम्—** बोलायचे एक व करायचे भलतेच असे न करता काया-वाचा-मनात एकवाक्यता असणे म्हणजे सरळपणा.

**आचार्योपासना—** धर्मोपदेश करतो तो गुरु. अशा आपल्या गुरूची मनःपूर्वक सेवा करून त्याला प्रसन्न करून घ्या. ' गुरुः साक्षात् परब्रह्म ' असल्याने तो प्रसन्न झाल्यास केवळ त्याच्या संकल्पाने, दृष्टीने, शब्दाने अगर स्पर्शाने आत्मज्ञान होते.

**शौचं—** अंतर्बाह्य शुद्धता राखणे. माती लावा अगर साबण लावा. पण स्नान करून बाहेरून स्वच्छ व्हा व कामक्रोधादि विकार नाहीसे करून आंतूनही शुद्ध झाले पाहिजे.

**स्थैर्य—** श्रवण-मनन निदिध्यासन करत असता लोकांनी पीडा दिली तरी त्यामुळे मन बदलू न देता स्थिर मनाने साधने करीत राहणे व त्यात खंड पडू न देणे म्हणजे स्थैर्य.

**आत्मविनिग्रह—** मनाला विषयांचे स्मरण, दर्शन, श्रवण फार आवडते. म्हणूनच माणस हाल सासून सिनेमा, नाटके प्रदर्शने पहायला जातात. पण ईश्वराचे ध्यान करायला मात्र ते तयार नसतात. विषयांच्या स्मरण दर्शनादिकांपासून मनाला परावृत्त करून त्याला आत्मचिंतन करायला लावायचे याला आत्मनिग्रह म्हणतात.

**इन्द्रियार्थेषु वैराग्यमनहंकार एव च ।**
**जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनम् ॥ ८ ॥**

इंद्रियांच्या विषयांच्या ठिकाणी वैराग्य, (कर्मांच्याविषयी) अहंकाराचा अभाव, जन्म, मृत्यु, म्हातारपण, रोग इत्यादींच्या ठिकाणी दुःखांची व दोषांची जाणीव.

**इंद्रियार्थेषु वैराग्यम्**— वर सांगितलेली साधने वैराग्य असेल तरच जमतात. शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हे पांच विषय असून जगांतील सर्व पदार्थ त्यात अंतर्भूत आहेत. सामान्यपणे सर्व इंद्रिये या विषयांमागे धावत असतात. शुकासारखा वैराग्यसंपन्न विरळा. ईश्वराच्या सगुण रूपावर प्रेम बसून ते रूप मनात ठसल्यास विषयांची आसक्ति कमी होते. किंवा शास्त्रोक्त कर्मे ईश्वरार्पण बुद्धीने केल्यास मन शुद्ध होते व त्यात वैराग्याचा उदय होतो. विषयांतील दोष कळल्यानेही वैराग्य येते. हे साधन संन्याशांना सुलभ असून संसारी जनांना प्रायः ते दुर्लभ आहे. पण या साधनाखेरीज बाकीची १८ साधने करीत राहिल्यास वैराग्याचा प्रार्दुभाव होतो.

**अनहंकार**:— अनहंकार म्हणजे विनय. साधक हा विनयसंपन्न असलाच पाहिजे. पाऊस सर्वत्र सारखाच पडतो, पण डोंगरावर पडलेले पाणी वाहात खाली येते व भुसभुशीत जमिनीत मुरते. त्याचप्रमाणे विनम्रपणा असेल तरच ज्ञान हृदयात रुजते. म्हणून शास्त्रकार सांगतात की, गुरु किंवा वक्ता जे सांगत असेल ते जरी ज्ञात असले तरी साधकाने ते शांतपणे व विनयाने ऐकून घेतले पाहिजे. त्यामुळे त्या विषयाची एखादी अधिक छटा कळल्याशिवाय राहात नाही. म्हणूनच 'तद्विद्धि प्रणिपातेन' ही पहिली अट शिष्याला सांगितली असून नंतर 'परिप्रश्नेन' म्हणजे शंका विचारून ज्ञान करून घ्यावे.

**जन्म-मृत्यु-जरा-व्याधि-दुःख-दोषानुदर्शनम्**— मुलगा झाला की लोक पेढे वाटतात. त्याचे बारसे बँड लावून करतात. असे असता जन्म हा दुःखकारक कसा म्हणता येईल? तासाभराच्या प्रवासात

गर्दीमुळे अवघडून बसावे लागले तर त्यावेळी तर त्रास होतोच, पण घरी आल्यावरही अंग ठणकते. मग प्राणी गर्भात नऊ महिने हातपाय आखडून जखडलेल्या अवस्थेत असतो. हे दुःख नव्हे का? त्याच्यावर जरायूचे घट्ट आवरण असते, कृमी चावत असतात, मातेच्या जठराग्नीचा ताप होत असतो. शरीर मोठे व बाहेर पडण्याचा मार्ग आकुंचित, त्यात प्रसूति-वायूचा वेग त्यामुळे तो मूर्च्छित पडतो. आत असता 'सोडव या यातनेतून' अशी भगवंताची केलेली प्रार्थना या बेशुद्धावस्थेत विसरून जातो व बाहेर येताच पुनः दुःखमय जगात रमतो.

काही जीवांच्या नशिबी जन्माच्या वेळीच कापाकापी येते. जन्माजवळ गर्भवासाचे दुःख तर मरणाजवळ नरक-यातनांचे. मरणसमयी एकदम १७ मर्मस्थाने सुटतात. १०० विंचू एकदम डसावे तशा वेदना होतात. प्राण आकुंचन पावतो, जोराचा श्वास लागतो. मरणानंतर यमदूत छळतात व नरकवासाचे दुःख भोगावे लागते. जरा म्हणजे वृद्ध-पण. वृद्धपणी वडील म्हणून कधीतरी नमस्कार केला जातो येवढेच मानले तर सुख. पण अवयव शिथिल होतात, बुद्धि, स्मरणशक्ति क्षीण होते, कानाने ऐकू येत नाही, डोळ्याने दिसत नाही, उठता बसता सांधे दुखतात, चालवत नाही, तोंडातून लाळ गळते, रूपाचे बेरूप होते व आपलेच लोक आपला अपमान करतात. असे म्हातारपणाचे दुःख भयंकर आहे.

**व्याधि :–** म्हणजे आजारपण. आजारपणाने शरीर दुर्बल होते. कडू ओषधे प्राशन करावी लागतात. तीक्ष्ण सुयांनी टोचून घ्यावे लागते. नुसते अंथरुणावर पडून रहायचे तरी जीव कंटाळून जातो. जन्म, मृत्यु व जरा या व्याधीतून कोणीही सुटलेला नाही. म्हणून यांतील दोषांचे व दुःखांचे सतत स्मरण ठेवले पाहिजे.

**असक्तिरनभिष्वङ्गः पुत्रदारगृहादिषु ।**
**नित्यं च समचित्तत्वमिष्टानिष्टोपपत्तिषु ॥ ९ ॥**

( देहासंबंधी ) अनासक्ति, स्त्री, पुत्र, गृह इत्यादीबद्दल अलोलुपता व इष्ट किंवा अनिष्ट प्रकार घडले तरी चित्ताचे समत्व कधीही ढळू न देणे.

**असक्तिरनभिष्वङ्गः पुत्रदारगृहादिषु**— बायको, मुले घर पैसा हे सर्व आवश्यक व चांगले आहेत. पण सदासर्वकाळ त्यांतच गढून जाणे योग्य नाही. घर सोडून तासभर कीर्तन प्रवचनाला वेळ देतात ते त्यांच्या सुकृतामुळेच म्हटले पाहिजे. घराला कुलूप लावून व ते पक्के बसले आहे याची तीन तीन वेळा खात्री करून जरी एखादा देवाला गेला तरी त्याचे चित्त घरांतच असते. पुराणाला बसलेल्या बायका घरांतील साखर दूध चहा करून कोणी संपवून तर टाकणार नाहींत ना, या विचाराने ग्रस्त झालेल्या असतात. परमेश्वराचे गुणगान ऐकताना घरातील काही जिन्नस कमी झाले म्हणून भिऊ नका. नशीबात असेल तर ते जिन्नस पुनः मिळाल्याशिवाय राहणार नाहीत, याची खात्री बाळगा. मुलांचे संगोपन करणे हे कर्तव्य आहे खरे, पण चोवीसही तास त्यातच गुरफटून जाणे योग्य नव्हे. स्वतःकरता एखादा तास तरी द्या.

**नित्यं च समचित्तत्वं इष्टानिष्टोपपत्तिषु** चांगली घटना घडली की आनंदाने हुरळून जाणे व थोडेसे अनिष्ट झाले की लगेच खिन्न होणे. इष्ट गोष्ट घडून आली की मनुष्य ती आपली पुण्याई समजतो. मग त्याच न्यायाने अनिष्ट गोष्टीलाही तोच जबाबदार नाही का ? अनिष्ट गोष्टीही आपल्याच प्रमादाची फळे असतात. म्हणून सुखदुःख सारखेच मानून सहन करणे आवश्यक आहे. शास्त्राने साधना करण्यास योग्य वेळ सकाळचा पहिला प्रहर किंवा संध्याकाळ अशी सांगितली आहे.

अशा वेळी हर्षविषाद आले तर नित्यकर्मात व्यत्यय येतो. रोजचे स्तोत्रपठण वा जप करायचे राहून जाते. सामान्य माणसे म्हणतील एखादा दिवस नियम चुकला म्हणून काय झाले. पण साधकाच्या दृष्टीने प्रत्येक क्षण महत्त्वाचा असतो. 'आज राहू द्या, उद्या करू' असे म्हटले की मनाला तीच संवय लागते. शरीराला जसे रोजच्या रोज अन्नपाणी हवे, तसेच मनालासुद्धा रोज विचारांचे खाद्य पुरविणे आवश्यक आहे. देवपूजेला दहा मिनिटांहून अधिक काळ लागत नाही. पण नेमके त्याच वेळांत पोस्टमन, पाहुणे, दूध येते, मुलांच्या अभ्यासाच्या शंका निर्माण होतात. कर्तव्य करीत असता आपली सत्त्वपरीक्षा पाहण्यासाठीच हे व्यत्यय आलेले आहेत, असा विचार करून एकाग्र चित्ताने पूजाअर्चा करावी.

**मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी ।**
**विविक्तदेशसेवित्वमरतिर्जनसंसदि ॥१०॥**

आणि माझ्या ठिकाणी अनन्यपूर्ण व अव्यभिचारी भक्ति, एकान्त प्रदेशात राहणे व जनसमुदायात राहण्याबद्दल खंत.

ईश्वर हाच सर्वश्रेष्ठ आहे असा मनाचा निश्चय हवा. त्यासाठी सदैव ईश्वरचिंतन, ध्यान व पूजन करणे. ते करताना ईश्वराचे सान्निध्य आहे अशी भावना असणे व हे सर्व निष्काम बुद्धीने केवळ भगवंताच्या प्रेमासाठी करणे. तसेच एकान्तवासाचीही जरूरी आहे. विषयचिंतन सोडून काही क्षण तरी राहण्यास एकान्ताची मदत होते. हल्लीच्या जागेच्या अडचणीमुळे हे जमणे कठीण आहे खरे. पण त्यातूनही अलिप्त राहण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

सज्जनांच्या संगतीत जितके राहता येईल तितके राहा. त्यात नुकसान काही नसून उलट चांगले संस्कार होतात. तेच टवाळ लोकात बसलात तर नको ते ऐकावे लागते. आपल्याही तोंडातून अर्वाच्य शब्द बाहेर पडतात. म्हणून अशा लोकांपासून दूर राहिले पाहिजे.

कीर्तन-प्रवचनांत कान मंद होतात, तर भांडण ऐकताना ते तीव्र बनतात. ज्यांच्या संगतीमुळे साधनात व्यत्यय येईल त्यांचा संबंध न ठेवणे चांगले.

**अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्त्वज्ञानार्थदर्शनम् ।**
**एतज्ज्ञानमिति प्रोक्तमज्ञानं यदतोऽन्यथा ॥११॥**

नेहमी आत्मानात्मविवेक करीत राहणे, तत्त्वज्ञानाचा अर्थ म्हणजे फळ जो मोक्ष त्याचे आलोचन करणे, या सर्वाला ज्ञान असे म्हणतात. याखेरीज जे इतर ज्ञान ते सर्व अज्ञान होय.

भगवंतानी प्रथम ३६ पदार्थ सांगून क्षेत्राचे वर्णन केले. नंतर क्षेत्रज्ञासंबंधी सांगावयाचे, पण तो अतीसूक्ष्म असल्याने त्याच्या प्राप्तीसाठी अमानित्वादि २० साधने सांगितली. त्या सर्वात ' अध्यात्मज्ञान–नित्यत्व ' हे प्रधान आहे. बाकीची गौण होत. समोरचे पदार्थ दिसण्यासाठी डोळे हवेत. पण प्रकाशच नसेल तर डोळे असूनही वस्तु दिसणार नाही. म्हणजे प्रकाश हे सहकारी साधन आहे. भात करावयाचा झाल्यास तांदूळ हे प्रधान साधन. पण त्यासाठी अग्नी, पाणी, भांडे या साहाय्यक साधनांचीही तितकीच गरज असते. पण यातील प्रधान साधन हेच महत्त्वाचे. कारण डोळे असतील तर प्रकाशाची व तांदूळ असतील तर चूल, पाणी, भांडे यांची जमवाजमव करता येते. त्याचप्रमाणे आत्म्याची ओळख होण्यासाठी अध्यात्मज्ञानाची म्हणजेच वेदान्त या प्रधान साधनाची नितांत गरज आहे.

पण वेदान्ताकडे लोक सहसा फिरकत नाहीत. कारण व्यवहारातील पदार्थ–अन्न, वस्त्र, पैसा इत्यादी–मिळाले नाहीत तर माणसाचे व्यवहारच अडतात. म्हणून त्यांच्या प्राप्तीसाठी माणसे चोरटा व्यापार, काळा बाजार, साठेबाजी, भेसळ इत्यादी अनाचार करतात. तसे आत्मज्ञान झाले नाही तर काही रोजचे व्यवहार अडत नाहीत. म्हणून माणसाची त्याकडे प्रवृत्ति क्वचितच होते.

'आजीवितं त्रयः सेव्याः वेदान्तो गुरुरीश्वरः' असे म्हटले आहे. वेदान्त सांगणारा गुरु हवा व तो समजण्यासाठी ईश्वरकृपा हवी म्हणजे वेदान्तातच गुरु व ईश्वराचाही समावेश होतो. पण यांची सेवा आजीवित का करावयाची ? स्वयंपाक झाल्यावर चुलीचे काम संपले म्हणून काही ती मोडून टाकायची नसते. कारण पुनः चूल पेटवावीच लागते. तसेच ज्ञानाचे आहे. प्रथम मिळविण्यासाठी व नंतर ते टिकविण्यासाठी वेदान्त, गुरु व ईश्वराची सेवा करीत राहणे अगत्याचे आहे. ज्यांच्यामुळे ज्ञान झाले त्यांची सेवा सोडल्यास कृतघ्नपणाचा दोष लागेल. शिवाय काम झाले की जड पदार्थाचा त्याग करता येतो. ईश्वर व गुरु हे चेतन आहेत व चेतनाला जडाचे नियम लावता येत नाहीत.

नित्य अभ्यास म्हणजे श्रवणमनन करणे हे आपल्या हातातले आहे. हल्ली शाळा-कॉलेजात श्रवण कमी पडते, म्हणून विद्यार्थी विशेष वर्गाकडे धाव घेतात. मनन कमी पडल्यास सहाध्यायाबरोबर चर्चा करून त्याची पूर्तता करता येते. (मात्र निदिध्यासन ही उच्च कोटी आहे) सतत वेदान्ताच्या अभ्यासात रमता यावे म्हणून 'तत्त्वज्ञानार्थचिंतनम्' हा मार्ग आहे. हा मार्ग साधण्यासाठी फलाचा (मोक्षाचा) विचार महत्त्वाचा आहे. 'सर्व दुःखनिवृत्तिः मोक्षः' असे नैय्यायिक म्हणतात. दुःख निवृत्तीसाठी लोक दवाखान्यात जातात. दुखणारे अवयव कापून टाकायलाही तयार होतात. काही 'परमानन्दप्राप्तिर्मोक्षः' असे म्हणतात. पण वेदान्ती या दोन्हीला मिळून मोक्ष म्हणतात. 'जादूगार पांच मिनिटे अधांतरी चालतो. तो तसे सतत चालू शकत नाही. म्हणून त्याचे चालणे आपण खोटे मानतो. तसेच नित्य सुखाचे आहे की काय' अशी शंका अर्जुनाच्या मनात येताच सर्वज्ञ भगवंतानी त्या शंकेचे निरसन करण्यास प्रारंभ केला.

सामान्य माणसालाही नित्यसुखाचा अनुभव घेता येतो. एखाद्याचे डोके दुखते म्हणून तो झोपतो. त्याला जर गाढ झोप लागली तर त्याची त्या वेळेपुरती डोकेदुखी नाहीशी होते. पुनः जागा झाला की डोके धरून बसतो. म्हणजे गाढ झोपेत दुःख नसते हे सिद्ध होते. गाढ झोपेत मनाचा आत्म्याशी संयोग होतो, म्हणून सुखाचा लाभ घडतो. जागेपणी मनाचा जगाशी संबंध आला की त्याबरोबर दुःखही येते. सामान्य माणसाला नित्य सुखाची कल्पना नसली तरी साक्षात्कारी पुरुषांनी नित्यसुख अनुभवलेले असते. एकदा समर्थांना फार थंडी वाजू लागली म्हणून त्यानी थंडीला एका घोंगडीत राहायला सांगितले व आपण आनंदात राहिले. म्हणजे मनाने देहसंबंध सोडून दिला. आमचे मन देहाला चिकटून असते. त्यामुळे कितीही पांघरूणे घेतली तरी आमची थंडी काही कमी होत नाही. बाजारच्या उत्तम आंब्यापेक्षा आपल्या परसातील सामान्य प्रतीचा आंबा अधिक चवदार लागतो. आत्मत्वामुळे अचेतन पदार्थही सुंदर होतात व सुख देतात. मग प्रत्यक्ष आत्मा सुखरूप असलाच पाहिजे.

नित्य व अनित्य असे सुखाचे दोन प्रकार आहेत. मन व विषयांच्या सन्निकर्षाने मिळणारे ते अनित्य सुख, व केवळ आत्म्याचे सुख ते नित्य सुख. आपण अनित्य सुखे अनुभवतो. ती अत्यंत अल्प काळ टिकणारी असतात. मग नित्य सुखासाठी प्रयत्न का करू नये ? नित्यसुख मिळविणे हाच खरा पुरुषार्थ आहे. अनित्य सुखे कृमीकीटकही मिळवितात. त्यात अलौकिक ते काय ? नित्यसुख मिळविण्यासाठी झटणे हेच मनुष्यत्वाचे लक्षण आहे.

आता भगवंत ज्ञान शब्दानी सांगितलेल्या साधनांनी जाणले जाणारे ज्ञेयाचे स्वरूप सांगत आहेत.

**ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वामृतमश्नुते ।**
**अनादिमत्परं ब्रह्म न सत्तन्नासदुच्यते ॥१२॥**

जे ज्ञेय आहे, जे जाणले असता मनुष्य अमृतत्व पावतो ते मी सांगतो. ते हे आदिरहित ब्रह्म होय. ते सत्‌ही नाही व असत्‌ही नाही, असे ज्ञाते म्हणतात.

ज्ञेय म्हणजे परब्रह्म. परब्रह्म जाणणारा मानव अमर होतो. ते अनादिमत् म्हणजे त्याला कारण नाही. त्याचा कशापासूनही जन्म झालेला नाही. पण जगाचा जन्म मात्र त्यापासून होतो. म्हणूनच व्यासानी 'जन्माद्यस्य यतः' असे सूत्र लिहिले आहे. सत् म्हणजे कार्य अर्थात् दिसणारा देह व त्यापुढील सर्व वस्तु. म्हणजेच प्रमाणाने समजणाऱ्या वस्तु. असत् म्हणजे कारण. यापेक्षा ब्रह्म वेगळे आहे. देह, इंद्रिये व मन यांची जाणीव होते. काही काळापूर्वी प्रसन्न असलेल्या मनात क्रोध निर्माण होतो. बुद्धिसुद्धा कधी चांगली तर कधी वाईट असते, हेही आपणाला कळते. हे सर्व जो जाणतो तो मात्र कोणाला कळत नाही. पण कळत नाही म्हणून तो नाही, असेही म्हणता येत नाही. कारण 'मी' आहे हा अनुभव प्रत्यक्ष आहे. म्हणूनच ब्रह्म सत् व असत् पेक्षा वेगळे मानावे लागते.

सर्वतः पाणिपादं तत्सर्वतोऽक्षिशिरोमुखम् ।
सर्वतः श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ॥१३॥

त्याला हातपाय सर्वत्र आहेत, त्याला डोळे, शिर व मुख सर्वत्र आहे. त्याला कान सर्वत्र आहेत. याप्रमाणे ते विश्वामध्ये सर्वाला व्यापून राहिले आहे. अर्थात् ते सर्वेन्द्रियांना प्रवर्तक असे आहे.

हातपाय इत्यादी कर्मेंद्रिये व डोळे, कान इत्यादि ज्ञानेंद्रियांचे ते प्रवर्तक आहे. त्यामुळेच तर गीता निर्माण होऊ शकली. पावसाचे चार थेंब आले तर लोकांची पांगपांग होते. पण बाणांचा वर्षाव होण्याची शक्यता असता अर्जुन कृष्णाचे बोल शांतपणे ऐकू शकला. कृष्णार्जुनांचे सूक्ष्म भाषण चालू आहे तोवर आपण शांत राहू या, असा विचार

करण्याइतके प्रतिपक्षी काही उदार वृत्तीचे नव्हते. पण परब्रह्मरूपी भगवंताने त्या सर्वांची इंद्रिये रोखून धरली होती. म्हणून अर्जुन शांतपणे ऐकू शकला.

शिपाई जनतेवर अधिकार गाजवितो, पण जेव्हा त्याच्या अंगावर सरकारी गणवेश नसेल तेव्हा त्याला कोणी भीत नाही. म्हणजे खाकी पोषाख घातल्यावर शिपायाला शक्ति येते. ती शासनाच्या अस्तित्वामुळे आलेली असते. मंत्रीपदावर असता उठसूठ परदेश दौरे काढणारी व्यक्ति मंत्रीपद गेल्यावर देशातल्या देशातही दौरे काढत नाही. राजसत्तेची मागे प्रेरणा असते, तोवर त्या व्यक्तीच्या उड्या चालतात. मागील प्रेरक शक्ति गेली की त्याला गप्प बसावे लागते. म्हणून इंद्रियांना जरी आपले म्हटले तरी त्यांना प्रेरणा देणारी एक वेगळीच शक्ति आहे. तिचे नांव परब्रह्म. सर्वांचे हात, पाय, कान, डोळे हे त्या परब्रह्माचे आहेत व ते सर्वत्र व्यापून राहिले आहे. सर्वत्र त्याचीच सत्ता आहे.

**सर्वेन्द्रियगुणाभासं सर्वेन्द्रियविवर्जितम् ।**
**असक्तं सर्वभृच्चैव निर्गुणं गुणभोक्तृ च ॥१४॥**

सर्व इंद्रिये ( चक्षुरादि ) व गुण ( सत्त्वादि ) यांच्या आकाराने ते भासते. पण ते स्वतः सर्व इंद्रियांनी विरहित आहे. ते सर्वत्र असक्त तथापि सर्वभृत् ( सर्व धारण करणारे), निर्गुण पण गुणांचे पालन करणारे आहे.

ते ब्रह्म सर्व इंद्रियांच्या विषयांना जाणते, पण त्याला तर कोणतेच इंद्रिय नाही. ते अतींद्रिय व निरवयव आहे. त्याला मुळात देहच नाही तर इंद्रिये तरी येतील कोठून. असक्त म्हणजे असंग. जगाशी त्याचा संबंध नाही. आकाशाचा मेघाशी संबंध नसताना आकाशात जसे मेघ राहतात तसे ब्रह्माच्या ठिकाणी जग राहते. ते सर्वभृत् म्हणजे सर्व जगाला धारण करणारे आहे. वस्तुतः निर्गुण पण देहद्वारा गुणांचा उपभोग घेते.

**बहिरन्तश्च भूतानामचरं चरमेव च ।**
**सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चान्तिके च तत् ॥१५॥**

ते भूतमात्राच्या बाहेर आहे व आंतही आहे. ते अचर आहे तसेच चरही आहे. सूक्ष्मत्वामुळे ते पूर्णपणे जाणण्याला अशक्य आहे. तसेच ते दूरही आहे व जवळही आहे.

प्रत्येक भूतमात्राच्या आत व बाहेर ते आहे. सर्व चराचर त्याने व्यापले आहे. अंधुक प्रकाशात पडलेली दोरी दुरून पाहणाऱ्या एकाला पुष्पमाला भासली, दुसऱ्याला बैल मुतून गेल्याची खूण वाटली, तिसऱ्याला ती भूमीला पडलेली भेग असावी असे वाटले, तर चौथा सर्प समजून घाबरून गेला. ते चौघे दिवा घेऊन जवळ जाऊन पाहतील, तेव्हा त्यांची एकवाक्यता होण्यास वेळ लागणार नाही. कल्पित पदार्थ (पुष्पमाला, सर्प इ.) अधिष्ठाना (दोरी) पेक्षा वेगळा नसतो. तसेच चर व अचर पदार्थही ब्रह्मापेक्षा वेगळे नाहीत. तेही ब्रह्मच आहेत. ते ब्रह्म ज्यांनी सुकृत केले नाही त्यांना हजारो मैल भटकत राहिले तरी भेटणार नाही. इतके ते दूर आहे. पण गुरुसेवा, ईश्वराराधना, श्रवणमननादि साधने करणाऱ्यांना ते प्राप्त करण्यासाठी कोठे दूर जावे लागत नाही. ते त्यांच्या अगदी जवळ म्हणजे त्यांच्या हृदयातच असते.

**अविभक्तं च भूतेषु विभक्तमिव च स्थितम् ।**
**भूतभर्तृ च तज्ज्ञेयं ग्रसिष्णु प्रभविष्णु च ॥१६॥**

ते तत्त्वतः अविभक्त आहे, तरी भूतांच्या ठिकाणी विभागल्यासारखे आहे. भूतांचे पालन करणारे व प्रलयकाळी भूतांचा ग्रास करणारे व उत्पत्तिकाळी निर्माण करणारे असे जाणावे.

वास्तविक ते विभक्त नाही पण ते तसे भासते. जसे आकाश एकच असताना ते उपाधीनुसार घटाकाश, मठाकाश असे वेगवेगळे वाटते.

ब्रह्मच भूतांचे पालनपोषण करते, त्यांचा नाशही ब्रह्मच करते व भूतांना पुन: उत्पन्न पण तेच करते. यावर अर्जुनाने अशी शंका घेतली की ही झाली ब्रह्माची लक्षणे, तीच जीवाला लावता येत नाहीत. मग जीव व शिव एकच कसे म्हणता येतील ? ' क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि ' हे आपले म्हणणेही जमत नाही.

भगवान म्हणाले, " जगन्निर्मिति हे ब्रह्माचे तटस्थ लक्षण व सच्चिदानंद हे स्वरूप लक्षण आहे. परमात्मा मायाविशिष्ट झाला की जग निर्माण करतो, ब्रह्माची माया व जीवात्म्याची अंत:करण ही उपाधि वगळली की दोन्हीकडे उरते फक्त चैतन्य अशा प्रकारे जीव हाच परब्रह्म होऊ शकतो.

**ज्योतिषामपि तज्ज्योतिस्तमसः परमुच्यते ।**
**ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं हृदि सर्वस्य धिष्ठितम् ॥१७॥**

त्यालाच तेजाचे तेज व अंधाराच्याही पलीकडील असे ज्ञाते म्हणतात. ज्ञान, ज्ञेय व ज्ञानाच्या योगाने जाणले जाणारे तेच आहे. सर्व भूतांच्या हृदयात तेच स्थित आहे.

चंद्रसूर्यासारखे तेजस्वी पदार्थ म्हणजे ज्योति, ब्रह्म चंद्रसूर्यांचेही प्रकाशक आहे. तम म्हणजे अज्ञान, अज्ञानाच्याही पलीकडे असलेले म्हणजे नित्य शुद्ध-बुद्ध-मुक्त स्वभावाचे ते आहे, ज्ञानही तेच व ज्ञेयही तेच. ते सर्वांच्या हृदयात आहे.

प्रत्येकाच्या हृदयात ब्रह्माप्रमाणेच कामक्रोधादि विकारही असतात, लोकांना हे विकार समजतात, पण तेथेच वास करणारे ब्रह्मतत्त्व मात्र समजत नाही. कारण ते समजण्यासाठी ज्ञानाची गरज असते व अमानित्वादि साधने केल्याखेरीज ज्ञानाची प्राप्ति होत नाही.

**इति क्षेत्रं तथा ज्ञानं ज्ञेयं चोक्तं समासतः ।**
**मद्भक्त एतद्विज्ञाय मद्भावायोपपद्यते ॥१८॥**

याप्रमाणे क्षेत्र तसेच ज्ञान व ज्ञेय याबद्दल संक्षेपाने सांगितले. हे तीन्ही जाणल्यावर माझ्या भक्ताला मद्भाव म्हणजे मद्रूपता येते. तो मत्स्वरूपाप्रत येतो.

**प्रकृतिं पुरुषं चैव विद्ध्यनादी उभावपि ।**
**विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृतिसंभवान् ॥१९॥**

प्रकृति आणि पुरुष ही अनादि आहेत असे जाण व विकार आणि गुण हे प्रकृतीपासून उत्पन्न झाले आहेत असे जाण.

भगवंतानी सातव्या अध्यायात परा व अपरा अशा दोन्ही प्रकृतीबद्दल सांगितले आहे. आता अधिक खुलासा करत आहेत.

प्रकृति पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश, मन, बुद्धि आणि अहंकार अशा आठ प्रकारांनी विभागलेली आहे. आकाशापासून वायू निर्माण होतो, तरी आकाश कायमच राहते. वायूपासून तेज निर्माण होऊनही वायूही कायमच राहते. पंचमहाभूते अशी एकांतून एक निर्माण होतात आणि स्वतः कायम राहतात. अशा प्रकाराला माया म्हणायचे, नाहीतर काय म्हणायचे? या प्रकृतीपासूनच महत्तत्व-समष्टिबुद्धि-निर्माण होते. आमच्याकडे बुद्धीचा एक अंशमात्र आलेला असतो. जगात एकाचा चेहरा जसा दुसऱ्यासारखा नसतो, तसेच व्यक्तीगणिक बुद्धीतही फरक आढळतो. बुद्धि इतकी सुंदर असता त्यापासून अहंकार का निर्माण व्हावा? म्हणून या सर्वाला माया म्हटले जाते. एखाद्या जादूसारखे हातात फक्त कोय घेऊन त्याचा फळांनी लगडलेला वृक्ष करून दाखवावा, तशी प्रकृति ही जादूगार आहे.

प्रकृति व पुरुष दोघेही अनादि असून त्यापासून हे चराचर विश्व निर्माण होते. पांच ज्ञानेंद्रिये, पांच कर्मेन्द्रिये, पांच विषय, व मन मिळून सोळा विकार आणि सत्त्व, रज व तम हे तीन गुण प्रकृतीचे आहेत. सत्त्वाने सुख, रजाने दुःख व तमाने मोह निर्माण होतो. विकार, गुण

व विषय यात सर्व चराचर आले. पण या प्रकृतीमध्ये पुरुषाचे वास्तव्य असेल तरच ती कार्य करू शकते. म्हणून प्रकृतीपेक्षा पुरुषालाच महत्त्व अधिक आहे.

**कार्यकरणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते ।**
**पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते ॥२०॥**

कार्यकरण यांच्या उत्पादनास मूळ प्रकृति कारण आहे असे म्हणतात. आणि सुखदुःखांच्या भोगाला कारण पुरुष आहे असे म्हणतात. अर्थात् शरीर इन्द्रियादिक हे प्रकृतीचे परिणाम आहेत.

कार्य म्हणजे शरीर, करण म्हणजे इन्द्रिये व कर्तृत्व म्हणजे उत्पादन. हे सर्व प्रकृतीचें आहे. पुरुष भोक्ता म्हणून त्याला सर्व आपत्ती व विपत्ती भोगाव्या लागतात. पण वस्तुतः पुरुष भोक्ता नसून अंतःकरणाच्या तादात्म्यामुळे तो भोक्ता आहे असे भासते. गाढ झोपेत हे तादात्म्य सुटते, म्हणून तेव्हा दुःख नसते. जाग येताच पुनः अंतःकरणाचा संबंध येऊन दुःख येते.

**पुरुषः प्रकृतिस्थो हि भुङ्क्ते प्रकृतिजान्गुणान् ।**
**कारणं गुणसङ्गोऽस्य सदसद्योनिजन्मसु ॥२१॥**

प्रकृतीच्या ठिकाणी स्थित असलेला पुरुष प्रकृतीच्या गुणांचा भोग घेतो. हा गुणसंयोगच त्याच्या चांगल्या वाईट जन्मांना कारण होतो.

प्रकृति पुरुषांचे तादात्म्य निर्माण होण्यास कारण एकच. ते म्हणजे अज्ञान. मेघ व आकाशाचा संबंध जसा अज्ञानजन्य किंवा काल्पित आहे, तसाच प्रकृति–पुरुषाचा संबंध अज्ञानजन्य आहे. पुरुष अजन्मा म्हणजे जन्म नसलेला असताही या प्रकृतीच्या संबंधात अडकल्यामुळे त्याला नाना योनीत जन्म घ्यावे लागतात. प्रकृति म्हणजे शरीर, म्हणूनच एकमेकांची गांठ पडली की प्रथम प्रकृति कशी आहे ? अशी चौकशी केली जाते. शरीरात क्षणोक्षणी विकार होत असतात. तारुण्यात

सहनशक्ति असल्याने ते जाणवत नाहीत. पण वार्धक्यात विकार पीडा देतात. पुरुष निर्विकारी असून प्रकृतीचे गुण उसने घेऊन तो हे भोग भोगतो. गाढ झोपेत शरीराला चंदन लावा अगर डांबर फासा, पुरुषाची तक्रार नसते. त्याला दोन्ही सारखेच असते. तो स्वतंत्र असेल तेव्हा काहीच भोग नसतात. 'आत्मा देहेन्द्रिययुक्तः भोक्ता' असे वचन आहे.

आता आत्म्याच्या खऱ्या स्वरूपासंबंधी भगवान आणखी सांगत आहेत.

**उपद्रष्टानुमन्ता च भर्ता भोक्ता महेश्वरः ।**
**परमात्मेति चाप्युक्तो देहेऽस्मिन्पुरुषः परः ॥२२॥**

आपणास वेगळा पाहणारा, अनुमोदन देणारा, भर्ता, उपभोग घेणारा महेश्वर या शरीरातील परमात्मा असे ज्याला म्हणतात, प्रकृतीच्या पलीकडचा पुरुष असे ज्याला म्हणतात तोच हा.

**उपद्रष्टा**— यज्ञात १६ ऋत्विज, यजमान व त्याची पत्नी असे अठराजण असतात. हे सर्व आपली कामे व्यवस्थित करतात की नाही हे पाहणारा जो असतो त्याला उपद्रष्टा म्हणतात. काम व्यवस्थित चालू असते तेव्हा तो स्वस्थ असतो. चूक आढळली की तो फक्त खूण करतो. यज्ञातच काय पण लग्न-मुंजीसारख्या समारंभातही असा कोणीतरी असावा लागतो. आपल्यावर नजर ठेवणारा कोणीतरी आहे व चूक झाल्यास शिक्षा होईल ही जाणीव असली की सर्वजण आपआपली कामे बिनचूक करतात. पुरुष असा उपद्रष्टा आहे. त्यालाच साक्षी असेही म्हणतात.

**अनुमंता**— अपराधी व्यक्तीच्या सहवासातील निरपराधी व्यक्तीही अपराधी म्हणून पकडली जाते. ज्या अर्थी अपराधी व्यक्तीची संगत केली त्या अर्थी त्याने केलेल्या गुन्ह्यास त्याची अनुमति आहे असे समजले जाते. म्हणूनच सभेचे कामकाज जेव्हा पसंत नसते, तेव्हा

सभासद सभागृहाबाहेर पडतात. द्रौपदी वस्त्रहरणाच्या प्रसंगी भीष्म-द्रोणांनी जर असा सभात्याग केला असता, तर त्यांना दोष लागला नसता. चोरून सोने आणताना जर आणणारा पकडला गेला तर तो माल आपला नाही असे म्हणून तो आपली सुटका करून घेतो. माझे म्हणाला की तो अडकलाच. देहेन्द्रियादिक आपआपले व्यापार करीत असता पुरुष त्यांना करा किंवा करू नका यापैकी काहीच म्हणत नाही. म्हणून सर्वजण त्याची आपणाला अनुमति आहे असे मानतात. म्हणून तो अनुमंता ठरतो.

**भर्ता :–** जीव जोपर्यन्त शरीरात आहे तोपर्यन्त शरीर सुंदर असते. देहेन्द्रियादिक आपआपले व्यवहार करतात. जीवाने शरीराचा त्याग केला की त्याला प्रेत ही संज्ञा येते व ते कुरूप दिसू लागते. त्यास दुर्गन्धी सुटू लागते. जीवामुळे शरीराचे धारण होते, म्हणून त्यास भर्ता असे म्हणतात.

**भोक्ता–** श्रुति म्हणते या शरीरात जीव व शिव हे दोन पक्षी, जीव विषयांचा भोग घेतो. ईश्वर मात्र कधीच भोग घेत नाही. कृष्णाने सांगितले मथुरेचे राज्य उग्रसेनाचे व द्वारकेचे बळरामाचे. राम म्हणे की लक्ष्मण, भरत, शत्रुघ्नांनी भोग भोगावेत मला त्याची जरूरी नाही. पण जीवसुद्धा खरा भोक्ता नाही. प्रकृतीच्या तादात्म्यामुळे तो भोक्ता वाटतो. गाढ झोपेत ते तादात्म्य तात्पुरते सुटते व ज्ञानाने कायमचे सुटते.

**महेश्वर–** देहेंद्रियांचा प्रवर्तक. लोहचुंबकाच्या केवळ सान्निध्याने सुई नाचू लागते. लोहचुंबक काही करीत नाही. सूर्योदय होताच लोक आपआपले व्यवहार करू लागतात. सूर्य काहीच करीत नाही. लोह-चुंबक किंवा सूर्याप्रमाणे आत्म्याच्या केवळ सान्निध्यात देहेंद्रियादिकांच्या क्रिया होतात. म्हणून त्यास महेश्वर म्हणजे प्रवर्तक म्हणतात.

**परमात्मा**— प्रकृतीचे तादात्म्य सोडले की जीव हाच परमात्मा होतो. तो देहाच्या पलीकडे म्हणजे त्यापेक्षा—पर—वेगळा आहे, म्हणून परमात्मा.

**य एवं वेत्ति पुरुषं प्रकृतिं च गुणैः सह ।**
**सर्वथा वर्तमानोऽपि न स भूयोऽभिजायते ॥२३॥**

पुरुष आणि प्रकृतीला जो त्यांच्या गुणासह जाणतो, तो सर्व कर्मे करीत असला तरी पुनः कधीही जन्म पावत नाही.

भगवान प्रकृति—पुरुषाचे इतके सूक्ष्म वर्णन कशासाठी करीत आहेत अशी अर्जुनाच्या मनांत शंका येते. त्याचे येथे भगवंत निरसन करीत आहेत.

भक्ताने पुरुषाला जाणले पाहिजे म्हणजे त्याला पुनर्जन्म येत नाही. भक्ताला पुरुषाची चांगली ओळख पटावी म्हणून त्याचे सूक्ष्म वर्णन करणे आवश्यक आहे. एकदा पुरुषाला जाणल्यावर शास्त्रानुसार वागलेच पाहिजे असे नाही. त्याची ओळख पटण्यापूर्वी मात्र शास्त्रानुसारच वागले पाहिजे. वाटेल तसे वागल्यास वाटेल ते फळ मिळेल. चांगल्या कुळात —'शुचीनां श्रीमतां गेहे'— जन्म यावा असे वाटत असेल तर शास्त्र-नियम पाळणे आवश्यक आहे. ज्ञान झाल्यावर पुनर्जन्मच नाही, म्हणून त्याला 'को विधिः को निषेधः' असे वागले तरी चालेल.

**ध्यानेनात्मनि पश्यन्ति केचिदात्मानमात्मना ।**
**अन्ये सांख्येन योगेन कर्मयोगेन चापरे ॥२४॥**

कित्येक आपल्या ठिकाणी आपणास आत्मध्यानाच्या योगाने पाहतात. दुसरे कोणी सांख्ययोगाने तर काही कर्मयोगाने जाणतात.

एका आंब्याच्या झाडास हजारो फळे लागतात. सर्व फळे एकाच झाडाची असली तरी त्याचे चार प्रकार होतात. त्यातील अत्युत्कृष्ट फळे परदेशी जातात. त्याहून कमी प्रतीचा माल मुंबईला जातो. तिसऱ्या दर्जाची फळे मध्यम शहरात व उरलासुरला माल खेड्यापाड्यात जातो.

कोठल्याही विषयात असे चार प्रकार पडतातच. उपासकांतही असे चार प्रकार आहेत. निदिध्यासन म्हणजे ध्यान करणारा सर्वोत्तम अधिकारी. नंतर सांख्य योगी म्हणजे श्रवण-मनन करणारे. श्रवणमनन सोपे वाटते. पण त्यात अडचणी फार. मुळात सवड होत नाही. सवड झाली तर नेमके त्या वेळी काही काम निघते किंवा कोणी तरी भेटायला येते. मन विषयांकडे ओढले जाते या सर्व अडथळ्यांना दूर करून श्रवण-मननासाठी नित्य ठराविक वेळ देणे फार अवघड आहे. त्यानंतरचे मंदाधिकारी निष्काम कर्मयोग आचरतात. हे साधन मुनींनीही आचरलेले व श्रुतिमान्य आहे. मंदतर मंडळी या बाजूस वळतच नाहीत.

**अन्ये त्वेवमजानन्तः श्रुत्वान्येभ्य उपासते ।**
**तेऽपि चातितरन्त्येव मृत्युं श्रुतिपरायणाः ॥२५॥**

पण दुसरे कोणी याप्रमाणे न जाणणारे दुसऱ्यापासून श्रवण करून उपासना करतात. श्रवण केलेल्या गोष्टीप्रमाणे मानणारे असे ते देखील मृत्युसागरातून तरून जातात.

एखादी उपासना गुरूंनी सांगितली तर ती निष्ठापूर्वक करतात. शिवलीलामृतांतील नवव्या अध्यायांतील कथा या दृष्टीने श्रवणीय आहे. सिंहकेतू राजाने शबराला थट्टेने शिवलिंगाचा चिताभस्म पूजनविधि सांगितला. शबराने त्यावर पूर्ण श्रद्धा ठेवून राजाने सांगितल्या बरहुकूम पूजाविधि केला आणि ते शबर दांपत्य मुक्त झाले.

वरील चार साधनांपैकी कोणत्याही एका साधनाने आत्मज्ञान मिळविता येते.

**यावत्संजायते किंचित्सत्त्वं स्थावरजङ्गमम् ।**
**क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्तद्विद्धि भरतर्षभ ॥२६॥**

हे भरतश्रेष्ठा, जो जो स्थावर अथवा जंगम पदार्थ उत्पन्न होतो तो तो क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्या संयोगापासून उत्पन्न होतो असे जाण.

सर्व जग क्षेत्र व क्षेत्रज्ञाच्या संयोगाने निर्माण झालेले आहे. थोडक्यात क्षेत्र म्हणजे जड अशी पंचमहाभूते व क्षेत्रज्ञ म्हणजे चेतन असा जीव किंवा शिव. पण एक जड व एक चेतन यांचा कोणता संबंध मानावयाचा ? संबंधांचे संयोग, समवाय व तादात्म्य असे तीन प्रकार आहेत. संयोगात दोघांना गुण असावे लागतात. पण आत्मा निरवयव व शरीर सावयव म्हणून शरीर व आत्म्याचा संयोग संबंध मानता येत नाही. व्यक्ति आणि जाति ( मनुष्य व मनुष्यत्व ), अवयव आणि अवयवी ( बोटे व शरीर ) गुण आणि गुणी ( बुद्धि व बुद्धिमान पुरुष ) यांचा समवाय संबंध होतो. पण आत्म्याला जाति, गुण वा अवयव यापैकी कोणताच धर्म नाही. म्हणून समवाय संबंधही होऊ शकत नाही. लोखंड तापविले की लोखंड व अग्नि यांचा तादात्म्य संबंध घडतो. असाही संबंध येथे मानता येत नाही. या तीन प्रकाराशिवाय चौथ्या प्रकारचा संबंध संभवत नाही. म्हणून आत्मा व शरीर यांचा संबंध अज्ञानजन्य व कल्पितच मानावा लागतो व यापासून निर्माण होणारे जगही कल्पितच ठरते.

अन्नाचे रक्त, मांस, मेद, मज्जा वगैरे सहा व वीर्य हा सातवा परिणाम होय. वीर्यापासून पुनः शरीर बनते. वीर्य जड म्हणूनच ते शस्त्रक्रियेने बंद करता येते—सध्या या गोष्टीला फारच महत्त्व आले आहे. पतिपत्नीचा संबंध हा शारीरिक मानला जातो. तो घटस्फोटाने तुटू शकतो. पिता व पुत्र यांचा रक्तजन्य संबंधही मतभेदाने संपतो. नोकर व मालक यांच्यातील अर्थमूलक संबंध कायम टिकणारे नसतात. दोन व्यक्तींतील मित्रत्व किंवा शत्रुत्व संबंधही कल्पित आहेत. प्रवासात गांठभेट झालेले परम मित्र बनतात. तर लहानपणापासून एकत्र वाढलेले, एकत्र धंदा करणारे धंद्यातील भानगडीमुळे एकमेकांचे कट्टर शत्रू बनतात.

शरीर व आत्मा यांचा संबंधही असाच कल्पित आहे. केव्हा तुटेल हे सांगता येत नाही. म्हणून संबंध आहे तोवरच परमार्थ कार्य साधून घ्या.

**समं सर्वेषु भूतेषु तिष्ठन्तं परमेश्वरम् ।**
**विनश्यत्स्वविनश्यन्तं यः पश्यति स पश्यति ॥२७॥**

सर्व भूतांच्या ठिकाणी एकसारखा असणाऱ्या व या नाश पावणाऱ्या भूतांमध्ये अविनाशी असलेल्या अशा परमेश्वरास जो जाणतो, तोच ज्ञान्यातील डोळस होय.

वैचित्र्य हे प्रकृतीचे मुख्य लक्षण आहे. एकासारखे एक शरीर, स्वभाव कधीही सापडणार नाहीत. प्रत्येकाची कृति, बुद्धि, ज्ञान इत्यादि भिन्न भिन्न असतात. बरोबर या उलट पुरुषाचे लक्षण आहे. मानव, पशु, पक्षी, कृमी, कीटक या सर्वांमध्ये तो समान रुपाने राहतो अविनाशी असून विनाशी शरीरात राहतो, हे जाणतो जो खरा ज्ञानी.

**समं पश्यन्हि सर्वत्र समवस्थितमीश्वरम् ।**
**न हिनस्त्यात्मनात्मानं ततो याति परां गतिम् ॥२८॥**

ईश्वर सर्वत्र समानत्वाने स्थित आहे असे जाणणारा स्वतःच स्वःचा घात करीत नाही म्हणून तो श्रेष्ठ गतीला जातो.

सर्वत्र भगवंत पाहण्याची दृष्टी नसेल त्यांना नैसर्गिक आनंद कधीच उपभोगता येत नाही. म्हणून ते आत्महिंसक ठरतात. देह म्हणजेच मी असे समजणे म्हणजेही आत्महिंसाच. मी देहाहून वेगळा आहे व तो 'मी' सर्वत्र आहे हे ज्ञान ज्याला झाले त्याला अत्यंत श्रेष्ठ गति मिळते.

**प्रकृत्यैव च कर्माणि क्रियमाणानि सर्वशः ।**
**यः पश्यति तथात्मानमकर्तारं स पश्यति ॥२९॥**

आणि जो, सर्व प्रकारे कर्मे प्रकृतीकडूनच केली जातात व आत्मा अकर्ता आहे असे जाणतो, तो खरा ज्ञानी होय.

सर्व कर्मे प्रकृतीच करते व पुरुष काहीच करीत नाही. म्हणून तो पूर्णपणे अकर्ता आहे. कर्तृत्व हा देखील एक विकारच आहे. म्हणूनच काम केल्यावर श्रम होतात व अती कष्ट केल्याने ग्लानी येते. यालाच तार्किक 'झीज' म्हणतात. आत्मा कर्ता मानल्यास त्याचीही झीज होते असे मानावे लागेल. झीज होणारा पदार्थ कालान्तराने संपणारच, पण आत्मा न संपणारा. नित्यत्व हे त्याचे लक्षण आहे, म्हणून आत्मा अकर्ता आहे हे सिद्ध होते. प्रकृतीच्या तादात्म्यामुळे तो कर्ता भासतो. हे जाणणारा ज्ञानी होय.

यदा भूतपृथग्भावमेकस्थमनुपश्यति ।
तत एव च विस्तारं ब्रह्म संपद्यते तदा ॥३०॥

जेव्हा भूतांचा वेगळेपणा एका आत्म्याच्या ठिकाणी स्थित आहे आणि आत्म्याचाच हा विस्तार आहे असे जो जाणतो, त्याला ब्रह्माची प्राप्ती होते.

केवळ आत्म्यात कर्तृत्व नाही इतकेच नव्हे तर त्यापासून निर्माण झालेल्या पंचमहाभूतातही नाही. वाटेत पडलेल्या दोरीबद्दल अंधुक प्रकाशामुळे चार जणांच्या चार कल्पना होतात. तरी मूळच्या दोरीत फरक पडत नाही. वेगवेगळ्या कल्पना पण दोरी एकच कारण कल्पित पदार्थ हे अधिष्ठानापेक्षा वेगळे नसतात, हा सिद्धांत आहे. त्याचप्रमाणे पंचमहाभूते व त्यापासून निर्माण झालेले जग यांचे अधिष्ठान परब्रह्मच आहे. सर्व भूते त्यापासून निर्माण होतात, त्यातच राहतात व शेवटी त्यातच लयाला जातात.

'आदावन्ते च यन्नास्ति वर्तमानेऽपि तत्तथा' (जे आधी नाही व शेवटीही नाही ते मध्ये असूनही नाही)

या गौडपादाचार्यांच्या सिद्धांताप्रमाणे भूते प्रथम दिसत नाहीत व शेवटीही अदृश्य होतात. म्हणून वर्तमान कालातील त्यांचे अस्तित्वही मानता येत नाही.

भूते अनेक असली तरी ती एकच आहेत अशी बुद्धि ठेवली तर ज्ञानेश्वर महाराज म्हणतात त्याप्रमाणे,

ते सुख येणेंचि देहे । पाय पाखाळणी लाहे ।
जो भूतवैषम्ये नोहे । विषम दृष्टी ॥

असे होईल, दुकानांतील गाय, हत्ती, सिंह वगैरे साखरेची चित्रे लहानमोठी व किंमतीच्या दृष्टीने कमी अधिक असली तरी त्यातले तत्त्व जी साखर ती एकच असते, अनेकता मिथ्या असते, त्याचप्रमाणे नानाविध भूतमात्रांतील तत्त्व जे ब्रह्म ते एकच आहे. ही एकत्वाची बुद्धि दृढ करा म्हणजे ब्रह्मसंपत्ति व आनंदरूपता मिळेल. नाहीतर दुःखाचे डोंगर सहन करावे लागतात.

**अनादित्वान्निर्गुणत्वात्परमात्मायमव्ययः ।**
**शरीरस्थोऽपि कौन्तेय न करोति न लिप्यते ॥३१॥**

हे कौन्तेया, अनादि व गुणरहित असल्यामुळे हा परमात्मा अव्यय आहे व तो शरीराच्या ठिकाणी स्थित असला तरी काही कर्म करीत नाही व सर्व कर्मापासून अलिप्त असतो.

परमेश्वराला आदि म्हणजे कारण नाही. जन्म नाही. तो निर्गुण निर्धर्मक आहे. नैय्यायिक इच्छा, द्वेष, सुख, दुःख हे आत्म्याचे धर्म मानतात. पण तारुण्यात ज्या इच्छा असतात त्या वृद्धापकालात नसतात. म्हणजे हे धर्म अनित्य असल्याने नित्य असलेल्या आत्म्याशी त्याचा संबंध जोडता येत नाही. म्हणून हे धर्म आत्म्याचे नसून अंतःकरणाचे आहेत, हे वेदान्ती मंडळींचे म्हणणे पटते. आत्म्याच्या निर्गुणत्वाचे दुसरे प्रमाण म्हणजे गाढ झोप. गाढ झोपेत इच्छा, द्वेष, सुख, दुःख यापैकी काहीच नसते. आत्मा अव्यय म्हणजे विकाररहित आहे. तो कांहीच करीत नसल्यामुळे त्याचा कशाशीही संबंध येत नाही. तो

निर्लेप आहे. अवयव नष्ट झाले की पदार्थाचा नाश होतो, पण आत्मा निरवयव असल्याने त्याचा नाश होत नाही.

**यथा सर्वगतं सौक्ष्म्यादाकाशं नोपलिप्यते ।**
**सर्वत्रावस्थितो देहे तथात्मा नोपलिप्यते ॥३२॥**

ज्याप्रमाणे सर्वव्यापी आकाश सूक्ष्मत्वामुळे कोणत्याही वस्तूशी लिप्त होत नाही, त्याप्रमाणे आत्मा सर्व देहामध्ये असला तरी लिप्त होत नाही.

स्थूल देहात जितके विकार आहेत त्याच्या अनेकपट लिंग शरीरात आहेत. त्याच्या आत आत्मा आहे. दुधाचे पातेले चुलीवर ठेवल्यावर पातेल्याला लागलेली ऊष्णता जशी आतील दुधाला लागते, तसे लिंग-शरीरांतील विकारांचा परिणाम आत्म्यावर व्हायला पाहिजे. पण आत्म्याला विकार होत नाहीत. कारण पातेल्यातील दूध तापले तरी पातेल्यांतील आकाश तापत नाही. कारण ते सूक्ष्म आहे व आत्मा तर त्याहूनही सूक्ष्म आहे. आकाशाचा अनेक युगानंतर केव्हातरी नाश होतो. पण आत्म्यांला विकार कधीच होत नाहीत. तो सर्वांच्या शरीरात आहे. तो अत्यंत व्यापक आहे. व्यापक पदार्थात हालचाल म्हणजे क्रिया नसते, म्हणून आत्मा अकर्ता आहे.

**यथा प्रकाशयत्येकः कृत्स्नं लोकमिमं रविः ।**
**क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत ॥३३॥**

हे भारता, ज्याप्रमाणे एकटा सूर्य या सर्व जगाला प्रकाशित करतो, त्याप्रमाणे एकटा क्षेत्रज्ञ सर्व क्षेत्रांना प्रकाशित करतो. कारण क्षेत्रज्ञ म्हणजे आत्मा प्रकाशरूप आहे. तो एकच असता जगातील यच्च-यावत् शरिरे प्रकाशित करतो.

**क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमन्तरं ज्ञानचक्षुषा ।**
**भूतप्रकृतिमोक्षं च ये विदुर्यान्ति ते परम् ॥३४॥**

याप्रमाणे क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचे अंतर आणि भूतांच्या प्रकृतीचा मोक्ष (मिथ्यात्व) जे ज्ञानदृष्टीने जाणतात, ते परमपदाला पोहचतात.

भगवंतानी अर्जुनाला प्रथम क्षेत्र व क्षेत्रज्ञ हे दोन पदार्थ सांगितले. त्यापैकी क्षेत्र हे विकारी, सावयव, अनित्य व ससंग आहे. तर क्षेत्रज्ञ म्हणजे आत्मा अविकारी, निरवयव, नित्य व असंग आहे. आत्म्याचा प्रत्यक्ष अनुभव येण्यासाठी भगवंतानी प्रथम अमानित्वादि ज्ञान-साधने केली पाहिजेत असे सांगितले. ही साधने सतत करीत राहिले म्हणजे सुकृत साठत जाते व ते परिपक्व झाल्यावर साक्षात्कार होतो. साक्षात्कार एकदम होत नाही, कारण ज्ञान अत्यंत सूक्ष्म आहे. आत्मज्ञान झाले की प्रकृतीचा मोक्ष होतो म्हणजे ती नष्ट होते. म्हणजेच प्रकृति पूर्णपणे मिथ्या आहे असे ज्ञान होते व असे ज्ञान ज्यांना होते ते परमपदाला पोहोचतात.

इति श्रीमद् भगवद् गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे प्रकृतिपुरुषविवेकयोगो नाम त्रयोदशोऽध्यायः ॥

# अध्याय १४ वा.

श्रीभगवान उवाच–

**परं भूयः प्रवक्ष्यामि ज्ञानानां ज्ञानमुत्तमम् ।**
**यज्ज्ञात्वा मुनयः सर्वे परां सिद्धिमितो गताः ॥१॥**

श्री भगवान म्हणाले, "पर म्हणून म्हटलेले, सर्व ज्ञानात उत्तम असलेले व जे जाणून सर्व मुनी या देहबंधनापासून मुक्त होऊन अत्यंत श्रेष्ठ सिद्धी पावले, ते ज्ञान मी तुला पुनः सांगतो."

श्री भगवान अर्जुनाला सर्वोत्कृष्ट ज्ञान सांगत आहेत. ज्ञान म्हणजे 'ज्ञायते अनेन' ते. अर्थात् ज्ञानसाधने सांगतात. यज्ञयागादिक सुद्धा साधनेच. पण त्या साधनांनी कालांतराने ज्ञान होते म्हणून ती साधने गौण असून ज्ञानाचे विचार हेच प्रधान साधन आहे. ते अंतरंग साधन असल्याने त्यापासून लवकर ज्ञान होते. सर्व मुनींनी याच साधनाच्या साहाय्याने परासिद्धी म्हणजेच आत्मज्ञान मिळविले आहे.

**इदं ज्ञानमुपाश्रित्य मम साधर्म्यमागताः ।**
**सर्गेऽपि नोपजायन्ते प्रलये न व्यथन्ति च ॥२॥**

या ज्ञानाचा आश्रय करून मजसमान झालेले, सृष्टी निर्माण काळी जन्म पावत नाहीत आणि प्रलयकाळी दुःख (मरण) पावत नाहीत.

ज्ञानी ज्ञानविचारामुळे परमेश्वरस्वरूप होऊन जातात. त्यामुळे त्यांची जन्ममृत्यूंची परंपरा कायमची टळते. ही केवळ कविकल्पना नसून पूर्वीच्या ऋषिमुनींनी याचा अनुभव घेतलेला आहे.

**मम योनिर्महद्ब्रह्म तस्मिन्गर्भं दधाम्यहम् ।**
**संभवः सर्वभूतानां ततो भवति भारत ॥३॥**

महत्‌ब्रह्म म्हणजे माया, ही माझे बीज ठेवण्याचे स्थान आहे. तिच्यामध्ये मी जगदुत्पत्तीचे बीज ठेवतो. हे अर्जुना, त्यापासून सर्व भूतांची उत्पत्ति होते.

तेराव्या अध्यायात या जगाची उत्पत्ति, क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्या संयोगातून होते असे सांगितले. पण त्यांचा संयोग आपोआप होतो की ईश्वर करतो. गुणात सापडल्यामुळे पुरुषाला अनेक योनीत जन्म घ्यावा लागतो. पण ते गुण कोणते व त्यात तो कसा अडकतो त्याचे विवेचन त्या अध्यायात केले नसल्याने या अध्यायात केले.

नैय्यायिक म्हणतात, एक अणू दुसऱ्याला लागून द्व्यणुक होतो. मग त्र्यणुक होतो. असे होता होता हे अवाढव्य जग बनते. त्यांचे हे म्हणणेही बरोबर म्हणता येत नाही. कारण रत्नाला रत्नाचा व फुलाला फुलाचाच परमाणू लागणार. म्हणजे प्रत्येक पदार्थाचे असे असंख्य अणू अंतराळात तरंगत असणार. पण ज्याचा त्याला परमाणू जोडून देणारा कोण? कोणी तरी मागे चेतन असलाच पाहिजे. आपोआप संयोग होणे शक्य नाही. घरात तांदूळ, पाणी व अग्नी जरी असले तरी भात तयार करणारा कोणीतरी लागतो. घर बांधण्यापूर्वी नकाशा तयार करून घेतला असला, सर्व सामान तयार असले, कारागीर असले तरी देखरेख करून घर बांधून घेणारा कोणीतरी लागतोच.

सांख्यमताप्रमाणे प्रधानापासून क्षेत्रक्षेत्रज्ञांचा संयोग होतो, जग विकारामुळे बनते. पण आपणास पाहिजे तसे बनत नाही. दूध चार दिवस ठेवले तर त्यात विकार होऊन ते घट्ट होईल. पण ते तोंडातही घालता येणार नाही. दुधाचे दही बनवायचे असेल तर पद्धतशीर विरजण घालण्याची क्रिया करणारी व्यक्ती हवी. मात्र ईश्वराला हे जग निर्माण करण्यासाठी प्रयत्न करावा लागत नाही. त्याच्या नुसत्या 'एकोऽहम् बहु स्याम्' अशा संकल्पाने जग तयार होते. कारण तो

सत्यकाम व सत्यसंकल्प आहे. आम्हाला नुसता संकल्प करून भागत नाही. त्याबरोबर कृती करावी लागते. सांख्यांनाही संयोग कर्ता मानावा लागतो. कारण देह व आत्मा यांचा वियोग होऊ नये म्हणून प्रत्येकजण पराकाष्ठेचे प्रयत्न करीत असतो. तरीही देहातून आत्मा निघून जातोच. म्हणजे वियोग करणारा कोणी तरी आहे त्याअर्थी संयोग कर्ताही कोणी तरी असलाच पाहिजे. हे जग आपोआप होत नाही, असे सांगून भगवंतांनी सांख्य व नैय्यायिक या दोघांचेही या श्लोकात निराकरण केले आहे.

महद्ब्रह्म म्हणजे माया. तिच्या ठिकाणी गर्भ स्थापन करतो म्हणजेच पुष्कळ बनावे अशी इच्छा करून चिदाभासरूपाने तो प्रत्येकात प्रविष्ट होतो. त्यामुळे सर्व चराचर विश्वाची उत्पत्ती होते.

**सर्वयोनिषु कौन्तेय मूर्तयः संभवन्ति याः ।**
**तासां ब्रह्म महद्योनिरहं बीजप्रदः पिता ॥४॥**

हे कौन्तेया, देव दानव गंधर्वादि सर्व योनींमध्ये जी जी शरीरे निर्माण होतात, त्या सर्वांची माता ही माया व बीज पेरणारा पिता मी आहे.

**सत्त्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसंभवाः ।**
**निबध्नन्ति महाबाहो देहे देहिनमव्ययम् ॥ ५ ॥**

सत्त्व, रज व तम हे गुण आहेत व प्रकृति ही त्यांची जन्मभूमि आहे. हे महाबाहो, हे गुण देहामध्ये अविनाशी जो देही (आत्मा) त्याला बंधन करतात (असे दिसते).

सत्त्व, रज व तम हे तीन गुण जीव अविकारी असताही त्याला बंध निर्माण करतात. त्याच्यावर विकार भासवतात. पोपटाला पकडण्यासाठी दोन झाडामध्ये एक नळी बांधतात. पोपट त्याबर बसला की

त्याच्या वजनाने नळी फिरू लागते. पोपटाला वाटते की आपण आता खाली पडणार. त्या भीतीने पोपट नळीवरील पायाची पकड अधिक घट्ट करू लागतो, त्यामुळे नळी अधिक वेगाने फिरू लागते. आपणाला कोणी तरी नळीला जखडून टाकले आहे, असा पोपटाला भ्रम होतो. स्वतंत्र असूनही स्वतःला परतंत्र समजू लागतो व पारधी पकडायला आला तरी नळी सोडत नाही. आणि खरोखरी स्वातंत्र्य गमावून पिंजऱ्यात अडकून पडतो. जीवही अविकारी-बंधमुक्त-असता या त्रिगुणामुळे भ्रांत होऊन आपण बद्धच आहोत अशीच पक्की समजूत करून घेऊन दुःख भोगत असतो. अनंत सुकृताचे फळ असेल तर तत्त्वज्ञानाचा लाभ घडून त्याचा भ्रमनिरास होतो.

**तत्र सत्त्वं निर्मलत्वात्प्रकाशकमनामयम् ।**
**सुखसङ्गेन बध्नाति ज्ञानसङ्गेन चानघ ॥ ६ ॥**

त्यामध्ये सत्त्वगुण निर्मळ असल्यामुळे प्रकाश देणारा व उपद्रवरहित आहे. हे पापरहिता (अर्जुना) तो सत्त्वगुण सुखाच्या व ज्ञानाच्या (मी सुखी—मी ज्ञानी) या दोन पाशांनी प्राण्याला बद्ध करतो.

सत्त्वगुण चांगला खरा, पण त्यामुळे मी सुखी आहे असे जीव म्हणतो. सुखाच्या भरात धर्ममर्यादेचे उल्लंघन होते, प्रमाद घडतात. लग्नाआधी सुतासारखा सरळ असलेला मुलगा लग्नानंतर सुख जास्त झाल्यामुळे त्याला बायकोशिवाय काहीही दिसत नाही. आणि त्याचे हातून आईवडिलांची अवज्ञा घडते. सत्त्वगुणामुळे ज्ञान होते व मी ज्ञानी असा अहंकार होतो. ज्ञान व सुख हे अंतःकरणाचे धर्म आहेत. मी त्यांचा फक्त प्रकाशक आहे, असे चिंतन केल्यास त्यांचे बंध निर्माण होणार नाहीत.

**रजो रागात्मकं विद्धि तृष्णासङ्गसमुद्भवम् ।**
**तन्निबध्नाति कौन्तेय कर्मसङ्गेन देहिनम् ॥ ७ ॥**

रजोगुण हा अभिलाषरूप असून तृष्णा व आसक्ति ही यापासून उत्पन्न होतात असे समज. हे कौन्तेया, रजोगुण मी अमुक करीन तमुक करीन अशा कर्मपाशाने प्राण्याला बद्ध करतो.

रजोगुणामुळे नसलेले पदार्थ मिळावे अशी इच्छा निर्माण होते. असलेल्या पदार्थांबद्दल आसक्ती वाढून ते कायम टिकावे, यासाठी मनुष्य घाण्याच्या बैलाप्रमाणे क्रिया करत राहतो. त्यामुळे बंध निर्माण होतात.

**तमस्त्वज्ञानजं विद्धि मोहनं सर्वदेहिनाम् ।**
**प्रमादालस्यनिद्राभिस्तन्निबध्नाति भारत ॥ ८ ॥**

तमोगुण तर अज्ञानापासून निर्माण होतो. तो सर्व प्राण्यांना मोह पाडतो असे जाण. हे भारता, प्रमाद, आळस व निद्रा या तीन पाशांनी तो प्राण्याला बद्ध करतो.

तमोगुणामुळे प्रमाद, आळस व निद्रा यातच सर्व आयुष्य गेल्यामुळे मानवी जीवनाचे साफल्य होत नाही. म्हणून निर्बंध पाळावे लागतात. सर्वांत कडक निर्बंध काळाचे असतात. रामकृष्णादि ईश्वरी अवतारांनाही काळाचे बंधन पाळून देहत्याग करावाच लागला. मानव देह जर फुकट घालविला तर पुनः तो मिळणे कठिण. पापपुण्य समान झाले पाहिजे, सर्ग-काळ असला पाहिजे, प्राण्यांची कर्मे फलोन्मुख होऊन ईश्वराला सृष्टि निर्माण करण्याची इच्छा झाली पाहिजे. इतके सर्व जुळून येईल तेव्हा पुनः मानव देह मिळू शकेल आणि मिळाला तरी तो निर्दोषच असेल याची खात्री नाही. बहिरा, मुका, आंधळा, निर्बुद्ध, दरिद्री असा जन्म मिळाला किंवा जन्म होताच भूकंप, पूर अशा उत्पातामुळे लवकर नष्ट झाला, तर मानव जन्म मिळूनही वाया जाणार. म्हणून मिळालेल्या जीवनाचे सार्थक करण्यासाठी प्रमाद, आळस व निद्रा यांच्या आहारी न जाता ज्ञानसाधने केली पाहिजेत

**सत्त्वं सुखे संजयति रजः कर्मणि भारत ।**
**ज्ञानमावृत्य तु तमः प्रमादे संजयत्युत ॥ ९ ॥**

हे भारता, सत्त्वगुण सुखाच्या ठिकाणी व रजोगुण कर्माच्या ठिकाणी आसक्ति उत्पन्न करतो. आणि तमोगुण ज्ञानाला झाकून प्रमादाबद्दल आसक्ति उत्पन्न करतो.

**रजस्तमश्चाभिभूय सत्त्वं भवति भारत ।**
**रजः सत्त्वं तमश्चैव तमः सत्त्वं रजस्तथा ॥१०॥**

हे अर्जुना, रज व तम यांना जिंकून सत्त्व बळावतो. सत्त्व व तम यांना जिंकून रज आणि रज व सत्त्व यांना जिंकून तम वाढतो.

रजतमांना पराभूत करून सत्त्वगुण वर येतो. ज्याप्रमाणे चुलीवर ठेवलेला तवा प्रथम काळा असतो. पण खूप वेळ चुलीवर राहिल्यावर काळा रंग जाऊन त्यास लालभडक रंग येतो. किंवा ताप आल्यावर अंगातील शक्ति लुप्त होते, त्याप्रमाणे एक गुण वाढला की इतर दोन गुण लुप्त होतात.

**सर्वद्वारेषु देहेऽस्मिन्प्रकाश उपजायते ।**
**ज्ञानं यदा तदा विद्याद्विवृद्धं सत्त्वमित्युत ॥११॥**

या देहातील सर्व इंद्रियांच्या ठिकाणी जेव्हां ज्ञान उत्पन्न होते, तेव्हा सत्त्वगुणाची वृद्धी झाली असे समज. कोणत्याही इंद्रियापुढे विषय आल्यास तात्काळ त्याचे ज्ञान होते. म्हणजे सर्वोत्कर्षाने ज्ञानग्रहाची योग्यता येते.

**लोभः प्रवृत्तिरारम्भः कर्मणामशमः स्पृहा ।**
**रजस्येतानि जायन्ते विवृद्धे भरतर्षभ ॥१२॥**

हे भरतश्रेष्ठा, रजोगुण वाढला की लोभ, प्रवृत्ति, कर्माचा आरंभ, दुर्धर अभिलाषा, विषयलालसा ही उत्पन्न होतात. अवाढव्य कामे करण्याचा हव्यास वाढतो अनेक संकल्प केले जातात व नाना विषयांची इच्छा निर्माण होते.

**अप्रकाशोऽप्रवृत्तिश्च प्रमादो मोह एव च ।**
**तमस्येतानि जायन्ते विवृद्धे कुरुनन्दन ॥१३॥**

हे कुरुनंदना, तमोगुण अधिक झाला असता अविवेक, अप्रवृत्ति, प्रमाद व मोह ही निर्माण होतात. अनवधानाने चुका होऊ लागतात. ज्ञानसाधने पुढे आली तरी त्यांचे सम्यग् ज्ञान होत नाही.

**यदा सत्त्वे प्रवृद्धे तु प्रलयं याति देहभृत् ।**
**तदोत्तमविदां लोकानमलान्प्रतिपद्यते ॥१४॥**

सत्त्वगुणाची वाढ झाली असता मनुष्य मृत्यु पावला तर तो ज्ञानी व शुद्ध अशा लोकामध्ये जन्म पावतो.

या तीन गुणापैकी सत्त्वगुण उत्कृष्ट म्हणून तो वाढविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. त्याकरता आहारही सात्त्विक घ्यावा. सत्संगती करावी, नेहमी सात्त्विक विचारांची पुस्तके वाचावी. विचारही सात्त्विक असावे. शास्त्रीय कर्मात किंवा शास्त्रीय विचारात सर्व आयुष्य वेचल्यास कमालीचा सर्वोत्कर्ष होतो. मरणकाळी चांगले विचार मनात आले तर अनायासे ब्रह्म लोक मिळतो. वर्षभर अभ्यास न करणारा, उनाडक्या करण्यात वेळ घालविणारा विद्यार्थी शेवटी शेवटी शिक्षकानी महत्त्वाचे म्हणून सांगितलेले तेवढे लक्षात ठेवतो व चांगल्या प्रकारे उत्तीर्ण होतो. त्याप्रमाणे शेवटी जरी सत्त्वगुणाची वाढ झाली तरी त्या जीवाचे कल्याण होते.

**रजसि प्रलयं गत्वा कर्मसङ्गिषु जायते ।**
**तथा प्रलीनस्तमसि मूढयोनिषु जायते ॥१५॥**

रजोगुणाची वाढ झाली असताना मरण पावल्यास कर्मासक्तीने युक्त अशा मनुष्य लोकात जन्म पावतो. त्याचप्रमाणे तमोगुणाची वृद्धी झाली असता मरण आल्यास त्यास ज्ञानहीन योनीत जन्म येतो.

रजोगुण वाढलेला असा मृत्यू आला तर पुनः मर्त्य लोकांत यावे लागते, पण सर्व आयुष्य सत्त्वगुणात गेले व अंतकाळी रज वा तमाचा

जोर झाला तरी त्याला पूर्वायुष्यातील सत्त्वगुणाचा फायदा मिळतो. त्याला उत्तम फळ मिळते. सर्व नोकरी उत्तम प्रकारे केली आणि पेन्शनला आल्यावर त्याचेकडून काही चुका झाल्या अगर तो कामाच्या वेळी झोपलेला आढळला तर त्याचे मागील वर्तन लक्षात घेऊन अधिकारी त्याला शिक्षा करीत नाहीत. आयुष्य सत्त्वात गेले असेल तर त्याचे फळ चांगलेच मिळते.

**कर्मणः सुकृतस्याहुः सात्त्विकं निर्मलं फलम् ।**
**रजसस्तु फलं दुःखमज्ञानं तमसः फलम् ॥१६॥**

सुकृताचे म्हणजे सात्त्विक कर्माचे सत्त्वप्रधान निर्मल फल मिळते. राजस कर्माचे फल दुःख असते आणि तामस कर्माचे फल अज्ञान असते, असे ज्ञाते सांगतात.

सत्त्वाचे फळ निर्मळ असते. ते पुण्यकर्मांमुळे मिळते. रजाचे फळ म्हणजे दुःख अधिक व सुख अत्यल्प. संत तुकोबांच्या भाषेत सांगायचे म्हणजे ‘ सुख पाहता जवापाडे । दुःख पर्वता येवढे ’. रजोगुणामुळे सुख मिळाले नसते तर संसारच कोणी केला नसता. फ्रान्सचा राजा म्हणतो, सर्व वैभव माझ्या पायांशी लोळत आहे. मी बावन्न वर्षे राज्य केले पण त्यापैकी फक्त तेरा दिवस काय ते सुखाचे होते. राजाची ही कथा, मग सामान्य माणसाबद्दल बोलायलाच नको. महिनाभर कष्ट करायचे, वरिष्ठांची बोलणी खायची, दुःख भोगायचे, तेव्हा कुठे आनंदाचा एक दिवस—पहिली तारीख पहायला मिळते.

**सत्त्वात्संजायते ज्ञानं रजसो लोभ एव च ।**
**प्रमादमोहौ तमसो भवतोऽज्ञानमेव च ॥१७॥**

सत्त्वगुणापासून ज्ञान उत्पन्न होते. रजोगुणापासून केवळ लोभ उत्पन्न होतो आणि तमोगुणापासून प्रमाद व मोह म्हणजे अविवेक, येवढेच नव्हे तर अज्ञानसुद्धा निर्माण होते.

**ऊर्ध्वं गच्छन्ति सत्त्वस्था मध्ये तिष्ठन्ति राजसाः ।**
**जघन्यगुणवृत्तिस्था अधो गच्छंति तामसाः ॥१८॥**

सत्त्वगुणी पुरुष उच्च ठिकाणी स्वर्गादि लोकी जातात. रजोगुणी पुरुष मध्येच म्हणजे या मनुष्यलोकी राहतात. पुनः या मर्त्य लोकात जन्माला येतात आणि तमोगुणी अधोगतीला जातात, खालच्या खालच्या हीन योनीत पश्वादि किंवा कृमीकीटकांच्या योनीत जन्माला येतात.

**नान्यं गुणेभ्यः कर्तारं यदा द्रष्टानुपश्यति ।**
**गुणेभ्यश्च परं वेत्ति मद्भावं सोऽधिगच्छति ॥१९॥**

ज्यावेळी पुरुष द्रष्टा होऊन इतर दुसरा कर्ता नाही असे जाणतो व गुणाहून वेगळा जो आत्मा त्याला जाणतो, तेव्हा तो पुरुष गुणातीत अशा मत्स्वरूपाप्रत पावतो.

भगवान येथे गुणांपासून सुटका करून घेण्याचा मार्ग दाखवीत आहेत. शारीरिक, वाचिक व मानसिक अशी तीन प्रकारची कर्मे आहेत. जैविक म्हणजे जीवाची कोणतीच कर्मे नसतात. पण माणूस मूर्खपणाने मी म्हणजे जीव कर्म करतो असे म्हणतो व त्यामुळे जो करतो तो फळ भोगतो ' या न्यायाने जीवाला दुःखही भोगावे लागते. खरे कर्तृत्व मनात असते. तिथून ते इंद्रियात येते व इंद्रियांतून ते शरीरात येते. म्हणजे मन हाच इंद्रियांचा राजा होय. हा मन राजाच कर्ता आहे असे ज्ञान झाल्यास गुणातीत होता येते. गुणातीत होता यावे म्हणूनच मनुष्याला सर्व शास्त्रीय कर्मे प्रतिपादन केलेली आहेत.

**गुणानेतानतीत्य त्रीन्देही देहसमुद्भवान् ।**
**जन्ममृत्युजरादुःखैर्विमुक्तोऽमृतमश्नुते ॥२०॥**

देहाला कारण असलेल्या या तीन गुणांच्या पलीकडे जाऊन म्हणजे त्यांचे अतिक्रमण करून जन्म, मृत्यु व जरा इत्यादीतून मुक्त होऊन तो देहात राहणारा अमृतत्व ( मोक्ष ) पावतो.

त्रिगुणांचे अतिक्रमण केल्यास प्रधान फळ म्हणजे आत्मज्ञान मिळते. जन्ममृत्युजरा इत्यादीतून मुक्तता ही आत्मज्ञानाची आनुषंगिक फळे होत.

अर्जुन उवाच—

**कैर्लिङ्गैस्त्रीन्गुणानेतानतीतो भवति प्रभो ।**
**किमाचारः कथं चैतांस्त्रीन्गुणानतिवर्तते ॥२१॥**

अर्जुन म्हणाला, हे प्रभो, तीन गुणांच्या पलीकडे जो जातो, तो कोणत्या लक्षणांनी ओळखावा? त्याचे आचरण कसे असते? या तीन गुणांपलीकडे तो कसा जातो?

श्रीभगवान उवाच—

**प्रकाशं च प्रवृत्तिं च मोहमेव च पाण्डव ।**
**न द्वेष्टि संप्रवृत्तानि न निवृत्तानि काङ्क्षति ॥२२॥**

श्रीकृष्ण म्हणाले, ' हे पांडवा सत्त्वगुणाचे कार्य प्रकाश, रजोगुणाचे कार्य प्रवृत्ति व तमोगुणाचे कार्य मोह. ही प्राप्त झाली असता गुणातीत झालेला मनुष्य त्यांचा तिरस्कार करीत नाही. ही प्राप्त होऊन नाहीशी झाली असता तो त्यांची इच्छा करीत नाही.

अर्जुनाच्या या प्रश्नाची उत्तरे वास्तविक भगवंतानी त्याला दुसऱ्या अध्यायात स्थितप्रज्ञाची लक्षणे सांगताना पूर्वीच दिलेली आहेत. बाराव्या अध्यायात भक्ताची लक्षणे सांगितलेली आहेत, त्यावरूनही या प्रश्नांचा उलगडा होतो. येथे तेच प्रकारान्तराने भगवंत सांगत आहेत. गुणातीत सत्त्वगुणामुळे प्रकाश म्हणजे ज्ञान, रजोगुणामुळे कर्मात प्रवृत्ति किंवा तमोगुणामुळे मोह झाला तर तो प्रारब्धयोग समजून तो जावा असे तो म्हणत नाही. याउलट यापैकी कांहीही न आल्यास ते यावे असेही म्हणत नाही.

**उदासीनवदासीनो गुणैर्यो न विचाल्यते ।**
**गुणा वर्तन्त इत्येव योऽवतिष्ठति नेङ्गते ॥२३॥**

उदासीनासारखा राहणारा, जो गुणांच्या येण्याजाण्याने चाळविला जात नाही. ते गुण आपली कर्मे करीत आहेत, असे म्हणून विचलित न होता तटस्थ राहतो.

काही लोक किरकोळ काम असेल तर त्यात विशेष लक्ष घालीत नाहीत, म्हणजेच उदासीन असतात. पण मोठी कार्ये निघाली की, त्यांना उत्साहाचे भरते येते. पण गुणातीत दोन्ही प्रकारच्या कामाबद्दल उदासीन असतो. सर्व कर्तृत्व गुणांचे आहे—माझे नाही असा विचार करून विचलित न होता स्थिर राहतो. दोन अनोळखी माणसांचे भांडण जसे आपण तटस्थपणे पाहतो तसे तो या गुणांचे बाबतीत करतो. 'रागद्वेषशून्यः स एव गुणातीतः' अशी गुणातीताची व्याख्या आहे. सामान्य मनुष्यसुद्धा रागद्वेष आवरतो. नाही असे नाही. पण त्याला त्यासाठी बुद्धिपुरःसर व कसून प्रयत्न करावा लागतो. तरी सुद्धा हे त्याने आणलेले अवसान फार काळ टिकत नाही. तासा दोन तासानी तो पुनः कामक्रोधांच्या आहारी जातो. ज्ञानी सर्वकाळ रागद्वेषांना आवरू शकतो, तेही अगदी सहजपणे.

**समदुःखसुखः स्वस्थः समलोष्टाश्मकाञ्चनः ।**
**तुल्यप्रियाप्रियो धीरस्तुल्यनिन्दात्मसंस्तुतिः ॥२४॥**

सुखदुःखांना समान समजणारा, स्वस्वरूपी स्थित, मातीचे ढेकूळ, दगड किंवा सोने यांची किंमत सारखीच मानणारा, प्रिय अथवा अप्रिय दोन्हीही समान समजणारा, ज्याची आत्मबुद्धी अभंग आहे व स्वतःची निंदा व स्तुती समान लेखणारा—

सामान्य मनुष्य अल्पशा सुखाने आनंदित होतो व जरासे दुःख झाले की लगेच विषण्ण होतो. गुणातीताचे वर्तन अत्यानंदाचे प्रसंगी

किंवा अतिशय दुःख झाले असता सारखेच असते. तो स्वस्थ म्हणजे आत्मानंदात रमलेला असतो. सोने व रत्न ही माती व दगडासमान समजणारा, कारण आत्मज्ञान प्राप्तिच्या दृष्टीने त्यांचा काहीच उपयोग नाही म्हणून ती एकाच लायकीची आहेत असे मानणारा व निंदा स्तुति प्रिय-अप्रिय यात जो भेद मानीत नाही, तो गुणातीत होय.

**मानापमानयोस्तुल्यस्तुल्यो मित्रारिपक्षयोः ।**
**सर्वारम्भपरित्यागी गुणातीतः स उच्यते ॥२५॥**

मान अपमान, मित्र-शत्रू अशा दोन्ही ठिकाणी समान बुद्धि ठेवणारा व कर्मांचा आरंभ न करणे हेच ज्याचे शील आहे त्याला गुणातीत म्हणतात.

गुणातीत कोणतेही कर्म करताना त्याचे फळ मिळावे किंवा मी कर्ता आहे अशी भावना ठेवत नाही.

**मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते ।**
**स गुणान्समतीत्यैतान्ब्रह्मभूयाय कल्पते ॥२६॥**

अव्यभिचारी भक्तियोगाने जो माझी उपासना करतो, तो या गुणांच्या पूर्णपणे पलीकडे जाऊन त्यास ब्रह्मत्व प्राप्त होण्याची योग्यता येते.

खरा भक्त मनाला म्हणतो, ‘ अरे तू मधुर द्राक्षांची, खडीसाखरेची, धारोष्ण दुधाची चव घेतली असशील किंवा स्वर्गातील रंभा उर्वशी सारख्या स्त्रियांच्या अधरपानाची गोडी चाखली असशील. पण कधी ईश्वरभजनाची चव घेतली आहेस काय? मुळीच नसावी. ती अनुभवली असतीस तर तू या विषयांच्या मागे लागलाच नसतास. ”

प्रारब्धात असेल ते केव्हाही चुकणार नाही व दैवातच नसेल तर केव्हाही घडणार नाही. म्हणून जे व्हायचे असेल ते खुशाल होवो.

भगवंता, मला फक्त तुझ्या पादकमलांची अखंड भक्ती दे; असे मागणे मागणाऱ्याची भक्ती ती एकांत किंवा अव्यभिचारी भक्ती होय. प्रथम अत्यंत दुष्कर्मे करणारा वाईट संगत सोडल्यास सुधारतो. जीवाने जर विषयांची संगत सोडली तर तोही सुधारून शिव होतो. गाढ झोपेत जीव देहेंद्रियादिकांची संगत सोडतो, म्हणून त्या काळात त्याला काम, क्रोध, लोभ यांचा संपर्क नसतो. त्यावेळी तो निस्त्रैगुण्य असा शिवच असतो. हे तादात्म्य कर्मजन्य असते, म्हणून रोज धरले व सोडले जाते. त्या कर्मातून सुटायला कांही एक उपाय नाही. ते कर्म भोगणे हाच उपाय.

'असंभवं हेममृगस्य जन्म तथापि रामो लुलुभे मृगाय ॥
प्रायः समापन्नविपत्तिकाले धियोऽपि पुंसां मलिना भवन्ति ॥'

सोन्याचा मृग असू शकणार नाही हे रामाला माहीत नव्हते असे थोडेच आहे, तरी तो भुलला. म्हणजे कर्मात असेल ते कुणालाही चुकविता येत नाही. आत्मज्ञान झाल्यास मात्र हे कर्म ज्ञानी पुरुषाचे काहीएक वाकडे करू शकत नाही. सापाचे दात काढल्यावर किंवा विंचवाची नांगी ठेचल्यावर ते जसे निरुपद्रवी होतात, तसेच आत्मज्ञानामुळे अविद्यारहित झालेले कर्म निस्तेज होते. म्हणून अव्यभिचारी भक्ति हा गुणातीत होण्याचा राजमार्ग आहे.

**ब्रह्मणो हि प्रतिष्ठाहममृतस्याव्ययस्य च ।**
**शाश्वतस्य च धर्मस्य सुखस्यैकान्तिकस्य च ॥२७॥**

अमृत, अविकारी, शाश्वत धर्मरूप सुख व अद्वितीय असे जे ब्रह्म ते मीच आहे, कारण अमृतादिकाचा आश्रय मी आहे.

सविकल्प ब्रह्माचा आधार जे निर्विकल्प ब्रह्म ते मीच आहे. जगात प्रकाश सर्वत्र असतो. पण सूर्याच्या ठिकाणी जसा प्रकाश घनीभूत

झाला आहे तसे जगातले सर्व तेज व आनंद माझ्या ठिकाणी घनीभूत झालेला आहे. अमृत म्हणजे मोक्ष व आत्यंतिक सुखही मीच आहे. व्यवहारात मिळणारे सुख विकार व भावना यांनी मिश्रित असते. पण हे सुख निर्मळ असते व ते माझेच स्वरूप आहे. सारांश मोक्ष, शुद्धसुख, शाश्वत धर्म यापैकी कांहीही हवे असेल तर त्यासाठी माझाच आश्रय घ्यावा लागेल.

इति श्रीमद् भगवद् गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे गुणातीतयोगो नाम चतुर्दशोऽध्यायः ॥

◊ ◊

# अध्याय १५ वा.

भगवान् उवाच—

> ऊर्ध्वमूलमधःशाखमश्वत्थं प्राहुरव्ययम् ।
> छन्दांसि यस्य पर्णानि यस्तं वेद स वेदवित् ॥ १ ॥

श्रीभगवान म्हणाले, " ज्याचे मूळ वर आहे, शाखा खाली आहेत. जो अश्वत्थ आहे तरी अव्यय असे म्हणतात, वेद ज्याची पाने आहेत, असा जो प्रपंचरूपी वृक्ष जाणणारा खरा वेदवेत्ता ( ज्ञानी ) होय.

गुणातीतालाच आत्मज्ञान होते हे चौदाव्या अध्यायात कथन केले. गुणातीत कसे व्हायचे व आत्मस्वरूपाची प्राप्ती कशी करून घ्यायची. याचे प्रतिपादन या अध्यायात केले आहे.

संसारातून पूर्ण परावृत्त झाल्याशिवाय गुणातीत होता येत नाही. शास्त्रकार ' संसार सोडा ' असे कधीच सांगत नाहीत. ते म्हणतात की हा संसारवृक्ष कसा आहे ते एकदा समजून घ्या. नंतर त्यावर चढायचे की नाही हे ठरवा. संसारवृक्ष मोठा विलक्षण आहे. इतर वृक्षाचे मूळ खाली व फांद्या वर असतात, तर याचे मूळ वर असते व फांद्या खाली असतात. पूर अगर वादळाने उन्मळून पडलेला वृक्ष असावा तसा हा आहे. या वृक्षाला सुंदर सुंदर फळे लटकलेली दिसली तरी यावर घरटे करून कायमचा राहण्यास योग्य नव्हे. तसे करणे धोक्याचे आहे. कारण हा ' अश्वत्थ ' आहे. ' श्वः तिष्ठति वा न वा ' उद्या राहीलच असे नाही म्हणून अश्वत्थ.

अशा अशाश्वत वृक्षास नष्ट करण्यासाठी खटपट करण्याची गरज नाही असे वाटेल, पण ते बरोबर नाही. कारण हा ' अव्यय ' ही आहे. आजची स्थिती उद्या नसते येवढेच नव्हे, तर या क्षणाची परिस्थिती दुसऱ्या क्षणी रहात नाही. सारखा बदल होत असतो. या

अनित्यतेमुळे त्यास अश्वत्थ नांव दिले आहे. अशी अनित्यता असली तरी या वृक्षाचा व्यय होत नाही.

सर्वोत्कृष्ट ब्रह्म हे याचे मूळ व जीव ह्या शाखा होत. जीव ब्रह्मापेक्षा निकृष्ट म्हणून शाखा खाली व वर मूळ. कर्मकांडाचे प्रतिपादन करणारे वेद ही या वृक्षाची मोठमोठी पाने होत. पाने टवटवीत असेपर्यंत झाड मेले असे म्हणता येत नाही. कर्मकांड म्हणते तुम्हाला जी फळे पाहिजेत ती मी देईन. साधने करा. कष्ट करा म्हणजे फळ मिळेल, पण हे लक्षात ठेवा की, ते फळ कायम टिकणारे नाही. पुनः पुन. कष्ट करा. असेच सारखे करीत राहिल्याने संसार कधीच संपत नाही. मनुष्य प्रथम एकटा असतो. नोकरी लागून विवाह झाला की दोनाचे चार, चाराचे आठ अशा श्रेणीने वाढता वाढता मुले नातवंडे पणतवंडांनी त्याचा संसार–वृक्ष बहरून जातो. व्याप तितका संताप या न्यायाने त्याचा जीव उबगून जातो. अनेक काळज्यांनी त्याला सतत घेरलेले असते. त्याची मुले नातवंडे वास्तविक त्याला विचारीत नाहीत. पण हा मात्र त्यांचे कसे होई ? म्हणून चिंता करीत असतो. वृद्धपणी त्याला संसार वृक्षाची कडू फळे चाखावी लागतात. म्हणून हा संसारवृक्ष तोडून टाकणे हे उत्तम. सकाम कर्मे करीत राहिले की हा वृक्ष बहरतो. म्हणून निष्काम कर्म करा की याची पाने झडून तो नाश पावेल.

**अधश्चोर्ध्वं प्रसृतास्तस्य शाखा गुणप्रवृद्धा विषयप्रवालाः ।**
**अधश्च मूलान्यनुसंततानि कर्मानुबन्धीनि मनुष्यलोके ॥ २ ॥**

गुणांच्या योगाने वाढलेला, विषयरूपी पल्लवांनी युक्त अशा वृक्षाच्या अनेक शाखा खाली व वर पसरलेल्या आहेत. कर्माधीन असलेली त्याची मुळे मनुष्यलोकी विस्तार पावली आहेत.

या वृक्षाच्या शाखा खाली आणि वर अशा दोन्हीकडे पसरलेल्या आहेत.

'धर्माद्देवत्वमेति व्रजति पुनरधः पातकैः स्थावरादीन्।'

म्हणजे उत्कृष्ट व शास्त्रानुसार कर्मे करणारा देवयोनीत जातो. ब्रह्मलोकापर्यन्त तो जातो. या झाल्या वरच्या शाखा. वाईट व शास्त्रास सोडून वागणारा पश्वादी योनीत जातो. या त्याच्या खालच्या शाखा. सत्त्व, रज व तम यांच्या वृत्तीचे जल मिळाले की या फांद्या फोफावतात. प्रायः सर्व वृत्ती रजोगुणाच्या असतात. मनुष्य थकला की तमोगुणाचा प्रभाव वाढतो. या सर्व वृत्ती नाहीशा करणे फारच कठीण आहे. पण या वृत्तींचा निरोध करता येतो. त्यासाठी ध्यानाची सवय लावून घेतली पाहिजे. निदान दिवसाकाठी पाच दहा मिनिटे तरी ध्यान करा. ते जमत नसेल तर सच्छास्त्राचे श्रवण, वाचन वा मनन करा. म्हणजे सात्त्विक वृत्ती निर्माण होतात. रज व तमोगुण वृत्तींचे पाणी न मिळाल्याने संसारवृक्ष फोफावण्याचे बंद होते.

या वृक्षाची शब्द-स्पर्श-रूप-रस-गंध ही विषयरूपी पालवी (विषय प्रवालाः) आहे. पालवी आरक्त असते म्हणून पशू त्याकडे आकृष्ट होतात. त्याप्रमाणे जीवसुद्धा विषयाकडे झेप घेतात. फांद्याप्रमाणेच या वृक्षाची मुळे वरखाली दोन्हीकडे आहेत. ब्रह्म हे मुख्य मूळ व रागद्वेषादि वासना ही अवांतर मुळे. मनुष्य म्हातारा झाला तरी वासना नष्ट होत नाहीत. 'जीर्यंत्यपि च देहेस्मिन्कामना नैव जर्यते' असे म्हटले आहे. इतकेच नव्हे, तर देहत्यागानंतरही वासना नष्ट होत नाहीत. सामान्य झाडाचे बी तयार व्हावे लागते. मग ते पेरायचे, त्याला खतपाणी घालायचे, तेव्हा त्याचे रोप तयार होते व कालान्तराने त्याचा वृक्ष होतो. पण या संसारवृक्षाला यापैकी कशाचीच गरज नसते. मेल्यावरही वासना कायम असल्याने हा वृक्ष आपोआप फोफावतो. केवळ चांगली कर्मे करून हा वृक्ष हटणार नाही. कारण चांगले कर्म करताना दुसरे वाईट कर्म न कळत, इच्छा नसतानाही होत असते. म्हणून दोन्ही फळे भोगावी लागतात. उदाहरणार्थ, पूजा करताना एखादेवेळा निरांजन किंवा देवच

हातातून खाली पडतात. अशा गोष्टी वृद्धांच्या हातून होतात. कारण तरुण त्या मार्गास जातच नाहीत.

**न रूपमस्येह तथोपलभ्यते नान्तो न चादिर्न च संप्रतिष्ठा ।**
**अश्वत्थमेनं सुविरूढमूलमसङ्गशस्त्रेण दृढेन छित्त्वा ॥ ३ ॥**
**ततः पदं तत्परिमार्गितव्यं यस्मिन्गता न निवर्तन्ति भूयः ।**
**तमेव चाद्यं पुरुषं प्रपद्ये यतः प्रवृत्तिः प्रसृता पुराणी ॥ ४ ॥**

परंतु त्याचे जसे वर वर्णन केले आहे तसे त्याचे खरे स्वरूप आहे असे आढळून येत नाही. याला आदि, अंत व स्थिती नाही. अत्यंत दृढमूल अशा या अश्वत्थ वृक्षाला बळकट असंग शस्त्राने छेदून नंतर त्या पदाचा शोध करावा की ज्या ठिकाणी गेले असता परत येत नाहीत, ज्यापासून ही अनादी विश्वपरंपरा वाढली अशा त्या आद्य पुरुषासच शरण जावे.

वर्षानुवर्षे संसार करणाऱ्यांनासुद्धा या वृक्षाचे स्वरूप कळत नाही. याचा आदि अंत मध्य सांगता येत नाही. याची मुळे फारच खोल गेलेली आहेत. ती तोडण्यासाठी विवेक व तत्त्वज्ञान यांच्या साहाय्याने असंग शस्त्र तीक्ष्ण केले पाहिजे. अनासक्तीने ब्रह्मपद मिळतेच मिळते. ते मिळविण्याचा अधिकार सर्वांना आहे. शिवाय तेथून पुनरावृत्ती नाही. अतोनात कष्ट करून विद्या वा धन मिळविले, तरी ते सर्वच्या सर्व मिळविणाऱ्याला मिळत नाही. त्यातील कांही ना कांही वाटा इतरांना जातो. नव्हे द्यावा लागतोच. पण ब्रह्मज्ञानासाठी घेतलेल्या कष्टाचे फळ एकटयालाच मिळते, हा त्याचा विशेष. आपणहून दुसऱ्याला दिले तरी आपले कायम राहते.

आई वडील लहानपणी अभ्यासासाठी झोपू देत नाहीत, जास्त खेळू देत नाहीत, सिनेमा नाटकाला जाऊ देत नाहीत. म्हातारपणी मुलांना फिरवून आणा, भाजी निवडा घर सांभाळा अशी कामे करायला

लावतात. तरुणपणी सुख भोगावे म्हटले तर आई वडील आड येतात. नाहीतर सासूतरी येऊन राहते किंवा शिक्षणासाठी मेव्हण्याला ठेवून घ्यावे लागते. असे सदैव दुसऱ्यांचे दडपण असल्याने सुख व विश्रांती कधीच मिळत नाही. असा दुःखमय संसार खुशाल करा. पण तेच परम ध्येय असे कदापी मानू नका. ब्रह्मज्ञान हेच ध्येय असले पाहिजे. ते गाठण्यासाठी परमेश्वराला संपूर्ण शरणागती देऊन त्याची भक्ती करावी. अशा भक्ताच्या अंगी कोणते गुण बाणतील ते भगवान पुढे सांगत आहेत.

**निर्मानमोहा जितसङ्गदोषा अध्यात्मनित्या विनिवृत्तकामाः ।**
**द्वन्द्वैर्विमुक्ताः सुखदुःखसंज्ञैर्गच्छन्त्यमूढाः पदमव्ययं तत् ॥ ५ ॥**

मानमोहरहित, संगरूपी दोष जिंकलेले, आत्मस्वरूपाच्या ठिकाणी नित्य स्थिती असलेले, सर्व कामनांतून निवृत्त झालेले, सुख व दुःख या द्वंद्वापासून कायमचे मुक्त झालेले ज्ञानी त्या अत्युच्च पदाप्रत जातात.

निर्मानमोहाः– मान व मोह नसणे. इतरांनी आपणाला मोठे म्हणावे असे वाटते यालाच मान म्हणतात व मोह म्हणजे अविवेक.

जितसंगदोषाः– स्त्री, पुत्र, धन यांना सोडू नये पण त्यांनाच सर्वस्व मानायचे नाही. त्यातच अडकून पडायचे नाही.

अध्यात्मनित्याः– अध्यात्माबद्दल अधिकाधिक गोडी वाटू लागणे. अध्यात्म्याची गोडी सहजासहजी लागत नाही. कांही लोकांना तर या विद्येचे इतके वावडे असते की, वेदांताविषयी कोणी बोलू लागला तर त्याचे बोलणेच बंद पाडतात. 'महापापव्रतां नृणां ज्ञानयज्ञो न रोचते' पापी लोकांना ज्ञानाचे वावडे असते असे भीष्मांनी म्हटले आहे. भाग्य असेल तरच अध्यात्माची गोडी लागते.

व्यवहारातील क्रिया शक्ती असली तर करता येतात. तरुणपणी भरपूर शक्ती असल्याने जशा क्रिया होतात, तशा म्हातारपणी शक्ती क्षीण

झाल्यावर होत नाहीत, परमार्थातील कोणतीच साधने अशी शक्तिसापेक्ष नाहीत. अगदी अंथरुणास खिळलेल्यालाही ईशचिंतन करता येते. नुसते बसून जप, ध्यान, वाचन, श्रवण करता येते. पण परमार्थ इतका सुलभ असूनही त्याकडे कोणी वळत नाही. कथा कादंबऱ्या नाटक सिनेमा यावर लोक हजारो रुपये खर्च करतात. पण त्यांना परमसुंदर ज्ञानेश्वरी विकत घ्यायचे जीवावर येते, मग ती वाचण्याचे दूरच राहिले. काही लोक परमार्थ साधने करतात, पण त्यांची वृत्ती प्रपंच प्रधान व परमार्थ गौण मानण्याची असते. खरा भक्त परमार्थ प्रधान व प्रपंच गौण मानतो. व्यवहारातील साधने प्रथम अधिक असतात. म्हणजे तरुणपणी मनुष्य दोन दोन नोकऱ्या करतो. पण पंचावन्न वर्षे झाली की एकही नोकरी न करता घरी बसतो. परमार्थ साधनांचे याउलट असते. सुरवातीस ती कमी प्रमाणात असतात व पुढे पुढे वाढत जातात.

**विनिवृत्तकामाः**—संसारविषयक कामना कमी कमी होत जाणे.

**द्वंद्वैर्विमुक्ताः**—उन्हाळा, पावसाळा, हिवाळा हे ऋतु येतात व जातात. त्याबद्दल तक्रार करता येत नाही. पंखा, छत्री व बंडीच्या सहाय्याने त्यांचे निवारण करायचे. सृष्टीनियमानुसार हे ऋतु अटळ असतात. म्हणून त्यांचेबद्दल तक्रार करण्यात काही अर्थ नसतो. सुख-दु:खाबद्दल अशीच भावना ठेवली पाहिजे. ती जशी येतात तशी जातातही. हे लक्षात ठेवून दोन्ही प्रसंगी सारखीच शांत वृत्ती ठेवली पाहिजे.

प्रल्हादाला कड्यावरून लोटले, तापलेल्या तेलात टाकले तरी ते त्याने शांतपणे सहन केले. त्यामुळे त्याला काहीएक बाधा झाली नाही. विष पिऊनही तो गुटगुटीत झाला. त्याचेवर फेकलेल्या शस्त्राने प्रल्हादाचे तुकडे होण्याऐवजी शस्त्रांचेच तुकडे झाले. प्रल्हादाच्या द्वंद्वसहिष्णुतेमुळे त्याच्या अंगांत अशी शक्ती निर्माण झाली होती.

परमार्थाची साधने करता करता भक्त अमूढ म्हणजे ज्ञानी होतो व त्यामुळे त्यास अविनाशी असे पद प्राप्त होते.

भक्ती केल्यास ही साधने आपोआप प्राप्त होतात, तरी भगवंतांनी त्याची सविस्तर माहिती दिली आहे. हेतु हा की साधकाला आपली प्रगती अजमावण्यास साधकास मदत व्हावी.

**न तद्भासयते सूर्यो न शशाङ्को न पावकः ।**
**यद्गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम ॥ ६ ॥**

ते पद सूर्य प्रकाशित करीत नाही, चंद्र नाही किंवा अग्नीही नाही. ज्या ठिकाणी गेल्यावर गेलेले लोक परत मागे पाऊलच घेत नाहीत, ते माझे अत्यंत श्रेष्ठ निजधाम होय.

चंद्र, सूर्य, अग्नी या तेजस्वी पदार्थांना पहायचे म्हटले तरी डोळे असावे लागतात, इंद्रियांचा प्रकाश लागतो. अग्नीची जाणीव त्वगिंद्रियाने होते. पण आत्मा समजण्यासाठी कशाचीच जरूरी नसते. कारण तो स्वप्रकाशच आहे. गाढ झोपेत देहेंद्रियादिकांचा संबंध नसतो. पण ' मी आहे ' असे भान असते. आत्मपद प्राप्त झाल्यावर ज्ञानी पुनः संसारात येत नाही. ' सर्वे संयोगाः वियोगांताः' संयोग झाल्यावर वियोग होतोच असा नियम आहे. फक्त वियोग किती काळाने होणार येवढेच अज्ञात असते. चढेल तो पडेल या न्यायाने जितके उंच जावे तितकेच खाली यावे लागते. तसेच जीवनाची मर्यादा मरणापर्यंत, या न्यायाने अज्ञानी मूळपदावर येणारच. कुठलेही पद कायमचे नसते. राजपद, राज्यपालपद, अधिकारपद किंवा सामान्य नोकरी विचारात घेतली तरी वयाला पंचावन्न वर्षे होताच नोकरीचे पद सोडून द्यावे लागते, कांही राजकारणी आपल्या पदाला चिकटून बसतात. पण मरण आले की ते पद त्यांना सोडावेच लागते, याला अपवाद फक्त आत्मपदाचा आहे. हे पद मिळविल्यावर मृत्यूनंतरही ते सोडावे लागत नाही.

ब्रह्मपदी पोहोचल्यावर परतावे लागत नाही. कारण ब्रह्मपद ही प्राप्ताची प्राप्ती आहे. गळ्यातील कंठा गळ्यातच असतो. पण हरवला आहे अशा शंकेने शोधाशोध आरडा ओरडा सुरू होतो, मग कोणीतरी आरशात आपले रूप बघावयास सांगितल्यावर त्याला आपलीच वस्तू मिळाल्याचा आनंद होतो, यालाच प्राप्ताची प्राप्ती म्हणतात. तुमचा आत्मा तुमच्यापाशीच आहे. तो कधी हरवत नाही. अज्ञानामुळे आपण शोधाशोध करतो. एकदा त्या आत्म्याचे ज्ञान झाल्यावर त्याची ओळख कदापि विसरणार नाही.

जाणे ही क्रिया येण्याच्या सापेक्ष आहे. जीव रोज गाढ झोपेत ब्रह्मरुपाला जातो व जागा झाला की पुनः संसारात येतो. हा रोजचा अनुभव पाहिल्यास वरील विवेचन वृथा वाटेल, पण वस्तुस्थिती तशी नाही. आई लहान मुलाला घेऊन कीर्तनाला जाते, तिचे मूल काही काळ स्तब्ध बसते, पण नंतर चुळबूळ सुरू करते. तरीही आई कीर्तनातून उठत नाही असे पाहिल्यावर ते मूल रडायला लागते, मग मात्र आईचा नाईलाज होऊन तिला घरी परतावे लागते. तसेच झोपेत जीव अज्ञानाला बरोबर घेऊन सताशी संपन्न होतो. ते अज्ञान त्याला फार वेळ तिथे राहू न देता जागे करते. पण अज्ञान सोडून ज्ञानसंपन्न होऊन जो जीव ब्रह्मपदी जाईल त्याला परतण्याचा प्रश्न येत नाही.

**ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः ।**
**मनःषष्ठानीन्द्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति ॥ ७ ॥**

माझाच सनातन अंश जीवलोकामध्ये जीवरूप पावलेला आहे. तो प्रकृतीच्या ठिकाणी स्थित असलेल्या मनादि करून सहा इंद्रियांना आपल्या जवळ ओढून घेतो.

जीव हा परब्रह्माचाच अंश आहे. याचा अर्थ परब्रह्माचे तुकडे होतात असा नव्हे. आकाश निरवयव असल्याने त्याचे तुकडे होत

नाहीत. आत्मा तर आकाशहूनही सूक्ष्म व निरवयव असल्याने त्याचे वस्तुतः अंश होत नाहीत. पण अंतःकरणाच्या सान्निध्यामुळे जीव आत्म्याहून वेगळा वाटतो. विजेच्या दिव्यापुढे तांबडी काच आली की वाहने थांबतात. हिरवी काच आली की ती चालू लागतात. हा फरक रंगीत काचामुळे होतो. अंतःकरण ही जीवावरची कांच असल्याने तो ब्रह्मापेक्षा वेगळा भासतो. गाढ झोपेत अंतःकरण अज्ञानात लीन झाल्यामुळे राजा—रंक—विद्वान—अविद्वान असा काहीच फरक रहात नाही.

शरीरं यदवाप्नोति यच्चाप्युत्क्रामतीश्वरः ।
गृहीत्वैतानि संयाति वायुर्गन्धानिवाशयात् ॥ ८ ॥
श्रोत्रं चक्षुः स्पर्शनं च रसनं घ्राणमेव च ।
अधिष्ठाय मनश्चायं विषयानुपसेवते ॥ ९ ॥

जेव्हा जीवरूपी ईश्वर नवीन शरीर धारण करतो आणि जेव्हा शरीर टाकून देतो, त्यावेळी तो गंधाश्रया ( सुगंधी पुष्प ) पासून वायू ज्याप्रमाणे गंध नेतो त्याप्रमाणे ही इंद्रिये घेऊन जातो.

कान, डोळे, त्वचा, जिव्हा, घ्राण आणि मन यांचा अंगीकार करून हा जीवात्मा ( शब्दादी ) विषयांचा उपभोग घेतो.

पशुपक्ष्यांचे सामर्थ्य त्यांच्या हस्तपादादी कर्मेन्द्रियात असते, तर मानवाचे सामर्थ्य त्याच्या ज्ञानेंद्रियात असते. पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेन्द्रिये व मन यांचे आकर्षण करून जीव झोपतो. ती प्रकृतीत काही काळ लीन होतात तेव्हा झोप लागते. अंथरुणावर लोळून रात्र काढली तरी झोप लागेलच असे नाही. भोगप्रद कर्म संपल्यावर इतर कर्मे अज्ञानात लयाला जातात तेव्हांच झोप लागते. झोपेचे तंत्रही कर्माधीन आहे. आपल्या हाती नाही.

कर्मसुद्धा लगेच फल किंवा भोग देत नाही. त्यासाठी काहीतरी सहकारी कारण व संस्कार व्हावे लागतात. आंब्याचे कलम लावल्यावर

प्रत्यक्ष फळे मिळायला मध्ये काही वर्षे जावी लागतात. आपण फक्त दुःखालाच भोग म्हणतो. पण शास्त्रकार सुखदुःख दोन्हीलाही भोग म्हणतात. हे दोन्ही भोग संपले म्हणजे झोप येते. म्हणून कोणी दुपारी कामाच्या वेळी घोरतो तर कोणी मध्यरात्रीही झोपेची आराधना करीत असतो.

जीव हा देहाचा स्वामी आहे म्हणून त्याला ईश्वर म्हणतात. झोपेच्या वेळी तो देहावरची मालकी तात्पुरती सोडतो. जेव्हा कायमची मालकी सोडतो तेव्हा त्याला मृत्यु म्हणतात. कायमची मालकी सोडून जाताना कान, डोळे, त्वचा, जिव्हा, घ्राण आणि मन या सहांना आपल्या बरोबर नेतो. हे उपलक्षण आहे. पांच कर्मेन्द्रिये, पांच ज्ञानेंद्रिये, पंचप्राण, मन आणि बुद्धी अशा सतरा तत्त्वानी बनलेले लिंग शरीर तो बरोबर घेऊन जातो. भोगांची वासना राहिल्याने त्याला हे लटांबर न्यावे लागते. ज्ञान झाल्यावर वासनाच उरत नाही. त्यामुळे त्याला इथले कांहीच न्यावे लागत नाही. तापल्या तव्यावर टाकलेल्या जलबिंदूप्रमाणे ज्ञानाग्नीमुळे लिंग शरीराचा नाश होतो. ज्ञानामुळे श्रेष्ठ अशा परमानंदाचा लाभ झाल्यावर किरकोळ आनंद देणारी साधने बाळगण्याचे प्रयोजनच उरत नाही.

सामान्य पुढारी मंत्री झाला की त्याला राजधानीतील मोटार, बंगला, नोकर चाकर मिळतात, पण बायकामुले स्वतःचीच न्यावी लागतात. जीव जेव्हा दुसरे शरीर धारण करतो तेव्हा त्याला नव्या स्थूल शरीराचा लाभ होतो, पण लिंग शरीर पहिलेच न्यावे लागते. ज्ञानप्राप्ती-नंतर भोगांची अपेक्षाच उरत नसल्याने लिंग शरीराची आवश्यकता भासत नाही. म्हणून ज्ञानाने मिळणारे पद हे सर्वोत्कृष्ट होय.

जगातील सर्व सुख-दुःखे मानवाच्या मनावर अवलंबून आहेत. साक्षात्कार झाला की सुख-दुःख भासविणारे मनच नष्ट होते. मनरूपी

प्रधान मल्लाचा ज्ञानाकडून पराभव झाल्यावर देहेन्द्रियादी छोटे मल्ल त्याच्या वाटेसच जात नाहीत.

**उत्क्रामन्तं स्थितं वापि भुञ्जानं वा गुणान्वितम् ।**
**विमूढा नानुपश्यन्ति पश्यन्ति ज्ञानचक्षुषः ॥१०॥**

(शरीर) सोडून जाताना, त्यात राहताना, उपभोग घेताना अथवा गुणांनी युक्त असता अज्ञानी आत्म्याला देहाहून वेगळा असे पाहू शकत नाही, पण ज्ञानरूपी चक्षूंनी युक्त असलेले त्याला तसे पाहतात.

जीव या शरीरातच राहतो व स्थूल होऊन सुखोपभोग भोगतो. जीव असेपर्यन्त शरीराला किंमत असते. जीव निघून जाताच शरीराची विल्हेवाट लावावी लागते. ताजी भाजी मिळविण्यासाठी मुंबईतून चार चार चकरा मारणारी मंडळी आहेत, पण आत्म्याचा शोध घेण्यासाठी कष्ट करणारे कोणी सापडणार नाहीत. दैनिक सकाळमध्ये 'पुण्यात कोठे काय मिळते' असे एक सदर असते. त्यात हरएक वस्तूची जाहीरात सांपडेल. पण अमुक ठिकाणी आत्मा मिळेल अशी जाहीरात मात्र असणार नाही. याचा अर्थ मनुष्य दृश्य वस्तूंना महत्त्व देतो, पण हे सारे ज्या सत्तेच्या आधारे चालू आहे, त्या आत्म्याकडे मात्र पूर्ण दुर्लक्ष करतो. मूढांना आत्म्याची ओळख पटत नाही. ज्ञान प्राप्त केल्याशिवाय आत्म्याचा अनुभव घेता येणार नाही. पण ज्ञान मिळविणे सोपे काम नव्हे.

**यतन्तो योगिनश्चैनं पश्यन्त्यात्मन्यवस्थितम् ।**
**यतन्तोऽप्यकृतात्मानो नैनं पश्यन्त्यचेतसः ॥११॥**

प्रयत्न करणारे योगी याला बुद्धीचे ठिकाणी पाहतात. यत्न करणारे पण ज्यांचे मन सुसंस्कृत नाही असे अविवेकी यत्न करूनही (आत्मा जसा आहे तसा) पाहू शकत नाहीत.

आत्म्याच्या शोधासाठी प्रयत्न केल्यास तो प्रत्यक्ष दिसू शकतो. त्याला पाहण्यासाठी विशेष दृष्टी यावी लागते. आकाशवाणीवरील गाणे अनेकजण ऐकतात. पण सर्वांना राग कोणता, साथ बरोबर आहे की नाही, सूर जमला आहे की नाही हे कळत नाही. आपल्या नाडीचे ठोके कोणीही पाहू शकतो. पण त्यावरून रोगपरीक्षा सर्वांना करता येत नाही. या गोष्टी समजण्यासाठी त्या त्या विषयाचा अभ्यास असावा लागतो. तज्ञांचा सहवास घडावा लागतो व इतर प्रतिबंध नसेल तरच ते जमते. कोठल्याही शास्त्राचे सम्यग् ज्ञान होण्यासाठी विशिष्ट दृष्टी यावी लागते. एखाद्या शास्त्राचा सतत अभ्यास, मनन व चिंतन करीत राहिल्यावर कालांतराने त्या शास्त्रासंबंधी अधिकारवाणीने बोलता येते.

आत्म्याचे ज्ञान होण्यासाठी सत्त्व वाढवावे लागते. एक किलो दूध आटवून त्याचे सत्त्व काढल्यास ते पाव किलोही भरत नाही. पण जे उरते ते शुद्ध असते. मनुष्यही सत्त्वगुणाने युक्त असतो. पण त्यात रज व तमाचे मिश्रण झालेले असते. रज तम काढून टाकून सत्त्व गुणांची वाढ करण्यासाठी आहार, विहार, उच्चार व आचार हे सर्व सात्त्विक बनवायला हवेत. ईश्वराच्या दिव्य लीलांचे श्रवण व मनन करीत राहिले तरी सत्त्वगुणाची वाढ होऊन आत्मा प्रत्यक्ष होईल.

**यदादित्यगतं तेजो जगद्भासयतेऽखिलम् ।**
**यच्चन्द्रमसि यच्चाग्नौ तत्तेजो विद्धि मामकम् ॥१२॥**

जे तेज आदित्याच्या ठिकाणी असून अखिल जगाला प्रकाशित करते, जे चंद्राच्या व अग्नीच्या ठिकाणी आहे ते तेज माझे आहे असे जाण.

परमेश्वर हा तर व्यापक आहेच. पण त्याचे अवतारसुद्धा तसेच व्यापक आहेत. एकटा सूर्य साऱ्या जगाला प्रकाशित करतो. तेज मग ते अग्नीचे असो किंवा चंद्राचे असो, ते भगवंताचेच समजावे.

**गामाविश्य च भूतानि धारयाम्यहमोजसा ।**
**पुष्णामि चौषधीः सर्वाः सोमो भूत्वा रसात्मकः ॥१३॥**

तसेच मी पृथ्वीमध्ये प्रवेश करून आपल्या सामर्थ्याने भूतांचे धारण करतो व रसात्मक चंद्र होऊन सर्व औषधींचे मीच पोषण करतो.

घराची डागडुजी वरचेवर केली नाही तर घर पडते. या पृथ्वीचा जन्म होऊन कित्येक युगे लोटली, पण हिची डागडुजी कधी करावी लागते का? डागडुजी न करताही पृथ्वी कार्यक्षम राहते. कारण पृथ्वी-मध्ये परमेश्वर आहे, म्हणून तिचे अस्तित्व टिकून आहे व त्याच्याच सान्निध्यामुळे ती प्राणीमात्रांना धारण करू शकते. चंद्रकिरणांच्या द्वारा भगवंतच वनस्पतींचे पोषण करीत असतो.

**अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः ।**
**प्राणापानसमायुक्तः पचाम्यन्नं चतुर्विधम् ॥१४॥**

मी सर्व प्राण्यांच्या देहात जठराग्नी होऊन प्राण व अपान यांच्या सहाय्याने शुष्क, स्निग्ध, सुपक्व व विदग्ध असे चार प्रकारचे अन्न पचवितो.

मनुष्य अन्न खातो पण भूक लागणे व खाल्लेले पचविणे त्याच्या ताब्यात नाही. परमेश्वररूपी वैश्वानर आत प्रज्वलित झालेला असेल तरच मनुष्य अन्नावर ताव मारू शकतो. हा अग्नी शरीरात असूनही तो शरीराला जाळत नाही. उलट शरीराची झीज भरून काढतो. असा चमत्कार ईश्वराशिवाय कोण करू शकेल ?

अन्नाचे शुष्क, स्निग्ध, सुपक्व व विदग्ध हे जसे चार प्रकार पडतात तसेच, भक्ष्य, भोज्य, लेह्य व चोष्य असेही वर्गीकरण करण्यात येते. भाकरी-चपातीसारखे दातांनी तोडून खाण्याच्या पदार्थांना भक्ष्य म्हणतात. सर्व पेये ही भोज्य होत. तर श्रीखंडासारख्या चाटून खाण्याच्या

पदार्थांना लेह्य म्हणतात. अंबा, ऊस इत्यादी चोखून खाण्याचे पदार्थ हे चोष्य होत. पूर्वी रोजच्या भोजनात हे चारी प्रकार असत. समतावादी सर्वांना सारखे अन्न द्यावे म्हणतात! एकच प्रकारचे अन्न पशूंना चालते. मानवाच्या अन्नात विविधता असावी लागते.

**सर्वस्य चाहं हृदि संनिविष्टो मत्तः स्मृतिर्ज्ञानमपोहनं च ।**
**वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो वेदान्तकृद्वेदविदेव चाहम् ॥१५॥**

सर्व प्राण्यांच्या हृदयात मी प्रवेश करून राहिलो आहे. त्यांना स्मृति, ज्ञान व विस्मृति माझ्यामुळे होतात. सर्व वेदांकडून मीच जाणण्यास योग्य आहे. वेदांचा कर्ता व जाणणारा मीच आहे.

सर्वांच्या हृदयात ईश्वर आहे म्हणून जीव व शिव हे दोघे एकत्र नांदतात. नाहीतर घरमालक व भाडेकरू, जमीनदार व कूळ यांच्यात जशी भांडणे चालतात तशी भांडणे लागली असती. खूप पाठांतर केले व भाषणाची जय्यत तयारी केली तरी हृदयस्थ परमेश्वराची कृपा नसेल तर तोंडातून शब्दही फुटणार नाही. अशा सर्वव्यापी परमेश्वराची स्तुतिस्तोत्रे सर्व वेद एकमुखाने गातात. वेदांतकृत् म्हणजे संप्रदाय प्रवर्तक ईश्वरच आहे. ज्याचेवर हा हृदयस्थ भगवंत प्रसन्न होतो, त्याचे द्वाराच नवीन नवीन शोध– रेडिओ, टेलिव्हिजन, रॉकेट लागतात. अनात्म्य वस्तूत नित्य बदल होत असतो. पण आत्मा हा नित्य असतो.

पूर्वी सध्याइतके भेसळीचे वा फसवाफसवीचे प्रकार नव्हते. एक रुपयाला मणभर धान्य मिळत असल्यावर त्यात भेसळ कोण आणि कशाला करील? आता रुपयाला मापटेभरसुद्धा धान्य मिळत नाही. मग पोत्यात पांच मापटी खडे मिसळले तर पोत्यामागे पांच दहा रुपये सहज मिळतात. परीस्थितीत असा जमीनअस्मानाचा फरक पडला असला, तरी आत्मा मात्र अनादी काळापासून जसा आहे तसाच आताही आहे. म्हणून त्याचे ज्ञान–आत्मज्ञानही आहे तसेच आहे. हे आत्मज्ञान प्रथम

नारायणाने ब्रह्मदेवांना दिले व पुढे वसिष्ठ-शक्ती, पराशर—व्यास-शुक—गौडपाद—गोविंदपाद—शंकराचार्य अशा परंपरेने आजतागायत चालत आले आहे. आत्मज्ञान प्राप्त होण्यास गुरूची आवश्यकता असते. प्रत्येक आत्मज्ञानी संत आपली गुरुपरंपरा सांगतो. संतशिरोमणी तुकाराम महाराजानाही 'बाबा चैतन्यानी स्वप्नात गुरूपदेश केला' हे सांगावे लागले. गुरूशिवाय संतांच्या वचनास वजन येत नाही.

**द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च ।**
**क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते ॥१६॥**

या संसारात क्षर आणि अक्षर असे दोन पुरुष आहेत. सर्व शरीरधारी प्राण्यांना क्षर व कूटस्थास ( मुक्त जीवास ) अक्षर म्हणतात.

क्षर—अक्षर असे दोन पुरुष म्हणजे पुरुषाच्या उपाधी दोन आहेत. क्षर म्हणजे विनाशी कार्य— मायेचे अंतःकरणादिक कार्य व अक्षर किंवा कूटस्थ म्हणजे परमेश्वरी माया. यालाच कार्योपाधि व कारणोपाधि असेही म्हणतात. कार्योपाधि हा जीव होय तर कारणोपाधि ईश्वर होय. या दोन्हीपेक्षा वेगळा नित्यशुद्ध-मुक्त स्वभावाचा पुरुष असतो. त्यासच परमात्मा म्हणतात. त्याचे स्वरूप पुढील श्लोकात भगवंतानी स्पष्ट केले आहे.

**उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः ।**
**यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वरः ॥१७॥**

या दोघाहून वेगळा — ज्याला परमात्मा असे म्हणतात, जो त्रैलोक्यात प्रवेश करून त्याला धारण करतो, जो अव्यय व ईश आहे— असा उत्तम पुरुष आहे.

व्यवहारात उपाधीलाच महत्त्व दिले जाते. एखादा शिक्षकाचा व्यवसाय करणारा मास्तर म्हणून ओळखला जातो. तो मृत झाल्यावरही त्याचा मास्तर म्हणूनच उल्लेख केला जातो. जो नोकरीत असता 'साहेब' असतो, तो निवृत्त झाल्यावरही साहेब म्हणून ओळखला जातो. काळा

डगला घालून न्यायासनावर बसेल त्याला न्यायाधीश म्हणावयाचे. मग तो पुरुष असो अथवा स्त्री असो. व्यवहारात आनंदाची साधने मिळवावयाची असल्याने उपाधींना प्राधान्य येते. परमार्थात शुद्धालाच महत्त्व असते. कारण शुद्ध आनंद मिळविणे हे परमार्थाचे ध्येय असते. मग साधनांना कोण विचारतो? त्रैलोक्याला व्यापून असलेल्या उत्तम पुरुषाला परमात्म्याला प्राप्त करून अलौकिक आनंदाचा लाभ करून घेण्यासाठी मानवाने यत्न केले पाहिजेत.

**यस्मात्क्षरमतीतोऽहमक्षरादपि चोत्तमः ।**
**अतोऽस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः ॥१८॥**

ज्या अर्थी मी ( परमात्मा ) क्षराच्या पलीकडचा आहे आणि अक्षराहून देखील उत्कृष्ट आहे, त्या अर्थी जगामध्ये व वेदामध्ये पुरुषोत्तम म्हणून प्रसिद्ध आहे.

क्षर व अक्षर म्हणजे अंतःकरण व माया हे प्रथम सांगितले. या दोन्ही उपाधी सोडून जे शुद्ध तत्त्व उरते तेच परमात्म्याचे खरे स्वरूप. त्यालाच पुरुषोत्तम असे म्हणतात. परदेशी चाललेल्या व्यक्तीला निरोप देण्यासाठी अनेक मंडळी जमली असता त्याची पत्नी त्याचेशी स्पष्टपणे बोलू शकत नाही. जे तिला बोलायचे असते ते ती शब्दाने व्यक्त करू शकत नाही. मात्र तिला काय म्हणावयाचे आहे हे तिचा चेहरा व भरलेले डोळे सांगत असतात. त्याचप्रमाणे श्रुतीला या परमात्म्याचे वर्णन शब्दांनी करता येत नाही. म्हणून ती परमेश्वराचा बोध लक्षणेने करते. सर्वांना ज्ञान देणारा, मोह नाहीसा करणारा व चराचराला धारण करणारा या त्याच्या सगुण रूपाद्वारे श्रुती त्याचा बोध करून देते.

**यो मामेवमसंमूढो जानाति पुरुषोत्तमम् ।**
**स सर्वविद्भजति मां सर्वभावेन भारत ॥१९॥**
**इति गुह्यतमं शास्त्रमिदमुक्तं मयानघ ।**
**एतद्बुद्ध्वा बुद्धिमान्स्यात्कृतकृत्यश्च भारत ॥२०॥**

हे भारता, जो ज्ञानी या प्रकारे मला पुरुषोत्तमाला जाणतो तो सर्वज्ञ होय. तो सर्व प्रकारे म्हणजे कायिक, वाचिक व मानसिक भावाने माझी भक्ती करतो.

हे पापरहिता अशा प्रकारे हे अत्यंत गुह्य शास्त्र मी तुला सांगितले. हे भारता याचे ज्ञान करून घेऊन मनुष्य बुद्धिमान व कृतकृत्य होतो.

सबंध अठराध्यायी गीतेला तर शास्त्र म्हणतातच, पण हा पुरुषोत्तम योग सांगणारा पंधरावा अध्यायही शास्त्र या संज्ञेस पात्र आहे. हा अध्याय म्हटल्याखेरीज पूर्वीचे लोक अन्नग्रहण करीत नसत. अर्जुन निष्पाप आहे ( अनघ ) म्हणून भगवंतानी त्याला हे शास्त्र सांगितले. कारण शास्त्र ही अत्यंत पवित्र गोष्ट असल्याने ते वाटेल त्याला देता येत नाही. अध्यात्म, वेदान्त इत्यादी शास्त्रे ब्राह्मणांनी दडवून ठेवली म्हणून बहुजन समाज अनभिज्ञ राहिला असा एक प्रवाद आहे, पण तो यथार्थ नाही. जो पवित्र होईल त्याला शास्त्र आपणहून हुडकत येते.

हे शास्त्र समजून घेतले तर मनुष्य बुद्धिमान म्हणजे ज्ञानी व कृतकृत्य होतो. व्यवहारी माणसामागचे काम संपले आहे, असे कधीच होत नाही, पण ज्ञानवान झाल्यावर मात्र तो सर्व कृत्यातून मोकळा होतो. सामान्य माणसाला त्याची पत्नी स्वस्थ बसू देत नाही, पण नारायणाला काय काम आहे ? ना नोकरी ना धंदा. तरीसुद्धा लक्ष्मी त्याची सेवा करते.

सर्वांना सर्व गोष्टी सारख्या प्रमाणात द्याव्या या साम्यवादी तत्त्वाप्रमाणे ज्ञान सर्वांना सारखे वाटता येत नाही. सर्वांना निवडणुकीस उभे राहण्याचा हक्क असला तरी मोजकेच लोक उभे राहतात. त्यातले थोडे निवडून येतात व त्यातील काही निवडक मंडळी मंत्रीपद पटकावतात. अधिकार सर्वांना आहे. पण तो मिळविणारा एखादाच असतो. तसेच

शास्त्र समजणारे अगदी निवडक लोक असतात. कारण तसाच अधिकार असल्याखेरीज शास्त्र समजणारच नाही.

हा अधिकार कसा मिळविता येईल ? व्यवहारात जसे द्रव्यानें सर्व काही मिळविता येते, निर्धन माणसाला कोणी विचारीतही नाही. तसेच परमार्थात जवळ दैवी संपत्ती नसेल तर शास्त्र त्याचेकडे फिरकणारही नाही. मग अशी दैवी संपत्ती मिळवायची तर तिची प्रथम ओळख असायला पाहिजे. तेच काम दैवी व आसुर संपत्तीची लक्षणे सांगण्याचे काम भगवंत पुढील अध्यायात करीत आहेत.

इति श्रीमद् भगवद् गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे पुरुषोत्तमयोगो नाम पंचदशोऽध्यायः ॥

# अध्याय १६ वा.

श्रीभगवान उवाच—

> अभयं सत्त्वसंशुद्धिर्ज्ञानयोगव्यवस्थितिः ।
> दानं दमश्च यज्ञश्च स्वाध्यायस्तप आर्जवम् ॥ १ ॥
>
> अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शान्तिरपैशुनम् ।
> दया भूतेष्वलोलुप्त्वं मार्दवं ह्रीरचापलम् ॥ २ ॥
>
> तेजः क्षमा धृतिः शौचमद्रोहो नातिमानिता ।
> भवन्ति संपदं दैवीमभिजातस्य भारत ॥ ३ ॥

श्रीभगवान म्हणाले— निर्भयता, शुद्धसत्त्वात्मक बुद्धी, ज्ञान व योगाच्या ठिकाणी तत्परता, दान, दम, यज्ञ ( स्वधर्माचरण ) स्वाध्याय, तप, सौजन्य—अहिंसा, सत्य, क्रोधराहित्य, ( अहंतेचा ) त्याग, शांति, दोष टाकून गुण घेण्याची दृष्टी, भूतमात्राच्या ठिकाणी दया, अनासक्ती, मृदुता, लज्जा, इंद्रियांच्या क्रियेचा थंडपणा-तेज, क्षमा, धैर्य, शौच, अद्रोह, अमानित्व हे गुण दैवी संपत्तीत जन्म पावलेल्या मनुष्यामध्ये असतात.

या अध्यायात भगवंत दैवी व आसुरी संपत्तीबद्दल विवेचन करीत आहेत. प्रथम त्यांनी दैवी संपत्तीत जन्मलेल्या मनुष्यामध्ये कोणकोणते गुण असतात ते सांगितले आहेत. ही एकूण सव्वीस लक्षणे आहेत.

**अभयः**— कोणतेही पारमार्थिक साधन निःसंशयपणे करणे. फळ मिळेल की नाही, तडीला जाईल की नाही, अशा विचारांना थारा न देणे. साधन सुरू करण्यापूर्वी ते नीट तपासून घ्यावे, पण एकदा सुरू केल्यावर शंका नसावी. आपल्या साधनाबद्दल पक्का निश्चय असणे म्हणजेच अभय.

**सत्वसंशुद्धिः–** साधने करता करता सत्त्वगुणाचा प्रकर्ष होतो व अंतःकरणाला ईश्वरी स्फुरणाची योग्यता येते. ध्यान करताना मन ईश्वराकडे अनायासे जाणे. विषयाकडे जसे मन आपोआप धावते, तसेच ईश्वराकडे गेले पाहिजे.

**ज्ञानयोगव्यवस्थितिः–** ज्ञान म्हणजे अध्यात्मज्ञान व योग म्हणजे सतत त्याच विचारात राहणे–श्रवण किंवा मनन करीत राहणे. अध्यात्माबद्दल गोडी बाळगणे.

**दानः–** आपल्या मालकीची वस्तु वा धन सत्पात्र व्यक्तीस योग्य काळी व योग्य स्थळी देऊन टाकणे.

**दमः–** बाह्येन्द्रियांचा निग्रह करणे. लक्षाधीश होणे हे ध्येय असेल तर प्रथमपासून पै-पैसा साठवावा लागतो. तसेच व्यवहारात बारीकसारीक प्रसंगातही इंद्रियनिग्रह करून दैवी संपत्तीचा संचय करता येतो. पान वाढलेले असले व भूकही सडकून लागली असली तरी चालू असलेला जप किंवा पूजा पुरी करून मगच उठायचे. स्वयंपाकासच उशीर झाला असता तर थांबावे लागलेच असते, असा विचार करून निग्रह करायचा.

**यज्ञः–** श्रुतीने सांगितलेल्या अग्निष्टोमासारख्या किंवा स्मृतींनी सांगितलेल्या वैश्वदेव, होम हवनादी क्रिया. नित्यकर्मे.

**स्वाध्यायः–** ब्राह्मणांनी वेदाध्ययन व इतरांनी जपासारखे नित्यनेम करणे.

**तपः–** तप तीन प्रकारचे आहे. कायिक, वाचिक व मानसिक. देव, ब्राह्मण, गुरु, विद्वान यांचे पूजन करणे हे शारीरिक तप. वाचेने नेहमी सत्य, प्रिय म्हणजे कोणाचेही मन दुखवले जाणार नाही असे व हितकारक बोलणे म्हणजे वाङमयीन तप होय. मन शांत ठेवणे, मौन पाळणे, आत्मनिग्रह करणे हे मानसिक तप समजावे. साधी देवपूजा हे सुद्धा तप आहे अशा भावनेने केली पाहिजे. म्हणजे दैवी संपत्तीत भर पडते.

**आर्जव–** सरळपणा. कोणी कांही विचारले तर सरळ उत्तर द्यावे. उत्तर सरळ दिले नाहीतर पुढील क्रियाही सरळ होत नाहीत. पतीने जेवण तयार आहे कां ? असे विचारल्यावर जर ' नसायला काय झाले ? आम्हालाच चुलीत गेले पाहिजे. तुम्ही थोडेच करणार आहात ' असे पत्नीकडून उत्तर आले तर परिणामी भांडण व्हायचे हे ठरलेले आहे. सरळ बोलण्याने–वागण्याने प्रेमवृद्धी होते.

**अहिंसा–** कायावाचामनाने दुसऱ्याला कसलीही पीडा न देणे.

**सत्य–** खरे बोलण्याने फायदा होत नाही असे दिसत असले तरी खरेच बोलणे.

**अक्रोध–**दुसऱ्याने राग येण्यासारखे कृत्य केले तरी राग आवरणे. तोंडाने तर मुळीच व्यक्त करू नये. एक वेळ चेहऱ्यावर नापसंती दर्शविली तरी क्षम्य होईल. पण प्रत्यक्ष कृती नको. संगीतातील अवघडांतील अवघड राग एक वेळ साध्य होईल, पण राग आवरता येणे अत्यंत कठीण आहे.

**त्याग–** दुष्ट विचार, दुष्ट क्रिया, दुष्ट अन्न-संगती इत्यादींना सोडणे.

**शांति–** ज्ञेय, ज्ञाता व ज्ञान नाहीसे होऊन उरणारी स्थिती.

**अपैशुन–**चहाडी न करणे. चहाडीने मने कलुषित होण्यापलीकडे कांहीं साधत नाही.

**भूतदया–** दुसऱ्याचे दुःख दूर व्हावे अशी मनापासून इच्छा करणे. इच्छा असली की प्रत्यक्ष कृती होते. दुःखिताबद्दल सक्रिय सहानुभूती दाखविणे.

**अलोलुप्त्व–** निर्लोभवृत्ती. लोभ हे एक नरकद्वार आहे असा पक्का समज असणे.

**मार्दव–** सज्जनांच्या संगतीला पात्र होणे. त्यांचे आवडते होणे.

**ऱ्ही—** निंद्य कर्माबद्दल लज्जा बाळगणे.

**अचापल्य—** कर्मेंद्रियांची कारणाशिवाय हालचाल न करणे.

**तेज—** प्रगल्भपणा, प्रौढपणा. स्त्री-बालकादिकापासून पराभव न पावणे. केवळ अस्तित्वाने दुसऱ्याचा पराभव होणे.

**क्षमा—** अपराध्यास शिक्षा करण्याचे सामर्थ्य असताही स्वस्थ बसणे. सहन करणे.

**धृति-** दुःखप्रसंगी धैर्य बाळगणे.

**शौच—** अंतर्बाह्य शुद्धता.

**अद्रोह—** स्वार्थासाठी दुसऱ्याचे अहित करण्याची कल्पनाही मनात न येणे.

**नातिमानिता—** रूप, बल, गुण, धन, विद्या याबद्दल दुरभिमान नसणे.

व्यवहारांतील संपत्ती कितीही मिळाली तरी ती कांही माणसाबरोबर शेवटी जात नाही. चुकून त्याच्या अंगावर एखादा दागिना राहिलाच तर तो काढून घेतात. पण दैवी संपत्ती जीव ज्या ज्या योनीत जाईल त्या त्या योनीत त्याच्याबरोबर जाते. व्यवहारांतील संपत्तीचे वाटणीदार व वारसदार असतात. दैवी संपत्ती जो मिळवील त्याचीच सर्वस्वी असते. त्याच्या वारसांना सुद्धा ती मिळत नाही किंवा वारस नाही म्हणून सरकारजमाही होत नाही. व्यावहारिक संपत्ती जरी चोरून वाढविली तरी सरकारला त्याचा पत्ता लागतो. सरकारने त्यासाठी स्वतंत्र खातेच ठेवले आहे. अशा संपत्तीवर सरकार कर वसूल करते. दैवी संपत्ती वाढली की ईश्वराला आपोआप कळते. त्याचेकडे परमेश्वर आपणहून येतो व मोक्षरूपी फल देतो. व्यवहारातील संपत्तीचे फल मिळेलच असे नाही. कारण त्यात दुसरे अडथळे आणू शकतात. दैवी संपत्तीच्या फळात कोणी आड येऊ शकत नाही.

दैवी संपत्तीवानांनाही प्रारब्धामुळे दुःखे भोगावी लागतात. पण ती दुःखे शिथील होतात. दुःखातही परमेश्वराचे अनुसंधान राखल्याने त्यांची कोणतीही गैरसोय होत नाही. दैवी संपत्तीने संपन्न असलेले पांडव वनवासात होते, पण ते अप्रिय झाले नाहीत व दुर्योधन राज्यावर होता म्हणून लोकप्रिय झाला नाही. त्याच्या हाती सत्ता व संपत्ती असल्याने लोक त्याची आज्ञा पाळीत, पण त्यांचा कल पांडवाकडे होता. पांडवाना सूर्यकृपेमुळे थाळी लाभली होती, त्यामुळे वनात राहूनही ते अन्नदान करीत असत. त्यांचेकडे आश्रित होते. ऋषीमुनी येऊन त्यांना कथा सांगत व वेदान्ताचा उपदेश करीत असत. योगी, गुरु, परमेश्वर हे आपण होऊन दैवी संपात्तिवानांचा शोध घेत त्यांचेकडे येतात.

आता भगवान आसुरी संपत्तीची लक्षणे सांगत आहेत.

**दम्भो दर्पोऽभिमानश्च क्रोधः पारुष्यमेव च ।**
**अज्ञानं चाभिजातस्य पार्थ संपदमासुरीम् ॥ ४ ॥**

हे पार्था दांभिकपणा, मस्ती, अभिमान, क्रोध, निष्ठुरता, अज्ञान हे गुण आसुरी संपत्तीत जन्म पावलेल्या मनुष्यामध्ये असतात.

**दंभ**– धर्माचरण करीत असल्याचा फक्त देखावा निर्माण करणे.

**दर्प**–मस्ती-आपल्या अंगातील बळाचा स्वार्थासाठी दुरुपयोग करणे.

**अभिमान** – अहंकार. सर्व मी करतो व आपल्यासारखे दुसरे कोणी कार्य करू शकणार नाही अशी भावना.

**क्रोध** -- क्षणाक्षणाला कुठल्याही कारणावरून रागावणे.

**पारुष्य**-- कठोर भाषण व अज्ञान म्हणजे कृत्याकृत्य-विवेकशून्यता. या सहा दोषांना आसुरी संपत्ती म्हणतात. या संपत्तीची वाढ झाली की, नरकाकडे जाण्याशिवाय दुसरा मार्गच नाही. हे सहा दोष घालविण्यासाठी दैवी संपत्तीचे सव्वीस गुण अंगी बाणावे लागतात. इतकी ही आसुरी संपत्तीची लक्षणे प्रभावी आहेत.

दैवी संपत्तीची वाढ करण्यासाठी सर्वसंगपरित्याग करून अरण्य-वास पत्करण्याची आवश्यकता नाही. उलट एकांतात बसल्यावर दैवी संपत्तीतील कांही गुण मिळवताच येत नाहीत. वनांत अपराध कोणी करण्याची शक्यता नसल्याने क्षमा करण्याचा प्रसंग येणार नाही. एकटेच बसल्यावर मनात क्रोध येणार नाही. मग अक्रोध हा गुण संपादन कसा करता येईल. म्हणून व्यवहार करतानाच दैवी संपत्ती साठविता येते.

**दैवी संपाद्विमोक्षाय निबन्धायासुरी मता ।**
**मा शुचः संपदं दैवीमभिजातोऽसि पाण्डव ॥ ५ ॥**
**द्वौ भूतसर्गौ लोकेऽस्मिन्दैव आसुर एव च ।**
**दैवो विस्तरशः प्रोक्त आसुरं पार्थ मे शृणु ॥ ६ ॥**

दैवी संपत्ती मोक्षाला कारण होते. आसुरी संपत्तीने बंध निर्माण होतो असे मानले आहे. हे अर्जुना, तू दैवी संपत्तीबद्दल काळजी करू नकोस. कारण तू दैवी संपत्तीत जन्माला आला आहेस. या लोकी दैवी आणि आसुरी असे दोन प्रकारचे प्राणी असतात. हे पार्था, दैवी संपत्तीने युक्त लोकांचा विचार विस्ताराने सांगितला. आता आसुरांचा श्रवण कर.

राक्षस, तामस व मोहिनी प्रकृती या तिघांचा आसुरांतच अंतर्भाव होतो. आसुरी व दैवी अशा दोन संपत्ती सांगितल्या आहेत, पण मानवी संपत्ती असा वेगळा प्रकार केलेला नाही. शास्त्रीय पद्धतीने वागल्यास मानवाचा देव होतो व अशास्त्रीय वर्तन केल्यास त्याची असुरात गणना होते. मानवाने काय बनावे याचे त्याला स्वातंत्र्य आहे.

**प्रवृत्तिं च निवृत्तिं च जना न विदुरासुराः ।**
**न शौचं नापि चाचारो न सत्यं तेषु विद्यते ॥ ७ ॥**

आसुरी संपत्तिवान धर्माच्या ठिकाणी प्रवृत्ती व अधर्माच्या ठिकाणी निवृत्ती जाणत नाहीत. त्यांच्यामध्ये पावित्र्य, सदाचार वा सत्य यापैकी काहीही नसते.

अंबाड्याची भाजी पंधरा पैसे खर्चून आणली म्हणून काही ती मुळासकट खाता येत नाही. त्यातला काही भाग हा फेकूनच द्यावा लागतो. लहान मुलाला वाचायला येऊ लागले म्हणून लगेच त्याला शृंगारिक पुस्तके वाचावयाला द्यावयाची नसतात. त्याला अभ्यासाची पुस्तके वाचायला लावली तरच त्याचा उत्कर्ष होतो. सारांश, काही पदार्थ त्याज्य आहेत. तर कांहीं ग्राह्य आहेत. सामान्य मानवाला काय घ्यावे व काय टाकावे हे समजत नाही. त्यासाठी शास्त्र निर्माण झालेले आहे. म्हणून शास्त्र प्रमाण मानून त्यानुसार वागणे हिताचे असते. परंतु आसुरी संपत्तीचे लोक शास्त्र जुमानीत नाहीत. धर्मानुसार वागणे त्यांना मान्य नसते. शुद्धता, आचार, सत्य इत्यादी गोष्टींचा त्यांना गंधही नसतो

**असत्यमप्रतिष्ठं ते जगदाहुरनीश्वरम् ।**
**अपरस्परसंभूतं किमन्यत्कामहैतुकम् ॥ ८ ॥**

हे जग सत्य, धर्माधर्मव्यवस्थारहित आणि ईश्वररहित आहे. ते काममूलक व स्त्री-पुरुषांच्या परस्पर संयोगाने उत्पन्न होणारे आहे. दुसरे काय? असे ते म्हणतात.

आसुरी संपत्तीच्या लोकांना श्रुती, स्मृती, व पुराणे यात जगाचे मूळ आहे हे मत मान्य नसते. प्रतिष्ठा म्हणजे व्यवस्था. ईश्वर जगाची व्यवस्था करीत असतो. पण ते जगात ईश्वर आहे हीच गोष्ट मानीत नाहीत. मग त्याने व्यवस्था केली हे त्यांना कसे पटणार? या जगाची निर्मिती स्त्री-पुरुषांच्या कामवासनेतून झालेली आहे असे त्यांचे म्हणणे असते व याशिवाय अन्य मत ते ग्राहय मानीत नाहीत.

**एतां दृष्टिमवष्टभ्य नष्टात्मानोऽल्पबुद्धयः ।**
**प्रभवन्त्युग्रकर्माणः क्षयाय जगतोऽहिताः ॥ ९ ॥**

त्या दृष्टीचा अंगीकार करून ज्ञाननष्ट झालेले, अल्पबुद्धी, उग्र-कर्मी व जगताचे शत्रू असे ते जगताच्या नाशाला प्रवृत्त होतात.

आसुरी संपत्तीच्या लोकांच्या विकृत दृष्टीमुळे त्यांची बुद्धीच नष्ट होते. ते उग्र कर्मे करून जगाच्या नाशाला प्रवृत्त होतात. आपल्या दुष्कृत्यामुळे ते अगोदरच मेल्यासारखे असतात. तथापि त्यांच्या संपर्काने इतर लोक बिघडू नयेत म्हणून ईश्वर त्यांना नष्ट करतो. साप अगर विंचू एकटा दुकटा असला तर आपण त्याला ठेचून नष्ट करू शकतो. पण घरात जर असंख्य साप वळवळ करू लागले तर आपणाला घरच सोडून द्यावे लागते. आसुरी लोकांनी जर आपले असंख्य चेले निर्माण केले तर या जगात सामान्य माणसाला राहणे मुष्कील होईल. म्हणून परमेश्वर आसुरी संपत्तीच्या लोकांचा नाश करून टाकतो.

**काममाश्रित्य दुष्पूरं दम्भमानमदान्विताः ।**
**मोहाद्गृहीत्वासद्ग्राहान्प्रवर्तन्तेऽशुचिव्रताः ॥१०॥**

दुर्भर अशा कामाचा आश्रय करून, दांभिकपणा, मान व गर्व यांनी युक्त होऊन, मोहाने दुराग्रह धरून ते पापाचरण करण्यास प्रवृत्त होतात.

अग्नीप्रमाणे कामाची तृप्ती कधीही होत नाही, पण ही गोष्ट त्यांना पटत नाही व ते कामाचा त्याग कधीच करीत नाहीत. दंभ, मान व मदाने ते सर्वदा ताटलेले असतात. मोह म्हणजे अविवेक. तो त्यांचेजवळ सदैव असतो. ते दुराग्रही असतात. त्यांना पवित्र अन्न दिले तर ते मुद्दाम अपवित्र करून खातील, कारण अपावित्र्य हे त्यांचे व्रत असते.

**चिन्तामपरिमेयां च प्रलयान्तामुपाश्रिताः ।**
**कामोपभोगपरमा एतावदिति निश्चिताः ॥११॥**

तसेच मरणानेही न संपणाऱ्या अशा विषयसुखोपभोगाच्या अमर्याद चिंतेने ग्रासलेले असतात व कामोपभोग हेच अंतिम साध्य असा त्यांचा पक्का निश्चय असतो,

त्यांची चिंता कधीच संपत नाही. आपल्याहून एखादा अधिक बुद्धिमान किंवा शक्तिसंपन्न निघेल काय ? आपले पद कोणी हिरावून

घेईल काय अशा भीतीने ते सतत चिंताग्रस्त असतात. वैभवसंपन्न राष्ट्राचे प्रमुख निश्चिंत नाहीत हे आपण पाहतच आहोत. ‘ चिता दहति निर्जीवं चिंता दहति जीवितम् ’ चिता मृत शरीर जाळते पण चिंता जिवंत माणसास जाळत असते, म्हणून चितेपेक्षा चिंता भयंकर आहे. सामान्य माणसाला हजारो चिंता असतात. त्याहून आसुरी प्रवृत्तीच्या लोकांना चिंता अधिक. बेडूक माशी पकडण्यासाठी उडी मारतो. पण त्याला गिळण्यासाठी साप टपलेला असतो याची त्याला दखल नसते. तसेच आसुरी लोक कसली तरी आशा धरून धडपडत असतात व स्वतः दुःखाच्या गर्तेत पडतात.

**आशापाशशतैर्बद्धाः कामक्रोधपरायणाः ।**
**ईहन्ते कामभोगार्थमन्यायेनार्थसञ्चयान् ॥१२॥**

शेकडो आशापाशांनी बद्ध झालेले, कामक्रोधपरायण होऊन, आपल्या कामाच्या उपभोगाकरिता अन्यायाने द्रव्यसंचय करण्याची इच्छा करतात.

आसुरी प्रवृत्तीचे लोक शेकडो आशापाशांनी बांधले गेलेले असतात. ते कामक्रोधाच्या आहारी जातात. कामाच्या आहारी जाण्याचा एक प्रकार म्हणजे स्त्रीलंपट बनणे. माता, पिता, जात, कुल, धर्म यापैकी कशाचीही पर्वा न करता स्त्री म्हणेल तसे नाचणे. धनलोभ हा दुसरा कामीजनांचा प्रकार. हे लोभीजन सतत धनसंचय करीत राहतात, मात्र त्याचा स्वतःही भोग घेत नाहीत व दुसऱ्यालाही घेऊ देत नाहीत. द्रव्य संपेल या भीतीने कदन्न खातो. मेल्यावरही पिशाच्च बनून धनाचे रक्षण करतो. धन जर अन्यायाने मिळाविलेले असेल तर जवळ असताना सुख देत नाही व पश्चातही देत नाही. तसेच अन्यायाने मिळविलेले धन फार काळ टिकतही नाही. अन्न, वस्त्र व सुख मिळविणे हे धनाचे तीन उपयोग, पण भेद, वैर, अविश्वास, स्पर्धा, संकट, भीती इत्यादी पंधरा अनर्थ धनामुळे निर्माण होतात व धनसंचय करणाऱ्याला भोगावे लागतात.

**इदमद्य मया लब्धमिमं प्राप्स्ये मनोरथम् ।**
**इदमस्तीदमपि मे भविष्यति पुनर्धनम् ॥१३॥**

आज मी हे मिळविले. उद्या मी ते मिळवीन हा माझा मनोरथ आहे. माझे हे धन आहे आणखी हे धन माझे होईल.

**असौ मया हतः शत्रुर्हनिष्ये चापरानपि ।**
**ईश्वरोऽहमहं भोगी सिद्धोऽहं बलवान्सुखी ॥१४॥**

आज मी हा शत्रू मारला. उद्या दुसऱ्यालाही मारीन. मीच ईश्वर आहे. सुखोपभोग घेणारा भोगी मी आहे. सिद्ध म्हणजे भार्या, पुत्र, मित्र वगैरे परिवारांनी युक्त, बलवान व सुखी मीच आहे.

**आढ्योऽभिजनवानस्मि कोऽन्योऽस्ति सदृशो मया ।**
**यक्ष्ये दास्यामि मोदिष्य इत्यज्ञानविमोहिताः ॥१५॥**

मी धनवान आहे, मी कुलीन आहे, माझ्यासारखा दुसरा कोणी असणार नाही. मी यज्ञ करीन, मी दान देईन, आनंद पावेन. इत्यादी प्रकारे ते अज्ञानाने मोहित झालेले असतात.

**अनेकचित्तविभ्रान्ता मोहजालसमावृताः ।**
**प्रसक्ताः कामभोगेषु पतन्ति नरकेऽशुचौ ॥१६॥**

त्यांचे मन अनेक ठिकाणी भटकत असते. ते मोहाच्या जाळ्यात गुरफटून गेलेले असतात व कामोपभोगात गर्क झाल्याने शेवटी अत्यंत अपवित्र अशा नरकात जातात.

**आत्मसंभाविताः स्तब्धा धनमानमदान्विताः ।**
**यजन्ते नामयज्ञैस्ते दम्भेनाविधिपूर्वकम् ॥१७॥**

अहंमन्य, नम्रताहीन, धन-मान व गर्वाने ताठून दांभिकपणाने व शास्त्रात सांगितलेल्या नियमांना डावलून नावाला यज्ञ करतात. पण मुख्य हेतु आपली जाहिरात व्हावी हाच असतो.

आसुरी संपत्तीच्या लोकांनी अशा प्रकारे जरी यज्ञयाग केले तरी त्याना शेवटी नरकाचीच वाट धरावी लागते.

**अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं च संश्रिताः ।**
**मामात्मपरदेहेषु प्रद्विषन्तोऽभ्यसूयकाः ॥१८॥**

अहंकार, बल, गर्व, काम आणि क्रोध यांचा आश्रय केलेले, मत्सरयुक्त, आपल्या व इतरांच्या देहामध्ये असणाऱ्या परमात्म्याचा द्वेष करतात.

यज्ञयाग करणे ही आत्मज्ञान मिळविण्याची बहिरंग साधने आहेत. आसुरी लोकांना ही बहिरंग साधनेही व्यवस्थित करता येत नाहीत. मग अंतरंग साधने कशी जमतील? वास्तविक मानव जन्म मिळाल्यामुळे साधना करण्याचा प्रत्येकाला अधिकार आहे. पण सर्वांना सर्व खाण्याचा अधिकार असला तरी मानव कडबा खात नाही. कारण तो विशिष्ट अधिकारसंपन्न असतो. पण आसुरी संपत्तीचे लोक अधिकारहीन असल्याने विवेक वैराग्यासारखी साधने त्यांच्या वाटेला जातच नाहीत. काटेकुटे, तण, दगडधोंडे असलेल्या जमिनीत चांगले पीक येत नाही. आले तरी टिकत नाही. म्हणून बी पेरण्यापूर्वी जमीन साफ करून घ्यावी लागते. आसुरी संपत्तीच्या लोकांच्या मनात अहंकार, बळ, दर्प वगैरे काटेरी तण अतिशय माजलेले असल्याने तेथे विवेकवृक्ष मूळ धरत नाही.

अशा पापी लोकांचाही उद्धार परमेश्वर करतो, पण ते परमेश्वराला शरण गेले तर. पण आसुरी प्रवृत्तीचे लोक ईश्वराचा द्वेष करतात. ईश्वराने त्यांच्या मनोभूमीवर मशागत सुरू केलीच तर तो पुढे आपला हक्क सांगेल, या भीतीने परमेश्वराचा मनात प्रवेशच होऊं देत नाहीत. वास्तविक करणे न करणे हे मानवाच्या हाती नाही, सर्वांतर्यामी

असलेला परमेश्वरच सर्व करीत असतो. पण आसुरी लोक ते कर्तृत्व आपल्याकडे घेऊन ईश्वराचा त्यात काही संबंध नाही, असे म्हणून ते ईश्वराची अवज्ञा करतात.

**तानहं द्विषतः क्रूरान्संसारेषु नराधमान् ।**
**क्षिपाम्यजस्रमशुभानासुरीष्वेव योनिषु ॥१९॥**

द्वेष करणाऱ्या त्या दुष्ट पापी नराधमांना मी सृष्टीतील अमंगल अशा आसुरी जन्मामध्ये कायमचा ढकलून देतो.

ईश्वर आसुरी संपत्तीच्या लोकांचे मनुष्यत्वच हिरावून घेतो. प्रथम पशुयोनीत नंतर पक्षीयोनीत व त्यानंतर कृमीकीटकात त्याना जन्म घ्यावा लागतो. त्यांच्यात कांही फेरबदल होतो कां हे पाहण्यासाठी त्या त्या जन्मात सुस्थिती दिली जाते. पण तेथेही ते आपले आसुरी गुणच दाखवितात. त्यांना ताळ्यावर आणण्यासाठीच शिक्षा केलेली असते. मानव जन्म आलाच तर दारिद्र्य, मुकेपणा, अंधपणा अशी व्यंगे त्यांना पत्करावी लागतात. जोवर समाजात आसुरी संपत्तीचे लोक आहेत तोपर्यंत समाजांतील दारिद्र्य व व्यंगे नाहीशी होणार नाहीत.

**आसुरीं योनिमापन्ना मूढा जन्मनि जन्मनि ।**
**मामप्राप्यैव कौन्तेय ततो यान्त्यधमां गतिम् ॥२०॥**

हे कौन्तेया, जन्मोजन्मी आसुरी जन्म पावणाऱ्या त्या मूढांना माझी प्राप्ती न होताच ते याहून अधम अधम ( लोह—काष्ठ—पाषाण ) गतीला जातात.

केवळ मनुष्य जन्मातच ब्रह्मज्ञान संपादन करण्याचा अधिकार आहे. मानव जन्मात चुका झाल्या, त्या समजल्या व ईश्वराला अनन्यभावाने शरण गेल्यास ईश्वर क्षमा करतो. नहुषाला अगस्तीने ' सर्प हो ' म्हणून शाप दिल्याबरोबर तो सावध झाला व त्याने ऋषींची क्षमा मागितली, कारण त्याला माहीत होते की एकदा सर्प बनल्यावर

पश्चात्ताप होऊनही कांहीं उपयोग होणार नाही. म्हणून मनुष्य योनीत असेपर्यंतच आपल्या जीवनाचे सार्थक करून घेतले पाहिजे.

काही लोक ईश्वराचे अस्तित्व मान्य करीत नाहीत. ते म्हणतात, जगात ईश्वराला मानणारे फार तर दहा टक्के लोक असतील. त्यांचेच खरे कशावरून? फक्त संतांचे ग्रंथ सोडले तर ईश्वर आहे असे कोणीच ठामपणे सांगत नाही. ते म्हणतात, ईश्वर इतिहास शास्त्राप्रमाणे आहे असे सिद्ध करा. त्याची वंशावळ दाखवा, तरच आम्ही मान्य करू. या नास्तिक मतावर भारतीय मनुष्य ठामपणे उत्तर देतो की, आमचा संत मंडळीवर पूर्ण विश्वास आहे. त्यांना भगवंत भेटलेला आहे, येवढेच नव्हे तेच भगवंताच्या योग्यतेचे झाले. दैवी संपत्तीचा प्रकर्ष झाल्याखेरीज ईश्वर दर्शनाची योग्यता येत नाही. तशी योग्यता येताच देवदर्शन होते.

पू. वासुदेवानंद सरस्वती तर अलीकडे होऊन गेले. एक नास्तिक त्यांची परीक्षा पाहावी म्हणून बोटाला चिंध्या बांधून आला व आपला महारोग कधी बरा होईल अशी पृच्छा केली. स्वामी म्हणाले, " मी अज्ञ आहे, कृपया मला असा अवघड प्रश्न विचारू नका. पण माणसाने अशी वाईट वासना करू नये. त्याचे परिणाम वाईट होतात " तो नास्तिक घरी गेला आणि त्याने चिंध्या सोडल्या तो काय? त्याला खरोखरीच महारोग जडल्याचे आढळून आले. मग तो धावत स्वामींकडे गेला व त्याने त्यांचे पाय धरले. स्वामींनी सहा महिने वाळवंटात राहून नामस्मरण करण्यास सांगितले. तसे केल्यावर रोगमुक्त झाला. त्याचा नास्तिकतेचा रोगही संपला. भक्ताच्या अंगी जर येवढी शक्ती असते; तर परमेश्वर किती सामर्थ्यसंपन्न असेल याची कल्पना करा व मग तो आहे की नाही याचा वाद घाला.

**त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः ।**
**कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत् ॥२१॥**

कामरूपी, क्रोधरूपी व लोभरूपी असे तीन प्रकारचे नरकाचे द्वार आहे. ते आत्म्याचा नाश करणारे आहेत. म्हणून या तिघांचा त्याग करावा.

काम, क्रोध व लोभ यांना घालवायचे म्हणजे त्यांची कार्ये बंद करावयाची. उदाहरणार्थ, क्रोध आला तर चेहऱ्यावरील आविर्भावावरून नापसंती दाखवा. पण तोंडाने अपशब्द उच्चारून आपली वाणी विटाळू देऊ नका. एकही शब्द न बोलता एक ते दहा अंक मोजा. तोपर्यंत रागाचा वेग कमी होतो. काम, क्रोध, लोभ यांना प्रत्येक वेळी धुडकावून लावल्यास कालांतराने ते येण्याचे बंद करतील. एखादा मनुष्य तुमच्याकडे येत असला व त्याचा तुम्ही प्रत्येक वेळी अपमान केलात, तर तो तुमच्या-कडे येण्याचे नावही काढणार नाही. यांचा बंदोबस्त केला की आपो-आपच नरकाची वाट बंद होते.

**एतैर्विमुक्तः कौन्तेय तमोद्वारैस्त्रिभिर्नरः ।**
**आचरत्यात्मनः श्रेयस्ततो याति परां गतिम् ॥२२॥**

हे कौन्तेया, नरकाची द्वारे असलेल्या या तीन्हीपासून जो मुक्त होतो, तो आत्मकल्याणाचे साधन करतो व त्यायोगे तो श्रेष्ठ गती पावतो.

प्रत्येकाला स्वार्थ समजतो पण हित समजत नाही. लग्न झाल्या-बरोबर मुलगा वेगळा होतो. दोघेही तरुण मिळविते असतात म्हणून त्यांना स्वातंत्र्य हवे असते. आईवडिलांचा त्यांना जाच वाटतो. सुखाच्या व स्वार्थाच्या आशेने ते वेगळे होतात. पण हे सुख फार काळ टिकत नाही. आजारपण, बाळंतपण अशा अडचणी येणे अटळ असते. मग माणसांची गरज भासते. तेव्हा मदतीसाठी सासू येते व बरोबर मुलालाही घेऊन येते. मग माता—पित्यानाच ठेवून घेतले असते तर बिघडले असते का ? पण हित कळल्यावर ते तारुण्य कसले ? माता-पित्यांची सेवा केली तर अदृष्ट निर्माण होते. अदृष्टच प्रतिकूल असेल

तर स्वतःची पत्नीही विरोध करते. प्रसंगी सोडूनही देते. वय झालेले असले तर पुनः लग्नाला उभेही राहता येत नाही. कितीही वय झाले तरी निवडणुकीला उभे राहता येईल, तसे विवाहासाठी उभे राहता येत नाही.

अर्जुन तरुण होता. पाशुपतासारख्या दिव्यास्त्रांनी संपन्न होता. वनवासात त्याचा व कृष्णाचा संबंध होता. पण त्या वेळी त्याला ज्ञानाची इच्छा झाली नाही. ‘ दुर्लभः स्वजनः प्रियः ’ म्हणजे हित सांगणारा स्वजन दुर्लभ असतो. माता-पिता पुत्राचे अभीष्ट चिंतीत असतात. पण आत्महित सांगणारा पुण्याई असल्याखेरीज भेटत नाही. अर्जुनाची पुण्याई युद्ध काळात उदयाला आली, म्हणून श्रीकृष्णाला ‘ शिष्यस्तेहं शाधि मां त्वां प्रपन्नम् ’ अशी विनंति केली व श्रीकृष्णानेही त्याला हिताची गोष्ट सांगून त्याला ज्ञानी बनविले, हिताच्या गोष्टी सांगणारा भेटला तरी जोपर्यन्त काम-क्रोध-लोभ यांच्यापासून सुटका होत नाही तोपर्यन्त उपदेशाचा अर्थ समजत नाही.

**यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः ।**
**न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम् ॥२३॥**

जो शास्त्रमार्गाचा त्याग करतो व कामाची कास धरून वागतो त्याला सिद्धी प्राप्त होत नाही. म्हणजे कोणताही पुरुषार्थ मिळविता येत नाही. ऐहिक सुख मिळत नाही अथवा श्रेष्ठ गतीही मिळत नाही.

**तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ ।**
**ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि ॥२४॥**

म्हणून कार्य कोणते व अकार्य कोणते याची व्यवस्था जाणण्याला ‘ शास्त्र ’ ( वेद ) हेच तुला प्रमाण आहे. शास्त्रांनी सांगितलेले कर्म जाणून ते करणे हे या लोकी तुला योग्य आहे.

भगवंतानी केलेला उपदेश वेदाला अनुसरून आहे. शास्त्राने राज्य सोडायला सांगितले तरी रामाप्रमाणे राज्यत्याग केला पाहिजे. ' मातापिता सहस्रेभ्योऽपि हितैषी वेदः ' हजारो मातापित्यांना पुत्राचे जे हित करता येत नाही ते वेद साधतात. म्हणून वेदांची योग्यता महान आहे. शास्त्रात जे दोष भासतात ते आमच्या सदोष बुद्धीमुळे. वस्तुतः शास्त्र केव्हाही निर्दोषच्च असते.

इति श्रीमद् भगवद् गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे दैवासुरसंपद् योगो नाम षोडशोऽध्यायः ॥

# अध्याय १७ वा.

मागील अध्यायात भगवंतानी दैवी व आसुरी संपत्तीबद्दल विवरण केले. दैवी संपत्तीने संपन्न झालेला पुरुष तत्त्वज्ञानाचा अधिकारी बनतो. शास्त्राप्रमाणे वागल्यास नराचा नारायण बनतो. शास्त्राविरुद्ध वागणारा असुर होतो. कुंभाराच्या घरून आणलेल्या गणेशमूर्तीबद्दल आपणास आदर असतो. मूर्ती आणल्याबरोबर तिच्यात देवत्व नसते. मंत्रपूर्वक प्राणप्रतिष्ठा केल्यावरच त्या मूर्तीत देवत्व येते. कुंभाराकडील पाच पंचवीस मूर्तींचे हात दुखावले तरी कुंभाराला खंत असते. पण ती मूर्ती घरी आणल्यावर बिघडली तर आपण ते अशुभ समजतो. पुढे ती मूर्ती देव होणार म्हणून आपण आधीपासूनच त्या मूर्तीस देव मानतो. त्याच-प्रमाणे शास्त्र समजून वागणारा पुढे निश्चितच देव होणार म्हणून त्यास आधीपासूनच पूज्य मानले पाहिजे.

शास्त्र दोन प्रकारचे असते. विधि आणि निषेधात्मक. शास्त्र काही गोष्टी करा व काही गोष्टी करू नका असे सांगते. शास्त्राचे नियम—विधिनिषेध—पाळणे यातच श्रेय किंवा हित आहे.

अर्जुन उवाच—

ये शास्त्रविधिमुत्सृज्य यजन्ते श्रद्धयान्विताः ।
तेषां निष्ठा तु का कृष्ण सत्त्वमाहो रजस्तमः ॥ १ ॥

अर्जुन म्हणाला, "हे कृष्णा, जे शास्त्रविधि माहीत नसल्यामुळे उल्लंघन करतात. पण श्रद्धेने युक्त होऊन पूजनादि करतात, त्यांची गती काय होते ? सात्त्विक, राजस की तामस ?

कांहीं लोक आळसामुळे, दुर्बलतेमुळे, बुद्धिमांद्यामुळे शास्त्र शिकत नाहीत. ज्ञान संपादन करून त्याप्रमाणे वागत नाहीत. पण कुलपरंपरेने

चालत आलेले आचार पाळतात. शास्त्रदृष्टी नाही म्हणून अशा लोकांना असुर म्हणावयाचे की सात्त्विक श्रद्धावान म्हणून देव ठरवायचे ? असा अर्जुनाचा प्रश्न आहे.

भगवान उवाच–

त्रिविधा भवति श्रद्धा देहिनां सा स्वभावजा ।
सात्त्विकी राजसी चैव तामसी चेति तां शृणु ॥ २ ॥

भगवान म्हणाले, "प्राण्यांची ती स्वाभाविक श्रद्धा सात्त्विक, राजस व तामस अशा तीन प्रकारची असते ती ऐक.

सत्त्वानुरूपा सर्वस्य श्रद्धा भवति भारत ।
श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः ॥ ३ ॥

हे अर्जुना, प्रत्येकाची श्रद्धा ज्याच्या त्याच्या सत्त्वादि संस्काराप्रमाणे असते. मनुष्यप्राणी हा श्रद्धामय असतो. ज्याची ज्यावर श्रद्धा असते तसा तो असतो.

प्रत्येकाच्या अंत:करणात सत्त्व, रज, व तम हे तीन गुण असतात. त्यातील एखाद्या गुणाचे प्रमाण अधिक असते. त्या गुणावरून त्याची श्रद्धा ठरवावी लागते. पित्तकर प्रकृतीच्या माणसाने एकादशी म्हणून दिवसभर दुसरे कांही न खाता फक्त शेंगदाणेच खाल्ले तर त्याचे पित्त उसळल्याशिवाय कसे राहील ? त्याचप्रमाणे अंत:करणात जो गुण अधिक असतो, त्यातच पूरक पदार्थ मिळाले की तो गुण आणखी वाढतो. त्यावरून त्याची श्रद्धा कशी आहे ते समजून येते.

काही लोक आपण नास्तिक आहोत असे सांगतात. आपण देव मानत नाही, साधुसंतांवर वा शास्त्रावर आपली श्रद्धा नाही असे मोठ्या फुशारकीने सांगतात. देव, संत, शास्त्रावर त्यांची श्रद्धा नसली तरी इतर कुठे तरी श्रद्धा असतेच. कुणाची धनावर, कुणाची मुलावर तर कोणाची बायकोवर श्रद्धा असते. बायकोवर श्रद्धा ठेवणारा आपली

पगाराची सर्व रक्कम तिच्या हवाली करतो. बायको पगार घेऊन कुठे पळून जाणार नाही अशी त्याची खात्री असते.

> यजन्ते सात्त्विका देवान्यक्षरक्षांसि राजसाः ।
> प्रेतान्भूतगणांश्चान्ये यजन्ते तामसा जनाः ॥ ४ ॥

सात्त्विक श्रद्धावान देवांची उपासना करतात, राजस श्रद्धेचे लोक यक्ष राक्षसांची उपासना करतात आणि इतर तामस श्रद्धेचे लोक प्रेते व भूते यांची उपासना करतात.

> अशास्त्रविहितं घोरं तप्यन्ते ये तपो जनाः ।
> दम्भाहंकारसंयुक्ताः कामरागबलान्विताः ॥ ५ ॥
> कर्षयन्तः शरीरस्थं भूतग्राममचेतसः ।
> मां चैवान्तःशरीरस्थं तान्विद्ध्यासुरनिश्चयान् ॥ ६ ॥

जे लोक दंभ अहंकारानी युक्त होऊन, अभिलाषा, आसक्ती यांच्या आग्रहाच्या जोरावर शास्त्रसंमत नसलेले घोर तप आचरण करतात— जे शरीरामधील भूतसमुदायाला कृश करतात व शरीरामध्ये असलेल्या मला दुःख देतात ते अविवेकी व आसुरी बुद्धीचे आहेत असे समज.

जो अशास्त्रीय व दंभ अहंकाराने घोर तप करतो तो असुर होय. विषयांची प्रबळ इच्छा असल्याने लोक दिवसच्या दिवस उभे राहतात. कांही वेळा रात्रभर झोपतही नाहीत. त्यांना हे बळ कोठून येते ? तीव्र विषयेच्छेमुळेच ते हे करू शकतात. या ओढाताणीमुळे त्यांच्या शरीरांतील पंचमहाभूते कृश होतात. शरीरावर तादात्म्य धरल्यामुळे आतील जीवात्माही कृश होतो. तुमचा अत्यंत लाडका मुलगा आजारी पडला तर त्याचा परिणाम तुमच्यावर होतो ना ?

एखादा पुरुष राजस अगर तामस असेल तर त्याला सात्त्विक बनविता येणार नाही का ?

जरूर करता येईल. ज्याला सात्विक बनावे अशी इच्छा आहे त्याने आहार, यज्ञ, दान तप या सर्व गोष्टी सात्विकच केल्या पाहिजेत. प्रारंभी सात्विक कर्मे करणे मुळीच आवडणार नाही. पण त्यातच हित आहे अशी खूणगांठ बांधून सात्विक कर्मे करीत राहिले पाहिजे. कडू औषध किंवा शरीराला टोचून घेणे हे कोणी हौसेने करीत नाही. पण रोगमुक्त होऊन सुखी होऊ अशा विश्वासाने प्रथम त्रासदायक उपचार सहन करावे लागतात. सात्विक बनण्यातच हित आहे अशा विश्वासाने त्रासदायक वाटली तरी सात्विक कर्मे करीत राहिल्यास सात्विक बनणे अवघड नाही. अशास्त्रीय कर्मे टाळली पाहिजेत.

**आहारस्त्वपि सर्वस्य त्रिविधो भवति प्रियः ।**
**यज्ञस्तपस्तथा दानं तेषां भेदमिमं शृणु ॥ ७ ॥**

प्राणिमात्राला प्रिय असलेला आहार देखील तीन प्रकारचा असतो. यज्ञ, दान, तप ही देखील तीन प्रकारची असतात. त्यांतील भेद ऐक.

**आयुःसत्त्वबलारोग्यसुखप्रीतिविवर्धनाः ।**
**रस्याः स्निग्धाः स्थिरा हृद्या आहाराः सात्त्विकप्रियाः ॥ ८ ॥**

आयुष्य, सत्त्व, बल, आरोग्य, सुख व प्रीति यांची वृद्धी करणारे, सुरस व स्निग्ध, शरीरामध्ये बहुत काळ राहणारे, मनास आनंद देणारे आहार सात्विक वृत्तीच्या लोकांना प्रिय असतात.

शास्त्राचा आहाराबद्दल फार कटाक्ष आहे. कारण 'आहारशुद्धौ सत्त्वसंशुद्धिः' असे म्हटले आहे. पुरुष म्हणजे मन व ते अन्नमय आहे असे श्रुती सांगते. हे पटवून देण्यासाठी उद्दालकाने श्वेतकेतूला क्रमाक्रमाने अन्न सोडण्यास सांगितले. जेव्हा आहार पूर्ण बंद झाला तेव्हा तो शिकलेले सर्व विसरून गेला. पुनः आहार वाढवत गेल्यावर तो पूर्ववत् ज्ञानी झाला. खाल्लेल्या अन्नाच्या स्थूल भागाचा मळ बनून तो बाहेर निघून जातो. सूक्ष्म भागाचे रक्त व सूक्ष्मतम भागाचे मन बनते. सात्विक

अन्नाचे सूक्ष्मतम कण मनाला लागून मनांतील रज व तमाचे कण कमी कमी होतात. रसयुक्त आहार म्हणजे फळे व स्निग्ध म्हणजे तेल तूप लोणी इ. हृद्य म्हणजे दृष्ट व अदृष्ट दोष नसलेले म्हणजे विटलेले व अपवित्र नसलेले. अशा सात्त्विक अन्नाने ताकद येते, आयुष्य वाढते, रोग जातात व समाधान होते.

**कट्वम्ललवणात्युष्णतीक्ष्णरूक्षविदाहिनः ।**
**आहारा राजसस्येष्टा दुःखशोकामयप्रदाः ॥ ९ ॥**

तिखट, आंबट, खारट, अतीऊष्ण, तीक्ष्ण, रुक्ष, दाह करणारे आहार राजस वृत्तीच्या लोकांना इष्ट वाटतात. असे आहार दुःख, शोक व रोग निर्माण करतात.

अती कडू ( कडूलिंब ) अती आंबट ( चिंच ) अती उष्ण ( चहा ) तीक्ष्ण म्हणजे अती तिखट ( मिरच्या ) रूक्ष ( चुरमुरे ) असे पदार्थ राजस वृत्तीच्या मनुष्याला आवडतात. चुरमुरे खूप खाल्ले. खाताना मजा वाटली, तरी त्याने कांही पोट भरत नाही. विदाहिन म्हणजे दाहक- मोहरीसारखे पदार्थ, जे खाल्ले असता नाकातून डोळ्यातून पाण्याच्या धारा लागल्याच पाहिजेत. वरील सर्व रस शरीराला आवश्यक आहेत. पण ते प्रमाणाबाहेर सेवन केले की तो राजस आहार होतो. अशा आहाराने दुःख, शोक आणि रोग होतात.

**यातयामं गतरसं पूति पर्युषितं च यत् ।**
**उच्छिष्टमपि चामेध्यं भोजनं तामसप्रियम् ॥१०॥**

ज्या अन्नाला तयार होऊन प्रहराहून अधिक वेळ झाला आहे, ज्यातील रस गेलेला आहे, दुर्गंधी येत असलेले, आदल्या दिवसाचे, उष्टे व सदोष असे भोजन तामस वृत्तीच्या लोकांना आवडते.

यातयामं म्हणजे तयार होऊन तीन तास उलटून गेलेले, गतरसं— उतरलेले, पूति—नासलेले, पर्युषितं—रात्र होऊन गेलेले म्हणजे शिळे, उष्टे,

अमेध्य म्हणजे यज्ञ व देवांना उपयोगी नसलेले अन्न, तामस मोठ्या आवडीने सेवन करतो. राजस व तामस अन्न सात्त्विक माणसाने खाल्ले तर त्याची वृत्ती तशी होते. एका चोराने एका संन्याशाला भोजनाचे आमंत्रण दिले व त्याला चांदीच्या ताटवाटीत सुग्रास अन्न वाढले. जेवण झाल्यावर संन्याशाने एक चांदीची वाटी झोळीत टाकली. दुसरे दिवशी तो चोर संन्याशाच्या आश्रमात चौकशीला आला. संन्याशाने अपराध कबूल केला व त्याची वाटी त्याला परत दिली. संन्याशी त्याला म्हणाला, "आजपर्यन्त मला कधीही चोरी करण्याची इच्छा झाली नाही. तुझे अन्न खाल्ल्याबरोबर ज्या अर्थी माझे हातून चोरी झाली त्या अर्थी तू सर्व पदार्थ चोरून आणलेले असले पाहिजेत."

चोराला त्याचे म्हणणे कबूल करावे लागले.

**अफलाकाङ्क्षिभिर्यज्ञो विधिदृष्टो य इज्यते ।**
**यष्टव्यमेवेति मनः समाधाय स सात्त्विकः ॥११॥**

फलाची इच्छा नसलेल्याकडून, शास्त्रानुसार असलेला, व आपले कर्तव्य म्हणून समाधानयुक्त मनाने जो यज्ञ केला जातो, तो सात्त्विक यज्ञ होय.

अग्निष्टोम, ज्योतिष्टोम, वाजपेय वगैरे अनेक यज्ञ श्रुतीने सांगितले आहेत. पण त्या सर्वांना विशिष्ट स्थान, विशिष्ट वय, विशिष्ट अधिकार व भरपूर द्रव्य लागते. घरांतील सर्वांची अनुकूलता असावी लागते. धर्माने राजसूय यज्ञ केला तेव्हा श्रीकृष्णाने उष्टी काढली इतकेच नव्हे त्यात परमसुख मानले. सध्याच्या काळात आधी कोणी यज्ञच करीत नाहीत. कारण आपल्या सरकारचाच त्यास विरोध आहे आणि यज्ञ केलाच तर त्यात पैसे घेतल्याशिवाय कोणी उष्टी काढणार नाही. फुकट कांहीं करायचे नाही असा सध्याचा काळ आहे. यज्ञ म्हणजे पूजा करणे असाही अर्थ आहे. रोज पूजा करण्यात फुकट वेळ

घालविण्यापेक्षा तेवढ्याच वेळात कांहीं उद्योग केल्यास चार पैसे मिळतील अशा युक्तिवाद करणारेही लोक आहेत.

मुलगा बापाचे धन घेतो. बापाने आजोबाचे व आजोबाने पणजोबाचे धन घेतलेले असते. बापाचे धन दुसऱ्या कुणी घेतले तर आपला हक्क शाबीत करण्यासाठी मुलगा हायकोर्टात लढतो. शास्त्रकार विचारतात, वडिलांचे धन जसे तुम्ही हक्काने घेता तसे परंपरागत चालत आलेल्या विचार-धनाचा स्वीकार कां करीत नाही? यज्ञ पूजा हे शास्त्रानी सांगितलेले आपले धन आहे व तेही आपण हक्काने, आपुलकीने व श्रद्धेने मिळविले पाहिजे. जो निष्काम बुद्धीने, शास्त्राने वा गुरूनी सांगितलेला म्हणून किंवा केवळ कर्तव्य म्हणून यज्ञ केला जातो, तो सात्त्विक यज्ञ होय. अशा यज्ञात काही चुका झाल्या तरी खपतात. ईश्वर म्हणतो, ‘ यज्ञ करणारा जर काहीएक मागत नाही तर त्याच्या चुकांकडे तरी कशाला लक्ष द्या ? ’ मात्र पुनः चुका होऊ नयेत म्हणून त्याला मार्गदर्शन करण्यासाठी परमेश्वर सद्गुरु वा संतमंडळींची योजना करतो. अशा प्रकारे साधकाची प्रगती होत असते.

**अभिसंधाय तु फलं दम्भार्थमपि चैव यत् ।**
**इज्यते भरतश्रेष्ठ तं यज्ञं विद्धि राजसम् ॥ १२ ॥**

हे भरतश्रेष्ठा, क्रियेने वरच्या सारखाच पण फळाची आशा धरून व दांभिकपणे केला जातो तो राजस यज्ञ होय.

मनात कांहीतरी हेतु धरून किंवा आपली प्रसिद्धी व्हावी, आपला लोकांनी गौरव करावा यासाठी जो यज्ञ केला जातो तो राजस होय.

अशा यज्ञात चुका झाल्यास खपत नाहीत. सध्या सरकारी कार्यालये, सहकारी संस्था, शाळा, महाविद्यालये यांची वार्षिक तपासणी केली जाते. त्यात काही दोष आढळून आल्यास तपासनीसांना खूष केले की झालेल्या चुकांवर पांघरूण घातले जाते. पण अशा यज्ञात झालेल्या

चुका माफ होत नाहीत. म्हणून पुण्याहवाचनाला ‘ अष्टौ वा चत्वारो वा ’ ब्राह्मण असावेत असे म्हटले आहे. एखाद्याचे दुर्लक्ष झाले तर दुसरा सुधारून घेतो. म्हणून यज्ञात जितके ब्राह्मण अधिक तितके चांगले असते. शिवाय आपली चूक उघडकीस येऊ नये व आपले हसे होऊ नये म्हणून प्रत्येकजण दक्षता बाळगतो. विशेष महत्त्वाची किंवा अवघड शस्त्रक्रिया असेल तर दोनतीन तरी डॉक्टर उपस्थित असतात. हेतु हा की, एकाची चूक झाल्यास ती दुसऱ्याच्या लक्षात यावी. असे लक्ष नसेल तर चिमटे, कात्र्या आतच राहून जातात !

ईश्वर राजस यज्ञाचे फळ देतो, पण तोलून मापून.

**विधिहीनमसृष्टान्नं मन्त्रहीनमदक्षिणम् ।**
**श्रद्धाविरहितं यज्ञं तामसं परिचक्षते ॥१३॥**

शास्त्र विधीला सोडून असलेला, अन्नदान नसलेला, मंत्र नसलेला, दक्षिणारहित, श्रद्धाविरहित अशा यज्ञाला तामस यज्ञ म्हणतात.

अशा यज्ञाचे काहीही फळ मिळत नाही.

भगवान आता तपातील भेद सांगत आहेत.

**देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं शौचमार्जवम् ।**
**ब्रह्मचर्यमहिंसा च शारीरं तप उच्यते ॥१४॥**

देव, ब्राह्मण, आईवडील व गुरु यांचे पूजन, शुद्धता, सरळपणा, ब्रह्मचर्य व अहिंसा यांचे पालन करणे याला शरीर तप म्हणतात.

या शारीरीक तपाने अदृष्ट निर्माण होते. व्यवहारात प्रत्यक्ष प्रमाण मानण्यात येत असले तरी शास्त्रकार अदृष्टालाच प्रमाण मानतात. म्हणजेच ते दैवाला प्राधान्य देतात. अत्यंत कुरूप मुलाला सुंदर पत्नी मिळाली तर ते त्या मुलाचे सद्भाग्य व मुलीचे दुर्भाग्य. लोकमान्य टिळक किती बुद्धिमान, केवढे त्यांचे कर्तृत्व ! पण त्यांचा मुलगा काही बुद्धिमान अगर कर्तृत्ववान प्रसिद्ध नव्हता. असे कां व्हावे ? अदृष्टाखेरीज

दुसरे कारण सापडत नाही. अदृष्ट अनुकूल असले की सर्व कार्ये अनायासे होतात.

ब्रह्मचर्य म्हणजे निषिद्ध मैथुन न करणे व अहिंसा म्हणजे कोणाला पीडा न देणे. पण एखाद्याच्या उत्कर्षासाठी त्याला त्रास दिल्यास अहिंसेस बाध येत नाही. उदा. तुमच्या मुलाला सकाळी आठपर्यंत झोपायची सवय आहे. पण त्याचा अभ्यास चांगला व्हावा म्हणून त्याला लवकर उठवून त्रास देण्यास हरकत नाही. मातापित्यासाठी पुत्राने, गुरूसाठी शिष्याने व पतीसाठी पत्नीने पीडा सहन केलीच पाहिजे, अशी शास्त्राज्ञा आहे.

कुठलीही गोष्ट वर्षानुवर्षे सातत्याने करत राहिल्यास त्यात आपोआप विशेष नैपुण्य प्राप्त होते. यालाच तप म्हणतात. सतत खेळाचा सराव करणाऱ्या खेळाडूस यशाची खात्री असते. म्हणूनच तो प्रतिस्पर्ध्यावर आव्हान देऊ शकतो. प्रथम सायकल शिकताना कुणीतरी धरावे लागते. पण सतत सराव करीत राहिले की हात सोडून सायकल चालविता येते.

आर्जवम् म्हणजे शास्त्राने सांगितलेल्या गोष्टी श्रद्धापूर्वक करावयाच्या व निषेध केलेल्या गोष्टींचा त्याग करायचा.

असे हे त्रिविध शारीरिक तप प्रत्येकाने केले पाहिजे.

**अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत् ।**
**स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मयं तप उच्यते ॥१५॥**

दुसऱ्याला दुःख न देणारे, सत्य, प्रिय आणि हितकर वाक्य व स्वाध्यायाचा अभ्यास यांना वाङ्मय तप म्हणतात.

दुसऱ्याशी बोलताना त्याला आवडेल असे बोलावे. पण ते सत्य व हितकारकही असले पाहिजे. दुसऱ्याला उद्वेग उत्पन्न होणार नाही असे भाषण असावे. प्रिय आणि हितकर बोलणे फार अवघड आहे.

तरुणांना उच्छृंखलपणे वागू नका, पैसा उधळू नका, असे सांगणे हे सत्य व हितकर असले तरी तरुणांना ते ऐकून राग येतो. पिता आपल्या मुलाला किंवा गुरु शिष्याला असा हितकर उपदेश करू लागला की, पिता व गुरु अप्रिय होतात. आपले बोलणे कोणाला आवडत नसेल तर बोलण्यापेक्षा मौन धरणे चांगले. प्रिय आणि हितकर बोलणे म्हणजेच वाचिक तप होय. असे वाचिक तप आचरल्यानंतर कांहीं काळाने तपाचरणी सत्यवाक् होतो. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, " माझिया सत्यवादाचे तप । वाचा केले बहुत कल्प । तया फळांचे महाद्वीप । पातली प्रभु ॥ असा अधिकार प्राप्त झाल्यामुळेच ज्ञानेश्वरी-सारखा अलौकिक ग्रंथराज ते निर्माण करू शकले.

भीष्माचार्यांनी पित्याकरता आजन्म ब्रह्मचर्य व्रत पाळले. राज्य-त्यागही केला. ते म्हणत " स्त्री किंवा राज्य भोगून जे सुख झाले असते त्याहून शतपटीने अधिक सुखाचा लाभ मला होत आहे. या शारीरिक तपामुळे मला त्रैलोक्याचे ज्ञान झाले आहे. शरशय्येवरही मी सुखाने पहुडतो व धर्मराजाला ज्ञानाच्या गोष्टी सांगतो. ज्या ऐकण्याला असंख्य मुनी व प्रत्यक्ष भगवान श्रीकृष्ण उपस्थित राहतात. याहून आणखी आनंद कोणता असूं शकेल ? "

सिद्धेश्वर ( गुरु ) महाराजांचे ज्येष्ठ चिरंजीव रामचंद्रपंत यानी वयाच्या चवथ्या वर्षीच वडिलाना सांगितले की गेल्या जन्मी मी गंगेच्या तीरावर लाह्याचे पीठ खाऊन बारा वर्षे तप केले म्हणून तुमच्या पोटी जन्मलो आहे. कनिष्ठ चिरंजीव नाना महाराजही असेच पुण्यवान होते. ते जगदंबेच्या दर्शनास गेले की देवी स्वतः आपल्या गळ्यातील हार काढून त्यांच्या गळ्यात घाली. पुजाऱ्यांना त्यांचा मत्सर वाटून नाना महाराज येताच देवीच्या गळ्यांतील सर्व हार काढून ठेवले. तेव्हा देवीने आपल्या किरीटावरील तुरा त्याना दिला. पूर्वजन्मी तप केल्याचेच हे फळ.

**मनःप्रसादः सौम्यत्वं मौनमात्मविनिग्रहः ।**
**भावसंशुद्धिरित्येतत्तपो मानसमुच्यते ॥१६॥**

मनाची प्रसन्नता, सौम्यत्व, मौनवृत्ति, आत्मसंयम, कल्पनाविरहित अशी अंतःकरणाची शुद्ध स्थिति याला मानस तप म्हणतात.

मन नेहमी प्रसन्न राखले पाहिजे. त्यात थोडेसुद्धा काळेबेरे असूं नये. मन स्वच्छ ठेवणे कांही सोपे काम नाही. पण तसा प्रयत्न करीत राहिले पाहिजे. दुसऱ्याचे कल्याण व्हावे असे चिंतन करावे. ते जमत नसेल तर निदान वाईट होवो असे विचार तरी मनात आणू नका. दुसऱ्याचे वाईट चिंतून, त्याचे वाईट होत नाही. पण वाईट चिंतणाऱ्यास मात्र पापाचे धनी व्हावे लागते. दुसऱ्याचे भले चिंतण्यात दोघांचेही हित आहे. मनाला असे वळण लावणे हा एक मानसिक तपाचा भाग आहे. दुसरे साधन मौन. मौन म्हणजे केवळ गप्प बसणे नव्हे. तर न बोलता मनांत ईशचिंतन चालू ठेवणे म्हणजे मौनव्रत. उगाच वायफळ वटवट करण्यापेक्षा न बोलणे चांगले. पण न बोलता विषयांचे विचार घोळत ठेवणे याला मौनव्रत म्हणत नाहीत. येताजाता, उठताबसता मनाला ईश्वरचिंतन करण्याची संवय लाविली पाहिजे.

आत्मविनिग्रह म्हणजे समाधि. समाधीत कर्मेन्द्रिये, ज्ञानेन्द्रिये इतकेच नव्हे तर श्वासोश्वासही बंद करावा लागतो. हा तपाचा प्रकार अवघड आहे. म्हणून मानस तपाचा अगदी सोपा सर्वांना सहज जमेल असा प्रकार सांगतात. तो म्हणजे भावसंशुद्धि. प्रत्येक व्यवहार चोख करायचा. त्यांत फसवाफसवी करायची नाही. तुमच्याजवळ एखादे खोटे नाणे आले तर ते अंधारात खपविण्याचा प्रयत्न करू नका. असा व्यवहार करून वर धन्यता मानणे हा तर मनाचा कोतेपणाचा प्रकार होय. तुम्ही फसलात तर तुम्हाला पीडा होते. मग दुसऱ्याला फसवून

पीडा देण्याचे पाप आपण कां करावे. तुम्ही दुसऱ्याला फसवलेत की, तुम्हाला कोणीतरी फसविल्याशिवाय राहणार नाही. उदार मनाचा माणूस असा विचार करतो की, मानव जन्म केवळ पैशासाठी नाही. दोन पैसे अधिक गेले तरी पर्वा नाही, पण सरळ व्यवहार करणेच इष्ट. सरळ व्यवहार करणाराचे मन प्रसन्न राहते.

**श्रद्धया परया तप्तं तपस्तत्त्रिविधं नरैः ।**
**अफलाकाङ्क्षिभिर्युक्तैः सात्त्विकं परिचक्षते ॥१७॥**

हे तीन प्रकारचे तप फलाची इच्छा न करणाऱ्यांनी पूर्ण सत्त्वशुद्धि-युक्त अशा मानवानी अत्यंत आस्तिक बुद्धीने आचरले तर त्याला सात्त्विक तप म्हणतात.

कुठलीही इच्छा मनात न बाळगता, गुरु व शास्त्रावर प्रबळ श्रद्धा ठेवून तप केले की ते सात्त्विक तप होते. ज्या भगवंताने आपणास जन्मास घातले त्याला आमच्या कामना कळत नाहीत की काय? तो तर सर्वज्ञ आहे. मग वेगळा संकल्प किंवा एखादी इच्छा मनात बाळगून तप करण्यात काय अर्थ आहे. भक्त प्रल्हाद निष्कामबुद्धीने तपाचरण करीत होता. भगवंत त्यावर प्रसन्न झाले व त्यास वर माग असे म्हणाले. तेव्हा तो म्हणाला,

'सर्वसंकल्पफलदः सर्वलोकान्तरास्थितः ।
यदुदारतमं वेत्सि तदेवादिश मे विभो ॥'

सर्व संकल्पांचे फळ देणाऱ्या व सर्वांच्या अन्तःकरणात राहणाऱ्या भगवंता, तू अतिशय उदार आहेस. मग तुझ्याकडे मी काय मागावे? जे तुला इष्ट वाटेल ते मला दे.

**सत्कारमानपूजार्थं तपो दम्भेन चैव यत् ।**
**क्रियते तदिह प्रोक्तं राजसं चलमध्रुवम् ॥१८॥**

सत्कार, मान व पूजा याकरिता म्हणजे लोकात आपली प्रतिष्ठा वाढावी म्हणून दांभिकपणाने जे तप करतात, त्यास या लोकी राजस तप म्हणतात. ते तप उद्दिष्ट साध्य झाले की लगेच बंद केले जाते. तसेच ते निष्फळ असते.

**मूढग्राहेणात्मनो यत्पीडया क्रियते तपः ।**
**परस्योत्सादनार्थं वा तत्तामसमुदाहृतम् ॥१९॥**

जे तप मूर्खपणाचा हट्ट धरून, स्वतःला पीडा देऊन, अथवा दुसऱ्या लोकांच्या नाशाकरता केले जाते त्यास तामस तप म्हणतात.

यज्ञापेक्षा तप सोपे. यज्ञ एकट्याने करता येत नाही. त्याला ऋत्विज, यजमान, यजमान–पत्नी, परिवार व द्रव्य या सर्वांची अनुकूलता लागते. पण तप एकट्याला करता येते. पण तपात क्लेश फार, म्हणून तप करता येत नसेल तर दान करा. त्या दानाचे प्रकार आता भगवंत सांगत आहेत. दान म्हणजे आपले सर्व धन देऊन टाकायचे असा अर्थ नाही. शास्त्रकार म्हणतात,

धर्माय यशसेऽर्थाय कामाय स्वजनाय च ।
पंचधा विभजन्वित्तं इहामुत्र च मोदते ॥

तुम्ही जे मिळवाल त्यातला पांचवा भाग दान करा.

**दातव्यमिति यद्दानं दीयतेऽनुपकारिणे ।**
**देशे काले च पात्रे च तद्दानं सात्त्विकं स्मृतम् ॥२०॥**

स्वधर्माने मिळविलेल्या धनाचे दान करणे हे कर्तव्य आहे अशा बुद्धीने, ज्याच्याकडून परतफेडीची अपेक्षा नाही, अशा व्यक्तीला योग्य ठिकाण, काळ, पात्र पाहून दिलेल्या दानाला सात्त्विक दान म्हणतात.

शास्त्राने व गुरूनी सांगितले आहे व त्यांची आज्ञा पालन करणे हे कर्तव्य या बुद्धीने दान द्यावयाचे. ज्याला द्यायचे त्याचेकडून कसलीही

अपेक्षा करायची नाही. ज्याला द्यायचे तो सत्पात्र हवा व देण्याची जागा व वेळही योग्य हवी. सात्त्विक दानांत पात्रापात्र विचार महत्त्वाचा आहे.

पात्रापात्र विवेकोऽस्ति धेनुः पन्नगयोरिव ।
तृणात् संजायते क्षीरं क्षीरात् संजायते विषम् ॥

गाईला गवत दिले तर ती दूध देते व तेच दूध सापाला दिले तर त्याचे विष बनते. दिलेल्या दानाचा दुरुपयोग होऊ नये.

**यत्तु प्रत्युपकारार्थं फलमुद्दिश्य वा पुनः ।**
**दीयते च परिक्लिष्टं तद्दानं राजसं स्मृतम् ॥२१॥**

जे दान उपकाराचा मोबदला म्हणून अथवा फळाच्या आशेने व अतिशय कष्टाने दिले जाते, त्याला राजस दान म्हणतात.

लग्नामुंजीतील अहेर, दिवाळीतील फराळांच्या जिनसांची देवाण घेवाण, प्रसिद्धीसाठी दिलेल्या देणग्या इ. राजस दाने होत.

**अदेशकाले यद्दानमपात्रेभ्यश्च दीयते ।**
**असत्कृतमवज्ञातं तत्तामसमुदाहृतम् ॥२२॥**

जे दान अयोग्य ठिकाणी, अयोग्य वेळी, अयोग्य व्यक्तीला, सत्कार-विरहित व अवहेलनापूर्वक दिले जाते, ते तामस दान होय.

**ॐतत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः ।**
**ब्राह्मणास्तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिताः पुरा ॥२३॥**

ॐ, तत्, सत्, असा तीन प्रकारचा ब्रह्माचा नामनिर्देश श्रुतीने सांगितला आहे. या नामाच्या योगाने पूर्वी प्रजापतीने ब्राह्मण, वेद व यज्ञ निर्माण केलेले आहेत.

कर्म कितीही दक्षतापूर्वक केले तरी त्यात चुका होतातच. हे गृहीत धरून कर्म झाले की 'ॐ तत्सत्' म्हणावयाचे म्हणजे सर्व चुका खपून जातात. ॐ हे परमेश्वराचे नाव आहे. हे एकच अक्षर

असून अ उ व म् हे त्याचे तीन अवयव आहेत. प्रत्येक अवयवात प्रचंड सामर्थ्य आहे. प्रणवाचा उच्चार करून ब्राह्मण ( कर्ता ), वेद ( करण-साधन ) व यज्ञ ( कर्म ) यांची निर्मिती करण्यात आली. म्हणजेच सर्व सृष्टी ओंकारातून उत्पन्न झाली. ज्या उच्चाराने सृष्टी निर्माण झाली तोच उच्चार कार्यातील दोषही घालवू शकतो. म्हणून कर्म पूर्ण झाल्यावर 'ॐ तत्सत्' म्हणावयाचे.

**तस्मादोमित्युदाहृत्य यज्ञदानतपःक्रियाः ।**
**प्रवर्तन्ते विधानोक्ताः सततं ब्रह्मवादिनाम् ॥२४॥**

म्हणून ॐ हे अक्षर उच्चारून ब्रह्मवेत्ते यज्ञदानतपादि क्रिया विधिपूर्वक नेहमी करीत असतात.

**तदित्यनभिसंधाय फलं यज्ञतपःक्रियाः ।**
**दानक्रियाश्च विविधाः क्रियन्ते मोक्षकाङ्क्षिभिः ॥२५॥**

मोक्षाची इच्छा करणारे फलाची अपेक्षा न धरता यज्ञ, तप आणि दान यांच्या विविध क्रिया तत् अक्षराचा उच्चार करून ( ब्रह्मार्पण बुद्धीने ) करीत असतात.

तत् म्हणजे प्रसिद्ध असलेला ईश्वर. मनुष्य कितीही मोठा होऊन गेला तरी त्याचे नांव कांहीं शतके राहते. पण जन्मण्यापूर्वी कांहीं तो कोणाला माहीत नसतो. पण ईश्वराची प्रसिद्धी अनादी काळापासून असून ती अनंतकाल चालूच राहणार. ईश्वर नाही म्हणणारेही त्याचीच चर्चा करतात. 'वंध्यापुत्र' 'शशशृंग' यांच्याबद्दल कोणी चर्चा करीत नाही. पण ईश्वर नाही म्हणून पुनः पुनः त्याचीच चर्चा करतात. म्हणजे एक प्रकारे त्याचे अस्तित्वच मान्य करतात. अस्तित्व मान्य करून साधने करणाऱ्यांचा फायदा होतो. नास्तिकांना हा फायदा मिळत नाही. मुमुक्षु तत् म्हणून यज्ञयागादि क्रिया करतात. त्यांना मोक्षाखेरीज अन्य कशाचीच इच्छा नसते.

सद्भावे साधुभावे च सदित्येतत्प्रयुज्यते ।
प्रशस्ते कर्मणि तथा सच्छब्दः पार्थ युज्यते ॥२६॥

कर्ता ब्रह्मरूप होण्याकरिता, सदोष कर्म निर्दोष व पूर्ण होण्याकरिता सत् या अक्षराचा उपयोग करतात.

विद्यमान पदार्थांना म्हणजेच वर्तमानकाळांतील वस्तूंना सत् म्हणतात. साधुभाव म्हणजे चांगल्या गोष्टींनाही सत् म्हणतात. प्रशस्त कर्मांनाही सत् शब्द लावतात. चांगले व प्रशस्त यात फरक आहे. उंची हॉटेलमधील जेवण चांगले असेल, पण त्याला प्रशस्त म्हणता येणार नाही. शुचिर्भूत होऊन तयार केलेले व शुचिर्भूत होऊन समानशील सज्जनासमवेत भोजन करणे हे प्रशस्त कर्म होय. प्रशस्त कर्म केल्याने मनाला समाधान लाभते.

यज्ञे तपसि दाने च स्थितिः सदिति चोच्यते ।
कर्म चैव तदर्थीयं सदित्येवाभिधीयते ॥२७॥

यज्ञ, दान व तप यातील न्यूनता जाऊन पूर्णता येणे यालाही सत् म्हणतात. याच्याकरता केलेल्या कर्मालाही सत् म्हणतात.

यज्ञ दान तप यातच गर्क राहणे म्हणजे सत्. ईश्वरार्थ कर्म करणे म्हणजेही सत्कर्मच. स्वतःसाठी व स्वकीयासाठी दिवसभर असंख्य कर्मे केली जातात. पण ईश्वरासाठी एकही कर्म केले जात नाही. देवासाठी नैवेद्य तयार केला तरी त्याचा लाभ भक्तालाच होतो. यथाविधि षोडशोपचारे पूजा करणे शक्य नसेल पण निदान स्मरणपूर्वक मनोभावे नमस्कार करणे हे काय अवघड आहे? पण तेवढेही लोक करीत नाहीत.

अश्रद्धया:हुतं दत्तं तपस्तप्तं कृतं च यत् ।
असदित्युच्यते पार्थ न च तत्प्रेत्य नो इह ॥२८॥

हे पार्था, अश्रद्धेने केलेले हवन, दिलेले दान, आचरलेले तप व केलेल्या कर्माला असत् म्हणतात. त्यामुळे परलोकी फल नाही व इहलोकीही लाभ नाही.

कसेही कर्म करून ॐ तत्सत् म्हणून चालणार नाही. पाकशास्त्रात कोणी निपुण असला व त्याला डाळ तांदूळ न देता भात भाजी करावयास सांगितले तर ते त्याला जमणार नाही. म्हणजे साधन पाहिजे. परमार्थात श्रद्धा हे प्रबल साधन आहे. श्रद्धा नसता केलेली कर्मे कुठेच उपयोगी पडत नाहीत, उलट निंदा होते. सध्याच्या कर्मावरून पुढच्या जन्मीची अवस्था ठरत असते. सुंदर कर्म करणाऱ्याला सुंदर कुलात जन्म मिळतो. घरदार धन, मुले, मृत्यूपर्यंत साथ करतात. पण यज्ञ-दान-तपादि सात्त्विक कर्मे श्रद्धेने केलेली असली तर ती मृत्यूनंतरही--परलोकात-साथ करतात, म्हणून सतत सत्कर्मे करीत असावे व ॐ तत्सत् असा शब्दोच्चार करून त्यास पूर्णता आणावी.

इति श्रीमद् भगवद् गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे श्रद्धात्रयविभागयोगो नाम सप्तदशोऽध्यायः ॥

० ० ०

# अध्याय १८ वा.

अर्जुन उवाच—

**संन्यासस्य महाबाहो तत्त्वमिच्छामि वेदितुम् ।**
**त्यागस्य च हृषीकेश पृथक्केशिनिषूदन ॥ १ ॥**

अर्जुन म्हणाला, "हे महाबाहो, हृषीकेशा, केशिनिषूदना, संन्यासाचे व त्यागाचे तत्त्व ( निश्चितार्थ ) वेगवेगळे मी जाणू इच्छितो."

आतापर्यंत अर्जुनाचे प्रश्न पाहिल्यास तो भगवंताला, 'हे सांगा', 'ते सांगा' असे म्हणत असल्याचे आढळून येते. आता मात्र तो 'वेदितुमिच्छामि' अशी नम्रतापूर्वक विनंती करीत आहे. अर्जुनाचे अंगी अधिक नम्रता आली असा याचा अर्थ होतो. आतापर्यंत भगवंत अर्जुनाला 'महाबाहो' म्हणून आदराने संबोधित होते. आता तेच विशेषण लावून अर्जुन भगवंताला संबोधित आहे. हा फरकही लक्षणीय आहे.

संन्यास व त्याग यात फरक काय? असा अर्जुनाचा प्रश्न आहे व फरक असल्यास त्यांची तत्त्वे स्वतंत्रपणे ऐकण्याची त्याची इच्छा आहे.

अर्जुनाला युद्धासंबंधी मोह निर्माण झाला म्हणून त्याने भगवंताला गुरु करून व शिष्यभावनेने शरण जाऊन मोहातून सोडविण्याची विनंती केली. तेव्हा भगवंतानी प्रथम त्याला 'धर्म्याद्धि युद्धात् श्रेयोऽन्यत् क्षत्रियस्य न विद्यते' ( क्षत्रियाला धर्मयुद्धाहून दुसरे कोणतेही कार्य श्रेयस्कर नाही. ) अशी कर्तव्याची जाणीव करून दिली. नंतर 'स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः' ( स्वधर्माचरण करीत असताना मरण आले तरी चांगले, पण परधर्म भयप्रद होय. ) अर्जुनाने क्षत्रियधर्म सोडल्यास त्याचे परिणाम भयानक होतील, हे

त्याला पटवून दिले. तरी अजून अर्जुनाचे प्रश्न चालूच आहेत. असा वेळ घालविल्यास शत्रु घात करील अशी त्याला भीती वाटत नाही. कारण श्रीकृष्णाचे सामर्थ्य तो जाणून आहे. श्रीकृष्ण ' केशिनिषूदन ' म्हणजे केशिदैत्याचा नाश करणारा आहे. श्रीकृष्णाच्या बालपणी केशि घोड्याचे रूप घेऊन श्रीकृष्णाचा घात करण्यासाठी आला. त्या मायावी घोड्याने श्रीकृष्णाचा हात तोंडात धरताच त्याने आपला हात इतका मोठा केला की केशि राक्षस गतप्राण झाला. बालपणी ज्याचे इतके सामर्थ्य असा श्रीकृष्ण जवळ असल्यावर अर्जुनाला भीती कसली ?

श्रीकृष्णाची ' न धरी शस्त्र करी मी ' अशी प्रतिज्ञा होती, म्हणजे श्रीकृष्णाच्या संरक्षणाचीही जबाबदारी अर्जुनावर होती. पण श्रीकृष्ण हा हृषीकेश म्हणजे सर्वांच्या इंद्रियांचा स्वामी आहे, हेही अर्जुन जाणत होता. कौरवांची इंद्रियेसुद्धा त्याच्या ताब्यात, मग अर्जुन कौरवांची भीती कशाला बाळगेल? म्हणून तो आपली जिज्ञासा पूर्ण करण्यासाठी निर्भयपणे प्रश्न विचारीत आहे.

विद्वत्संन्यास व विविदिषा संन्यास असे संन्यासाचे दोन प्रकार आहेत. साक्षात्कार झाल्यानंतर घेतात तो विद्वत्संन्यास. असा संन्यासी भिक्षा मागत नाही. त्याला जगाची अपेक्षा नसते. याज्ञवल्क्यानी असा संन्यास घेतलेला होता. सामान्य लोकांना अशा संन्याशाचे दर्शन घडत नाही. ज्ञान मिळविण्यासाठी घेतला जातो तो विविदिषा संन्यास. अशा संन्यस्ताने सात घरीं भिक्षा मागावी, आधी सांगून भिक्षेस जायचे नाही. धूम शांत झाल्यावर भिक्षेस जायचे व कोणी वाढले नाही तरी सातच घरी भिक्षा मागायची, असे नियम पाळावयाचे असतात. हा सात्त्विक संन्यास आहे.

भगवंतानी तिसऱ्या अध्यायात आत्मसंतुष्ट पुरुषाची लक्षणे सांगून ( श्लोक १७ व १८ ) संन्यासाबद्दल खुलासा केलेला असता व वर

सांगितल्याप्रमाणे संन्यासाचे दोनच प्रकार असतील तर अर्जुनाचा प्रश्न चुकीचा वाटतो. पण अर्जुन 'स संन्यासी च योगी च न निरग्निर्न चाक्रियः' अशा संन्यासाबद्दल विचारत आहे हे लक्षात घेतले तर त्याचा प्रश्न चुकीचा वाटणार नाही. मुख्य संन्यासाचे दोनच प्रकार असले तरी 'कर्मफलत्याग' हा जो गौण संन्यास आहे त्याचे सात्त्विक, राजस व तामस असे तीन प्रकार होतात.

श्री भगवान उवाच—

**काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः ।**
**सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः ॥ २ ॥**

भगवान म्हणाले, 'काम्य कर्मांचा त्याग म्हणजेच संन्यास होय असे विद्वानांचे मत आहे. सर्व कर्मफलांचा त्याग म्हणजे त्याग असे पंडित म्हणतात.'

नोकरी मिळावी म्हणून सत्यनारायण, बढतीसाठी संकष्टी किंवा मुलासाठी देवांना नवस करणे अशी काम्य कर्मे अजीबात न करणे हाच संन्यास असे कांही लोक म्हणतात. फक्त आपल्या वाट्यास आलेली नित्यनैमित्तिक कर्मे तेवढी करायची. प्रारब्धातच जर नसेल तर त्यासाठी कितीही कष्ट केले तरी ते साध्य होत नाही. प्रारब्धात असेल तेच होते, हे जाणून सकाम कर्मे न करणे, ती सोडणे हा एक संन्यासाचा अर्थ व नित्यनैमित्तिक कर्मांबरोबर काम्य कर्मेही करावयाची पण त्याचे फल सोडावयाचे, हा संन्यासाचा दुसरा प्रकार. पहिल्यापेक्षा दुसरा प्रकार चांगला. कारण आधी मालकी हक्क प्रस्थापित करून मग तो सोडण्यात विशेष महत्त्व आहे. त्यालाच त्याग म्हणता येईल. कर्म केलेच नाही तर त्याचा त्याग तरी कसा करता येईल? कर्मांचे फल तयारच असते, पण ते मागायचे नाही. नको म्हणावयाचे अशा वृत्तीने ईश्वर संतुष्ट होतो.

धनाढ्य असून उदार असलेल्या एका गृहस्थाकडे एक याचक गेला व त्याकडे एक रुपयाची मागणी केली. उदार गृहस्थाने ताबडतोब रुपया काढून दिला. दुसरा एक याचक आला व म्हणाला, 'महाराज, आपली कीर्ति ऐकून मी येथे आलो आणि आपल्या दर्शनानेच मला आनंद झाला.' त्याने काहीही मागणी केली नाही. पण त्या धनाढ्य गृहस्थाने दुसऱ्या याचकास शंभर रुपये दिले. ईश्वर तर परम उदार आहे. कर्मांचे फळ न मागणाऱ्या भक्ताला ईश्वर आपल्या औदार्याला साजेल असेच फळ देतो.

बुद्धिमान पुरुष एकपट काम करून चौपट फळ मिळवितो. भक्त निष्काम व निरहंकार वृत्तीने कर्मे करून ती ईश्वरार्पण करून मोकळा होतो. ईश्वर त्याच्या कर्मांचा संचय करून त्याद्वारा भक्ताची चित्तशुद्धि करतो, अशा भक्ताचे मन सत्यसंकल्प बनते व भक्त जणू कल्पद्रुमच होतो.

**त्याज्यं दोषवदित्येके कर्म प्राहुर्मनीषिणः ।**
**यज्ञदानतपःकर्म न त्याज्यमिति चापरे ॥ ३ ॥**

कित्येक पंडित कर्म दोषवत् (बंधक) म्हणून त्याज्य असे सांगतात. दुसरे कित्येक यज्ञ, दान व तप हे कर्म त्याज्य नाही असे सांगतात.

सांख्य मतानुसार कर्मे केल्याने दोष निर्माण होतात, बंध येतात, म्हणून ती अजीबात करूच नयेत. तर मीमांसकांच्या मते यज्ञदान तपादि कर्मे कदापि सोडू नयेत, अशी परस्पर विरुद्ध मते जगात प्रचलित आहेत. आता भगवंताचे मत ऐका.

**निश्चयं शृणु मे तत्र त्यागे भरतसत्तम ।**
**त्यागो हि पुरुषव्याघ्र त्रिविधः संप्रकीर्तितः ॥ ४ ॥**

'हे भरतोत्तमा, त्यागासंबंधी माझे निश्चित मत काय आहे ते तू ऐक. हे नरश्रेष्ठा त्याग तीन प्रकारचा सांगितलेला आहे.

**यज्ञदानतपःकर्म न त्याज्यं कार्यमेव तत् ।**
**यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम् ॥ ५ ॥**

यज्ञ, दान, तप ही कर्मे त्याज्य नाहीत. ती केलीच पाहिजेत. कारण यज्ञ-दान-तप ही कर्मे फलेच्छा सोडून केल्यास विचारवंतांची चित्तशुद्धि करणारी आहेत.

**एतान्यपि तु कर्माणि सङ्गं त्यक्त्वा फलानि च ।**
**कर्तव्यानीति मे पार्थ निश्चितं मतमुत्तमम् ॥ ६ ॥**

मात्र ही कर्मे आसक्ति आणि फलेच्छा सोडून केली पाहिजेत. अर्जुना हे माझे निश्चित व उत्तम मत आहे.

ही कर्मे अवश्य पण फलेच्छा व अभिमान सोडून करावीत असे भगवंत ठामपणे सांगत आहेत आणि हाच मार्ग उत्कृष्ट अशी ग्वाही देत आहेत. भगवंतांच्या या मतास श्रुतिस्मृति आणि पुराणे यांचा आधार आहे. वरील दोन्ही मतांचा हा सुवर्णमध्य आहे. कर्म स्वतः मुळीच वाईट असते तर शास्त्रकारांनी करा म्हणून सांगितलेच नसते. कर्म करताना अहंकार व फळाची आशा निर्माण होते. या दोन गोष्टी मात्र घातक आहेत. तेवढे सोडून कर्म केले की ते चांगलेच असते. फलेच्छा सोडणे यालाच त्याग म्हणावयाचे. तोच संन्यासही-सम्यक् न्यासः- होतो.

निष्काम कर्म म्हणजे सुरक्षित ठिकाणी ठेवलेली ठेव. बँकेत ठेव ठेवली की ठेवीची रक्कम ठराविक कालपर्यंत मिळत नाही व आपणास दिसतही नाही. तरी मुदतीनंतर सव्याज पदरी पडते. पैसे मध्यंतरी दिसले नाहीत याचा अर्थ ते नाहीसे झाले असा नव्हे. निष्काम व निरहंकारपूर्वक केलेली कर्मे ईश्वराजवळ संचित होत राहतात. त्यांचे फळ दिसले नाही तरी ती कर्मे नष्ट होत नाहीत. व्यवहारात बँक बुडण्याचा धोका आहे. पण ईश्वर बुडण्याचा किंवा त्याने बुडविण्याचा धोका नाही.

आपण लावलेले झाड सुरक्षित जागी नसेल तर त्याला लागलेली फळे आपले हाती लागत नाहीत. झाडही जागेवर राहील याची शाश्वती नसते. दुसरेच कोणीतरी फळे लुबाडून नेतात. तसेच आपली सुंदर कर्मे जर ईश्वराच्या हवाली केलेली नसतील तर त्याची फळे अदृष्ट मधल्यामधे नष्ट करून टाकते. ययाति स्वर्गात गेला असता त्याच्या पुण्याचा इंद्रालाही हेवा वाटला. इंद्राने ययातीला, 'तू कोणकोणती पुण्य कर्मे केलीस ते तरी सांग' असे विचारताच ययातीने भोळेपणाने सर्व सांगून टाकले. पण 'धर्मः क्षरति कीर्तनात्' (धर्म—पुण्य—सांगितला की नष्ट होतो.) या न्यायाने ययातीची स्वर्गातून हकालपट्टी झाली. 'मी केले' असा कर्तृत्वाभिमान—अहंकार झाला की केलेले सर्व वाया जाते. निष्काम व कर्तृत्वाभिमान सोडून केलेले कर्म ईश्वराजवळ सुरक्षित असल्याने ते नष्ट होत नाही.

**नियतस्य तु संन्यासः कर्मणो नोपपद्यते ।**
**मोहात्तस्य परित्यागस्तामसः परिकीर्तितः ॥ ७ ॥**

परंतु विहित कर्माचा त्याग करणे योग्य नाही. मोहाने केलेल्या अशा त्यागास तामस त्याग म्हणतात.

शास्त्राने जी कर्मे सांगितली आहेत, त्यांची फळेही सांगितली आहेत. उदा० चित्रायाग केल्यास पशुधन, पुत्रकामेष्टी केल्यास पुत्र, सप्तशती पाठ केल्यास संपत्ती इत्यादि. पण व्यवहारांतील कर्मांची फळे मात्र निश्चितपणे सांगता येत नाहीत. बी. एड्. किंवा बी. ई. पदवी संपादन केली की लगेच शिक्षणाची अगर इंजिनियर म्हणून नोकरी मिळेलच असे नाही. व्यापारशास्त्रातील पदवी घेऊन कोणी दुकान काढले तर ते चालेलच असे सांगता येत नाही.

स्नान, संध्या पूजा इत्यादी नित्यकर्मे कर्तव्य भावनेने केली पाहिजेत. त्यांच्या फळाबद्दल कोणी चिंता करू नये. पोटापाण्याचा धंदा

करून राहिलेल्या वेळात इतर कांही तरी करण्यापेक्षा नित्यकर्मे करा. पोटापाण्यासाठी पशुपक्षीसुद्धा खटपट करीत असतात. त्या बिचाऱ्यांना पारमार्थिक कर्मे करताच येत नाहीत. मांजर गाय पाळण्याचे कष्ट करीत नसले तरी खटपट करून दूध प्यायल्याशिवाय रहात नाही. मुंग्यादेखील अखंड कष्ट करतात, पावसाळ्यासाठी धान्यसाठा करतात. एखादी नशीबवान मुंगी साखरेच्या गुदामात जन्मते, जन्मभर साखर खात राहते व एक दिवस साखरेच्या पोत्याखाली चिरडून मरून जाते. मनुष्य जर असाच नुसता पोटासाठी काबाडकष्ट करून मरून गेला, तर पशू, पक्षी, किडा, मुंगी व मानवात फरक काय राहिला? पशूपेक्षा मानवात कांहीं वेगळेपणा आहे, म्हणून त्याने नित्यनैमित्तिक कर्मे केली पाहिजेत.

ह्या कर्मांमुळे बंध निर्माण होतात म्हणून ती सोडली तर तो तामस त्याग होतो. नित्यकर्मांचा त्याग संभवतच नाही. ती अविवेकाने—मोहामुळे—सोडली जातात, म्हणून ते तामस कृत्य ठरते.

**दुःखमित्येव यत्कर्म कायक्लेशभयात्त्यजेत् ।**
**स कृत्वा राजसं त्यागं नैव त्यागफलं लभेत् ॥ ८ ॥**

कर्म दुःखरूप आहे म्हणून त्याचा शरीरत्रासाच्या भीतीने जो त्याग केला जातो तो राजस त्याग होय. असा त्याग करणाऱ्यास त्यागाचे फल मिळत नाही.

सध्या लोकांनी स्नान-संध्या, सोवळे-ओवळे, पूजा-अर्चा यांचा त्याग याच भावनेने केलेला आहे.

**कार्यमित्येव यत्कर्म नियतं क्रियतेऽर्जुन ।**
**सङ्गं त्यक्त्वा फलं चैव स त्यागः सात्त्विको मतः ॥ ९ ॥**

हे अर्जुना, कर्तव्य म्हणून, जे नित्य कर्म, आसक्ती व फलाकांक्षा सोडून केले जाते, त्यास सात्त्विक त्याग म्हणतात.

आपल्या वाट्याला आलेली कर्मे कर्तव्य भावनेने पण कर्तृत्वाभिमान व फलेच्छा सोडून करावयाची व ती ईश्वराला अर्पण करून मोकळे व्हायचे, म्हणजेच सात्त्विक त्याग.

**न द्वेष्ट्यकुशलं कर्म कुशले नानुषज्जते ।**
**त्यागी सत्त्वसमाविष्टो मेधावी छिन्नसंशयः ॥१०॥**

बुद्धिमान, संशय दूर झालेला आणि सत्त्वसंपन्न असा त्यागी अशुभ कर्मांचा द्वेष करीत नाही व शुभ कार्याच्या ठिकाणी आसक्त होत नाही.

सात्त्विक त्याग केलेला मनुष्य वाईट कर्मांचा द्वेष करीत नाही किंवा चांगल्या कर्मामध्ये आसक्तही होत नाही. त्याच्या अंतःकरणात सत्त्वगुणाची अतिशय वाढ होऊन तो बुद्धिमान म्हणजे साक्षात्कारसंपन्न होतो. त्याच्या मनात कोणताही संशय रहात नाही.

सात्त्विक त्यागी पुरुषाची ही अंतस्थ लक्षणे झाली. ही सर्वांना समजून येतील असे नाही. म्हणून त्याची बाह्य लक्षणेही सांगितली पाहिजेत.

जन्मभर त्याच्या वर्तनात कधी फरक पडत नाही, कारण त्याच्या चित्तात सात्त्विक धैर्य असते. व्यवहारात त्याला प्रसन्नता लाभते. ईश्वरी प्रसन्नताही त्याला मिळालेली असते. तो षड्गुणैश्वर्यसंपन्न होतो. शेकडा नव्याण्णव लोक शास्त्रबाह्य वर्तन करतात, ईश्वराला मानीत नाहीत, म्हणून कांही ईश्वराने आपले कार्य कधी बंद पाडले आहे का ? कंसवधानंतर कंसाचे राज्य श्रीकृष्णाला घेता आले असते. पण ते उग्रसेनाला देऊन श्रीकृष्ण त्याचाच सेवक बनला. याचाच अर्थ श्रीकृष्ण रागद्वेषशून्य आहे. सात्त्विक त्यागीही असाच रागद्वेषशून्य असतो.

**न हि देहभृता शक्यं त्यक्तुं कर्माण्यशेषतः ।**
**यस्तु कर्मफलत्यागी स त्यागीत्यभिधीयते ॥११॥**

कर्मांचा पूर्णपणे त्याग करणे देहधाऱ्यास शक्य नाही. पण जो कर्मफलाचा त्याग करतो त्यास त्यागी म्हणतात.

आपली देहावर ममता असल्याने सर्व कर्मे सोडणे सर्वथा अशक्य आहे. भगवंतानी तिसऱ्या अध्यायातच ' न हि कश्चित् क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् '— एक क्षणही कर्म न करता मनुष्य राहू शकत नाही असे प्रतिपादन केले. पण कर्तृत्वाभिमान व कर्मफलाची इच्छा सोडून कर्मे केल्यास त्यालाही सर्व कर्मत्यागाचे फळ मिळते. त्यालाच त्यागी म्हणतात.

**अनिष्टमिष्टं मिश्रं च त्रिविधं कर्मणः फलम् ।**
**भवत्यत्यागिनां प्रेत्य न तु संन्यासिनां क्वचित् ॥१२॥**

वाईट ( नरकादि ) बरे ( स्वर्गादि ) अथवा बरेवाईट ( मनुष्य लोक) असे तीन प्रकारचे कर्मफळ जे त्यागी नसतात त्यांना मृत्यूनंतर मिळते. पण जे ( ज्ञानप्रधान ) संन्यासी आहेत, त्यांना ते कर्मफल कधीच बाधू शकत नाही.

अनिष्ट, इष्ट व इष्टानिष्ट अशी तीन प्रकारची कर्माची फले आहेत. अनिष्टापासून पशुपक्षी, इष्टापासून देव व इष्टानिष्ट म्हणजे मिश्र फलाचा परिणाम मानव जन्मात होतो.

सर्व कर्मफल-त्यागी संन्याशास इथल्या कर्माची फले भोगावी लागत नाहीत. पण संन्यास घेण्यापूर्वीची संचित व प्रारब्धाची कर्मे शिल्लक असतात, त्यांची फले येथेच व ज्ञान होण्यापूर्वीच मृत्यूने गाठले तर मृत्यूनंतर तीन्ही प्रकारची फळे भोगावी लागतात. ज्ञानाकरिता विविदिषा संन्यास घेतला व साक्षात्कार होण्यापूर्वीच मृत्यु आला तरी तीन्ही प्रकारची कर्मफळे भोगावी लागतात. साक्षात्कारानंतरच्या घेतलेल्या विद्वत्संन्यासात मात्र खऱ्या अर्थाने सर्वकर्मत्याग होतो. कारण असा साक्षात्कारी पुरुष सदैव ज्ञानातच राहतो. यालाच ज्ञाननिष्ठा असे म्हणतात.

अर्जुन– " साक्षात्कारानंतरही ज्ञानी भिक्षा मागणे, स्नानसंध्या, जपजाप्य, वेदपठण इत्यादी कर्मे करतो. बृहदश्व, नारद, लोमश, व्यास इत्यादी ज्ञानी पुरुष कर्मात मग्न असलेले मी पाहिले आहेत. भगवन्, आपण स्वतः ज्ञानी असून माझे सारथ्य कर्म करीत आहात. म्हणून विद्वत्संन्यास घेतला तरी खऱ्या अर्थाने सर्वकर्मत्याग होणे अशक्यच नाही का ? "

भगवान–" ज्ञानी पुरुष कर्मे करतो पण त्याला बंध निर्माण होत नाहीत. त्याला पुनर्जन्म नाही, म्हणून त्याचे कर्म करणे हाही कर्मत्यागच होतो. उलट जे लोक अशा पुरुषांची सेवा व भक्ति करतात, त्यांना ज्ञानी पुरुषाच्या पुण्यकर्मांची फळे मिळतात व ज्ञानी पुरुषाने इच्छा नसताना प्रारब्धवशात् केलेल्या वाईट कर्मांची फळे त्यांची निंदा करणाऱ्यांना मिळतात. "

ज्ञानेश्वर म्हणतात, " मी धनहीन असल्याने माझे पश्चात कोणाला माझ्या धनाचा लाभ होणार नाही. पण माझ्या जिवंत समाधीचे, आयुष्यभर केलेल्या परोपकाराचे, ग्रंथनिर्मिती, ज्ञानसाधने, साक्षात्कार, या सर्वांचे पुण्य मी माझ्या ग्रंथात साठवून ठेवलेले आहे. जो त्या ग्रंथांचे श्रवण, मनन वा लेखन करील त्याला ते पुण्य मिळाल्याशिवाय राहणार नाही. "

**पञ्चैतानि महाबाहो कारणानि निबोध मे ।**
**सांख्ये कृतान्ते प्रोक्तानि सिद्धये सर्वकर्मणाम् ॥१३॥**

हे महाबाहो, सर्व कर्मांच्या सिद्धीला आवश्यक अशी पांच कारणे सांख्य सिद्धांतात सांगितलेली आहेत, ती तू माझ्यापासून समजावून घे.

' सम्यक् ख्यायते आत्मतत्त्वं अनया सा संख्या ' व ' वेदान्त **संख्यैव सांख्यं ' अशी सांख्यशास्त्राची व्याख्या केलेली आहे. वेदान्त हे सर्वात शेवटचे व सर्वोत्कृष्ट असे शास्त्र आहे.**

अर्जुनाचे ' विजय ' असे नाव आहे. भगवान महेश व अष्टदिक्पालाना आपल्या पराक्रमाने प्रसन्न करून तो विजयी झाला, त्याला त्यानी शस्त्रास्त्रे दिली. अर्जुन नुसता पराक्रमीच नाही तर बुद्धिमानही आहे. युद्ध करून मिळणारे राज्य, भोग, कीर्तिही त्याला नकोशी झाली आहे व त्याला अध्यात्मश्रवणाची आवड निर्माण झाली आहे. ते श्रवण करीत असता बंधू, पत्नी तिची झालेली विटंबना या सर्वांची त्याला विस्मृती झाली आहे व सर्वज्ञ, सर्व शास्त्रार्थवेत्ता प्रत्यक्ष परमात्मा सांगत असलेले तत्त्वज्ञान तो विरक्त व तल्लीन होऊन व जिवाचे कान करून ऐकत आहे. असा श्रोता आणि असा वक्ता पूर्वी कधी झाला नाही व पुढेही होणार नाही.

**अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधम् ।**
**विविधाश्च पृथक्चेष्टा दैवं चैवात्र पञ्चमम् ॥१४॥**

शरीर, त्याचप्रमाणे जीव, निरनिराळी इंद्रिये, विविध व्यापार व इंद्रियांची अधिष्ठात्री देवता हीच ती पांच कारणे.

अधिष्ठान म्हणजे देह. कर्ता म्हणजे चिदाभास किंवा अहंकार म्हणजेच जीव. करण म्हणजे कर्मेंद्रिये व ज्ञानेंद्रिये. विविधाश्च पृथक् चेष्टा म्हणजे प्राण. दैव म्हणजे इंद्रियांच्या देवता. प्रत्येक इंद्रियाची अधिष्ठात्री देवता वेगळी आहे. उदा० डोळ्यांची देवता सूर्य, कानांची दिशा, नाकाची अश्विनीकुमार, जिव्हेची वरुण व त्वचेची देवता वायु आहे. देह, जीव, इत्यादी पांचानी मिळून कर्म होते. यापैकी कोणावरच आपला ताबा नाही. देह रोगमुक्त असेल तरच तो आपल्या ताब्यात असतो. अहंकार व इंद्रियांवर आपला अधिकार नाही. प्राण केव्हां जाईल याची शाश्वती नाही व इंद्रियांच्या देवतांवर तर आपली सत्ता बिलकूल नाही. सूर्याचा अनुग्रह नसेल तर डोळ्याचे ऑपरेशन केले किंवा दुसरा डोळा बसविला तरी दिसणार नाही. जीवाच्या कर्माप्रमाणे अधिष्ठात्री देवता आपल्या इंद्रियांवर कमीअधिक अनुग्रह करतात.

अधिष्ठानादि पंचकांच्या गोटात जीव सापडलेला आहे. जीव वास्तविक कांहीच करीत नाही. पण भ्रमाने स्वतःस कर्ता समजतो. उदा. सरकार शेतसारा वसूल करते. सरकार म्हणजे कोणी व्यक्ति नाही. पण आपल्या नोकरांकरवी सर्व कामे करविते. म्हणजे प्रत्यक्ष कर्ते नोकर, पण व्यवहारात सरकारला आपण कर्ते समजतो. त्याप्रमाणे जीव हा सरकार असून शरीर, अहंकार, इंद्रिये, प्राण व देवता हे त्याचे नोकर होत. पण अज्ञानामुळे जीव कर्ता असे म्हटले जाते. संप, हरताळाचे वेळी लोक गाड्या, स्टेशने, पोस्ट ऑफिसे जाळतात. विजेच्या तारा तोडतात व आपण सरकारचे मोठे नुकसान केले असे समाधान मानतात. पण सरकार या मंडळींनी निवडून दिलेल्या लोकांचे म्हणजे त्यांचेच असते. झालेली नुकसान भरपाई कररूपाने लोकांनाच भरावी लागते.

प्रत्येकाच्या सुखाच्या कल्पना वेगवेगळ्या असतात. बालपणी खेळात, तरुणपणी प्रेमात तर वृद्धपणी देवतार्चनात आनंद वाटतो. एखाद्याला कितीही चांगला पदार्थ दिला तरी तो खूष होत नाही. अमुकच पदार्थ मिळाला तर मी सुखी होईन असे तो म्हणतो. प्रिय मित्राने मुद्दाम व जोरात मारले तरी चालते, पण शत्रूचा चुकून बारीकसा धक्का लागला तरी संताप येतो. याचा अर्थ सुख–दुःख हे मानीव संबंधावर अवलंबून आहे.

**शरीरवाङ्मनोभिर्यत्कर्म प्रारभते नरः ।**
**न्याय्यं वा विपरीतं वा पञ्चैते तस्य हेतवः ॥१५॥**

मनुष्य शरीर, वाणी व मन या द्वारा जे जे विहित वा निषिद्ध कर्म करतो त्याचे हे पाच हेतु आहेत.

**तत्रैवं सति कर्तारमात्मानं केवलं तु यः ।**
**पश्यत्यकृतबुद्धित्वान्न स पश्यति दुर्मतिः ॥१६॥**

असे असताना, संस्कारविरहित बुद्धि असल्याने जो शुद्ध आत्म्यालाच कर्ता समजतो तो मूढ होय, त्याला यथार्थ समजत नाही.

तार्किक व व्यावहारिक लोक आत्मा हा कर्ता आहे असे म्हणतात. तार्किक म्हणजे गौतमादि. हे अत्यंत बुद्धिमान खरे, पण त्यांनीही आत्मस्वरूप व्यवहारदृष्टीनेच सांगितले आहे. अत्यंत बुद्धिमान असला तरी त्याला आपले आईवडील कळत नाहीत. इतकेच नव्हे, तर आईवडीलही लोकांच्या सांगण्यावरूनच ' हा आपला मुलगा आहे ' असे मानतात. याला उदाहरण प्रत्यक्ष श्रीकृष्णाचे आहे. तो देवकीच्या पोटी जन्मला असता यशोदा त्याला आपला मुलगा मानीत होती. म्हणून येथे आप्तवाक्य हेच प्रमाण मानावे लागते. त्याचप्रमाणे आत्म्याचे बाबतीतही तर्कापेक्षा वेदांताचेच मत प्रमाण मानले पाहिजे. वेदांताखेरीज इतर कशानेही आत्म्याच्या स्वरूपाचा बोध होत नाही. म्हणून आत्म्याला " वेदैकसमधिगम्य " म्हणतात. मीमांसकांनी विचार सांगावा, कोणता शब्द साधु व कोणता असाधु हे व्याकरणाने दाखवून द्यावे. स्त्रियांकडे वात्सल्य व पुरुषांकडे पराक्रम अशी वाटणी केलेली आहे. एखादा पुरुष वत्सल असेल किंवा एखादी स्त्री झांशीची राणी निपजते. पण हे अपवाद. त्याचप्रमाणे वेदांत हा आत्म्याचा प्रांत. वेदांतदृष्टीने ' आत्मा कर्ता ' हे मत अग्राह्य म्हणून तसे प्रतिपादन करणाऱ्या तार्किक व व्यावहारिकांना उद्देशून ' दुर्मति ' असे म्हटले आहे.

**यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते ।**
**हत्वापि स इमाँल्लोकान्न हन्ति न निबध्यते ।।१७।।**

ज्याच्या ठिकाणी मी कर्ता असा अहंकार नाही, ज्याची बुद्धि अलिप्त असते, त्याने जरी या सर्व जगाला मारले तरी तो कोणालाही मारीत नाही म्हणून तो बांधलाही जात नाही.

एकदा कर्तृत्वाचे ज्ञान झाले व आत्मा आणि अहंकार किंवा अंतःकरण हे वेगवेगळे आहेत असा प्रत्यक्षानुभव आला, की तो पुरुष

पूर्ण होतो. अशा पुरुषाने सर्व लोकांना मारले तरी मारलेच नाही असे ठरते. त्यापासून त्याला बंधही निर्माण होत नाहीत.

अर्जुन— खुनी व दरवडेखोर पुराव्या अभावी सुटतात. पण ' अथ प्रच्छन्नपापानां शास्ता वैवस्वतो यमः ' या न्यायाने यमाच्या तावडीतून कोणी सुटू शकत नाही. ज्ञान्याने मारले तरी पुराव्याच्या अभावी ' न हन्ति ' असे सिद्ध करता येईल. पण ' न निबध्यते ' हे कसे जमेल?

भगवान— एक मोठा धोंडा दोरीला बांधून ठेवला. ती दोरी तुटून दगड खाली पडला व त्याखाली अनेक किडे मेले तर दगड गुन्हेगार ठरत नाही. कारण दगड जड आहे. ज्ञानी पुरुष देहेन्द्रियावरचे तादात्म्य पूर्णपणे सोडून देतो. ' मी सच्चिदानंदघन परब्रह्म आहे ' असे तो म्हणतो व तसे प्रत्यक्ष पाहतो. आत्मा बाजूला काढला की देहेन्द्रियादिक पाषाणाप्रमाणेच जड नव्हेत काय? म्हणून त्यांनी प्रारब्धाच्या वेगात किंवा संस्कारवशात् चांगल्या वा वाईट क्रिया केल्या तरी त्यामुळे त्याला बंध निर्माण होत नाहीत. शंकर प्रलयकाळी संहार करीत असतो. परशुरामाने पित्राज्ञा प्रमाण मानून मातेचा वध केला. २१ वेळा पृथ्वी निःक्षत्रिय केली. पण तो ज्ञानी असल्याने त्या क्रिया त्याच्या आत्म्याहून वेगळ्या असलेल्या जड देहाकडून झाल्या होत्या. म्हणून त्याला पापपुण्य लागले नाही.

**ज्ञानं ज्ञेयं परिज्ञाता त्रिविधा कर्मचोदना ।**
**करणं कर्म कर्तेति त्रिविधः कर्मसंग्रहः ॥ १८॥**

ज्ञान, ज्ञेय व ज्ञाता हे कर्माचे प्रवर्तक आहेत. करण ( इंद्रिये ) कर्म व कर्ता असा तीन प्रकारचा कर्मसंचय आहे म्हणजे कर्माचा आश्रय आहे.

घट तयार करायला कुंभार, त्याचे चाक व माती लागते. प्रत्येक ठिकाणी असे कर्ता कर्म व करण असतात. सर्व जगच असे त्रिपुटीने

भरलेले आहे. आत्म्याला कर्मसंबंध नाही. तो निर्गुण असल्यामुळे क्रिया-कारकाना त्रिगुणात्मकत्व आहे.

**ज्ञानं कर्म च कर्ता च त्रिधैव गुणभेदतः ।**
**प्रोच्यते गुणसंख्याने यथावच्छृणु तान्यपि ॥१९॥**

सांख्य मताप्रमाणे ज्ञान, कर्म व कर्ता ही तीन देखील गुणभेदाने तीन प्रकारची आहेत. ते जसेच्या तसे सांगतो ते ऐक.

कर्ता, कर्म आणि करण या तीन्हींचे तीन प्रकार आहे. एखादा माणूस दुसऱ्याला मारताना सात्त्विकाचा तामस होतो. दुसऱ्याचे उपटताना तामसाचा राजस होतो. ज्ञान संपादन करीत असता राजसाचा सात्त्विक होते. असे त्यात बदल होतात. पण ' अतति सातत्येन वर्तते सः आत्मा ' अशी आत्म्याची व्याख्या आहे. आत्मा नेहमी एकरूपाने राहतो. बदल होतात ते अंतःकरणात. आत्म्यात बदल होतात असे मानले तर कांहीं आत्मे कायमचे सात्त्विक, कांही राजस व कांही तामस मानावे लागतील. आत्म्यात विकार व प्रकार मानले तर तो इतर पदार्थाप्रमाणेच होईल. पण आत्म्यात प्रकार वा विकार नाहीत.

सांख्य मताप्रमाणेही आत्मा अकर्ताच आहे. कारण कर्ता, कर्म व करण यापैकी कशातच त्याला घालता येत नाही. ' नाभुक्तं क्षीयते कर्म कल्पकोटीशतैरपि ' असा नियम असला तरी जे लोक अंतःकरण व आत्मा एकच मानतात त्यांना ती भोगावी लागतात. ज्ञान्याला पृथग् रूपाने ज्ञान असल्यामुळे त्याचा बंध नसतो. चांगल्या गोष्टी केल्या की आपणास हर्ष व वाईट केल्या की पश्चात्ताप होतो. पन्नास रुपयाचे पातळ ' तुम्हाला म्हणून चाळीस रुपयाला देतो ' असे दुकानदाराने सांगितले की आपणास आनंद होतो. वाटेत दुसरा दुकानदार भेटला व त्याने सांगितले की ' याची खरी किंमत तीस रुपये आहे ' की लगेच खेद होतो. ज्ञान्याला या दोन्ही वृत्ती नसतात. म्हणून ज्ञानसाक्षात्कारासाठी सदैव सिद्ध असले पाहिजे.

संसार केव्हाच संपत नाही. एकापुढे एक सारखे चालू असते. शिक्षण झाले की नोकरी, नंतर लग्न पुढे मूल, पुनः मुलाचे शिक्षण, लग्न, नातवंड, अशी ही न संपणारी कथा आहे. मेल्यानंतरही क्रिया कर्मांतर, समाचार या गोष्टी चालूच राहतात. साक्षात्कार झाला तरच या संसाराचा शेवट होतो.

**सर्वभूतेषु येनैकं भावमव्ययमीक्षते ।**
**अविभक्तं विभक्तेषु तज्ज्ञानं विद्धि सात्त्विकम् ॥२०॥**

भिन्न भिन्न असलेल्या सर्व भूतांच्या ठिकाणी एकच, अविनाशी व अविभक्त असा आत्मा ज्याच्या योगाने पाहतो ते ज्ञान तू सात्त्विक असे समज.

शरीरे जरी अनेक असली तरी आत्मा एकच आहे. हे ज्ञान सात्त्विक होय.

**पृथक्त्वेन तु यज्ज्ञानं नानाभावान्पृथग्विधान् ।**
**वेत्ति सर्वेषु भूतेषु तज्ज्ञानं विद्धि राजसम् ॥२१॥**

पण ज्या ज्ञानाने सर्व भूतांच्या ठिकाणी हे भिन्न भिन्न आत्मे आहेत, असा भेदकारक बोध होतो ते राजस ज्ञान असे जाण.

जगात एक शरीर दुसऱ्यासारखे नाही. एक काळा तर एक गोरा. एक उंच तर दुसरा ठेंगू. मनांतही सुष्ट-दुष्ट असे व्यक्तीगणिक भेद आढळतात. तसेच एक आत्मा दुसऱ्यासारखा नाही. एक सुखी तर दुसरा दुःखी असा भेद स्पष्ट आढळून येतो. म्हणून वेदान्त्याशिवाय इतर सर्व दर्शनकार आत्मे नाना मानतात. या सर्व दर्शनकारात सांख्य प्रधान आहेत. ते म्हणतात, 'पुरुषस्तु पुष्करपलाशवत् निर्लेपः प्रकृतिस्तु कर्त्री' आत्मा अकर्ता व असंग आहे. पण तो एक नसून नाना आहेत. यावर वेदांती म्हणतात, "तुम्ही तार्किकांचे युक्तीने निराकरण करून आत्मा असंग व अकर्ता ठरविला मग तो भिन्नभिन्न कसा असेल? जर

तो कर्ता असेल तर कर्तृत्वामुळे त्यात प्रकार पडतील. उदा. चार मुलींनी चार भाकरी केल्या तर एकीची जाड, दुसरीची पातळ, तिसरीची करपलेली तर चौथीची पिठुळलेली असे फरक पडतील. पण कोणी भाकरीच केल्या नाहीत तर फरक तरी कसे पडतील ? म्हणून अकर्ता असलेल्या आत्म्यात नानात्व संभवत नाही." सांख्य हे प्रधान-मल्ल समजले जातात. त्यांचाच असा पराभव केल्यावर बौद्ध, अर्हत, चार्वाक, नैय्यायिक यांचा पराभव अनायासेच झाला हे सांगणे नकोच.

**यत्तु कृत्स्नवदेकस्मिन्कार्ये सक्तमहैतुकम् ।**
**अतत्त्वार्थवदल्पं च तत्तामसमुदाहृतम् ॥२२॥**

पण एका कार्याच्या ठिकाणी पूर्णत्वाने तेच सारसर्वस्व समजून जडलेले प्रमाणरहित ( वेदबाह्य ) तत्त्वार्थशून्य व क्षुद्र असे जे ज्ञान त्याला तामस ज्ञान म्हणतात,

आत्मा हा देहच आहे असे चार्वाक म्हणतो. याला हेतु कांहीच देत नाही. मी सांगतो म्हणून तसे माना असे तो म्हणतो. देह म्हणजेच आत्मा हे तामस ज्ञान होय.

**नियतं सङ्गरहितमरागद्वेषतः कृतम् ।**
**अफलप्रेप्सुना कर्म यत्तत्सात्त्विकमुच्यते ॥२३॥**

आसक्तिरहित, प्रीति वा द्वेष यांनी वर्जित असे फलकांक्षा न धरणाऱ्या मनुष्याने केलेले जे विहित कर्म त्याला सात्त्विक कर्म म्हणतात.

स्नान, संध्यावंदन, पंचमहायज्ञ ( वैश्वदेव ) इत्यादी कर्मे ' रोजच्या रोज करा ' म्हणून सांगितलेली आहेत. ती कर्तव्य म्हणून करायची. त्याचे फळ मिळावे अशी अपेक्षा करायची नाही. अशी कर्मे सात्त्विक असतात. त्यांचा जोर इहलोकी नसला तरी परलोकी फारच असतो. येथे अष्टौप्रहर काम करून कोटयावधि रुपये मिळविले तरी शेवटी तुमच्याबरोबर त्यातील पैसुद्धा येणार नाही. पण ' धर्मो मित्रं मृतस्यच '

या न्यायाने सर्व सात्त्विक कर्मे त्याचेबरोबर जातात. संध्यावंदन त्रिकाळ करा. निदान दोनदा तरी कराच असा शास्त्रकारांचा आग्रह आहे. संध्येमध्ये गुरूला नमस्कार असतो. सूर्यस्तुति असते. तीन अर्घ्य द्यावयाचे. उशीर झाल्यास एक अधिक द्यायचा व कमीतकमी दहा गायत्री जप करायचा असतो.

आसत्यलोकात् पातालात् आलोकालोकपर्वतात् ।
ये सन्ति ब्राह्मणाः देवाः तेभ्यः नित्यं नमो नमः ॥

असा सर्वांना नमस्कार करायचा. या साऱ्या पुण्यकारक गोष्टी नाहीत का?

देवलऋषी म्हणतात की संध्यावंदन केल्यास सर्वार्थसिद्धि होतात व न केल्यास ' संध्याहीनो नित्यं अशुचिः सर्वकर्मभ्यः अनर्हः '. कांहीं लोक म्हणतात ' आचमन करून थोडे थोडे पाणी पिण्यापेक्षा एकदम पेलाभर पिऊन टाकावे म्हणजे झाले. ' अशा लोकांना, डॉक्टरानी आठ दिवसाचे औषध दिले ते रोज थोडे थोडे घेण्यापेक्षा एकदमच घेतले तर चालेल का? असे विचारावे.

**यत्तु कामेप्सुना कर्म साहंकारेण वा पुनः ।**
**क्रियते बहुलायासं तद्राजसमुदाहृतम् ॥२४॥**

फलाची इच्छा धरून, मी करतो अशा अहंकाराने किंवा शरीराला अतिशय कष्ट देऊन केलेले कार्य राजस होय.

**अनुबन्धं क्षयं हिंसामनपेक्ष्य च पौरुषम् ।**
**मोहादारभ्यते कर्म यत्तत्तामसमुच्यते ॥२५॥**

जे कर्म बंध निर्माण करते, ज्यात क्षय असतो, विनाकारण हिंसा असलेले, बलाबलाचा विचार न करता केवळ अविवेकाने व दुराग्रहाने आचरले जाते ते कर्म तामस होय.

दुर्योधनाने पांडवाशी मांडलेले महायुद्ध हे त्याचे ठळक उदाहरण आहे. या युद्धामुळे मानवांची विनाकारण हिंसा, कुलक्षय असे घोर परिणाम झाले. स्वतःचे अपुरे बल लक्षात न घेता दुराग्रहाने युद्ध पुकारून त्याने स्वतःचा व आपल्या पक्षाचा संपूर्ण नाश करून घेतला.

**मुक्तसङ्गोऽनहंवादी धृत्युत्साहसमन्वितः ।**
**सिद्ध्यसिद्ध्योर्निर्विकारः कर्ता सात्त्विक उच्यते ॥२६॥**

आसक्ति व अहंकाररहित, धैर्य व उत्साह यांनी युक्त, कर्माची सिद्धि वा असिद्धि यासंबंधी विकाररहित अशा कर्त्याला सात्त्विक कर्ता म्हणतात.

जगातील प्रत्येक व्यक्तीला 'अहं अस्मि' या रूपाने आत्म्याचे ज्ञान आहे, पण जो तो आत्मा वेगवेगळ्या वस्तूला म्हणतो. म्हणून मत-मतांतरे आहेत एवढेच. उठल्यापासून निजेपर्यंत असंख्य ज्ञाने होतात व जातात. सकाळी वाचलेल्या वर्तमानपत्रातील खून मारामाऱ्या व राज-कारणाच्या वार्ता वाचल्या जातात आणि लगेच त्यांचे विस्मरणही होते. वर्तमानपत्र आपल्या नांवाप्रमाणे फक्त वर्तमानकाळाची माहिती देते. भूत भविष्याबद्दल ते काही सांगू शकत नाही. दिवसभर होणाऱ्या ज्ञानापैकी नऊदशांश ज्ञाने राजस किंवा तामसच असतात. सात्त्विक ज्ञानासाठी मुद्दाम बुद्धिपुरःसर प्रयत्न करावा लागतो.

सात्त्विक कर्त्याला फलाची इच्छा नसते, अहंकार नसतो. संकटाने त्याचे धैर्य खचत नाही वा कार्य तडीला गेले तरी तो हुरळून जात नाही. अपयश आले तरी हताश होत नाही. घराचा कर्ता सात्त्विक असेल तर सर्व घर सुंदर बनते. राजा सात्त्विक असेल तर त्याचे राज्यही सुंदर प्रकारे चालते. श्रीकृष्ण हे याचे उत्कृष्ट उदाहरण आहे. तो अर्जुनाचे सारथ्य स्वतःच्या लाभासाठी करीत नाही किंवा त्याबद्दल अभिमानही बाळगत नाही. अर्जुनासारखा धनुर्धर गर्भगळित झाला. पण

श्रीकृष्ण थोडासुद्धा विचलित झाला नाही. उलट अर्जुनाला उपदेश करून विजय संपादन करून दिला. पण विजय मिळाला म्हणून त्याने जल्लोशही केला नाही.

सात्त्विक कर्त्याचा खात्रीपूर्वक उत्कर्ष होतो. प्रारब्धामुळे उत्कर्ष झाला नाही किंवा सर्व आयुष्य दैन्यात गेले तरी शेवट खचीतच गोड होतो.

**रागी कर्मफलप्रेप्सुर्लुब्धो हिंसात्मकोऽशुचिः ।**
**हर्षशोकान्वितः कर्ता राजसः परिकीर्तितः ॥२७॥**

अभिलाषी, कर्मफळाची इच्छा करणारा, लोभी, दुसऱ्याला पीडा देणारा, शुद्धिविरहित, (यशापयशामुळे) हर्षशोकयुक्त अशा कर्त्याला राजस कर्ता म्हणतात.

**रागी**— अधिकारपदे, मंत्रीपदे अशा व्यवहारांतील जागा व दीक्षित, अग्निहोत्री अशी परमार्थातील पदे मिळावी म्हणून सतत धडपडणारा व मिळाली की सत्कार करवून घेणारा तो रागी.

**कर्मफलप्रेप्सु**— कोणतेही काम फुकट करणार नाही. त्यांतून थोडातरी लाभ होणार असेल तरच त्यात लक्ष घालणारा.

**लुब्ध**— लोभी. (पगार भरपूर असूनही लोकांना नाडवून जास्तीत जास्त लाच उचलणारा) अशा माणसाला समाधान नसते. एक दिवस असे शंभर रुपये मिळाले व दुसरे दिवशी पन्नासच हाती लागले तरी दुःखी होतो. वास्तविक हे पन्नास तरी फुकटचेच असतात मग आनंद मानावयास काय हरकत आहे? पण लोभ त्याला दुःख देतो.

**हिंसात्मक**— शरीर, वाणी व मनाने दुसऱ्याला पीडा देणारा. अशा माणसाकडे कोणी कामासाठी गेला व ते काम पाच मिनिटात होण्यासारखे असले तरी त्याला तो पाच तरी हेलपाटे घालायला लावणारच. अधिकारपदावर असेल तर हाताखालच्या लोकांना व त्याजकडे

कामासाठी येणाऱ्या लोकांना लागेल असे बोलतो. नेहमी दुसऱ्याचे वाईट चिंतितो.

**अशुचि**- अपवित्र-सरळ मार्गाने न जाता आडमार्गाने व्यवहार करणारा.

**हर्षशोकान्वित**- मनासारखे झाले की हर्ष व जरा विरुद्ध झाले की शोक करणारा.

ही सर्व राजस कर्त्याची लक्षणे आहेत.

**अयुक्तः प्राकृतः स्तब्धः शठो नैष्कृतिकोऽलसः ।**
**विषादी दीर्घसूत्री च कर्ता तामस उच्यते ।।२८।।**

नियमरहित, शास्त्रसंस्कारहीन बुद्धीचा, कोणाहीपुढे नम्र न होणारा, कपटी, ज्याला दुसऱ्याचे बरे पाहवत नाही असा, आळशी, सदा असंतुष्ट असणारा व दीर्घसूत्री अशा कर्त्यास तामस कर्ता म्हणतात.

**अयुक्त**- काम करण्याची योग्यता व कर्तव्याची जाणीव नसलेला.

**प्राकृत**- शास्त्रसंस्काररहित; कोणी परमार्थाच्या गोष्टी सांगू लागला तर हा उठून जातो.

**शठ**- फसविणारा-वंचना करणारा-लुच्चा.

**नैष्कृतिक**- आपण फार संभावित आहोत असे भासवून केसाने गळा कापणारा. याला दुसऱ्याचे चांगले झालेले पाहवत नाही.

**अलस**- आळशी. आवश्यक कामे करायचाही कंटाळा करतो.

**विषादी**- सदा असंतुष्ट. याचे कधी समाधान होत नाही.

**दीर्घसूत्री**- तासाच्या कामाला दिवस व दिवसाच्या कामाला महिना लावणारा.

अशा गुणांनी संपन्न असणाऱ्या कर्त्यास तामस म्हणतात.

**बुद्धेर्भेदं धृतेश्चैव गुणतस्त्रिविधं शृणु ।**
**प्रोच्यमानमशेषेण पृथक्त्वेन धनंजय ।।२९।।**

हे धनंजया, बुद्धि व धृति म्हणजे धैर्य, यातही सात्त्विक, राजस व तामस असे तीन प्रकार आहेत ते संपूर्णपणे सांगतो ते ऐक, आणि ग्राह्याग्राह्यत्वहि सांगतो.

**प्रवृत्तिं च निवृत्तिं च कार्याकार्ये भयाभये ।**
**बन्धं मोक्षं च या वेत्ति बुद्धिः सा पार्थ सात्त्विकी ॥३०॥**

हे पार्था जी बुद्धि ( नित्य व नैमित्तिक ) करणीय ( काम्य व निषिद्ध ) व अकरणीयांच्या ठिकाणी प्रवृत्ति व निवृत्ति व त्यापासून होणारे भय, अभय, बंध व मोक्ष हे जाणते ती बुद्धि सात्त्विक होय.

बुद्धि सात्त्विक असली की तो सात्त्विक कर्ता होतो. मरीच्यादिकांनी सांगितलेला प्रवृत्तिमार्ग, निवृत्ति म्हणजे संन्यास मार्ग, कार्य कोणते व अकार्य कोणते, बंध म्हणजे विषयपारतंत्र्य व मोक्ष म्हणजे अज्ञाननिवृत्ति, भय कशात आहे व अभय कशाने मिळते हे सर्व जी जाणते ती सात्त्विक बुद्धि होय.

**यया धर्ममधर्मं च कार्यं चाकार्यमेव च ।**
**अयथावत्प्रजानाति बुद्धिः सा पार्थ राजसी ॥३१॥**

धर्म कोणता व अधर्म कोणता हे कळते, पण धर्म पाळला तर उत्तम फळ मिळेलच अशी खात्री नसते, त्याचप्रमाणे कार्य कोणते व अकार्य कोणते याबद्दलही मनात संशय असतो, अशा बुद्धीला राजस बुद्धि म्हणतात. सर्वसामान्य मानवांची बुद्धि या प्रकारची असते.

**अधर्मं धर्ममिति या मन्यते तमसावृता ।**
**सर्वार्थान्विपरीतांश्च बुद्धिः सा पार्थ तामसी ॥३२॥**

अज्ञानाने आच्छादलेली बुद्धि धर्माला अधर्म व अधर्माला धर्म, सताला असत् व असताला सत् म्हणजे सर्व अर्थांना विपरीत भासविते, ती बुद्धि तामस होय.

धृत्या यया धारयते मनःप्राणेन्द्रियक्रियाः ।
योगेनाव्यभिचारिण्या धृतिः सा पार्थ सात्त्विकी ॥३३॥

हे पार्था, योगाला सोडून न जाणाऱ्या ज्या धृतीने ( धैर्याने ) मनुष्य मन, प्राण व इंद्रिये यांच्या क्रिया आवरून धरीत असतो ती धृती सात्त्विक होय.

योग म्हणजे समाधि, जप किंवा ध्यान. या गोष्टी जे करीत नाहीत त्यांना त्यातील अडचणींची कल्पना येणार नाही. पण एकदा ध्यान करायचेच अशा निश्चयाने जो बसेल त्याला अडचणी समजू लागतील. एकदा मन काशीला जाते. तिकडून खेचून आणावे तर ते रामेश्वरला पळते. मन स्थिर होत नाही त्यामुळे वेळ वाया गेला असे वाटते. पण शास्त्रकार म्हणतात, ' मनाला आवरण्याचा प्रयत्न फुकट जात नाही. कठीण नारळ फोडताना दहा वेळा आपटावा लागतो. दहाव्या घावाला फुटला तर पहिले नऊ घाव फुकट गेले असे समजता येईल का? प्रत्येक घावाचा थोडा थोडा परिणाम झाला तेव्हाच दहाव्या घावात परिणाम दिसून आला. त्याचप्रमाणे ध्यानाचे प्रयत्नही फुकट जात नाहीत.

ध्यानाला अगर जपाला बसले की, नेमके आपले मित्र, शेजारी पाहुणे, दूधवाला, पोस्टमन यापैकी कोणीतरी टपकते. मुले गोंधळ करतात, अभ्यासांतील प्रश्न विचारतात. सारांश, तुमची सत्त्वपरीक्षा चालू असते. अशा वेळी नेटाने बसून रहायला धैर्य असावे लागते. तुम्ही निश्चयाने बसून राहिलात, प्रयत्न सोडला नाहीत तर ईश्वरच मदतीस धावून येतो. ईश्वराच्या सहाय्याशिवाय केवळ स्वतःच्या हिंमतीवर मनावर विजय मिळविणे सर्वथा अशक्य आहे. ध्यानाचा प्रयत्न सतत चालू ठेवला की, एखाद्या वेळी मन असे एकाग्र होते की, तसा बहारीचा क्षण आपण पूर्वी कधीच अनुभवलेला नसतो. मग मात्र मनाला ध्यानाची

गोडी लागते. ते अडथळे आणीत नाही, हे मनाला, प्राणाला व इंद्रियांना आवरण्याचे धैर्य आहे ते सात्विक धैर्य होय.

**यया तु धर्मकामार्थान्धृत्या धारयतेऽर्जुन ।**
**प्रसङ्गेन फलाकाङ्क्षी धृतिः सा पार्थ राजसी ॥३४॥**

आणि हे अर्जुना ज्या धृतीच्या योगाने मनुष्य धर्म, अर्थ व काम यांचे अवलंबन करतो, ती प्रसंगवशात् फलाची आकांक्षा धरणारी धृति राजस होय.

जो उत्कृष्ट कर्ता असतो तो जगांतील उत्कृष्ट पदार्थच उचलतो. उत्कृष्ट पदार्थ सहजासहजी मिळत नाहीत. त्यासाठी प्रयत्न व पैसा खर्च करावा लागतो. राजस धैर्य अंगी असलेला जास्तीत जास्त धन मिळवितो व तेही न्यायाने.

**यया स्वप्नं भयं शोकं विषादं मदमेव च ।**
**न विमुञ्चति दुर्मेधा धृतिः सा पार्थ तामसी ॥३५॥**

दुर्बुद्ध मनुष्य जिच्या योगाने निद्रा, भय, शोक, खेद आणि मद ही सोडीत नाही, तिला तामस धृति म्हणतात.

स्वप्न म्हणजे झोप. एखादी स्त्री सकाळी आठ वाजेपर्यंत झोपली, घरांतील लोक आपआपले व्यवहार करू लागले, लख्ख ऊन पडले व आता उठणे आवश्यक आहे हे कळत असूनही ती लोळत राहिली, तर ती धीराचीच स्त्री म्हटली पाहिजे. असले धैर्य हे तामस होय. त्याचप्रमाणे भय, शोक, विषाद, मद हे गुण मरेपर्यंत न सोडणे हेही तामस धैर्यच होय.

**सुखं त्विदानीं त्रिविधं शृणु मे भरतर्षभ ।**
**अभ्यासाद्रमते यत्र दुःखान्तं च निगच्छति ॥३६॥**

अर्जुना, सुखसुद्धा तीन प्रकारचे आहे. त्याचे विवेचन ऐक. ज्याच्या ठिकाणी अभ्यासाच्या योगाने जीव रममाण होतो व ज्या

योगाने जीवाच्या ( जीवपणाच्या ) दुःखाचा नाश खात्रीने होतो, त्याला सुख म्हणतात.

यत्तदग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम् ।
तत्सुखं सात्त्विकं प्रोक्तमात्मबुद्धिप्रसादजम् ॥३७॥

जे आरंभी विषासारखे पण परिणामी अमृतासारखे, जे आत्मबुद्धि प्रसादाने उत्पन्न होते, त्यास सात्त्विक सुख म्हणतात.

सात्त्विक सुख प्रथम विषासारखे वाटले तरी शेवटी अमृतासारखे ठरते. हे सुख कोणत्याही पदार्थाखेरीज मिळू शकते. पण ते प्राप्त होई-पर्यंत इतका अभ्यास करावा लागतो, इतका त्रास सहन करावा लागतो की नको ते आत्मसुख असे वाटू लागते. तो नाद कायमचा सोडून द्यावा असे वाटते. कारण खुद्द देवच साधकाच्या मार्गात 'देवा दारादिरूपेण' प्रचंड विघ्ने आणतात. त्याच्या बायका मुलात शिरून साधनात अडथळे आणतात. साक्षात्कारसंपन्न झाल्यास साधक आपल्याहून श्रेष्ठ होईल असा देवांना हेवा वाटत असावा, म्हणून ते विघ्ने आणीत असले पाहिजेत. आत्मसुख हेच खरे सात्त्विक सुख होय.

विषयेन्द्रियसंयोगाद्यत्तदग्रेऽमृतोपमम् ।
परिणामे विषमिव तत्सुखं राजसं स्मृतम् ॥३८॥

विषय व इंद्रिये यांच्या संयोगापासून उत्पन्न होणारे, आरंभी अमृता-सारखे पण परिणामी विषासारखे असे जे सुख ते राजस म्हटले आहे.

एकाने जिलबी आवडते, शिवाय ती फुकट मिळाली म्हणून तिचे आकंठ सेवन केले. खाताना जणू अमृतसेवन करीत आहो असा त्याला आनंद होत होता. पण थोड्या वेळाने पोट दुखू लागले. प्राणांतिक वेदना होऊ लागल्या. विषय व इंद्रियांच्या सन्निकर्षाने मिळणारी सर्व सुखे अशीच असतात. हीच राजस सुखे. एक वेळ राजस सुखाचा आस्वाद घेतला तरी चालेल. पण तामस सुखाच्या वाटेस कदापि जाऊ नये.

**यदग्रे चानुबन्धे च सुखं मोहनमात्मनः ।**
**निद्रालस्यप्रमादोत्थं तत्तामसमुदाहृतम् ।।३९।।**

आरंभी आणि परिणामी अंतःकरणाला मोह पाडणारे निद्रा, आळस आणि प्रमाद यापासून उत्पन्न होणारे सुख तामस होय.

दिवसच्या दिवस आळसात घालवायचा, झोपून राहण्याचा उच्चांक मोडावा, प्रमाद करावे व त्यातच आनंद मानावा, हे तामस सुखाचे लक्षण होय. एकाला महत्त्वाच्या कामासाठी कोर्टात जाणे जरूरीचे होते. पण आळसाने तो गेला नाही. 'उद्या जाऊ' असा विचार करून आराम केला. दुसरे दिवशी कोणी निवर्तल्याने कोर्टाला सुट्टी पडली. नंतर आला रविवार आणि सोमवारपासून उन्हाळ्याची सुट्टी सुरू झाली. एक दिवस आळसाचे सुख घेतले पण महत्त्वाचे काम झालेच नाही. प्रमाद म्हणजे अनवधानता. ही तामस सुखे प्रथम आणि शेवटी आत्म्यास मोह पाडणारी व घातक असतात.

**न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः ।**
**सत्त्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभिः स्यात्त्रिभिर्गुणैः ।।४०।।**

या प्रकृतिजन्य तीन गुणांपासून मुक्त असा कोणताही प्राणी पृथ्वीवर, स्वर्गात अथवा देवामध्येही नाही.

कर्म, कर्ता, धृति, सुख यांचे सात्त्विक, राजस व तामसअसे तीन तीन प्रकार सांगितले. पण जगांतील सर्वच पदार्थ असे त्रिगुणात्मक आहेत. जो उत्पन्न होतो त्यामागे हे त्रिगुण लागतात. जो उत्पन्नच होत नाही, तो आत्मा मात्र त्रिगुणातीत आहे.

**ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्राणां च परंतप ।**
**कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः ।।४१।।**

हे शत्रुतापना, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांची कर्मे स्वभावसिद्ध गुणांच्या योगाने विभागलेली आहेत.

कांही लोक म्हणतात, आम्ही हवी ती कर्मे करू. ती निष्काम केली म्हणजे झाले. मग हरकत काय आहे ? पण हे त्यांचे म्हणणे योग्य नाही. ज्याला जी जी कर्मे सांगितली आहेत त्यालाच विहित कर्मे म्हणतात. (उदा. ब्राह्मणांना स्नानसंध्या, वेदपठण, क्षत्रियांना राज्याचे रक्षण, वैश्यांना व्यापार व शूद्रांना सेवा) ही विहित कर्मे निष्कामबुद्धीने केली तरच त्याचा लाभ घडतो.

मृत्युसमयी जो गुण प्रकट झाला असेल त्यावरून ही विहित कर्मे ठरतात. सत्त्वोत्कर्ष झाला असेल तर तो ब्राह्मण, सत्त्वरजामुळे; क्षत्रिय, तमरजामुळे वैश्य व केवळ तमाचा उत्कर्ष झाला असेल तर तो शूद्र होतो. परीक्षेच्या अवधीतच विचारलेली गणिते सुटली पाहिजेत. घरी आल्यावर उत्तर सुचून काय फायदा ? मरणकाळ ही देखील एक परीक्षा आहे, त्या वेळी चांगले गुण प्रकट झाले पाहिजेत. म्हणूनच ' स्वभावप्रभवैः ' असे म्हटले आहे. स्वभाव म्हणजे जन्म जन्मकाळी प्रकट होणारा पूर्व जन्मसंस्कार.

**शमो दमस्तपः शौचं क्षान्तिरार्जवमेव च ।**
**ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम् ॥४२॥**

शम, दम, तप, शुद्धि, क्षमा, सरळपणा, ज्ञान, अनुभवयुक्त ज्ञान ( विज्ञान ) आणि आस्तिक्य बुद्धि ही ब्राह्मणाची स्वभावज कर्मे आहेत.

शम म्हणजे अंतरेन्द्रियाचा—मनाचा निग्रह, संयम. दम म्हणजे बाह्येन्द्रिये— हात, पाय इ. ताब्यात ठेवणे तप— आपल्या धर्माप्रमाणे वागणे. शौच— अंतर्बाह्य शुद्धता. क्षान्ति म्हणजे क्षमा. आर्जव म्हणजे सरळपणा. ज्ञान— आत्मज्ञान. विज्ञान— आत्म्याचे प्रत्यक्ष ज्ञान. आणि आस्तिक्य म्हणजे परमेश्वरावरील विश्वास. ही ब्राह्मणाची विहित कर्मे होत. एखाद्या शूद्राला शमदमादि साधने ब्राह्मणापेक्षा चांगली जमत

असतील तर ती त्याने करू नयेत असा त्याचा अर्थ नव्हे. जी विचार-रूप कर्मे आहेत, ती करण्याचा सर्वांना अधिकार आहे. मात्र आचाररूप कर्मे ज्याची त्यांनीच केली पाहिजेत.

**शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम् ।**
**दानमीश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजम् ॥४३॥**

शौर्य, तेज ( पाणीदारपणा ) धैर्य, दक्षता ( प्रत्युत्पन्नमति ) युद्धात माघार न घेणे, मुक्त हस्ताने दान देणे व ईश्वरभाव म्हणजे शासन, ( आश्रितांचे पालनपोषण व नियंत्रण करणे ) ही क्षत्रियांची स्वभावज ( विहित ) कर्मे होत.

**कृषिगौरक्ष्यवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजम् ।**
**परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजम् ॥४४॥**

शेती, पशुपालन व व्यापार करणे ही वैश्यांची व ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या त्रैवर्णिकांची सेवारूपी कर्मे करणे, हे शूद्रांचे स्वाभाविक कर्म आहे.

**स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः ।**
**स्वकर्मनिरतः सिद्धिं यथा विन्दति तच्छृणु ॥४५॥**

आपआपल्या कर्मामध्ये पूर्णपणे रत असलेल्या मनुष्याला वैराग्य प्राप्त होते. स्वकर्मरत पुरुष कोणत्या प्रकारे मोक्ष पावतो ते ऐक.

' आपआपली विहित कर्मे केल्यास फळ कोणते मिळते व त्यात तरतमपणा असतो का ? ' अशी अर्जुनाने शंका काढली. तेव्हा भगवा-नांनी सांगितले की विहित कर्मांचे फळ एकच असते व त्यात तरतमभाव मुळीच नसतो. ' संसिद्धि ' मिळणे म्हणजे ज्ञानाची पात्रता येणे. विहित कर्म केल्याने संसिद्धि मिळते, हेच त्याचे फळ होय.

एका गृहस्थाला चार मुलगे होते. एक बुद्धिवान, दुसरा कर्तृत्ववान, तिसरा धडपड्या तर चौथा निर्बुद्ध होता. वाटणी करताना तो गृहस्थ

मुलांना सारखेच देतो. पण अशक्त व निर्बुद्ध मुलाला दोन पैसे अधिकच देतो. त्याचप्रमाणे परमेश्वर बौद्धिक काम करणाऱ्या ब्राह्मणाला व सेवा करणाऱ्या शूद्राला सारखेच फल देतो. पण विहित कर्मे मात्र ज्याच्या त्याच्या योग्यतेनुरूप कमी अधिक जबाबदारीची सांगितलेली आहेत.

**यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम् ।**
**स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः ॥४६॥**

ज्याच्यापासून भूतमात्राची उत्पत्ती व रक्षण होते व ज्याने हे सर्व विश्व व्यापले आहे त्या ईश्वराची आपआपल्या कर्माने आराधना करून मनुष्य वैराग्य मिळवितो.

स्वकर्मे केली की ती सर्वात्मक ईश्वराची पूजा होते. या पूजेचा प्रसाद म्हणजे ज्ञान. ईश्वरापासूनच सर्व भूतांची प्रवृत्ति होते व ईश्वरानेच सर्व चराचर व्यापले असल्याने त्याचे ज्ञान व्हावयाचे असेल तर त्याचाच अनुग्रह असावा लागतो. पाषाणाला ज्ञान व्हावे असा ईश्वराने नुसता संकल्प केला तरी तो पाषाण ज्ञानी होतो. त्याच्या इच्छेने विषाचे अमृत व अमृताचे विष होऊ शकते.

विषमप्यमृतं क्वचित् भवेत् अमृतं वा विषमीश्वरेच्छया !

वनवासाची बारा वर्षे पूर्ण झाल्यावर यमधर्माने धर्मराजाची परीक्षा घेतली. यमाने त्याचे चारी भाऊ नेले व नंतर धर्माला अनेक प्रश्न विचारले. सर्व प्रश्नांची उत्तरे बरोबर मिळाल्याने यमधर्म संतुष्ट झाला व म्हणाला, ' तुझ्या चार बंधूपैकी एकाला परत करतो. तुला कोण हवा सांग.' धर्मराजाने नकुलाला जीवंत करण्याची विनंति केली. तेव्हां यमधर्म म्हणाला, ' धनुर्धर अर्जुन किंवा बलवान भीम हे तुला जास्त उपयोगी पडणारे असता नकुलाची मागणी का ? त्याचा तुला काय फायदा होणार ? '

धर्मराज— ' मी जिवंत राहिल्याने कुंती पुत्रवती राहील व नकुल जीवंत झाला की माद्रीही पुत्रवती होईल.'

या धर्माच्या उत्तराने यमधर्म संतुष्ट झाला व चारीही भावांना त्यानें जीवदान दिले. शिवाय अज्ञातवासात तुम्हाला कोणी ओळखणार नाही असा आणखी वर दिला. म्हणूनच पांडव विराटाकडे गेले व प्रत्येकाने मी धर्मराजाच्या पदरी होतो असे सांगितले. पाच पुरुष व एक स्त्री असे सांगत असूनही हे पाच पांडव व द्रौपदी असावी, असे कोणाच्याही मनात आले नाही.

विहित कर्मानुसार वागल्यामुळे पांडवाकडून भगवंताची नित्य पूजा होत होती. मरीची, अत्री, आंगिरस, पुलस्त्य, पुलहादि ऋषी विहित अशी वैदिक कर्मे करीत राहिल्याने ते परमेश्वरी कृपेस पात्र होऊन ज्ञानी झाले. ज्ञान होण्यापूर्वी सर्वांची कर्मे भिन्न, पण ज्ञानोत्तर मात्र सर्वांचे कर्म एकसारखेच असते.

कृष्णो भोगी शुकस्त्यागी नृपौ जनकराघवौ ।
वसिष्ठः कर्मनिरतः सर्वैते ज्ञानिनः समाः ॥

**श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।**
**स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥४७॥**

परक्याचा धर्म सुखाने आचरता आला आणि त्यापेक्षा आपला धर्म सदोष असला तरी तोच श्रेयस्कर आहे. स्वभावसिद्ध कर्म करणारा मनुष्य पाप पावत नाही.

संन्यासाचे मुख्य व गौण असे दोन प्रकार आहेत हे पूर्वी सांगितले आहे. पैकी मुख्य संन्यास सर्वांना घेता येत नाही. पण गौण संन्यास कोणीही घेऊ शकतो. गौण म्हणजे गुणापासून होणारा. मोहाने म्हणजे अज्ञान व अविवेकाने कर्म सोडल्यास तो तामस त्याग, कर्मक्लेश चुकविण्यासाठी केलेले पलायन म्हणजे राजस त्याग व ज्ञानपूर्वक विहित

कर्मे करून त्याचे फळ सोडणे हा सात्त्विक त्याग होतो व यालाच भगवंत गौण संन्यास म्हणतात व त्याच्याच प्रतिपादनार्थ आतापर्यंतचे शेहेचाळीस श्लोक सांगितले. सबंध गीतेत एकाच विषयाच्या प्रतिपादनार्थ इतका विस्तार कोठे केलेला नाही. त्यावरून या संन्यासास भगवंत किती महत्त्व देतात ते कळून येईल.

वाटेल ते कर्म करून ईश्वराला अर्पण करण्याने भागत नाही. शास्त्राने सांगितलेलीच कर्मे केली पाहिजेत. या संबंधात ज्ञानेश्वर माऊलीने एक सुंदर दृष्टांत दिला आहे– 'अगा पाणियाहूनि बहुवे। तुपी गूण कीर आहे ॥ परी मीना काय होय। असणे तेथ ॥

पाण्याहून तुपाची किंमत अधिक व पाण्यापेक्षा तूप चांगले असले तरी पाण्यातून काढून माशाला तुपात सोडले तर तो जिवंत राहणार नाही. उलट पाणी गढूळ असले तरी त्यातच आनंदाने तो क्रीडा करील. कारण पाणी हेच माशाचे जीवन आहे. स्वतःचे विहित कर्म हेच उत्कर्षदायी असते. म्हणून ते सोडून दुसऱ्याच्या कर्मात पडल्यास सर्वनाश होईल.

युद्ध हे क्षत्रियाचे विहित कर्म असता ते सोडून अर्जुन भिक्षावृत्ति स्वीकारण्याची भाषा करू लागला होता. म्हणून भगवंत त्याला सांगतात की, विहित कर्म कमी प्रतीचे असले तरी तेच कर व ईश्वराला अर्पण करून टाक. ईश्वरी दृष्टीने सर्व दोष नाहीसे होतात. कारण, विषाचे अमृत बनवावयाचे सामर्थ्य ईश्वरी दृष्टीत आहे.

**सहजं कर्म कौन्तेय सदोषमपि न त्यजेत् ।**
**सर्वारम्भा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः ॥४८॥**

हे कौन्तेया, आपल्या जन्माबरोबर उत्पन्न झालेले आपले कर्म दोषयुक्त असले तरी त्याचा त्याग करू नये. अग्नि म्हटला की जसा धूर असतोच. त्याप्रमाणे सर्व कर्मे दोषाने युक्त असतात.

युद्धापेक्षा भिक्षावृत्ती सोपी व शिवाय त्यात हिंसेसारखा दोषही नाही. म्हणून ती कां स्वीकारू नये ही अर्जुनाच्या मनातील शंका निवारण करण्यासाठी भगवंतानी हा श्लोक सांगितला आहे.

विषात कांही किडे निर्माण होतात. त्या किड्याना विषातून बाहेर काढले की ते मरतात. इतरांच्या दृष्टीने मारक असलेले वीष त्यांना मात्र तारक असते. त्याचप्रमाणे अज्ञानी जनांना सदोष वाटणारी परंतु वस्तुतः निर्दोष अशी विहित कर्मेच हितकारक असतात. म्हणून ती कदापि सोडू नयेत. शिवाय अग्नि म्हटला की जसा त्याचे बरोबर धूर असतोच, त्याप्रमाणे प्रत्येक कर्मात दोष हा असणारच. म्हणून विहित कर्म सोडून स्वतःच्या बुद्धीने दुसरे कर्म स्वीकारले तरी त्याबरोबर येणारे दोष लागणारच. विहित कर्म सोडून दुसरे कर्म करणे शास्त्रसम्मत नाही. अशास्त्रीय म्हणजेच धर्माविरुद्ध कर्म केल्यास उत्कर्ष होत नाही. कितीही बाह्य सुधारणा केली तरी उत्कर्ष हा शेवटी धर्मावरच अवलंबून असतो. कारण धर्म म्हणजे मनुष्याचे आंतर जीवनच असते.

कांही कार्यकर्ते घरोघर हिंडून, पायपीट करून वर्गणी जमवितात व त्यांतून एखादी सार्वजनिक इमारत बांधतात. दुसऱ्यासाठी कार्य करणारे स्तुतीस पात्र होतात व सार्वजनिक फंडातून स्वतःचा इमला बांधणारे निंद्य ठरतात. परोपकार अगर दुसऱ्याचे कार्य केले की दुसरी व्यक्ती संतुष्ट होते. मग विहित कर्म म्हणजे ईश्वराचेच कार्य व तेही ईश्वरार्पण बुद्धीने केल्यास ईश्वर संतुष्ट होणार नाही का? ईश्वराच्या प्रसन्नतेमुळे अशा लोकांना कोणते फळ मिळते ते भगवंत पुढील श्लोकात सांगत आहेत.

**असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतस्पृहः ।**
**नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति ॥४९॥**

ज्याचे अंतःकरण कोठेच सक्त नाही, नव्हे ते त्याच्या ताब्यात आलेले आहे, ज्याची इच्छा निःशेष झालेली आहे त्याला अशा संन्यासाच्या योगाने उत्कृष्ट नैष्कर्म्य सिद्धि प्राप्त होते.

ईश्वरार्पण कर्म करता करता भक्ताची विषयासंबंधीची प्रबळ आसक्ति कमी कमी होत जाते. खरे पाहिले तर जीव चेतन व विषय अचेतन, जीव निर्विकारी विषय विकारी, जीव नित्य तर विषय अनित्य. तथापि विषयच जीवाला आकृष्ट करतात. कसेही पाहिले तरी विषय सदोषच आहेत. पण जीवाला ते गोड वाटतात. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात,

" विषय विषाचा पडिपाडू । गोड परमार्थ लागे कडू ।
कडू विषय तो गोडू । जीवासि जाहला ॥ "

मग परमार्थ कोणी करायचा? वृद्धांनी कां गलितगात्र झालेल्यांनी? कां घरांतून बाहेर काढले आहे, अशा निराश्रितांनी? किंवा अशी परीस्थिति निर्माण झाल्याशिवाय माणसे परमार्थाकडे वळत नाहीत. पण स्वकर्मानुष्ठानाने प्रबळ विषयेच्छा नष्ट होते.

यच्च कामसुखं लोके यच्च दिव्यं महत्सुखं ।
तृष्णाक्षयसुखस्यैते कलां नार्हतः षोडशीम् ॥

आसक्ति सोडल्यावर मिळणारे सुख कधी घटणार नाही. हे जाणणारे शुकासारखे पुरुष तर तारुण्यात विषयसुख लाथाडून परमार्थात मग्न होऊ शकतात. ' अनासक्तीने वागावे । ऐसे मन हे वळवावे ॥ ' असा साधुसंतांचा आदेश आहे.

विषयांची ज्याच्यावर सत्ता चालत नाही जो स्वतंत्र असतो. तो ' जितात्मा ' व ' विगतस्पृहः ' म्हणजे निरिच्छ अशा व्यक्तीला संसिद्धि मिळते. संसिद्धि म्हणजे ज्ञानाची योग्यता. कुठल्याही सिद्धीपेक्षा ही सिद्धि फार महत्वाची आहे. धनासाठी अपार कष्ट केले तरी धन मिळेलच असे नाही. प्रारब्धात असेल तरच धनलाभ होतो. पण ज्ञानसाधना

सातत्याने करीत राहिल्यास प्रारब्धात नसले तरी यश येते. ज्ञान प्राप्तीनंतर मी–तू हा भिन्नभाव जाऊन सर्वांतरी एकच आत्मा असल्याची प्रत्यक्ष जाणीव होते. प्रथम तो विविदिषा संन्यास घेतो. सामान्य व्यवहारात त्याला रस उरत नाही. ज्ञानसाधनेत विक्षेप येऊ नये म्हणून लोकांपासून दूर राहून उपनिषदासारख्या ग्रंथांचे परिशीलन करीत ज्ञानसंपन्न होतो.

**सिद्धिं प्राप्तो यथा ब्रह्म तथाप्नोति निबोध मे ।**
**समासेनैव कौन्तेय निष्ठा ज्ञानस्य या परा ॥५०॥**

हे कौन्तेया, ज्ञानाची अखेरची मर्यादा असे जे ब्रह्म, सिद्धि ( वैराग्य ) पावलेला ( मंद ) अधिकारी कोणत्या क्रमाने मिळवितो ते ऐक.

स्वधर्मानुष्ठानाने ईश्वराची प्रसन्नता व ज्ञानाची योग्यता प्राप्त होते व शेवटी ज्ञानाची पराकाष्ठा म्हणजेच मोक्ष तोही मिळतो. जगात दोन प्रकारची प्राप्ती आहे. एक अप्राप्ताची व दुसरी प्राप्ताची. स्वर्ग, ब्रह्मलोक, ऐश्वर्य, स्त्रीपुत्रादी प्रथम नसतात. या अप्राप्त वस्तू साधने करून मिळवाव्या लागतात. मनुष्य देहसुद्धा सुकृतानेच संपादन झालेला आहे. पण हे मानवास कळत नाही. हा देह कायमचा रहावा असे त्याला वाटत असते, म्हणून त्या दृष्टीने त्याचे सतत प्रयत्न चालू असतात. तथापि देह जातोच.

जीव ब्रह्मरूप असता त्याला या गोष्टीचा विसर पडलेला असतो. हा भ्रम फार जोरदार असल्याने तो घालविण्यासाठी साधनेही तशीच तीव्र व सातत्याने करावी लागतात. पारमार्थिक ग्रंथांच्या पुनः पुनः आवृत्त्या कराव्या लागतात. मग तो ग्रंथ आरसा बनून त्याला आत्मदर्शन घडवितात व एकदा आत्मा लाभला की तो जाण्याची भीति नसते.

**बुद्ध्या विशुद्धया युक्तो धृत्यात्मानं नियम्य च ।**
**शब्दादीन्विषयांस्त्यक्त्वा रागद्वेषौ व्युदस्य च ॥५१॥**

शुद्ध बुद्धीने युक्त, ( सात्त्विक ) धैर्याने स्वतःचे मन व इंद्रिये यांचे नियमन करून, शब्दादि विषयांचा त्याग करून, प्रीति व द्वेष सोडून—

आता भगवंत आत्मज्ञान करून घेण्याची साधने सांगत आहेत. त्यातील जमतील ती व संधि मिळेल तेव्हा करत राहिली पाहिजेत.

पहिले साधन आहे चित्तशुद्धि व चित्तशुद्धीचे साधन आहे निष्काम कर्मानुष्ठान. दवाखान्यात असलेल्या औषधापैकी सर्वच जशी एकदम घ्यावयाची नसतात, त्याचप्रमाणे सर्व कर्मे निष्काम करा असे शास्त्र सांगत नाही. जमतील तेवढी करा, कालान्तराने त्यांचा परिपाक होऊन चित्तशुद्धि होते. शित्तशुद्धी झाल्यावर मन आत्मज्ञानाकडे वळवायचे. अडथळा करणाऱ्या संकटांना धैर्याने तोंड द्यावयाचे. जरूरीपुरतेच विषय सेवन करायचे. घरात शेकडो वस्तु असतात, त्यात आवश्यक थोड्या व फालतू अधिक असतात. त्या वस्तूपैकी जरूर तेवढ्यांचाच आपण वापर करतो. तसेच विषय अनेक असले तरी निर्वाहासाठी आवश्यक असतील तेवढेच सेवन करायचे. तसेच रागद्वेष सोडून वागायचे.

**विविक्तसेवी लघ्वाशी यतवाक्कायमानसः ।**
**ध्यानयोगपरो नित्यं वैराग्यं समुपाश्रितः ॥५२॥**

एकान्त सेवन करणारा, मिताहारी, वाणी, शरीर व मनाचे नियमन केलेला, ध्यानयोगपर वैराग्याचा नित्य आश्रय केलेला—

घरात ध्यान जमणे कठीण असते. बायको, मुले, मित्र, शेजारी, गडीमाणसे येवढेच नव्हे तर कुत्रे मांजरसुद्धा विक्षेप आणतात. म्हणून एकान्त सेवन करणे चांगले. खाणे अगदी बेताचे असावे व तेही हितकर, पथ्यकर व मेध्य म्हणजे पवित्र असले पाहिजे. कायावाचामनात एकसूत्रीपणा असला पाहिजे. म्हणजे मनात एक, ओठात दुसरेच व

प्रत्यक्ष कृती भलतीच करायची असे नसावे. मग ध्यानास बसावे. भगवंताचे सगुण रूप मनात पुनः पुनः आणायचे. त्याच वेळी मनात इतर अनेक विषय घुसत असतात. त्यांना थोपवून धरायचे. सगुण मूर्तीची मनात एकदा स्थापना झाली की विषयवृत्ती आपोआप मावळू लागतात. मनाच्या नाना वृत्ती निरोध करणे म्हणजेच योग. शेवटी मूर्तीचा आकारही नष्ट होऊन मन निर्विकल्प होते. म्हणजे सगुणच निर्गुण बनून ध्यानाचा प्रभाव पडू लागतो. सिद्धि प्राप्त होते. लोक मान देऊ लागतात, जयजयकार करतात, मानपत्रे देतात, मिरवणुका काढतात. येथेच साधकाला सावधगिरी बाळगावी लागते. सत्कारात तो गुंतला की त्याला शेवटचा पल्ला गाठताच येणार नाही. मानसन्मानाचा स्वीकार करायचाच झाला तर तो त्याने 'वैराग्यं समुपाश्रितः' म्हणजे त्याबद्दल पूर्ण उदासीन राहून स्वीकार करावा.

**अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम् ।**
**विमुच्य निर्ममः शान्तो ब्रह्मभूयाय कल्पते ॥५३॥**

अहंकार, बल, दर्प, काम, क्रोध, परिग्रह हे सर्व सोडून ममत्व-बुद्धिविरहित व शान्त झालेला मनुष्य ब्रह्मरूप होण्याला योग्य होतो.

'मला ध्यान जमते' असा सुद्धा अहंकार नसला पाहिजे. तसेच बल म्हणजे वासना, दर्प म्हणजे गर्व, काम, क्रोध आणि आवश्यक परिग्रह सोडला की तो जीवच ब्रह्म होतो.

**ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न काङ्क्षति ।**
**समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते पराम् ॥५४॥**

ब्रह्मभाव योग्यतेला प्राप्त झालेला, आत्मबोध प्रशस्तिपदावर आरूढ झालेला पुरुष शोक करीत नाही व इच्छाही करीत नाही. सर्व भूतांच्या ठिकाणी समत्व प्राप्त झालेला तो पुरुष माझी श्रेष्ठ भक्ति प्राप्त करून घेतो.

वर वर्णन केलेली कोणतीही साधने केली नसतील व फक्त मनाची प्रसन्नता राखता आली तरी साक्षात्कार होऊ शकतो. मन प्रसन्न असल्याचे गमक कोणते? ते भगवंतानी येथे थोडक्यात सांगितले आहे. जो गतगोष्टींचा शोक करीत नाही व जो अप्राप्ताची इच्छा करीत नाही, त्याचे मन प्रसन्न आहे असे समजावे. असा अधिकारी पुरुष सर्वाबद्दल समभाव बाळगतो. आपल्याप्रमाणेच इतरांनाही सुख हवे व दुःख नको हे जाणून दुसऱ्याला सुख होईल असे वागतो व त्यांची दुःखनिवृत्ति करायला प्रवृत्त होतो. अशा पुरुषाला माझी पराभक्ति म्हणजेच माझे ज्ञान लाभते.

'पराभक्ति म्हणजे ज्ञान कशावरून?' अशी शंका येत असेल तर सातव्या अध्यायांतील 'आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ' या श्लोकाचा अर्थ पहावा. त्यावरून भक्ति म्हणजे ज्ञान हा अर्थ स्पष्ट होतो.

भक्त्या मामभिजानाति यावान्यश्चास्मि तत्त्वतः।
ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनन्तरम् ॥५५॥

या सहज ज्ञानभक्तीच्या योगाने मी कोण आहे व केवढा आहे, हे तो तत्त्वतः जाणतो. अशा रीतीने मला तत्त्वतः जाणून तो माझ्यामध्ये प्रवेश करतो. (मत्स्वरूप होतो.)

ईश्वराची दोन रूपे आहेत. एक सगुण साकार व दुसरे निर्गुण निराकार. भक्ताला प्रथम सोपाधिक म्हणजे सगुण रूपाचे दर्शन व ज्ञान होते. त्यासारखे रूप, तेज प्रगल्भता, पराक्रम, ऐश्वर्य व औदार्य जगात कोठेच नसते. त्या परम सुंदर रूपाचा बोध भक्ताला तात्काळ होतो. सुंदर मूर्तीचे ध्यान करीत असता वरील सर्व गुण त्या मूर्तीत आहेत अशी कल्पना करून ध्यान करा असे शास्त्रकार सांगतात. अशा प्रकारे ध्यान करीत राहिल्यास कालान्तराने भक्ताला तसा प्रत्यक्ष अनुभव येतो. 'यावान् जानाति' म्हणजे सगुण ज्ञान होते व 'तत्त्वतः जानाति'

म्हणजे सच्चिदानंद रूपाचेही ज्ञान होते. सत् म्हणजे अबाधित, चित् म्हणजे प्रकाशमान व आनंद म्हणजे सुख. अबाधित व प्रकाशमान सुखाचा लाभ होणे हेच ज्ञान.

संतश्रेष्ठ तुकाराम महाराज 'रामकृष्णहरी' या मंत्राचा जप करीत होते. खूप जप केला पण समाधान लाभेना. तेव्हा हेच उत्कर्षाचे खरे साधन आहे की दुसरे कांही केले पाहिजे. असा संदेह त्यांच्या मनात यावयाचा. पण बाबा चैतन्यानी स्वप्नात दर्शन देऊन उपदेश केल्यावर त्यांच्या मनांतील संशय गेला. साक्षात्कार झाला की सर्व संशय, दुःखे, विपरीत भावना इ. कायमच्या नष्ट होतात. जीवनाला कृतार्थता येते व जगांतील इतर कुठला पदार्थ मिळावा अशी इच्छाच रहात नाही.

**सर्वकर्माण्यपि सदा कुर्वाणो मद्व्यपाश्रयः ।**
**मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम् ।।५६।।**

माझा आश्रय केलेला पुरुष सर्वदा सर्व कर्मे करीत असला तरी माझ्या प्रसादाने शाश्वत व अविनाशी असे पद मिळवितो.

नित्य कर्माबरोबरच सकाम कर्मे केली व फलाची अपेक्षा केली नाही तर भगवंत प्रसन्न होतो व काम्य कर्माचे फल स्वतंत्रपणे न देता 'यद्गत्वा न निवर्तंते तद्धाम परमं मम' असे अविनाशी व शाश्वत पद देतो. सर्व कर्मफलत्यागाने अव्यय पद मिळते, हे सांगताना पुन भगवंत 'मत्प्रसादात्' असे कां म्हणतात? निष्काम कर्म केल्यावर आणखी ईश्वराची प्रसन्नता कशाला हवी ? एका जागेसाठी दोन अर्ज आले व दोघांची पात्रता, शिक्षण, व्यक्तिमत्त्व इ. सर्व सारखे आहे. अशा वेळी निवड करणारा ज्याचेवर प्रसन्न होईल, त्याचीच नेमणूक केली जाणार. त्याचप्रमाणे काम्य व निषिद्ध कर्माची फळे रद्द करून ज्ञान करून देण्याचा अधिकार फक्त भगवंतालाच असल्याने त्याच्या प्रसन्नतेची नितांत गरज आहे.

सर्व कर्मे ईश्वराला अर्पण केल्यावर ईश्वर निषिद्ध कर्माकडे काना-डोळा करतो. पित्याच्या मताप्रमाणे वागणाऱ्या मुलाच्या हातून एखादी चूक झाली तर पिता तिकडे दुर्लक्ष करतो. त्याचप्रमाणे ईश्वर म्हणतो की, ' माझ्या भक्ताने निषिद्ध कर्मे करूं नयेत हे खरे. पण प्रारब्धाच्या तीव्र वेगात इच्छा नसताही कांही कर्मे घडतात, त्याला काय करायचे ? शिवाय त्याने ज्याअर्थी माझा आश्रय घेतला आहे त्या अर्थी त्याच्या चुका पोटात घालणे भाग आहे व त्याला ज्ञानी करणे माझे काम आहे.'

पण ईश्वर झाला तरी त्यालाही दंडक व नियम आहेतच. त्याने केलेले नियम त्यानेच मोडले, तर ईश्वरत्व बाधित होणार नाही का ?

ईश्वर आपले नियम कधीच मोडत नाही. निषिद्ध कर्माचे फळ म्हणजे नरक. ते द्यायलाच पाहिजे. तथापि हे फळ देण्याचे ईश्वर थोडे लांबणीवर टाकतो. तोपर्यन्त भक्त जर ज्ञानी झाला तर ' ज्ञानाग्निः सर्व कर्माणि भस्मसात्कुरुते ' या न्यायाने निषिद्ध कर्मे नष्ट होऊन जातात. किंवा कांही निषिद्ध कर्मे शिल्लक राहिली तर त्यांचे फल ईश्वर ज्ञानोत्तर देतो. हे आपणास साधुसंताच्या चरित्रावरून दिसून येतो. त्यांना दुःखे व व्याधि पीडा देत असतात. पण आत्मज्ञान झालेले असल्यामुळे साधू-संताना त्या व्याधींचा त्रास होत नाही. मुलीच्या लग्नात फार दगदग झाली व त्यामुळे चार दिवस दुःखणे आले तरी त्याचे कांही वाटत नाही. त्याचप्रमाणे ज्ञानाचे उद्दिष्ट साध्य झाल्यावर प्रारब्ध संपेपर्यन्त निषिद्ध कर्मांचे फल भोगताना ज्ञानी पुरुषास त्याची क्षिती वाटत नाही.

जयद्रथ वधाच्या वेळी श्रीकृष्णाने आपल्या सुदर्शन चक्राने सूर्यास झाकून टाकले. सूर्यास्त झाला असे समजून जयद्रथ बाहेर येताच सुदर्शन दूर करून ' हा सूर्य व हा जयद्रथ, उडव मस्तक ' असा आदेश देऊन अर्जुनाकरवी त्याचा वध घडवून आणला. ईश्वराला जसे सूर्यास्त करण्याचे स्वातंत्र्य आहे, त्याचप्रमाणे ज्ञान होईपर्यंत कांही काळ निषिद्ध

कर्मे प्रतिबद्ध करण्याचेही त्याला स्वातंत्र्य आहे. प्रथमच निषिद्ध कर्मे आड आली तर ज्ञान-साधने करणे जमणार नाही. मग साक्षात्कार तरी कसा होईल? आणि हा मानव जन्म एकदा हातचा गेल्यावर ज्ञानसाधने थोडीच करता येणार आहेत? म्हणून ईश्वर आपल्या भक्तांना निषिद्ध कर्मांचे फळ ज्ञानोत्तर देतो. त्यामुळे शास्त्रविरोध होत नाही व आपलेच नियम मोडल्याचा दोष ईश्वराला देता येत नाही.

**चेतसा सर्वकर्माणि मयि संन्यस्य मत्परः ।**
**बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव ॥५७॥**

विवेकाने सर्व कर्मे माझ्या ठिकाणी समर्पून, मत्पर होऊन बुद्धि-योगाचा आश्रय करून सर्व काळ माझ्या ठिकाणी चित्त जडलेला असा तू हो.

विचारपूर्वक सर्व कर्मे ईश्वरार्पण केली पाहिजेत. 'मत्पर हो' म्हणजे कर्म करीत असता चित्तवृत्ति भगवंताकडे लागलेली असली पाहिजे. कर्मे ईश्वराला अर्पण केली तर काय होईल व न केल्यास काय होईल याचा विचार केला पाहिजे. दृष्ट व अदृष्ट अशी दोन प्रकारची कर्मे असतात. अदृष्ट कर्मे म्हणजे पुढच्या जन्मी उपयोगी पडणारी कर्मे. दृष्ट कर्मे सर्व प्राणिमात्र करीत असतात. अदृष्ट कर्मे करण्याची शक्ति फक्त मानवास आहे. मग मनुष्य जर फक्त दृष्ट कर्मेच करू लागला, तर त्याची गणना मानवतेवर योनीतच करावी लागेल. अदृष्ट कर्मे केली असली तरच सौंदर्य, बुद्धिमत्ता, आरोग्य, ऐश्वर्य इत्यादींचा लाभ होतो. स्त्री, पुत्र, प्रतिष्ठा ही या जन्मीच्या दृष्ट कर्मांची फले आहेत. तुम्हास सोळाशे रुपये पगार असेल, तर रूपलावण्यसंपन्न व श्रीमंताची मुलगी पत्नी म्हणून मिळणे अवघड जाणार नाही. पण तिचे व तुमचे सख्य असणे हे तुमच्या अदृष्टावर अवलंबून आहे. मुलाला शिक्षण देऊन मोठा करणे तुमच्या हाती असले, तरी त्याचे व तुमचे पटणे हे तुमच्या हाती नाही. तरुणपणी कर्तबगारी

करून तुम्ही मानमरातब मिळवाल. पण तुमची मान हलू लागल्यावरही लोकांकडून मान मिळत राहणे हे ईश्वराधीन आहे. म्हणून ईश्वर-प्रसन्नतेसाठी सर्वकर्मफलत्याग करणे आवश्यक आहे.

'मत्पर' होण्याचे एक अगदी सुलभ साधन आहे. प्रत्येक कर्माच्या आदि व अंती परमेश्वराचे स्मरण केले की मत्पर होता येते. भगवंताचे स्मरण करून कर्मास आरंभ करा व संपूर्ण झाल्यावर ते त्यालाच अर्पण करून मोकळे व्हा.

चांगल्या कर्माचे फल मिळाले म्हणून हर्ष मानायचा नाही व वाईट फल मिळाले तर दुःख करायचे नाही. चांगली व वाईट फळे ही आपल्याच चांगल्या वाईट कर्मांची फले असतात, म्हणून त्याची फले आपणासच भोगावी लागणार, असा विचार मनात सतत जागा ठेवणे म्हणजेच बुद्धियोगाचा आश्रय करणे होय.

**मच्चित्तः सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि ।**
**अथ चेत्त्वमहंकारान्न श्रोष्यसि विनङ्क्ष्यसि ॥५८॥**

मच्चित्त झालेला तू माझ्या प्रसादाने सर्व संकटे तरून जाशील. पण अहंकाराने जर तूं ऐकणार नाहीस, तर नाश पावशील.

सर्व चित्त परमेश्वराकडे लावून वागल्यावर सर्व दुःखे व कामक्रोधादि विकारांपासून सुटका होते. आणिमादि सिद्धी सेवा करण्यासाठी हात जोडून तयार राहतात. प्रत्येक गोष्टीच्या साधक व बाधक अशा दोन बाजू असतात. मच्चित्त होऊन वागण्याचे फायदे सांगितले तसे न वागल्यास चारी पुरुषार्थांपासून भ्रष्ट होण्याची पाळी येते. कांही लोक दिवस उजाडल्यापासून निजेपर्यंत व जन्मल्यापासून मरेपर्यंत नुसते कष्टच करीत असतात. तरी त्यांना पोटभर अन्नही मिळत नाही. चणे चुरमुरे किंवा नुसतेच पाणी पिवून ते जगत असतात.

पूर्वजन्मी परमेश्वराची अवज्ञा केल्याचे फळ ते भोगीत असतात. उलट कांही लोक धर्मबाह्य वर्तन करीत असूनही त्यांचा उत्कर्ष झालेला दिसून येतो. पण ही गतजन्माची पुण्याई संपून येथील कुकर्माची फळे मिळू लागली की होणाऱ्या अपकर्षाला मर्यादा रहात नाही. एकदम अत्युच्चपदावरून फेकला जाऊन कोठेतरी कोपऱ्यात जाऊन पडतो.

**यदहंकारमाश्रित्य न योत्स्य इति मन्यसे ।**
**मिथ्यैष व्यवसायस्ते प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति ॥५९॥**

अहंकाराचा आश्रय करून मी युद्ध करणार नाही असा जो तू विचार करीत आहेस तो तुझा निश्चय व्यर्थ आहे. कारण तुझा क्षात्र-स्वभाव तुला युद्ध करायला भाग पाडील.

ईश्वराला शरणागति न देता स्वसामर्थ्यावर अर्थ व काम मिळवता येतील, मग धर्म व मोक्ष नाही मिळाला तरी चालेल अशा विचाराने कांही लोक वागत असतात. पण त्यांची ही विचारसरणी चुकीची आहे. मनुष्य आपल्या मतानुसार कसेही वागला तरी देणारा ईश्वर आहे. अर्थ व काम स्वसामर्थ्यावर मिळविता येतात, हा सुद्धा भ्रम आहे. ईश्वर सर्वज्ञ आहे व सर्व सूत्रे त्याच्याच हातात आहेत. शिवाय प्रत्येक जीव स्वकर्माने म्हणजेच प्रकृतीने बद्ध झालेला आहे. ते कर्म पुढे उभे राहिले की हातसुद्धा हलवता येत नाही. बोलता बोलता माणसे हृदयक्रिया बंद पडून मरतात. कर्म संपले की जीवनही संपेल याचा नेम नसतो. म्हणून रामासारख्या अवतारी पुरुषानेही ' स्वकर्मसूत्रग्रथितोहि लोकः ' असे उद्गार काढले आहेत.

एकदा भगवंताना भेटण्यासाठी सत्त्वगुणसंपन्न सनत्कुमार आले असता जयविजय या भगवंताच्या द्वारपालांनी त्यांना अडविले. जयविजय सनत्कुमारांची योग्यता जाणत होते. पण ते आपले कर्तव्यही चुकवू शकत

नव्हते. एखाद्या सामान्य अधिकाऱ्याचा पट्टेवालासुद्धा आपल्या साहेबाला चिठ्ठी पाठविल्याशिवाय आत घुसूं देत नाही. मग जयविजय तर भगवंतांचे द्वारपाल. त्यानी आडकाठी करताच सनत्कुमारानी 'तुम्ही असुरयोनीत जन्म घ्याल' असा शाप दिला. जयविजयांना सत्त्वगुणी लोकांना अडविण्याची बुद्धि कां व्हावी ? ज्ञानी पुरुषांनी तरी तामस वृत्तीने शाप का द्यावा ? त्यांचे कर्म फलोन्मुख झाल्यानेच त्यांच्या हातून अशा गोष्टी घडतात. म्हणून भगवंत अर्जुनाला त्याच्या स्वभावाची जाणीव करून देत आहेत. ते म्हणतात, अर्जुना, तूही कर्मतंत्राने असाच बांधलेला आहेस. तुझे जन्मजात शौर्य व क्षात्र प्रवृत्ति तुला लढायला उद्युक्त केल्याशिवाय राहणार नाही.'

> स्वभावजेन कौन्तेय निबद्धः स्वेन कर्मणा ।
> कर्तुं नेच्छसि यन्मोहात्करिष्यस्यवशोऽपि तत् ॥६०॥

हे कौन्तेया, स्वतःच्या स्वभावसिद्ध कर्माने बद्ध झालेला तू मोहामुळे जे कर्म करू इच्छित नाहीस, ते पूर्व संस्काराने परतंत्र असल्याने करशीलच.

जीवाला जसे कर्मांचे पारतंत्र्य आहे तसे ईश्वराचेही पारतंत्र्य आहे. ईश्वर एकरूप असता त्याचे पारतंत्र्य मानले तर ईश्वरावर विषमता व निर्घृणता असे दोष लादल्यासारखे सकृतदर्शनी वाटते. पण ईश्वराला दोष देता येत नाही. तो तुमच्या कर्माची फळे देतो. जसे कर्म तसे फळ. सिताफळाचे बी पेरून आंबे यावेत अशी अपेक्षा करणे व्यर्थ नाही का ? शुभ कार्याचे शुभ व अशुभाचे अशुभ फळ मिळते. तुम्ही अनीतीने वागलात तर प्रबल व्याधि, दारुण दारिद्र्य अशा शिक्षा मिळतात. या शिक्षा कां भोगाव्या लागतात याचा विचार करून मानवाने सुधारावे; हाच परमेश्वराचा हेतू असतो. पण हे न समजून मनुष्य अधिकच चेकाळतो. बेताल वागू लागतो. आईवडील मुलाला मारतात ते काही दुष्टबुद्धीने नाही. आपल्या मुलाने सुधारावे असाच

त्यांचा हेतु असतो. ईश्वरही सर्व जीवाबद्दल असलेल्या वात्सल्यामुळेच शासन करतो, म्हणून त्याला दोष देता येत नाही.

उठण्याची सुद्धा ताकद नसलेला एखादा म्हातारा रागावून तुम्हाला मारीन ' असे म्हणाला किंवा त्याची खोडी काढल्यावर ' जा तुम्हाला क्षमा केली ' असे म्हणाला, तरी त्या बोलण्यात कांहीच अर्थ नसतो. सामर्थ्यसंपन्न व्यक्तीच्या रागालोभाला किंमत असते. ईश्वर हा सर्व शक्तिमान असल्याने त्याच्या निग्रह-अनुग्रहास महत्त्व आहे.

सूत्रधार बाहुल्यांना नाचवतो. बाहुल्या अचेतन असल्याने त्या सूत्रधाराधीन असतात. पण जीव चेतन असता तो परमेश्वराधीन म्हणजे परतंत्र कसा असेल अशी अर्जुनाच्या मनांतील शंका जाणून भगवंत सांगतात—

**ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ।**
**भ्रामयन्सर्वभूतानि यन्त्रारूढानि मायया ॥६१॥**

हे अर्जुना, शरीररूपी यंत्रावर जणू काय आरूढ झालेल्या सर्व भूतांना मायेच्या योगाने फिरविणारा ईश्वर सर्व भूतांच्या हृदयांत स्थित आहे.

भगवान विचारतात, " अर्जुना तू स्वतंत्र आहेस ना? मग ' सीदन्ति मम गात्राणि ' असे का म्हणालास? तू शूर असता तुझ्या घशाला कोरड कशी काय पडली? युद्धाला न सटपटता उभे राहणे तुझ्या स्वाधीन नव्हते, असाच याचा अर्थ नाही का? माझ्या कृतीमुळेच तुझी अशी गत झाली. तुला प्रश्नोपप्रश्न विचारण्याची बुद्धी तरी कोणी दिली? तुला मोह झाला नसता तर तू शंका विचारल्या नसत्यास व गीताही जन्मली नसती. स्वतःच्या बुद्धीने काय वाटेल ते करीन अशी मानवाने फुशारकी मारली, तरी त्याच्या हातात कांहीच नसते, कारण मीच ' ददामि बुद्धियोगं तं ' व माझ्यापासूनच ' मत्तः स्मृतिर्ज्ञान

मपोहनं च ' हे सारे मिळते हे तो विसरतो. येवढेच नव्हे तर ' यतः प्रवृत्तिर्भूतानाम् ' मानवांची प्रवृत्ति करणाराही मीच आहे. साक्षात्कारी म्हणजे ज्ञानसंपन्न पुरुषांना माझे व कर्माचे पारतंत्र्य नसते. पण जे जीव ' यंत्रारूढ ' झाले आहेत (' यंत्र म्हणजे देह व देह म्हणजेच मी ' अशी समजूत असलेले ) त्यांना स्वातंत्र्य नाही. गाढ झोपेत देहाचे तादात्म्य सुटते त्यावेळी मनुष्य स्वतंत्र असतो. म्हणून स्वातंत्र्य पाहिजे असेल तर देहतादात्म्य ( देह म्हणजेच मी ही कल्पना ) सोडून दिले पाहिजे.

ईश्वर जर कर्मानुसारच फल देणारा असेल तर त्यात वैशिष्ठ्य ते कोणते? कारण व्यवहारातही काम तसे दाम हाच न्याय आहे. ईश्वराचे वैशिष्ठ्य हे की, जो त्याला शरण जाईल, त्याला ईश्वर अनंत पटीने देतो.

' अनंत हस्ते कमलावराने देता किती घेशिल दो कराने '

अशी भक्ताची अवस्था होते. भगवंताची सर कोणाला येणार नाही.

**तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत ।**
**तत्प्रसादात्परां शांतिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम् ॥६२॥**

हे भरतकुलोत्पन्ना, त्यालाच तूं सर्व भावाने शरण जा. त्याच्या प्रसादाने तूं अत्यंत श्रेष्ठ शांतिरूप जे शाश्वत स्थान ( निजात्मपद ) ते पावशील.

श्रुतिस्मृतिपुराणातून ईश्वराला शरणागती दिल्याने कसे चमत्कार घडतात याची असंख्य उदाहरणे आहेत. ' लिखितमपि ललाटे प्रोज्झितुं कः समर्थः ' असा नियम असला तरी ईश्वर प्रसन्न झाला तर तो ललाट लेखातही बदल करू शकतो. म्हणूनच सत्यवान जिवंत झाला एवढेच नव्हे तर त्याला दीर्घायुष्य लाभले. अल्पायुषी मार्कंडेय शंकराला शरण गेल्याने चिरंजीव झाला. प्रारब्धात बदल हवा असेल तर श्रीहरीला प्रसन्न केले पाहिजे. त्याला प्रसन्न करण्यासाठी त्याचे भजन केले पाहिजे. नुसते भजन करून चालणार नाही. त्याला कायावाचामनाने शरण जाऊन भजन केले पाहिजे.

युद्धापूर्वी मदत मागण्यासाठी दुर्योधन व अर्जुन दोघेही श्रीकृष्णाकडे गेले होते. दुर्योधनाचा भगवंतावर विश्वास नव्हता. त्याने त्याचे सैन्य मागितले. तर अर्जुन खुद्द भगवंताला शरण गेला. त्यामुळे अर्जुनाचा युद्धात विजय तर झालाच, शिवाय गीतामृत पान करावयास मिळाल्यामुळे त्याला परा शांति मिळाली. हमरस्त्यावरील घरांत रहदारीचा फार त्रास होतो, म्हणून गांवापासून दूर कोठे तरी बंगला बांधून राहिल्यावर मिळते तशा प्रकारची शांति नव्हे. तर ज्ञानाची परा शांति— जी धन सत्ता वा शारीरिक सामर्थ्य यापैकी कशानेही मिळत नाही तर फक्त ईश्वराला शरण गेल्यानेच मिळते. व्यवहारांतही दमदाटी देऊन अगर पैसे देऊन जी कामे होत नाहीत, ती शरणागति दाखविल्याने नम्रतेने करून घेता येतात. मग कर्तुमकर्तुमन्यथा कर्तुम् सामर्थ्य असलेल्या ईश्वराला शरण गेल्यावर तो आपले काम करणार नाही असे कधी होईल का ? आणि ज्याला शरण जायचे तो तरी दूर कोठे राहतो असे थोडेच आहे ? आपल्याच हृदयांत तर तो आहे.

**इति ते ज्ञानमाख्यातं गुह्याद् गुह्यतरं मया ।**
**विमृश्यैतदशेषेण यथेच्छसि तथा कुरु ॥६३॥**

गूढाहून अत्यंत गूढ असे हे ज्ञान मी तुला सांगितले. त्याचा पूर्ण विचार करून तुझ्या इच्छेस येईल त्याप्रमाणे कर.

गीता हे एक ज्ञानशास्त्र आहे. ‘ अशोच्यानन्वशोचस्त्वं ’ पासून ‘ इति ते ज्ञानमाख्यातं ’ या प्रस्तुत श्लोकापर्यन्त भगवंतानी ज्ञान व ज्ञानसाधनांचेच प्रतिपादन केले आहे. कर्म, भक्ति, योग, मणिमंत्रौषधे वगैरे गोष्टी गुह्य आहेत. पण ज्ञान हे त्या सर्वाहून गुह्यतम आहे. हे ज्ञान सांगून झाल्यावर भगवंत अर्जुनाला ‘ अमुकच कर ’ असे न सांगता ‘ तुला हवे ते कर ’ असे स्वातंत्र्य देतात. कारण दिलेले ज्ञान जर अर्जुनाने पचविले असेल तर तो अयोग्य असे कांही करणार नाही, याची त्याला खात्री आहे.

गीतेने कर्म व ज्ञान हे दोन मार्ग जगाला दाखविले आहेत. (याहून निराळा मार्ग म्हणजे स्वैराचार, पण तो मानवांसाठी नसून पशूंसाठी आहे). या दोन मार्गांपैकी कोणता मार्ग अनुसरायचा हे ज्याचे त्याने ठरवायचे असते. कारण सर्वांचा अधिकार सारखाच नसतो. पोट भरले म्हणजे तृप्ती झाली, हे जसे फक्त ज्याचे त्यालाच कळते, त्याप्रमाणे आपला अधिकारही ज्याचा त्यालाच समजतो. आपली कुवत ओळखून ज्ञानमार्गाने जायचे कां कर्ममार्गाने जायचे हे ज्याचे त्यानेच ठरविले पाहिजे.

**सर्वगुह्यतमं भूयः श्रृणु मे परमं वचः ।**
**इष्टोऽसि मे दृढमिति ततो वक्ष्यामि ते हितम् ॥६४॥**

सर्वात उत्कृष्ट असे माझे सांगणे पुनः ऐक. तू मला अत्यंत प्रिय आहेस, म्हणून मी तुला हिताची गोष्ट सांगतो.

अर्जुन– 'तुम्ही विचार करायला सांगून सर्व जबाबदारी माझ्यावरच टाकता हे बरोबर नाही. एखाद्या रोगाचे निदान करावयाचे झाल्यास चार वैद्यांची चार मते पडतात. ते अचूक निदान करू शकत नाहीत. प्रत्येकाने स्वबुद्धीने विचार केला तर असेच होईल. म्हणून भगवन् तुम्हीच निर्णय द्या. कारण तुम्ही सर्वज्ञ आहा.'

भगवान– "अर्जुना तूं उत्तम अधिकारी आहेस म्हणून मी निर्णय घेण्याची तुझ्यावर जबाबदारी टाकली. सांगितल्याप्रमाणे तूं वागशील अशी खात्री आहे. धर्मशास्त्र समजले तरी त्याप्रमाणे वर्तणूक करणे फार कठीण, उलट त्यातून पळवाटा काढण्याची शिकस्त केली जाते. त्याचप्रमाणे मंदाधिकारी पुरुष सांगितल्याप्रमाणे वागेलच असे नाही. विकल्प, शंकाकुशंका काढतील. असे लोक म्हणतात की, नियम फक्त शास्त्रात. पुस्तकातली विद्या पुस्तकात. व्यवहारात त्याचा काय संबंध? पण अर्जुना, तूं उत्तमाधिकारी आहेस, म्हणून तुला हिताची गोष्ट सांगतो."

एखाद्याने प्रत्येक ठिकाणी दोन वर्षे याप्रमाणे पंधरा ठिकाणी नोकरी केली. अशा प्रकारे तीस वर्षे काम करूनही अशा व्यक्तीला पेन्शन मिळू शकत नाही. म्हणून त्याला सोळाव्या ठिकाणी अर्ज करावा लागतो. पण सोळावा म्हणतो, 'तुझे पंधरा ठिकाणी जमले नाही मग इथे तरी कसे जमणार ? तेव्हा तू चालू लाग.' आयुष्यभर नाना साधने करणाराचीही अशीच गत होते. एकच साधन करावे व त्यातच आपले हित आहे असा पूर्ण विश्वास, पक्का निश्चय असला की पारमार्थिक पेन्शन मिळाल्यावाचून रहात नाही. पेन्शन म्हणजे अपेक्षित वस्तू मिळून शिवाय पूर्ण विश्रांति मिळाली पाहिजे. असा लाभ घडवून देणारे एक अत्यंत सोपे साधन भगवंत सांगत आहेत.

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।**
**मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे ॥६५॥**

माझ्या ठिकाणी मन ठेवणारा हो, माझा भक्त हो, माझे यजन करणारा हो, मला नमस्कार कर म्हणजे तू माझ्याप्रतच येशील. तू मला प्रिय असल्याने हे मी तुला प्रतिज्ञेवर सत्य सांगत आहे.

नवव्या अध्यायाचे अखेरी भगवंतानी हाच उपदेश केला व आता गीतेचा उपसंहार करतानाही पुनः तेच सांगत आहेत. म्हणून या श्लोकाला फार महत्त्व आहे. वरवर पाहता हा श्लोक अत्यंत सोपा वाटला तरी अंतरदृष्टीने पाहता यात गूढार्थ भरलेला आहे.

साध्यात जर 'एव'कार असेल तर तो साधनातही असतो असा नियम आहे. उदा. 'अस्य रुक्मिणी एव भार्या भवितुमर्हति' या भागवतांतील श्लोकावर टीका लिहिताना श्रीधर म्हणतात, 'अस्यैव रुक्मिण्यैव भार्यैव भवितुमर्हत्येव' त्याचप्रमाणे 'माम् एव' असे पद असल्यामुळे येथेही 'केवळ माझ्या ठिकाणी मन ठेवण्याने, केवळ माझ्यावर प्रेम केल्याने, केवळ माझे पूजन केल्याने किंवा केवळ मला

नमस्कार केल्याने किंवा यापैकी कुठल्याही एका साधनाने माझी प्राप्ती होते ' असा अर्थ केला पाहिजे.

भगवंतावर नुसते मन ठेवण्याने त्याची प्राप्ती कशीकाय होईल? दरिद्री सतत पैशावर मन ठेवून असतो. किंबहुना त्याच्या मनात पैशा-खेरीज दुसरा विचारच नसतो, पण त्याला कधी द्रव्यलाभ होत नाही. तसेच भगवंतावर सर्वस्वी प्रेम बसणे तरी कसे शक्य आहे? कारण बायका, मुले, घरदार यावर ते जाणारच. एखादा सामान्य माणूस एखाद्या अप्सरेवर प्रेम करू लागला म्हणून काय ती त्याला प्राप्त होईल? भगवंताचे पूजन करायचे तर सर्व साधने उपलब्ध होत नाहीत, म्हणून यथास्थित पूजनही जमत नाही. असे असता केवळ नमस्काराने भगवंत प्राप्त करून घेता येईल, हे कसे शक्य आहे?

पण यात अशक्य काही नाही. भगवंतावर मन ठेवायचे म्हणजे भगवंताखेरीज मनात दुसरा कोणताच विचार शिरकू द्यावयाचा नाही. असे झाल्यावर त्याची प्राप्ती झालीच पाहिजे. कंसाला भयामुळे जळी, स्थळी, काष्ठी, पाषाणी कृष्ण दिसत होता. गोपींना प्रेमामुळे, तर शिशुपालाला द्वेषामुळे सर्वत्र कृष्णच दिसत होता. त्यामुळे ते सर्व कृष्णरूप बनून गेले. विषयांच्या आसक्तीने ध्यान करू लागल्यावर जर वृत्ती तदाकार बनते, तर भगवंताचे ध्यान करू लागल्यावर भक्त ईश्वरस्वरूप झाल्याशिवाय कसा राहील? विषय आणि ईश्वर यांची बरोबरी करणे योग्य नाही. त्या दोघांत जमीन अस्मानाचा फरक आहे. विषयचिंतनाने विषय मिळत नाहीत, म्हणून परमेश्वर चिंतनाने तो भेटणार नाही हे म्हणणे बरोबर नाही. ईश्वरावर प्रेम करणारा व त्याचे चिंतन करणारा ईश्वरस्वरूपच होतो.

' मन्मना ' किंवा ' मद्भक्त ' होता येत नसेल तर ' मद्याजी ' म्हणजे माझे पूजन कर असे भगवंत सांगतात. प्रथम शिव्या देऊन मग

पूजा करायची याला पूजा म्हणत नाहीत. 'गौरवितस्थ तत् प्रीत्यनुकूलो व्यापार: पूजा' ईश्वराला श्रेष्ठत्व देऊन भक्ताने 'रत्नै: कल्पितमासनं हिमजलै: स्नानं च दिव्यांबरम्' अशी मानस पूजा केली तरी तो संतुष्ट होतो. खऱ्या भक्ताला पूजेसाठी साधनांची आवश्यकता भासत नाही. त्या बाह्य पूजेपेक्षा परमेश्वराला मनाने केलेली पूजाच अधिक प्रिय असते.

अशी पूजाही जमत नसेल तर केवळ मला नमस्कार कर, असा सर्वात सोपा व सहज सुलभ उपाय भगवंत सांगतात. नमस्कारही तीन प्रकारचा आहे, कायिक, वाचिक व मानसिक. नमस्काराने अहंकार जातो. अहंकार गेला की इतर ज्ञानसाधने तेथे आपोआप येतात. नमस्कार म्हणजे नम्रता. सध्या विद्यार्थ्यांजवळ नम्रता नाही व गुरुजींना आस्था नाही, मग ज्ञान कसे होणार? पण खरा गुरु नम्र विद्यार्थ्यांत स्वसामर्थ्याने ज्ञान निर्माण करतो. तुम्हाला एखाद्याकडून कांही घ्यायचे असेल तर त्याचेकडे कांही एक न मागता वा त्याचेशी न बोलता रोज त्याला नमस्कार करीत जा. कालांतराने तुमचे काम होईल. तेच जर प्रथमपासून मागणीच सुरू केलीत तर तुमचे कार्य कधीच होणार नाही. नमस्काराने मानव प्रसन्न होतो, मग भगवंत प्रसन्न होणार नाही हे कसे शक्य आहे?

साध्या पितळी ताटात भात भाजी भाकरी चटणी घेऊन थोडी थोडी खाल्ली तरी पोट भरते आणि फक्त साजुक तुपातील बदामाचा नाजुक शिरा चांदीच्या ताटात घेऊन भक्षण केला, तर पोट भरायचे राहील काय? त्याप्रमाणे वर सांगितलेली चार साधने थोडी थोडी केली तरी ईश्वराची प्राप्ती होते किंवा त्यापैकी एकच साधन पण उत्कटतेने केले तरी भगवंताची भेट झाल्याशिवाय राहणार नाही. भगवान हे प्रतिज्ञेवर सांगत आहेत म्हणून त्यावर विश्वास ठेवलाच पाहिजे. जे भक्ताचीही

प्रतिज्ञा ( उदा. भीष्मप्रतिज्ञा ) खोटी पडू देत नाहीत ते स्वतःची प्रतिज्ञा खोटी करतील काय ?

**सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।**
**अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ॥६६॥**

सर्व धर्मांचा त्याग करून मला एकट्यालाच अद्वैत भावाने शरण ये म्हणजे मी तुला सर्व पापांतून मुक्त करीन, तूं शोक करू नकोस.

अर्वाचीन लोक 'सर्व धर्म सोडून मला शरण ये' असा अर्थ करतात. पण तो बरोबर नाही. असा अर्थ केल्यास 'स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः', 'स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विंदति मानवः', 'श्रेयान् स्वधर्मो विगुणः' इत्यादि सर्व कर्मप्रतिपादक वाक्ये निरर्थक ठरतात. अशी एक दोन नव्हे तर चाळीस वचने गीतेत आहेत. शिवाय 'सर्व धर्म सोडा' म्हणून सांगायला गीता कशाला हवी? ते तर आम्ही सोडलेच आहेत !

गीतेचे वेगवेगळे कर्ते आहेत असे प्रतिपादन करणारे पहिला कर्ता 'धर्म करा' म्हणतो तर तिसरा 'धर्म सोडा' असे सांगतो, म्हणून गीतेत एकवाक्यता नाही असा युक्तिवाद करतात. पण गीतेचा कर्ता एकच आहे असा विश्वास असणाऱ्यांना सर्व वाक्यांची संगति बरोबर लावावी लागते. गीतेवर संस्कृतमध्ये पंचवीस टीका उपलब्ध आहेत. या टीका अगदीच संक्षिप्त नसून गीतेचा विस्तृत अर्थ त्यात दिलेला आहे. त्या ग्रंथापैकी शंकराचार्य, रामानुजाचार्य, मध्वाचार्य व वल्लभाचार्य यांची भाष्ये प्रसिद्ध आहेत. हे सर्व आचार्य गीता भगवान श्रीकृष्णानेच सांगितलेली आहे असे एकमुखाने सांगतात. गीतेतील भगवंताच्या मुखातून निघालेली 'स, वा, तु, च' ही अक्षरेसुद्धा व्यर्थ आहेत असे म्हणता येत नाही. सामान्य मानव भ्रम, अज्ञान वा भीतीने बोलताना चुकतो.

पण भ्रम, भीति, अज्ञानाचा पूर्ण अभाव ज्याचे ठिकाणी आहे तो भगवान कधीच चूक करणार नाही.

भगवान वेदव्यास म्हणतात, " या स्वयं पद्मनाभस्य मुखपद्माद्वि-निःसृता " अशी गीता आहे. अठराही अध्याय भगवान श्रीकृष्ण-मुखांतूनच निघाले म्हणून गीतामहात्म्यात प्रत्येक अध्यायाचे फळ वेगवेगळे सांगितलेले आहे. ( शंकराचार्यांनीही आपल्या भाष्यात हेच मत प्रतिपादन केले आहे. ) श्रीकृष्ण म्हणजे प्रत्यक्ष नारायण. ' शंकरः शंकराचार्यः ' म्हणजे शंकराचार्य प्रत्यक्ष शंकराचे अवतार. ' शिवस्य हृदयं विष्णुः विष्णोश्च हृदयं शिवः ' मग शंकराचार्यांचे बोलणे कसे चुकेल? असे असूनही बुद्धिमान लोकांना पुनः भ्रम व्हावा हे केवढे आश्चर्य !

' सर्वोपनिषदो गावा ' म्हणजे गीता हे सर्व उपनिषदांचे सार आहे. उपनिषदे ही ज्ञानप्रतिपादनार्थ निर्माण झाली. मग त्यांच्या सारा-मध्ये ज्ञानाशिवाय दुसरे काय असणार? ' संन्याशाने वेद म्हणू नयेत ' असा निषेध आहे. पण संपूर्ण गीता म्हटलीच पाहिजे असा दंडक आहे. अर्थ समजून म्हणणारास ज्ञान होईल यात शंका नाही. पण अर्थ न कळता पठण केले तरी त्यावर ईश्वर प्रसन्न होतो. कारण त्याला अर्थ कळला नाही तरी ईश्वराला अर्थ कळतो.

अर्जुनाला झालेला मोह नष्ट करण्यासाठी भगवंतानी ' नानुशो-चन्ति पंडिताः ' पासून ज्ञानच सांगितले आहे. म्हणूनच दुसऱ्या अध्यायाचे नांव ' सांख्ययोग ' असे आहे. ' संख्या, चर्चा, विचारणा सम्यक् ख्यायते आत्मरूपं यस्मिन् तत् सांख्यं नाम उपनिषद् ' असा सांख्य शब्दाचा अर्थ आहे. ज्ञानेश्वरीला अनन्यसाधारण महत्त्व आहे, ते कांही केवळ उपमा दृष्टांत, अलंकार, नादमधुर भाषा इत्यादीमुळे नाही. तर

' वाचे बरवे कवित्व । कवित्वे रसिकत्व ॥
रसिकत्वे परतत्त्व । स्पर्शु जैसा ॥ '

असे स्वतः ज्ञानेश्वरानीच सांगितल्याप्रमाणे ज्ञानेश्वरी म्हणजे परतत्त्वस्पर्शी असलेले सुंदर श्रेष्ठ काव्य आहे.

अलंकारविरहित पण भाळी कुंकुमतिलक असलेली व नखशिखान्त दागिन्याने नटलेली पण कुंकू नसलेली अशा दोन स्त्रियांत जशी सौभाग्यवती श्रेष्ठ. सोन्यामोत्याच्या मानाने कुंकवाची किंमत काहीच नाही. पण स्त्रीच्या दृष्टीने कुंकुमतितक हाच सर्व श्रेष्ठ दागिना असतो. स्त्रियांचे दृष्टीने जसे कुंकवाला तसे वाङ्मयात परतत्त्वाला महत्त्व आहे. परतत्त्व स्पर्श असलेले तत्त्वज्ञान गीतेत ठासून भरलेले आहे. म्हणूनच ती जगद्वंद्य झाली. पाश्चात्य तत्त्वज्ञ अक्षरशः गीतेला डोक्यावर घेऊन नाचले. असे सर्वश्रेष्ठ तत्त्वज्ञान भगवद् मुखांतून निघालेले असल्याने गीतेला पुण्यजनकता, फलवत्ता, अर्थवत्ता व विशिष्टता आलेली आहे.

गीतेत कर्म, उपासना व ज्ञान या तीन्हींचा उहापोह केलेला आहे. 'सर्वकर्माण्यपि सदा कुर्वाणो मद्व्यपाश्रयः' या श्लोकाने कर्माचा उपसंहार केला आहे. 'मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु' यात भक्तीची समाप्ति केली आहे व 'अशोच्यानन्वशोचस्त्वं' येथपासून सुरू केलेल्या ज्ञानाची परिसमाप्ति प्रस्तुत श्लोकांतील 'मा शुचः' या पदाने झाली आहे.

'अथातो धर्मजिज्ञासा' या जैमिनीच्या सूत्राचा धर्म व अधर्म अशी दोन पदे घेऊन अर्थ लावावा लागतो. धर्माचे ज्ञान स्वीकारण्यासाठी व अधर्माचे ज्ञान परित्यागार्थ असावे लागते. त्याचप्रमाणे या श्लोकातील धर्म या शब्दाचा अर्थ घ्यावा लागतो. साधकावस्थेत 'अधर्म' सोडलेलाच असतो. साक्षात्कारानंतर धर्महि सोडून द्यावयाचा व फक्त ईश्वराला शरण जावयाचे. ज्ञानोत्तर धर्माधर्म दोन्ही सुटतात.

द्वैतवादी म्हणतात शरण जाणारा व शरण्य असे द्वैत येत नाही का? मग गीतेत अद्वैत मत प्रतिपादन केले आहे असे कसे म्हणता येईल?

शरणागतीचे दोन प्रकार भगवंतानी सांगितलेले आहेत. १) सर्व विहित कर्मे ईश्वराच्या संतोषार्थ त्याला अर्पण करणे व २) ईश्वराला तत्त्वतः जाणून स्वतःचे स्वत्व नष्ट करणे. यापैकी दुसरा प्रकार श्रेष्ठ होय. मधुसूदन सरस्वतीनी शरणागतीचे तीन प्रकार सांगितले आहेत. १) 'तस्यैवाहं'— मी ईश्वराचाच. साधुसंतांची वृत्ती अशीच असते. २) ममैवासौ— ईश्वर माझाच— ही भावना लक्ष्मी, देवकी, यशोदा, कौसल्या यांची असते. ३) स एवाहं— तो ( ईश्वर ) मीच. ज्ञानी पुरुषाची हीच भावना असते. शरणागतीचे हे तीन प्रकार एकाहून एक श्रेष्ठ आहेत. शेवटचा अर्थ गीतेला अभिप्रेत आहे. तत्त्वज्ञान मिळवून ईश्वरात लीन होऊन जायचे. शरणागताने शरण्यच बनून जायचे. मग देव व भक्त असे द्वैत कुठे राहते ?

ज्ञान संपादन केल्याने सर्व अनर्थ व दुःखे जातात. म्हणूनच 'यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात्' असे भगवंतानी म्हटले आहे. हे अशुभ न जाता बाकीची दुःखे गेली तरी उपयोग नसतो. कारण अशुभ म्हणजे अज्ञान राहिले की ते बाकी सर्व अनर्थांना आणू शकते. कर्मयोग वा भक्ती यांनी दुःख सर्वथा जात नाही. पांडुरंग संत नामदेवाशी बोलत होता इतकी त्याची भक्ती श्रेष्ठ होती. पण ज्ञानाअभावी तो कच्चा ठरला. विसोबा खेचराकडून 'ईश्वर सर्वां घटी पूर्ण नांदे' हा उपदेश मिळाल्यावर तो पूर्ण म्हणजे ज्ञानी झाला, तेव्हांच त्याच्या सर्व दुःखांची निवृत्ती झाली.

ज्ञान्याला कर्तव्य असे कांही उरत नाही. म्हणूनच 'तस्य कार्यं न विद्यते' असे म्हटले आहे. यज्ञमंडपात दक्ष आल्यावर शंकरानी त्याला उत्थापन दिले नाही. सासरा ज्येष्ठ म्हणून शंकरानी उठून त्यांचा मान राखायला हवा होता. मान मिळाला नाही म्हणून दक्ष रागावला. पण शंकर ज्ञानी असल्यामुळे ते कर्तव्यमुक्तच होते. म्हणून त्यांना दोष नाही.

प्रत्येकाची आवड वेगवेगळी असते. कुणाला पोळी आवडेल तर कोणी भाकरी पसंत करील. त्याप्रमाणे कोणी कर्म श्रेष्ठ मानतो, तर कोणी भक्तीला प्राधान्य देतो. कोणतेही साधन श्रेष्ठ मानले तरी हरकत नाही, मात्र ते ईश्वरप्राप्तीसाठीच केले पाहिजे. कोठलेही साधन केले तरी प्रथम ज्ञान प्राप्त होते. ज्ञान झाल्याशिवाय ईश्वरप्राप्ती होत नाही. म्हणून ज्ञान हेच अंतिम ध्येय ठरते व त्यामुळे कर्म व भक्तीची व्यवस्था लावता येते. ज्ञानाऐवजी भक्ती हे प्राधान्य मानले तर ज्ञान व कर्म यांची व्यवस्था लावता येत नाही. म्हणून ती व्यर्थ ठरतात.

'सर्व धर्मान् परित्यज्य....' हा श्लोक भक्तिपर आहे असे कांही लोक म्हणतात. पण ते बरोबर नाही. कारण यापूर्वीच्या 'मन्मना भव मद्भक्तो....' या श्लोकाने भक्तीचा उपसंहार केला आहे. हा श्लोकही भक्तीच्या उपसंहाराचा मानला तर 'ज्ञानाचा उपसंहार कोठे केला?' हा प्रश्न उरतो. नुसती भक्ति केली व विहित कर्मे केली नाहीत तर कर्तव्यपराङ्मुखता हा दोष येतो. पण तीच नित्यकर्मे ईश्वरार्पण बुद्धीने केली म्हणजे भक्ति व कर्म दोन्ही साधले जाते. घरी ब्राह्मण जेवायला बोलवावयाचा असतो, पण महागाईमुळे जमत नाही. पण जावई आला तर मात्र दुष्काळी नव्हे महादुष्काळी परिस्थिति असली तरी गोडधोड केले जाते. त्यातच एक ब्राह्मण जेऊ घालायचा. ईश्वरार्पणबुद्धीने निष्काम कर्म केल्याने कर्म व भक्ति एकाच कार्यात होऊन जातात.

'इदं ते ज्ञानमाख्यातं' असे भगवंत स्वमुखाने म्हणतात. त्याअर्थी गीता हे ज्ञानशास्त्रच आहे. भक्तिशास्त्र नव्हे. परगांवहून बारा वाजून गेल्यावर तुम्ही आलात, त्यानंतर स्नान भोजन करून भजन करीत बसलात तरी बिघडत नाही. कारण भक्तीला नियम नाहीत. कर्म व ज्ञानाला नियम आहेत. वाटेल तेव्हा संध्या करता येत नाही. ती ज्या त्या वेळीच करावी लागते. तसेच वाटेल तसे वागून ज्ञान प्राप्त होणार

नाही. लहान मुलाच्या हाती धारदार शस्त्र दिल्यास तो हात कापून घेईल. ज्ञानसुद्धा वाटेल त्याला देऊन चालणार नाही. 'मनुष्याधिकारत्वात् शास्त्रस्य' असे शास्त्रकार म्हणतात. शौक्तिक भस्म कोणीही घेऊ शकेल, पण मौक्तिक भस्म सेवन करणारा विरळा. त्याचप्रमाणे पवित्र ज्ञानासाठी झटणारेही क्वचितच असतात. कारण त्यासाठी योग्यता असावी लागते, नियम पाळावे लागतात. गीताशास्त्र कोणाला सांगावे यासंबंधीचे नियम भगवान सांगत आहेत.

**इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन ।**
**न चाशुश्रूषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति ॥६७॥**

तपोहीन, गुरुभक्तीत ढिला, ज्याला ऐकण्याची इच्छा नाही व जो माझी निंदा करतो, त्याला हे ज्ञान कधीही सांगू नकोस.

तप म्हणजे इंद्रियनिग्रह. जो इंद्रियनिग्रह करूं शकत नाही, ज्याला ईश्वराबद्दल प्रेम नाही, ज्याने गुरुसेवा केलेली नाही व जो ईश्वरावर दोषारोप करतो, अशा व्यक्तीला गीताशास्त्र सांगू नये. मग गीता सांगायची तरी कोणाला? ज्यानी 'देवद्विजगुरुप्राज्ञ ...' या श्लोकात सांगितल्याप्रमाणे शारीरिक, 'अनुद्वेगकरं वाक्यं ... .... .... ' मध्ये सांगितल्याप्रमाणे वाचिक व 'मनःप्रसादः सौम्यत्वं ........ ' असे मानसिक तप केले असेल तोच गीता ऐकण्यास योग्य होय. भगवंतानी आपले ५६ कोटी यादव सोडून अर्जुनाला गीता ऐकविली. याबद्दल श्रीमद् शंकराचार्य म्हणतात, 'गुणाधिकैः गृहीतो धर्मः प्रचयं गमिष्यति' म्हणजे गुणवानास शास्त्र सांगितल्यास त्यात ऐकणाऱ्याचे गुण मिळून शास्त्राचा विस्तार होतो. अर्जुनाने इंद्रकील पर्वतावर जाऊन प्रत्यक्ष तप केले होते, 'देवद्विजगुरुप्राज्ञ' इत्यादींची सेवा केली होती. तो द्रोणांचा लाडका व ईश्वराचा भक्त होता. तो ईश्वरावर कधी दोषारोप करीत नसे, म्हणून त्याला गीताशास्त्र प्रत्यक्ष भगवानाचे मुखातून ऐकण्याचे भाग्य लाभले.

**य इमं परमं गुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति ।**
**भक्तिं मयि परां कृत्वा मामेवैष्यत्यसंशयः ॥६८॥**

हे परमगुह्य ज्ञान माझ्या ठिकाणी पराकाष्ठेचे प्रेम ठेवून जो माझ्या भक्तांना सांगेल तो निःसंशय मजप्रत येतो.

गीता अर्थ सांगून, विवरण करून किंवा नुसती भक्तांना सांगून त्यांचेकडून पाठ करून घेण्याचे फळ मोठे आहे. मात्र असे करण्यामागे आपण ही ईश्वरसेवा करीत आहोत अशी भावना पाहिजे. अशी भावना असेल तर त्याला मोक्ष मिळून मद्रूपता येईल. सुदाम्याचे पोहे कसे होते, कशांतून आणले होते या गोष्टी श्रीकृष्णाने पाहिल्या नाहीत. पाहिले फक्त सुदाम्याचे प्रेम. आपण कुठे गेलो तर आदराने दिलेला व द्यायचा म्हणून दिलेल्या चहातील फरक कळतो. खानावळीतल्या भरलेल्या ताटापेक्षा घरची फक्त मीठभाकर गोड लागते. खानावळीतील वाढणे म्हणजे पानात ढकलणे असते व लोकही नाईलाज म्हणून ते अन्न पोटात ढकलत असतात. घरच्या अन्नामागे अगत्य, प्रेम व पावित्र्य असते. प्रेमाने ईश्वराची सेवा म्हणून गीता म्हणणाऱ्यास व ऐकणाऱ्यास मोक्षप्राप्ती होते.

**न च तस्मान्मनुष्येषु कश्चिन्मे प्रियकृत्तमः ।**
**भविता न च मे तस्मादन्यः प्रियतरो भुवि ॥६९॥**

आणि मानवामध्ये त्याच्यापेक्षा अधिक प्रिय मला पूर्वी कधी झालेला नाही, सध्याही नाही व पुढेही होणार नाही.

**अध्येष्यते च य इमं धर्म्यं संवादमावयोः ।**
**ज्ञानयज्ञेन तेनाहमिष्टः स्यामिति मे मतिः ॥७०॥**

या आपल्या संवादाचे जो अध्ययन करील त्याने माझे ज्ञानरूपी यज्ञाने यजन केले असे मी समजतो.

'गुरूच्चारणपूर्वकं अनूच्चारणं अध्ययनम्' म्हणजे गुरूंनी सांगितल्या-प्रमाणे— अर्थ न समजता म्हटली तरी ती कृती म्हणजे ज्ञानरूपी यज्ञाने भगवंताची पूजा करणे होय. ही अतिशयोक्ती नसून वस्तुस्थिति आहे. म्हणणारा अज्ञ आहे व त्याला तो काय म्हणतो याचा अर्थ कळत नाही हे खरे, पण तो कोणत्या भावनेने म्हणतो हे मी जाणतो. त्याला अर्थ कळला नाही तरी मला तो कळतो व मला आत्मस्फुरण होते. म्हणून न समजता पण आदराने गीतापठण करणे हाही ज्ञानयज्ञच होय.

चौथ्या अध्यायात बारा यज्ञांचे वर्णन करून शेवटी 'श्रेयान् द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परंतप' सर्वांपेक्षा ज्ञानयज्ञच श्रेयस्कर असा सिद्धांत सांगितला. 'नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते', 'ज्ञानं लब्ध्वा परां शांतिमचिरेणाधिगच्छति,' 'सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं संतरिष्यसि' अशी ज्ञानाची महती गाईली व 'ज्ञानी त्वात्मैव मे मतम्' इतका तो मला प्रिय होतो असेही सांगितले. येथे भगवंत गीतादानाचे-गीतापठणाचे—फळ सांगत आहेत. अशा दात्यास मोक्ष मिळतो हेच ते फळ. गीतादान करणे म्हणजेच संप्रदाय. 'सम्यक् प्रदीयते अस्मै सः' असा संप्रदाय या शब्दाचा अर्थ आहे.

**श्रद्धावाननसूयश्च शृणुयादपि यो नरः ।**
**सोऽपि मुक्तः शुभाँल्लोकान्प्राप्नुयात्पुण्यकर्मणाम् ॥७१॥**

श्रद्धेने, माझा मत्सर न करता जो श्रवण करील तो देखील सर्व पापातून मुक्त होईल व ( मला मिळण्यापूर्वीचा पहिला मुक्काम अशा ) पुण्यकर्म करणाराना मिळणाऱ्या शुभलोकी ( स्वर्गात ) जाईल.

गीता ऐकताना ती न समजो पण, ही कांही तरी वायफळ बडबड चालली आहे, किंवा काय ही डोकेदुःखी ! असे न म्हणता ही परम पवित्र गीतेची अक्षरे माझ्या कर्णसंपुटात पडत आहेत व त्यामुळे मी

पावन होईनच अशी श्रद्धा बाळगून जो श्रवण करतो त्याला येथे ' नर ' अशी संज्ञा दिलेली आहे. जो गीता श्रवण करतो तो मनुष्य कोटीत जमा झाला. इतर न ऐकणारे कोणत्या कोटीतले हे ज्याचे त्याने ठरवावे. असे श्रवण करणाऱ्यांना शुभलोक म्हणजे अश्वमेध करणाऱ्यांना मिळणारे लोक मिळतात. मग अर्थानुसंधानाने पठण करणारा किंवा गीतेत सांगितल्याप्रमाणे आचरण करणारा किती प्रचंड फळ मिळवत असेल याचा विचार करा.

**कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा ।**
**कच्चिदज्ञानसंमोहः प्रनष्टस्ते धनंजय ॥७२॥**

हे पार्था तूं हे एकाग्र चित्ताने श्रवण केलेस ना? हे धनजंया तुझा अज्ञानामुळे निर्माण झालेला मोह पुरा नष्ट झाला ना?

अर्जुन अधूनमधून प्रश्न विचारून जागरूक असल्याचे दाखवून देत होता. आपल्या शंकांचे निरसन करून घेत होता. तरी भगवान त्याला ' नीट समजले की नाही व समजल्याचे फळ म्हणजे अज्ञानजन्य मोह गेला की नाही ? ' असे विचारतात. हे विचारण्यामागे ' जर अजूनही समजले नसेल तर मी पुनः सांगायला तयार आहे ' असा अर्थ आहे. गुरूने शिष्याला कोठवर बोध करायचा हे येथे भगवंतांनी दाखवून दिले आहे. शिष्याचे सर्व संशय जाऊन त्याला कृतार्थता येई-पर्यंत खरा गुरु थांबत नाही. कृतार्थता संपादन करून देतो तोच सद्गुरु.

अर्जुन उवाच :—

**नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाच्युत ।**
**स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव ॥७३॥**

अर्जुन म्हणाला, " हे अच्युता तुझ्या कृपेमुळे माझा मोह नष्ट झाला. (मला माझ्या खऱ्या स्वरूपाचे) स्मरण झाले. मी संशयरहित झालो आहे. आता तुझी जी आज्ञा असेल ती मी पाळीन. "

अर्जुन म्हणतो, " मला झालेला फक्त मोहच गेला असे नव्हे तर ज्ञानप्रकर्षामुळे मला माझ्या आत्मस्वरुपाची पुनः आठवण झाली आहे. तुम्ही जसे अच्युत म्हणजे तत्त्वापासून च्युत न होणारे—न ढळणारे आहात. तसाच मीही अच्युत झालो आहे. आता मी माझ्या आत्म-स्वरुपापासून कधीही ढळणार नाही. आता माझे सर्व संशय गेले असून तुमच्या आज्ञेप्रमाणे युद्धच काय पण तुम्ही सांगाल ते कोणतेही कर्म करावयास मी आता तयार आहे."

अर्जुनाची ही ग्वाही म्हणजे गीता जर जिवाचे कान करून ऐकली तर काय फळ मिळते त्याचे दिग्दर्शन आहे. मोह व अज्ञान नाहीसे होते व यावज्जीव ते पुनः उद्भवत नाही, हेच अशा श्रवणाचे फळ होय.

'करिष्ये वचनं तव' याचा अर्थ युद्ध करीन असा घेतला तर गीता फक्त क्षत्रियांनीच वाचावी असे होईल. पण संन्याशांनीही ती वाचली पाहिजे असा नियम आहे. स्त्री, वैश्य शूद्रांनाही गीताश्रवणाचा अधिकार आहे. म्हणून केवळ युद्ध असा अर्थ न करता 'भगवतः परम-गुरोः आज्ञा यावज्जीवं परिपालयिष्यामि' असाच अर्थ करावा लागतो.

संजय उवाच :—

> इत्यहं वासुदेवस्य पार्थस्य च महात्मनः ।
> संवादमिममश्रौषमद्भुतं रोमहर्षणम् ॥७४॥

संजय म्हणाला, " याप्रमाणे वासुदेव व महात्मा अर्जुन यांचा अद्भुत व रोमांचकारी संवाद मी ऐकला. "

संजय म्हणतो, " हे राजा मी तुझ्या सान्निध्यात राहिल्याने मला थोरामोठ्यांचे संवाद अनायासे ऐकायला मिळाले. नारद-परशुराम, व्यास मैत्रेय इत्यादी ऋषींचे व सनत्कुमार व सनत्सुजातीय यांचेही संवाद श्रवण केले. पण त्या सर्वांहून हा श्रीकृष्णार्जुनाचा संवाद आगळा आहे याबद्दल संशय नाही. असा संवाद मागेही कधी झाला नाही व पुढेही

होणार नाही. तो अद्भुत व अंगावर रोमांच निर्माण करणारा आहे. ''

अर्वाचीन काळीही या दिव्य संवादाबद्दल अनेकांनी असेच उद्गार काढले आहेत. महात्मा गांधी म्हणतात " बॅरिस्टर झाल्यापासून मी सर्व आयुष्य राजकारणात घालविले. पण अडचणीच्या प्रसंगी गीतेनेच मला अचूक मार्गदर्शन केले आहे. '' लोकमान्यानी गीतारहस्य लिहिले त्यामुळे अत्यंत कठीण असा तुरुंगवास सुसह्य झाला. त्यानी आयुष्याच्या उत्तरार्धात हा ग्रंथ लिहिला खरा. पण गीतेचे चिंतन ते बाळपणापासूनच करीत होते. गीतारहस्य हा ग्रंथ म्हणजे त्या दीर्घ चिंतनाचे सुंदर फळ होय.

उपनिषदे वृद्धानी वाचावी असा नियम आहे. गीता हे त्यांचे सार आहे. ते मात्र तरुणानी अवश्य सेवन केले पाहिजे, असे शास्त्रकार सांगतात. श्री ज्ञानेश्वर महाराज म्हणतात,

" आधीच विवेकाची गोठी । वरी प्रतिपादी श्रीकृष्ण जगजेठी ।
आणि भक्तराजु किरीटी । परिसत असे ॥ ''

श्रीकृष्णासारखा वक्ता, अर्जुनासारखा श्रोता व तत्त्वज्ञानासारखा विषय असा येथे त्रिवेणी संगम झालेला. अशा त्रिवेणी संगमात अवगाहन केल्यावर कोण पावन होणार नाही? सुवर्णाच्या अलंकारास सुगंध असून सुमधुर संगीत ऐकू यावे तसा येथे अनुपमेय सुयोग घडून आलेला आहे.

**व्यासप्रसादाच्छ्रुतवानेतद्गुह्यमहं परम् ।**
**योगं योगेश्वरात्कृष्णात्साक्षात्कथयतः स्वयम् ॥७५॥**

योगेश्वर श्रीकृष्ण स्वतः प्रत्यक्ष सांगत असता व्यासांच्या कृपेने हे योगरूप अत्यंत गुह्य मी श्रवण केले.

युद्ध निश्चित झाल्यावर महर्षी व्यास धृतराष्ट्राला म्हणाले, ' राजा तुला हे युद्ध पहावयाचे आहे का? तू जरी जन्मांध असलास तरी मी माझ्या तपोबलाने तुला दिव्य दृष्टी देतो.'

धृतराष्ट्र म्हणाला, " नको, माझी मुले हे युद्ध खेळत आहेत. युद्धात त्यांचा शेवट झाला तर तो माझ्याने पाहवणार नाही. मला दृष्टी देण्यापेक्षा मला रणभूमीवरील इत्थंभूत वर्तमान समजेल अशी कांही व्यवस्था करा. "

संजय जवळच होता. व्यासानी त्याला दूर श्रवण व दूर दर्शन अशा दोन सिद्धी दिल्या. संजयाजवळ कथनकौशल्य असल्याने हा अद्‌भुत संवाद तो जशाचा तसा सांगू शकला.

**राजन्संस्मृत्य संस्मृत्य संवादमिममद्‌भुतम् ।**
**केशवार्जुनयोः पुण्यं हृष्यामि च मुहुर्मुहुः ॥७६॥**

राजा हा श्रीकृष्णार्जुनाचा अद्‌भुत व पुण्यमय संवाद होऊन कांही काळ झाला असला तरी तो मला जशाच्या तसा आठवतो व त्याचे पुनः पुनः स्मरण होत असल्याने मला पुनः पुनः आनंदाचे भरते येते.

श्रीकृष्णानी गीता सांगितली ती ईश्वररूपाने, म्हणून गीतेत 'भगवान उवाच ' असे आहे. ' श्रीकृष्ण उवाच ' असे म्हटलेले नाही हे लक्षात ठेवण्यासारखे आहे. पांडवांचे राज्य चालू झाल्यावर सर्वत्र शांततेचे वातावरण असता अर्जुनाने पुनः श्रीकृष्णाजवळ गीता ऐकण्याची इच्छा प्रदर्शित केली. पण श्रीकृष्णानाही परत तशी गीता सांगता आली नाही. अर्जुनाला त्यावेळी जे सांगितले ती ' अनुगीता ' म्हणून प्रसिद्ध आहे.

**तच्च संस्मृत्य संस्मृत्य रूपमत्यद्‌भुतं हरेः ।**
**विस्मयो मे महान्राजन्हृष्यामि च पुनः पुनः ॥७७॥**

भगवान व्यासांच्या कृपेने भगवंतानी अर्जुनाला दाखविलेले विश्वरूपही मी पाहिले. तेसुद्धा मला आठवते व ते श्रीकृष्णाचे अद्‌भुत विश्वरूप आठवून मला आश्चर्य वाटते. ते आठवले की अंगावर रोमांच उभे राहतात व पुनः पुनः आनंदच होतो.

यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ।
तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ॥७८॥

जेथे योगेश्वर कृष्ण व जेथे धनुर्धर पार्थ असेल तेथे श्री, विजय, ऐश्वर्य व अढळ नीति हे निश्चित आहे, अशी माझी धारणा आहे.

राजा लक्षात ठेव, श्रीकृष्ण हा कांही सामान्य मानव नाही. तर तो प्रत्यक्ष परमात्मा आहे. सर्व योगांचा अधिपति असा योगेश्वर श्रीकृष्ण व गांडीवधन्वा पार्थ हे दोघे ज्या पक्षाला आहेत, तेथे श्री म्हणजे राज्यलक्ष्मी, शत्रूवर विजय, भरभराट व नीति असणारच, असे माझे पक्के मत आहे.

राजा आता विजय कोणाचा होईल ते तूच ठरव. अजूनही वेळ गेलेली नाही. विचार कर व पुत्रांचा नाश टाळावयाचा असेल तर पांडवाबरोबर संधि कर.'

संजयाचे हे बोल ऐकून धृतराष्ट्र म्हणाला, ' संजया, माझे पुत्र माझ्या ताब्यात नाहीत. ते माझे ऐकणारे असते तर ही वेळ आली नसती. म्हणून त्यांना मी काही सांगू शकत नाही. पण मी तुला,

' धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः ।
मामकाः पांडवाश्चैव किमकुर्वत संजय ॥ '

अशी विनंति करतो. तेवढेच माझ्या हाती आहे.'

इति श्रीमद् भगवद् गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे ' सर्वगीतार्थसंग्रहो ' नाम अष्टादशोऽध्यायः ॥

# अथ गीताध्यानम् ॥

ॐ पार्थाय प्रतिबोधितां भगवता नारायणेन स्वयं
व्यासेन ग्रथितां पुराणमुनिना मध्येमहाभारतम् ।
अद्वैतामृतवर्षिणीं भगवतीमष्टादशाध्यायिनीम्
अम्ब त्वामनुसंदधामि भगवद्गीते भवद्वेषिणीम् ॥ १ ॥

नमोऽस्तु ते व्यास विशालबुद्धे फुल्लारविन्दायतपत्रनेत्र ।
येन त्वया भारततैलपूर्णः प्रज्वालितो ज्ञानमयः प्रदीपः ॥२॥

प्रपन्नपारिजाताय त[illegible]पाणये ।
ज्ञानमुद्राय कृष्णाय गीतामृतदुहे नमः ॥ ३ ॥

वसुदेवसुतं देवं कंसचाणूरमर्दनम् ।
देवकीपरमानन्दं कृष्णं वन्दे जगद्गुरुम् ॥ ४ ॥

भीष्मद्रोणतटा जयद्रथजला गान्धारनीलोत्पला
शल्यग्राहवती कृपेण वहनी कर्णेन वेलाकुला ।
अश्वत्थामविकर्णघोरमकरा दुर्योधनावर्तिनी
सोत्तीर्णा खलु पाण्डवै रणनदी कैवर्तकः केशवः ॥ ५ ॥

पाराशर्यवचःसरोजममलं गीतार्थगन्धोत्कटं
नानाख्यानककेसरं हरिकथासम्बोधनाबोधितम् ।
लोके सज्जनषट्पदैरहरहः पेपीयमानं मुदा
भूयाद्भारतपङ्कजं कलिमलप्रध्वंसि नः श्रेयसे ॥ ६ ॥

मूकं करोति वाचालं पङ्गुं लङ्घयते गिरिम् ।
यत्कृपा तमहं वन्दे परमानन्दमाधवम् ॥ ७ ॥

# अथ श्रीमद्भगवद्गीतामाहात्म्यम्

गीताशास्त्रमिदं पुण्यं यः पठेत्प्रयतः पुमान् ।
विष्णोः पदमवाप्नोति भयशोकादिवर्जितः ॥ १ ॥

गीताध्ययनशीलस्य प्राणायामपरस्य च ।
नैव सन्ति हि पापानि पूर्वजन्मकृतानि च ॥ २ ॥

मलनिर्मोचनं पुंसां जलस्नानं दिने दिने ।
सकृद्गीताम्भसि स्नानं संसारमलनाशनम् ॥ ३ ॥

गीता सुगीता कर्तव्या किमन्यैः शास्त्रविस्तरैः ।
या स्वयं पद्मनाभस्य मुखपद्माद्विनिःसृता ॥ ४ ॥

भारतामृतसर्वस्वं विष्णोर्वक्त्राद्विनिःसृतम् ।
गीता गङ्गोदकं पीत्वा पुनर्जन्म न विद्यते ॥ ५ ॥

सर्वोपनिषदो गावो दोग्धा गोपालनन्दनः ।
पार्थो वत्सः सुधीर्भोक्ता दुग्धं गीतामृतं महत् ॥ ६ ॥

एकं शास्त्रं देवकीपुत्रगीतमेको देवो देवकीपुत्र एव ।
एको मन्त्रस्तस्य नामानि यानि कर्माप्येकं तस्य देवस्य सेवा ॥७॥